# चांदोबातील नवलाई



### जागे रहाण्याचा नवा विक्रम

इंग्लडचा रहिवासी मारीस वेसनने लागोपाठ ४२२ तास १९ मिनीटे न झोपता जागण्याचा १९६६ मध्ये जागतिक विक्रम केला. परंतु त्याहून मोठा विक्रम कॅनडातील रहिवासी विक्टर जाबो नावाचा एका विद्यार्थ्याने त्यापेक्षा तीन मिनीटाने जास्त जागून जागतिक विक्रम मिळविला.

### एका पायावर उभें रहाण्याचा जागतिक विक्रम

श्रीलंकाचा रहाणारा एक कुमार आनंद ह्याने ३३ तास एका पायावर उभे रहाण्याचा जागतिक पराक्रम करून दाखविला.





### बुद्धिमान बालक

बेलग्रेड येथे रहाणारा दहा वर्षाचा मुलगा मायिडराग मियोतर ह्याला कॉलेजच्या वीस वर्षाच्या विद्यार्थ्यांच्या वर्गात शिकण्याची परवानगी देण्यात आली. विज्ञानशास्त्र व गणित ह्याचा अभ्यास करणाऱ्या ह्या छोट्या बालकाने जन्म झाल्यानंतर सात महिन्याच्या आतच बोलायला सुरवात केली. व दोन वर्षाच्या आतच लिहायला वाचायला शिकला.

## तुम्हांला माहीत आहे का ?

१. तुम्ही सांगू शकाल का ? की अंतराळात कृत्रिम उपग्रहात प्रवेश करून दाखविण्याची कल्पना सर्वात प्रथम कोणत्या वैज्ञानिकाला सुचली ?

२. जन्मत:च दांत असणारी प्रसिद्ध व्यक्ति कोण ?

३. काय तुम्ही सांगू शकाल ? सतत् आपल्या खिशात घुबड बाळगणारी प्रसिद्ध महिला कोणती ?

४. इतिहासात सर्वात प्रथम साफ दाढी करून दाखविणारी व्यक्ति कोण होती ?



# व्यापारातील दक्षता

**सु**शिलपुर नगरात मंदारगुप्त नावाचा एक गडगंज व्यापारी रहात होता. त्याला मुलगा नव्हता. पण एकुलती एक मुलगी होती. तिचे नाव सुवर्णा होते. मंदारगुप्तचा विचार होता की; तिच्या योग्य मुलगा पाहून तिचे लग्न करून द्यावे व तिच्या नवऱ्याच्या हातात आपला सर्व व्यापारधंदा सोपवून आपण विश्रांती घ्यावी.

ह्यासंबधी त्याने आपल्या बायकोचा सल्ला घेतला. तिने आपल्या जवळच्या नात्यातला कुंदन तिच्या योग्य आहे म्हणून सल्ला दिला. परंतु मंदारगुप्तला त्यांच्या ओळखीचा चंद्रपालच तिच्या योग्य असावा असे वाटले.

त्या वेळी त्याच्याकडे बऱ्याच वर्षापासून काम करणारा सुंदर नावाचा मुलगा तेथेच होता. त्याने आपल्या मालकाला नम्रस्वरात विचारले–" साहेब, मी आपल्याला सल्ला देण्या योग्यतेचा नाही. परंतु आपल्याला वाईट वाटत नसले तर एक उपाय सुचवावा म्हणतो !"

"सांग ! काय सांगणार आहेस ? मंदारगुप्तने विचारले.

"आपल्या दोघांचा विचार आहे की, सुवर्णाचा होणारा पती व्यापारात दक्ष व कुशल असावयास पाहिजे. तर ह्याकरीता कुंदन व चंद्रपालची परिक्षा घेतली तर काय हरकत आहे ?" सुंदरने आपली कल्पना व्यक्त केली.

"ती कोणती परिक्षा आहे?" मंदारगुप्तने विचारले.

"त्या दोघांना आपण सुवर्णदीपला पाठवावे व तिथे जाऊन त्यांनी ही माहीती काढली पाहिजे की ; तेथे कोणता व्यापार चांगला चालतो. ह्यावरून तरी आपल्याला



त्यांची व्यापारातील कुशलता दिसू शकेल." सुंदरने उपाय सांगितला.

"काय स्वर्णदीप बरोबर व्यापार? त्या देशाचे नावच सुवर्ण आहे. अरे, पण मागची दोन वर्षे तेथे पाऊस पडला नाही. त्यामुळे सर्व जनतेला दुष्काळ सहन करावा लागत आहे." मंदारगुप्त म्हणाला.

"मालक, ह्याकरीताच आपण त्या दोघांना त्या देशात पाठवायचे. इतर देशांतील व्यापाराचे फायदे काय ते त्यांना माहीत आहेत. आत खरे तर त्या दोघांना ह्या गोष्टीचा उलगडा झाला पाहिजे की; दुष्काळ व दुर्भिक्षान तडफडणाऱ्या देशांला वर्तमान व भविष्यकाळात कोणत्या प्रकारच्या वस्तु विकल्या तर आपल्याला लाभदायक होतील." सुंदरने सांगितले.

अशी परीक्षा पहाणे मंदारगुप्तला पण योग्य वाटले. त्याने कुंदन व चंद्रपालला तसेसांगून सुवर्णद्वीपला पाठवले. थोड्या दिवसांनी ते दोघे सुवर्णद्वीपहून सुशिलपुरला परत आले. मंदारगुप्तने सुंदरला बोलावले त्याच्या समोर कुंदनला प्रश्न विचारला– "सांग, सुवर्णद्वीपमध्ये कोणत्या प्रकारच्या वस्तुंची मागणी आहे. आणि कोणती वस्तु विकली तर त्या पासून आपल्याला भरपुर फायदा होईल."

"मला कळत नाही! खरे तर नविन व्यापार सुरू करण्याकरीता तुम्ही सुवर्णदीप कशा करीता निवडलेत. तिथली परिस्थिती आपल्या दृष्टीने तर अत्यंत भयंकर आहे. तरी सुद्धा आपण त्या देशांत व्यापार करू इच्छिता. जर व्यापार करावयाचाच आहे तर त्या देशात खाद्यपदार्थ पाठवणे आपल्याला लाभदायक होतील. त्या देशांत खाद्यपदार्थांची खूप मागणी आहे. ह्या व्यापारांने आपण लाखो रूपये कमावू शकतो." कुंदनने आपले म्हणणे सांगितले.

त्यानंतर मंदारगुप्तनी चंद्रपालला बोलावणे धाडले. व त्यालाही कुंदनला विचारलेलाच प्रश्न विचारला. तेव्हां चंद्रपालने सांगितले–" जर आपल्याला सुवर्णद्वीप बरोबर व्यापार करावयाचा असेल तर, तेथे फाटके तुटके कपडे घालून रस्त्यावर भटकणारे लोक खूप आहेत. परंतु स्वच्छ नविन कपडे घालून फिरणारा मला एकही माणूस दिसला नाही. माझ्या मते तर तुम्ही व्यापारातील जास्त अनुभवी आहात. त्यामुळे ह्याहून जास्त मला सांगण्याची जरूरी नाही."

त्यानंतर मंदारगुप्तने दोघा तरुणांना पाठवून दिले. व त्याने सुंदरला सांगितले– "मी माझा जवळचा नातलग म्हणून चंद्रपालला आपली मुलगी द्यावी असा विचार केला होता. परंतु त्याची व्यापाराबाबतची बुद्धिमत्ता पाहून मी त्याला देण्याचा विचार बदलला. आपण घेतलेली परिक्षा कुंदनच्या बाबतीतच ठिक दिसली. त्यामुळे मी त्यालाच आपला जावई करुन घेऊ इच्छितो."

त्यावर आश्चर्य करीत सुंदर म्हणाला– "मालक, मला समजले नाही. चंद्रपालने दिलेल्या व्यापाराबाबतीतील अनुभव ह्याचा आपण चुकीचा निर्णय कां, घेतलात? मला तर वाटते ह्या परिक्षेत चंद्रपालच यशस्वी आहे."

"ते कसे? तू मला समजेल असे सविस्तर सांग." मंदारगुप्त म्हणाला.



प्रत्यक्ष रूपात दिसणाऱ्या गोष्टी कोणताही साधारण व्यापारी कोणतीही अडचण न पडता अजमावू शकतो. परंतु भविष्यातून प्राप्त होणाऱ्या या. गोष्टीचा अंदाज प्रथमच लावणे ह्यातच व्यापाऱ्याचे कौशल्य व दक्षता प्रकट होते. उदाहरण म्हणजे. कुंदनचे म्हणणे घ्या. त्याने फक्त सध्या होणाऱ्या स्वर्णद्वीप मधील व्यापाराबाबतीतच मिळणारी संधी जाणली. व मोठी चूक केली. आपल्याला खाद्यपदार्थाचा व्यापार करावयाचा म्हणजे राजाची परवानगी घेतली पाहिजे. आपण तसेच आणि गुपचुप खाद्यपदार्थ पाठवत राहिलो तर आपला माल लुटला जाण्याची शक्यता









आहे. तसे झाले तर आपल्या हातात एक पैसाही येणे शक्य नाही सुंदरने सांगितले.

मंदारगुप्तने होकारार्थी मान हलविली. व म्हटले–"चंद्रपालच्या सांगण्याप्रमाणे आपण जर कापडाचा व्यापार केला तरी सुद्धा तशीच परिस्थिती आपल्यावर येऊ शकेल नां?"

"चंद्रपालने आपल्याला ताबडतोब वस्त्रांचा व्यापार करण्याबाबत सुचविले नाही. परंतु त्या करीता आधीच्या उपाय योजना करण्याचा सल्ला दिला. त्याने त्यापेक्षां जास्त सांगण्याची जरूरी दाखविली नाही. कारण आपल्यासारख्या अनुभवी व्यापाऱ्याला जास्त सांगण्याची काय जरूर. ह्यावरूनच त्याची व्यापारा बाबतची प्रगल्भता दिसून येते. आपल्या गावात अनेक कुशल विणकर आहेत. सध्या काही काम नसल्यामुळे ते बेकार बसलेले आहेत. त्यामुळे स्वस्तातले कापड त्याच्याकडून आपण विणून घेतले पाहिजे." सुंदर म्हणाला.

ह्यावर मंदारगुप्तला आनंद झाला तो म्हणाला–"हो, हो! तू बरोबर सांगतोस पण तो देश दुष्काळापासून मुक्त झाला तरच नां!"

कोणत्याही देशात पाऊस कायमचाच बंद रहाणार नाही. पुढच्या वर्षी पाऊस पडेल. त्या देशात पाऊस होईल तेव्हां तेथील परिस्थिती नक्कीच सुधारेल. तेव्हां ते लोक नक्कीच आपले फाटके कपडे पाहून घृणा करू लागतील. व अन्नानंतर प्रत्येक मनुष्याला कपड्याचीच जरूरत असते. त्यामुळे सुक्ष्मदृष्टी असलेला चंद्रपालने आपल्याला असा सल्ला दिला." सुंदर म्हणाला.

मंदारगुप्तला समजले की, चंद्रपालची बुद्धिमत्ता किती थोर आहे. त्यानंतर त्याने आपली मुलगी सुवर्णा हिचा विवाह चंद्रपाल बरोबर थाटामाटात लावून दिला.

ह्यानंतर चंद्रपालने आपली व्यापाऱ्यातली चतुरता एक दोन वर्षाच्या आत सासऱ्याला दाखवून दिली.






माहिष्मती नगरातील राजा यशोवर्धन हा साठ वर्षांचा होता. आता तो वृद्ध झाला. वयाच्या विसाव्या वर्षीच त्याचा राज्याभिषेक झाला होता. त्याने नंतर स्वतःच्या शौर्य व पराक्रमाने आपल्या राज्याचा विस्तार वाढविला. एवढ्या विशाल राज्याचा अधिपती होऊन सुद्धा म्हातारपणापर्यंत त्याला मानसिक शांती मिळाली नाही. ह्याचे मुख्य कारण त्याचे दोन मुलगे होते.

तपोवर्धन व गुणवर्धन. मोठा मुलगा तपोवर्धन पंचवीस वर्षांचा होता. लौकीक व्यवहाराच्या बाबतीत त्याच्या मनात जरा देखील अभिरुची नव्हती. तो सदा-सर्वदा आपला वेळ धर्म ग्रन्थांचे वाचन व वेदांता संबंधी सुक्ष्म विषयांची चर्चा करण्यातच घालवित असे.

छोटा मुलगा गुणवर्धन वीस वर्षांचा होता. त्याची मानसिक स्थिती मोठ्या मुलाच्या अगदी विरुद्ध होती. तो नेहमी भोग विलासात आपला वेळ घालवित होता. त्याला धर्म अधर्माचे बिलकूल ज्ञान नव्हते. खोटे बोलणारे दुष्ट, कपटी स्वभावाचे अनेक तरुण लोक त्याचे मित्र होते.

यशोवर्धनला आता आपले उरले सुरले आयुष्य कोणत्यातरी आश्रमात -देवाचे स्मरण व ध्यान धारणेत घालवायचे होते. पण त्याने विचार केला की, राज्याचा त्याग करण्याआधी एखादा समर्थ व्यक्ति कडे आपला राज्यकारभार सुपूर्द करावा.



नाहीतर राज्यात अंदाधुंदी माजेल. राज्यकारभाराच्या बाबतीत जरा देखील अभिरुची नसणारा त्याचा जेष्ट मुलगा तपोवर्धन हा त्याच्या एवढ्या पसरलेला राज्यविस्ताराचा भार सांभाळण्या लायक नव्हता. त्याला राज्य देणे बरोबरही नव्हते. आता राहिली धाकटा मुलगा गुणवर्धनची गोष्ट.

गुणवर्धनचे सर्व प्रकारचे गुण यशोवर्धनने ऐकले होते. त्याने त्याला कित्येक गोष्टी करीता रागावले सुद्धा होते. राजाला अत्यंत आश्चर्याचीच गोष्ट वाटत होती की, एवढ्या लहान वयात असले व्यवहार हा कसे काय करू लागला.

त्याला वाटू लागले की; जर राज्याचा भार त्याच्यावर टाकला तरच तो निश्चित सुधारू शकेल.

पण राजाने जेव्हां ह्या संबधी मंत्री व सामंत ह्यांच्याशी विचार विनिमय केला. तेव्हां त्यातील काहींनी गुणवर्धनला राज्यकारभार सोपवण्याविषयी विरोध दर्शविला. त्याच बरोबर त्यांनी आपला असा संशय व्यक्त केला की; मोठा राजकुमार असतांना जर धाकट्या राजकुमाराला राज्यकारभार दिला तर जनतेमध्ये अशांतता माजेल.

धार्मिक वृत्ती व सदाचार संपन्न अशा तपोवर्धनला महिष्मती नगरचा राजा करणे सर्वात जास्त हिताचे होईल.

परंतु हा सल्ला राजाला आवडला नाही. त्यांना असे वाटले की, क्षत्रिय धर्मात कोणत्याही प्रकारची इच्छा न बाळगणारा आपला मोठा मुलगा राजा बनल्यावर कोणत्याही मंत्र्यांच्या हातातले खेळणे बनून राहिल. त्याच बरोबर त्यानां अशीही भीती वाटत होती की; एवढा रक्तपात करून वाढविलेले साम्राज्य आपल्याच वंशातून निघून परक्यांच्या आधिन जाईल.

अशा तऱ्हेने अनेक शंका व भयाने ग्रासून जाऊन राजा शेवटी एका निर्णयाला येऊन





पोहोचला. तो निर्णय त्याने आपल्याच राज्यातील सामंत श्रेष्ठ मंडळी व मुख्य नागरीक यांचा समावेश करून त्याच्यां समोर मांडला की, आपला लहान मुलगा गुणवर्धन ह्याला आपला वारस ह्या नात्याने त्याची मंजूरी घेणे.

ह्यानंतर काही दिवसांनी राज्यातील प्रमुख श्रेष्ठ व्यक्ति, वडील माणसे व सामंत ह्यानां त्याकरीता निमंत्रित केले गेले. व राजा यशोवर्धन यांने आपला विचार त्यानां बोलून दाखविला. त्याच बरोबर त्यानां राजाने असे आश्वासन पण दिले की, आपण राज्याचा त्याग केल्यावर गुणवर्धनचा राज्याभिषेकाच्या वेळी त्याचा मोठा मुलगा तपोवर्धन यांने कोणत्याही प्रकारचा अडथळा आणू नये.

वाईट वागणुक असलेल्या गुणवर्धनला राज्यकारभार देऊ नये असे सर्वांना वाटत होते. परंतु राजा समोर प्रकट करायला सर्वांना संकोच वाटत होता. अशा स्थितीत वीरपुरचा सरदार सुर्यवर्मा ह्याने हसत उभे राहून गुणवर्धनच्या अत्याचारा व कृत्याचे दर्शन सर्वांना करविले. व असाही विचार सांगितला केला की, कोणत्याही दृष्टीने गुणवर्धन राजा बनण्यास लायक नाही.

सूर्यवर्माने सांगितल्या बरोबर सभेत सर्वत्र हास्यध्वनी निनादू लागला. इतर अनेक राजांनी गुणवर्धनबद्दल अनेक गोष्टी सांगितल्या व असे म्हटले; काही वर्षे यशोवर्धननेच राज्यभार करावा व तेवढ्यात त्याचा जेष्ठ मुलगा तपोवर्धन ह्याला राज्याच्या कामकाजा विषयी माहिती द्यावी. व त्याच्यात राज्यभार करण्याची आसक्ती आणावी.

यशोवर्धन काहीवेळ कोणताच निर्णय घेऊ शकला नाही. अनेक सरदार राजे प्रमुख व्यक्ति यांच्या विचाराने त्याचा लहान मुलगा गुणवर्धन ह्याला राज्यावर बसविले तर राज्यात अराजकता पसरेल व देशात भांडणे लागतील. आपल्याच सरदारांच्यात मुख्य असलेला सुर्यवर्मा असे

झाले तर मदत करेल नक्कीच राज्यात फूट पाडायला खरे तर राज्यात शांती संरक्षण रहावयास पाहिजे. आपल्या समोर एकच उपाय आहे. तो म्हणजे राज्याचा त्याग करण्यापेक्षां राज्यकारभार करावा. व त्याने आपला विचार बदलला. ते ऐकून सर्व प्रजा आनंदीत झाली.

सभा संपल्यानंतर राजा यशोवर्धन आपल्या मंत्र्याला बरोबर घेऊन उद्यानात गेला. तेथे राजाने मंत्र्याचा सल्ला घेतला. मंत्र्याने सांगितले की, ह्या-बाबतीत सूर्यवर्मा बरोबर एकांतात विचार विनिमय करणे योग्य.

मंत्र्याने राजाला सुचविले की, सूर्यवर्मा सर्व सरदारांच्यात शक्तिशाली आहे. तेव्हां त्याला आपल्याकडे ओढले की; हे संकट दूर व्हायला वेळ लागणार नाही.

तेव्हां सूर्यवर्माला तेथे बोलावून आणण्यात आले. राजा यशोवर्धनने त्याला आदरपूर्वक आपल्या समोर असलेल्या आसनावर बसण्यास सांगितले व म्हटले– "सूर्यवर्माजी, आजच्या समारोहात तुम्ही जे विचार मांडलेत ते मला पसंत नाहीत. तरीही मी तुमच्या साहस पराक्रमाची स्तुती करतो. मला माहित आहे की वीरपुरचे सरदार नेहमीच राजभक्त राहिले आहेत. गुणवर्धन लहान आहेच. परंतु तुमच्या सारख्या व्यक्तिचे त्याला मार्गदर्शन, सहयोग, समर्थन जर मिळले तर तो एक योग्य राज्य कारभार करू शकेल. हाच माझा विचार आहे.

"महाराज! धर्म व अधर्माचे ज्ञाता युवराज साधुशिलता असलेले तपोवर्धन ह्यांना सोडून तुम्ही धाकटे राजकुमार ह्याच्यावर, राज्यभार सोपवू लागलात तर ते प्रजेच्या दृष्टीने न्यायसंगत होणार नाही." सूर्यवर्मा म्हणाला.

"तपोवर्धनला लौकिक जिवनाच्या बाबतीत काडीचेही ज्ञान नाही. तेव्हां त्याच्या हातात राज्यकारभार सोपविला तर राज्यात अंदाधुंदी माजेल." राजा यशोवर्धनने आपली शंका बोलून दाखविली.

"तपोवर्धनच्या मनांत राज्याची लालसा उत्पन्न करणे काही कठीण काम नाही. जर त्याला तो स्वता: मोठा मुलगा आहे ह्याची जाणीव करून दिली, तर तो नक्कीच राज्यकारभार करावयास तयार होईल."

ह्यावर राजाने मंत्र्याकडे संतोषाने सार्थक झाल्यासारखे पाहीले. मंत्र्याने राजाच्या म्हणण्याला दुजोरा देत सूर्यवर्माची गोष्ट बरोबर आहे असे मान हलवून सांगितले.

तरमग मी तपोवर्धनला एक वर्ष तुमच्या देखरेखी खाली ठेवतो. त्या अवधीत तुम्ही त्याच्या मनांत जनसेवेची अभिरूची निर्माण करण्याचा प्रयत्न करावयाचा व त्याच बरोबर त्याला राजाला शोभेल अशा सर्व राजोचित शिक्षा-दिक्षा याने








प्रज्वलीत करावयाचे. "ते तुम्ही करू शकाल ना?" राजाने विचारले.

सूर्यवर्माने राजाच्या म्हणण्यास होकार दिला.

त्यानंतर सुर्यवर्माने सांगीतले की, "वीरपुरला जाऊन तेथील सर्व राज्याची व्यवस्था माझा मुलगा चंद्रवर्मा ह्याच्यावर सोपवून लगेच राजधानीला परत येईन." राजाने ते म्हणणे मान्य केले.

सूर्यवर्मा राजा यशोवर्धनची भेट घेऊन आपल्या घरी परत निघाला. आणि त्याच रात्री त्याने राजधानी सोडून वीरपुरला जाण्याची तयारी केली.

इकडे सूर्यवर्मा आपल्या जाण्याची तयारी करीत होता, तर तिकडे वाटेत त्याला मारण्याचा कट रचला जात होता. ह्याची चाल चालवणारा नेता होता सर्पकेतू नावाचा सरदार. त्याचे राज्य वीरपुर राज्याच्या सीमेला लागूनच होते. तो कित्येक वर्षापासून वीरपूर राज्यावर हल्ला करण्याचा विचारात होता. परंतु ते त्याला शक्य झाले नाही. पण त्याने आता अशी मनो कामना केली की, राजा यशोवर्धनचा धाकटा मुलगा गुणवर्धन ह्याला आपल्या गटात सामिल करून घेतले तर हे काम नक्कीच यशदायी होईल.

गुणवर्धनला जेव्हां समजले की, त्याच्या वडीलांच्या मनात आपल्याला राजा करण्याचे होते. परंतु त्याला विरोध करणारा सरदार हा सूर्यवर्मा आहे. तेव्हां तो रागाने लालबुंद झाला. परंतु त्याने विचार केला की सूर्यवर्माच्या आश्रयाला इतर सर्व सरदार राजे आहेत. तेव्हां आपल्याला एकटयालाच त्याच्या सामोरे जाणे शक्य नाही. त्याला साथ देणारे त्याचे मित्र एकटे सूर्यवर्माबरोबर लढू शकणार नाहीत.

अशा प्रकारे, विचारमग्न झालेल्या गुणवर्धनला उपाय सापडत नव्हता. तेवढयात सर्पकेतू त्याला भेटावयास आला



त्यांनी दोघांनी एकमेकांचे विचार ऐकून घेतले. सर्पकेतूने गुणवर्धनला सांगितले की, थोडयाशा अंगरक्षकांबरोबर वीरपुरला जाणाऱ्या सूर्यवर्माला पहाडात अर्ध-रस्त्यावर अचानक हल्ला करून त्याचा वध करणे सोपे जाईल. त्याने गुणवर्धनला म्हटले की; सूर्यवर्माचा अंत करण्या-करीता मी सैन्याची पूर्ण तयारीनिशी तुकडी तुझ्या बरोबर देईन.

"जर तुम्ही ह्या कामात यश मिळवून दिलेत. तर मी केव्हांन् केव्हां तरी तुम्हांला नक्कीच मदत करेन. शक्तिशाली सूर्यवर्मा मेल्यावर मी निश्चितपणे ह्या देशाचा राजा बनेन." गुणवर्धन म्हणाला.

"ह्यात काहीच शंका नाही. मी प्रथमच ह्याचा अंदाज लावून सूर्यवर्मांचे राज्य हस्तगत करण्याची आवश्यक ती व्यूह-रचना करून ठेवली आहे. त्याच्या मृत्यु नंतर माझे सैन्य त्याच्या राज्यावर हल्ला करून ते राज्य काबीज करतील. आणि सूर्यवर्माचा मुलगा चंद्रवर्मा राजा बनू शकणार नाही. माझी सर्व सेना साधारण नागरीकांचे वेष घालून वीरपूरवर हल्ला व अधिकार प्राप्त करेल. परंतु राजा यशोवर्धनला मात्र असे वाटेल पाहिजे की, हे कोणत्या तरी दुष्ट सरदाराचे कारस्थान असावे. की जनते कडून त्याने




हा विद्रोह केला असावा." सरदार सर्पकेतू म्हणाला.

ह्या करीता सर्व मदत मी करतोच वेळ आलीच की, मी वडीलांना पण समजावून सांगेन की, सरदार सूर्यवर्मा प्रजाकंटक होता. आणि जर कां त्याची हत्या वीरपुर राज्याच्या वेशीवर झाली, तर ती गोष्ट आपल्याला साक्ष पुरावा द्यायला सोपी जाईल. बाकीची सारी तयारी तुम्ही करा." गुणवर्धनने सांगितले.

गुणवर्धनच्या तडजोडीने सर्पकेतूला परमानंद झाला. त्याला वाटले की, शक्तिशाली अशा सूर्यवर्माचा कांटा काढून टाकला की, गुणवर्धनला महिष्मतीचा

राजा करणे काही कठीण काम नाही. त्याच बरोबर सूर्यवर्माचा वध करून वीरपुरचे राज्य आपल्या राज्यास जोडले की, महिष्मती राज्याच्या दरबारात आपला मान व प्रभाव वाढू शकेल.

अशा प्रकारे, सूर्यवर्माच्या हत्येची सर्व प्रकारे योजना आंखून सर्पकेतू तावडतोब राजधानीतून आपल्या साथीदारांसकट वीरपुरच्या राज्यसीमेपाशी जाऊन सूर्यवर्माच्या येण्याची वाट पाहू लागला.

सूर्यवर्माला आपली हत्या करण्याचे कारस्थान रचले गेले आहे. ह्यांची काहीही कल्पना नव्हती. तो आपल्या मोजक्याच शिपायांना बरोबर घेऊन त्या रात्रीच आपल्या गावी जाण्यास निघाला. मध्यरात्रीच्या सुमारास त्याने एका ठिकाणी आपला मुक्काम केला. दुसऱ्या दिवशी सूर्योदयाच्या सुमारास पुन्हां प्रवास सुरू केला.

त्या दिवशी रात्रीपर्यंत तो आपल्या राज्याच्या वेशीपाशी येऊन पोहोचला. तो भाग सर्व खडकाळ व छोटया छोटया जंगलांने व्यापलेला होता. सूर्यवर्मा भीती मनांत न ठेवता आपला घोडा हाकीत मार्गक्रमण करीत होता. त्याच्या डोक्यात् एकच विचारचक्र चालू होते की, युवराजांच्या बाबतीत आपण घेतलेली जबाबदारी कोणत्या तऱ्हेनी सोडवली पाहिजे.

अचानक डोंगरावरून हल्लकल्लोळ ऐकू येऊ लागला. तो आकांत ऐकताच सूर्यवर्माने आपल्या घोडयाला थांबण्याचा इशारा केला. व आपल्या अनुचरांच्याकडे वळून पाहिले. तेवढयात दगडांपाठीमागून व झांडापाठीमागून लपलेले साधारण वेषातले अनेक लोक हातात शस्त्रे घेऊन घोडयांवरून त्याच्यांवर तुटून पडले. निमिक्षार्धात सूर्यवर्माने आपली तलवार म्यानातून खस्कन बाहेर काढली व तो शत्रुशी सामना देऊ लागला. परंतु तोपर्यंत त्याला त्याच्या साथीदारांपासून अलग करण्यात आले होते. सशस्त्र दहाबाराजण एकदम त्याच्यावर तुटून पडले. (क्रमश:)



# शेतकरी आणि व्यापारी

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—" राजा, मला ह्या गोष्टीचे आश्चर्य वाटते की, आपले प्रयत्न नेहमीच असफल होतात, तरीही तुम्ही आपल्या प्रयत्नांचा त्याग करत नाहीत. ह्या अर्धरात्री भयाण अशा स्मशानात तुम्हांला पाठवून कोणी तुमचा व तुमच्या राज्य-पदाचा अपमान तर करत नाही. मला वाटते की, ही गोष्ट खरी असावी जर आपल्याला त्यांचा अपमान करण्याची ही संधी मिळत आहे. तर आपण त्याच्यांवर उदारता दाखवाल कां त्यांचा प्रतिकार कराल? त्याचे उदाहरण म्हणून रत्नपाद नावाच्या एका शेतकऱ्याच्या मुलाची गोष्ट



सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कांजीवरम् गावी एक हंसपाद नावाचा शेतकरी रहात होता. त्याचा मुलगा रत्नपाद मोठा हुषार होता. त्याने गावच्या शाळेतच आपले शिक्षण पुर्ण केले. परंतु तेवढयावरच तो संतुष्ट झाला नाही. त्याने तेथून दूर असलेला एका गुरूगृही जाऊन, तेथे त्यांच्या आश्रयाला राहून बरेच ज्ञान प्राप्त केले व मोठा विद्वान पंडीत बनून आपल्या गांवी परत आला. थोडया दिवसातच त्याच्या विद्वत्तेचा समाचार राजाला मिळाला. राजाने त्याला महिना हजार चांदीची नाणी पगार ठरवून आपल्या दरबारात नोकरी देण्याचा निर्णय केला व हि गोष्ट सांगण्याकरीता त्यांनी मंत्र्याला त्याचा घरी पाठविले.

हंसपाद ही गोष्ट ऐकूनच अत्यंत आनंदित झाला की, आपल्या मुलाला राजदरबारात मोठ्या चांगल्या पदावर नोकरी मिळाली आहे.

त्याने आपल्या मुलाला रत्नपादला म्हटले—" मुला, तू मेहनत कष्ट सहन करून उच्च शिक्षण प्राप्त केले व विद्वान पंडीत झालास. राजाने स्वतःहाने तुला नोकरी देण्याचा निश्चयपण केला आहे. तेव्हां जर तू लग्न करून घराची जबाबदारी सांभाळू लागलास तर मी निश्चित होईन. तू जर हो म्हणत असलास तर, मी तुझ्या योग्य मुलगी पाहून तुझे लग्न करून देईन. तू लग्न करून राजधानीला जा व तेथे आपला संसार मांड."

रत्नपाद घाईने लग्न करण्यास तयार नव्हता. परंतु आपल्या वडीलांचे म्हणणे डावलणे त्याला योग्य वाटले नाही.

हंसपादच्या घराला लागूनच गोपीनाथ नावाच्या एका श्रीमंत माणसाचे घर होते. त्याने व्यापारधंदा करून लाखो रुपये कमावले होते. तो हंसपादचा दूरचा नातलग पण होता. लहान असतांना त्या दोघांच्यात खूपच सख्य होते.



गोपीनाथची मुलगी लग्नायोग्य झाली होती. ती दिसावयास सुंदर तर होतीच पण चलाखही व विनयशिल होती. बऱ्याच दिवसांपासून तीला आपली सुन करून घ्यावी ह्याच्या तो विचारात होता.

आपल्या मुलाकडून होकार मिळताच, हंसपाद गोपीनाथच्या घरी गेला व गप्पांच्या ओघात त्याने मुलाच्या लग्नाचा प्रस्ताव मांडला. ते ऐकताच गोपीनाथ आश्चर्यचकित झाला. व म्हणाला—"मित्रा, आपल्या दोघांच्यात मैत्री बरोबर दूरचे नाते सुद्धा आहे. परंतु आपल्यात संबंध जोडावयाला दोन गुण जमणार नाहीत. मी एका श्रीमंत घराण्यातील मुलाबरोबर माझ्या मुलीचे लग्न करून देणार आहे. आणि तसे केले नाही तर गावचे लोक मला मूर्ख ठरवून माझी निंदा नालस्ती करतील."

ते उत्तर ऐकताच हंसपाद शरमेने म्हणाला—"मित्रा, हे सांग, माझ्या मुलांत कोणती गोष्ट कमी आहे? त्याला तर राजाश्रय मिळाला आहे. महिना एक हजार चांदीचे रुपये पगार आहे. तेवढेच नाही तर स्वतःह्याच्या विद्वतेने तो कोणत्याही मोठ्या पदावर पोहोचण्याची शक्यता आहे.

"तू वाईट वाटून घेऊ नकोस पण राजधानी सारख्या ठिकाणीं एक हजार मुद्रा काय महिनाभर आयुष्य चैनीत घालविण्यासाठी पुरे होणार आहेत कां? गोपीनाथने विचारले."





हंसपाद घरी आला आपल्या वडीलांचा चिंताग्रस्त चेहरा पाहून रत्नपादला समजले की, आपले वडील गोपीनाथच्या मुलीला आपली सुन करून घेण्याच्या विचारात होते.

ह्यानंतर थोडया दिवसांनी शेजार गावच्या गोपालच्या मुली बरोबर रत्नपादचे लग्न थाटामाटाने पार पडले.

एक महिन्यानंतर रत्नपादने राजधानीला जाऊन आपला संसार मांडला. हळूहळू रत्नपादला राजदरबारात यश मिळू लागले. पण त्याची आर्थिक स्थिती सुधारली नाही. पण संसार मात्र वाढत चालला व खर्च पण वाढ लागला. त्यामुळे त्याचे मन नेहमी काळजीने व्याकुळ होऊ लागले.

रत्नपादने आर्थिक स्थितीचा विचार केला व तो परत आपल्या गावी निघून आला. तोपर्यंत हंसपाद म्हातारा झाला होता. व शेतीभाती करण्याच्या बाबतीत निकामी होता. रत्नपादने आपल्या शेतात थोडा वेळ घालवून आणखी थोडे शेत खरेदी केले व त्याने स्वतःहा शेतकी करण्यास आरंभ केला.

राजदरबारात मऊ गादीवर बसून साहित्यचर्चा करणाऱ्या रत्नपादला उन्हातान्हात खूप कष्ट करणे त्रासाचे वाटू लागले. तरी सुद्धां मनापासून श्रम करून त्याने ह्या नव्या जीवनाचा अभ्यास केला.

रत्नपादचा गावात खर्च सुद्धा कमी होता. त्यामुळे तो आपल्या मिळकतीतला काही भाग वाचवू शकत होता. अशा प्रकारे चार वर्षे निघून गेली व त्याच्याकडे बऱ्यापैकी पैसे जमा झाले. त्याने त्या पैशाने शेतभाती बरोबर व्यापार पण सुरू केला. तो गावातील शेतकऱ्याकडून धान्य आधी खेरीदी करी व काही काळानंतर शहरातील व्यापारांना चांगल्या किंमतीला विके.

अशा प्रकारे दहा वर्षे निघून गेली. रत्नपादने आणखी काही वेगळे व्यापार धंदे सुरू केले व लाखानी संपत्ती मिळविली. व एक मोठे घर बांधले ह्यावेळेस तो दुसऱ्याच्या दृष्टीला एक श्रीमंत व मोठा व्यापारी होता. त्याचा मोठा मुलगा वयात आला व त्याने वडीलांची व्यापारीची जबाबदारी आपल्या हातात घेतली. व तो एक हुषार व्यापारी बनला.



एका काळी ज्या गोपीनाथने आपल्या मुलीचे लग्न रत्नपादशी करून देण्यास नकार दिला होता. तिचे लग्न शेजारच्या गावांतील एका सधन माणसाशी त्याने करून दिले होते त्यांची मुलगी आता वयात आली. तेव्हां जाता गोपीनाथने आपल्या नातीचे लग्न रत्नपादच्या मुलाशी करून देण्याचा विचार मनात पक्का केला. कारण ह्यावेळेस रत्नपाद लक्षाधिश गणला जात होता. व त्याचा मुलगा सुद्धा व्यापार धंद्यात कुशल होता. ह्या गुणांमुळे गोपीनाथ हुरळून गेला.

एक दिवस गोपीनाथ हंसपादला भेटला व म्हणाला—"मित्रा, ह्यापूर्वी जे काही झाले ते सर्व आठवून दुःखी होऊ नकोस. दुर्भाग्यच म्हणायचे की, त्यावेळेस आपण संबंधी बनू शकलो नाही. पण आता माझ्या नातीचे लग्न तुझ्या नातूशी लावून द्यावे म्हणतो."

हंसपादला खेद वाटला तो म्हणाला—"हे केव्हांही शक्य नाही. कारण कित्येक करोडोपती माझ्या नातवाबरोबर आपल्या मुलींची लग्न करून देण्यास तयार आहेत."

हंसपादला आपल्या अपमानाचा सुड घेण्याची चांगली संधी मिळाली तो बऱ्याच दिवसापासून अशा दिवसाची वाट पहात होता. परंतु तेवढयात रत्नपाद त्याच्या मध्ये आला व म्हणाला—"बाबा, त्या जुन्या गोष्टी विसरून जा. आपल्याला आता संपत्तीची काही कमी नाही. असे म्हणत त्याने आपल्या वडीलांना समजावले व गोपीनाथच्या बरोबर संबंध जोडण्याकरीता विनविले."

ह्यानंतर हंसपादच्या नातवाचे व गोपीनाथच्या नातीचे लग्न धमधडाक्याने पार पडले.









येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! एके काळी गोपीनाथने रत्नपादचा व त्याच्या वडीलांचा अपमान केला होता. अशा स्थिती रत्नपादने गोपीनाथच्या नातीबरोबर आपल्या मुलाचे लग्न कां करून दिले? त्याच बरोबर आपल्या अपमानाचा बदला घेण्याची चांगली संधी मिळाली असतांना त्याने ती कां घालविली? काय ह्या पाठीमागे त्याचा उद्देश एक उदारशील म्हणून घेण्याचा होता? एक लक्षाधीश त्याच्या घरी लग्न संबध जोडावयास आला म्हणून होता? ह्याचे समाधान कारक उत्तर दिले नाहीस तर तुला माहीतच आहे की, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–" गोपीनाथने काही चूक केली नाही की, त्याचा बदलाच घ्यायला पाहिजे तो एक चांगला अनुभवी व्यापारी होता. शत्रुत्व प्राप्त करण्यास ज्या दर्जाची आवश्यकता असते तशीच नात्याचे संबंध जोडावयाची असते. असा विचार करूनच त्याने स्वतःह्याच्या बरोबरीच्या संपन्न माणसाच्या मुलाशी आपल्या मुलीचे लग्न करून दिले. रत्नपाद शेतकरी वर्गातून जाऊन व्यवसायातील एक मोठा व्यापारी बनला होता. त्यामुळे त्याला गोपीनाथच्या मनाची पूर्ण कल्पना होती.

आता राहिली हंसपादची गोष्ट–"तो एक लहान शेतकरी होता. त्याला माहीत नव्हते की, पैसा हा लोकांमध्ये अंतर आणतो. त्यामुळे त्याने गोपीनाथच्या वागण्याला अपमान मानले व त्याचा अपमान करण्याची संधी पाहू लागला. परंतु रत्नपाद मोठा व्यापारी होता. त्यामुळे त्याच्या मनामध्ये त्याच्याशी सुड घेण्याची भावनाच राहीली नाही.

अशाप्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृष्य झाला व झाडावर जाऊन लोबकळू लागला. (कल्पित)





# खरा मदतनीस

चंद्रपुरच्या जमीनदाराकडे केशव नावाचा दिवाण कित्येक वर्षापासून काम करीत होता. आता तो म्हातारा झाला. त्यामुळे जमिनदाराला वाटू लागले की, त्याच्या मदती करीता एका माणसाला नियुक्त करावे.

ही गोष्ट समजताच कामाच्या आशेने गावातील रामभद्र व शिवचंद्र दोघे तरूण जमिनदाराला भेटावयास आले. जमिनदाराने दिवाणाजीला त्यातील एकाला मदतनीस म्हणून निवडावयास सांगितले.

दिवाणसाहेबांनी प्रथम रामभद्रला बोलावले व म्हटले–" जमीनदारी चालवायला अनेक संकटाना तोंड द्यावे लागते. एक समस्या दुसऱ्या समस्ये सारखी रहात नाही. परंतु ज्या वेळी जे संकट येते त्यावेळी ते कोणत्या तऱ्हेने सोडवले जाते हेच महत्वाचे असते. त्याने दुसरी समस्या उत्पन्न करणे बरोबर होत नाही."

रामभद्रने त्याचे उत्तर देत म्हटले– "साहेब, ह्या पूर्वी मी अनेक जमिनदारांच्याकडे काम करून असाच अनुभव प्राप्त केला आहे.

ह्यावर दिवाण केशव म्हणाला–"एका कचेरीतील अनुभव दुसऱ्या कचेरीकरीता किती लाभदायक होत असेल हे मला माहीत नाही. परंतु मी इथल्या दिवाणी बद्दल सांगतो. इथे किती तरी कामे संकटाना धरून येतात त्याच बरोबर कठीण असतात ह्या सर्वांना एका पद्धतीत बसवून करून घेण्याकरीता काही उपाय असल्यास सांग."

माझ्यावर जी संकटे येतील त्याचा मी गंभीरतेने विचार करून मगच विचारपुर्वक

निर्णय घेईन. त्यामुळे कोणतेही काम असो त्याबद्दल मला विशेष कष्ट वाटत नाहीत." रामभद्र म्हणाला.

त्यानंतर दिवाणजींनी शिवचंद्रला बोलावून तो प्रश्न त्याला विचारला तेव्हां तो म्हणाला–"मी कोणत्याही गुंतागुंतीच्या गोष्टी सोडविण्यापूर्वी त्याचा काळजीपूर्वक विचार करून मगच बरोबर उत्तर शोधून काढतो. त्यामुळे कोणतीही गोष्ट करावयाची झाल्यास माझ्यावर कोणतेच संकट सहजासहजी येत नाही. व मगच मी ते काम आपल्या हातात घेतो.

अशा प्रकारे दोघांची उत्तरे ऐकून दिवाणजी जमिनदाराकडे गेले व त्यांनी त्यांना ही गोष्ट सांगितली.

जमिनदाराने दिवाणजींचे म्हणणे ऐकून म्हटले–"हे दोघे तरूण खुपच बुद्धीमान आहेत असे दिसते. तेव्हां ह्या दोघांपैकी कोणालाही तुम्ही ठेऊन घेतलेत तर तुम्हांलाच त्रास होईल."

"जमिनदार साहेब, अशातला भाग नाही. पण शिवचंद्रला माझा सहाय्यक म्हणून निवडता येईल."

"तुम्ही शिवचंद्रला निवडलेत ह्या पाठीमागे काही कारण आहे का?" जमिनदाराने विचारले.

"हो एक कारण आहे? कोणतीही गोष्ट करावयाची झाल्यास ती समर्थपणे सोडविण्याकरीता तिचा पूर्वीच गंभीरपणे विचार करून त्याचे कारण शोधणे व ते सोडवणे एक चांगल्या कार्याचे लक्षण समजले जाते. जर का प्रथमच आपण आपल्या मनात अनेक विचार ठरवून त्याची उत्तरे शोधलीत तर त्यात कठीण असे काही वाटणार नाही. तसेच गुण शिवचंद्रचा मध्ये भरपूर आहेत. त्यामुळे मला वाटते की; माझ्या हाताखाली काम करण्यास तोच योग्य आहे." दिवाण म्हणाला.

जमिनदार ते ऐकून आनंदीत झाला व त्यांनी शिवचंद्रला दिवाणजींचा सहाय्यक म्हणून निवडले.



# खरे-खोटे

एका देशात सुंदर सुंदर खेळणी बनवणारे कारागीर रहात होते. पक्षांचे पंख त्यांच्या पायाची नखे व त्यांच्या चामडयाचा उपयोग करून ते कृत्रिम प्राण्याच्यांत सजीवता निर्माण करीत असत. जवळून काय किंवा लांबून काय ती खेळणी खरी भासत.

एकदा त्या देशाच्या राजाने आपल्या उद्यानात त्या पक्षांच्या खेळण्याचे प्रदर्शन भरविले. ते पहायला अनेक लोक तेथे आले. त्या लोकांमध्ये एक टिकाकार पण होता. तो प्रत्येक पक्षाच्या जवळ जाऊन त्यांची पहाणी करु लागला. तो त्याला ते अत्यंत सहज व स्वाभाविक नाहीत म्हणून नावे ठेवू लागला.

शेवटी पहाता पहाता त्याला झाडाच्या फांदीवर दोन खरे पोपट बसलेले दिसले. त्यांना पाहून त्यांनी त्यांची स्तुती करीत म्हटले. त्या पोपटाची चोच पहा कशी लाल रंगाची आहे. तशा प्रकारची रंगाची मिसळ न करता कशी खेळणी बनविली आहेत. त्यांना हे ही माहित नाही की, पोपटाला कशातऱ्हेच्या काचेचा डोळा बसवावा लागतो. ह्यांचे पाय पण किती जाडे जाडे आहेत. ह्यांच्या पायाची नखे सुद्धा कशी घाण आहेत.

अशा प्रकारे ज्या पोपटांची तो टिकाकार पहाणी करत होता. त्यातील एक पोपट पंख फडफडवत उडून गेला. त्याचे पंख लागून त्याच्या जवळचा बनवलेला पोपट खाली पडला व त्याचे तुकडे तुकडे झाले. त्या टिकाकाराचे ते बोलणे ऐकणारे इतर सर्व लोक खुदूखुदू हसु लागले. तेव्हां लाजेने मान खाली घालून तो टिकाकार तेथून निघून गेला.













# प्रसंगावधान

मध्यरात्री चौथे यात्रेकरूं एका नावेत बसून नागावली नदी पार करून पलीकडच्या तीरावर जाऊन पोहोचले. त्यांना तेथून चार मैल दूर असलेल्या विक्रमपुरला जायचे होते. एक घोडागाडी विक्रमपुरला जायला तयार असलेली दिसली.

ते चौथे यात्रेकरू घोडागाडीत चढून बसले. चोहोकडे काळाकुट्ट अंधार होता. रस्ता जंगलातून जात असल्यामुळे जागोजागी बरेच खड्डे व खाचखळगे होते. थोड्या दूरवर गाडी गेली नाहीत तोच एक अस्वल आपल्या दोन पिल्लांना घेऊन रस्त्याच्या मध्यावर उभे असलेले दिसले. गाडीचा आवाज ऐकताच ते अस्वल पळाले व झाडात जाऊन लपले. ते पाहून त्यातील एक यात्रेकरू म्हणाला–"चांगलेच झाले. त्या अस्वलांनी आपल्यावर हल्ला केला नाही. मला तर वाटते रात्रीचा प्रवास करणे ह्या सारखा मुर्खपणा नाही.

त्यानंतर थोडे पुढे गेल्यावर त्यातील दुसऱ्या एका यात्रेकरूनी गाडीवानाला गाडी थांबवण्यास सांगितली. गाडी थांबताच त्याने झटक्यात खाली उडी टाकली व आपल्या अंगरख्याच्या आतून एक धारदार तलवार बाहेर काढून जोरात दरडावत म्हटले–"तुम्ही शेरसिंहाचे नाव ऐकलेच असेल. मी ह्या अस्वल व सिंहावाघा पेक्षा भयंकर माणूस आहे. इथे चोहोबाजूला जंगलात पहाडात माझ्या हुकूमाशिवाय काही चालत नाही. माझ्या सांगण्याप्रमाणे मला आपापली धन-दौलत व दागदागीने देतात त्यांच्या केसालाही मी धक्का लावत नाही. परंतु जे कोणी द्यायला कां कू करतात व आपल्या बचावाकरीता ओरडतात. त्यांना ह्या तलवारीनी कापून ह्या दरीतून मी खाली फेकून देतो तुम्ही ऐकलेत नां ? ते मी काय बोललो तुम्ही सर्वांनी आपापल्या जवळ जे काही असेल ते मला द्या." असे म्हणत त्याने आपल्या जवळचे एक कापड खाली अंथरले.

बाकीचे तिघेजण भीतीने थरथर कांपु लागले. व आपापले दागीने व पैसे काढून देऊ लागले. तेवढ्यात गाडीवान आपल्या हातातील चाबूक हवेत उंच उडवत गर्जत म्हणाला–"अरे लुटेऱ्या, चोरा. शेरसिंह तू आहेस काय? तू जेव्हां गाडीत चढून बसू लागलास तेव्हांच तुझी दुष्ट दृष्टी मला समजली. परंतु मी गप्प बसलो. मी पार्वतीपुरच्या जमिनदाराने तुला पकडून आणण्याकरीता पाठविलेला गुप्तहेर आहे." असे म्हणत तो शेरसिंहच्या जवळजवळ जाऊ लागला.

गुप्तहेर आहे म्हटल्या बरोबरच चोर थरथर कापू लागला. ते पहाताच बाकीच्याना धीर आला व तिघांनी त्याला धरून पिटवायला सुरवात केली व त्याला बेदम-मार दिला. गाडीवाल्याने त्याचे हातपाय दोऱ्यांनी बांधले. व त्याला गाडीत टाकले. नंतर गाडी विक्रमपुरला लागली.

रस्त्यात एका यात्रेकरूने त्याला विचारले–"ह्याचा अर्थं असा की, वाटसरूंना लुटणाऱ्या ह्या डाकुला पकडण्याकरीता आपल्याला गाडीवाल्याचा वेष घ्यावा लागला ही गोष्ट प्रथमच सांगितली असतीत तर आम्ही घाबरलो नसतो.





"ह्या स्थितीत ह्या शेरसिंह माझ्या हातात बंदी झाला नसता. म्हणून काही कां होवो, आज ह्या लुटेऱ्याचा खेळ समाप्त केला." गाडीवान अति उत्साहाने म्हणाला.

गाडी विक्रमपुरला पोहोचली. गाडीवानाने कोतवालाच्या घरासमोर गाडी थांबवली व दार वाजविले कोतवाल बाहेर आला व गाडीत शेरसिंहाला पाहून आश्चर्य करीत म्हणाला—"तुझ्या गाडीत प्रवास करणारे लोक शूर व पराक्रमी दिसत आहेत. शेवटी ह्याला बंदी केलेतच. मी ह्याला पकडण्याकरीता अनेक योजना आखल्या परंतु ह्याला पकडू शकलो नाही.

कोतवालाच्या तोंडून हे ऐकताच ते यात्री आश्चर्य करीत म्हणाले—" साहेब, ह्या डाकूला पकडण्याची हिम्मत व धैर्य आमच्या कुणाच्यात आहे ? गाडीवाल्याच्या रूपात असलेल्या पार्वतीपुरच्या जमिनदाराच्या ह्या गुप्त हेराने ह्याला पकडले. तेव्हां तर आमची हिम्मत वाढली व आम्ही शेरसिंहच्यावर तुटून पडलो. ह्यांनी तर आमच्या धनाचे व संपत्तीचे रक्षण केले. तेव्हां सकाळ झाली की, आपण ह्यांचा उचीत स्वरूपात सत्कार करू.

ह्या गोष्टी ऐकून कोतवालाला विस्मय वाटला व तो गाडीवाल्याला म्हणाला—"अरे लखनसिंह! हि काय गंमत आहे! तू गुप्तहेर केव्हां पासून बनलास!"

सर्व हकीकत त्याने कोतवालाला सांगितली—"साहेब, आम्ही चौघेजण होतो. कोणीही दुष्ट, चोर, दरोडेखोर कोणी कां असेना. एकाला पकडून न आणणे म्हणजे आम्हाला लज्जास्पद होते नां! म्हणून मी गुप्तहेर असल्याचे नाटक केले."

कोतवालाने गाडीवाला बनलेल्या लखनसिंहची मोठी तारीफ केली.

हि बातमी ऐकून पार्वतीपुरच्या जमिनदाराने दुसऱ्या दिवशी गावात मोठी सभा भरवून लखनसिंगच्या प्रसंगावधानाचे शौर्याचे व साहसाचे पुन्हां पुन्हां कौतुक केले. व त्याला मोठी देणगी देऊन त्याचे अभिनंदन केले.





# पापाचे फळ

ब्रह्मदत्त जेव्हां काशीवर राज्य करीत होते. त्यावेळी बोधिसत्वांनी पुतनु नावाच्या एका गरीब शेतकऱ्याच्या रूपाने जन्म घेतला. तो जेव्हां वयात आला. त्यावेळी तो आपल्या आईवडीलांचे पालनपोषण स्वतःहाच्या कमाईने करू लागला. थोड्या दिवसानंतर त्याच्या वडीलांचा देहान्त झाला. तो दिवसभर कष्ट अंग मेहनत करी परंतु तेवढ्याने त्याचे व त्याच्या आईचे पोट भरत नसे.

त्या देशाच्या राजाला शिकार खेळण्याचा भयंकर नाद होता. तो नेहमी जंगलात जाऊन शिकार करीत असे. एक दिवस राजा शिकारीला गेला असतांना एका हरणाचा पाठलाग करीत बराच लांब गेला व त्याने आपला बाण सोडला. बाण लागून ते हरीण मेले जवळपास कोणीच नसल्यामुळे राजाने हरीणाला खांद्यावर उचलून घेतले व परत येऊ लागला.

"दुपारची वेळ असल्यामुळे कडक ऊन पडले होते. शिकार खेळण्याने व हरीणाला उचलून आणल्यामुळे राजा खूप थकला होता. त्या परिस्थितीत एक मोठ्या वृक्षाच्या छायेत त्याला अत्यंत अल्हाददायक वाटू लागले. म्हणून त्याने त्या हरीणाला झाडाच्या सावलीत टाकले व तो झाडाला टेकून विश्रांती घेऊ लागला.

अचानक राजाच्या समोर एक ब्रह्मराक्षस आला व त्याच्यावर जोरजोरात किंचाळून ओरडत म्हणाला-"मी तुला खाऊन टाकीन."

"तू कोण आहेस? मला खायचा तुला काय अधिकार? राजाने ब्रह्मराक्षसाला विचारले."

"हे झाड माझे आहे. ह्याच्या सावलीत जो कोणी येतो. ह्या झाडाखालच्या



जमिनीवर जो कोणी पाय ठेवतो. त्याला खाण्याचा मला अधिकार आहे. मी ब्रह्मराक्षस आहे."

राजाने थोडेसे गंभीरपणे विचार करीत म्हटले–"तू काय फक्त आजच्याच आहारावर भागवतोस? कां रोज तुला आहार पाहिजे ?

"मला तर रोजच खायला पाहिजे!" ब्रह्मराक्षस म्हणाला.

मग तू जर मला आज खाऊन टाकलेस तर तो प्रश्न कसा सुटणार. जर आताचे खाणे ह्या हरीणाला खाऊन भागवलेस व मला सोडून दिलेस तर पहा! मी ह्या देशाचा राजा आहे. म्हणून मी रोजच्या रोज तुला आहार व सोबत एक माणुस खायला पाठवून देईन." राजा म्हणाला.

ते ऐकून ब्रह्मराक्षस आनंदीत झाला व म्हणाला–" तर तुला मी सोडून देतो, परंतु एका अटीवर ज्या दिवशी मला बरोबर खाणे मिळणार नाही. त्यादिवशी मी स्वत: येऊन तुला खाऊन टाकेन."

त्यानंतर राजाने त्या हरीणाला ब्रह्मराक्षसाच्या ताब्यात दिले व तो परत राजधानीला परत आला व त्याने सर्व वृत्तांत आपला मंत्र्याना सांगितला.

मंत्र्याने राजाला समजावित म्हटले– "महाराज! आपण काळजी करण्यासारखे काही नाही. आपल्या तुरुंगात खूप कैदी आहेत. ब्रह्मराक्षसचा आहार म्हणून त्यातील रोज एकाला पाठवून देतो.

त्या दिवसापासून मंत्री एकेका कैद्याला रोज ब्रह्मराक्षसचे खाणे घेऊन जंगलात पाठवू लागला. असे काही दिवस बरोबर चालले.

थोडया दिवसानंतर सर्व कैदी संपले. मंत्री घाबरून गेला. त्याला सुचेना त्याने दवंडी पिटविली "जो माणुस खाणे घेऊन जंगलात रहात असलेल्या ब्रह्मराक्षसाच्या वस्तीपाशी जाईल. त्याला राजा एक हजार रूपये बक्षीस देईल."

ती दवंडी ऐकून पुतनुला खूप आश्चर्य वाटू लागले. 'तो मनात म्हणु लागला.

मी एवढा मरमर जीव तोडून काम करतो तरी सुद्धा चार तांब्याची नाणी हाती येत नाहीत. पण ब्रह्मराक्षसाचा आहार बनलो तर मला इतके रूपये मिळून जातील.

असा विचार करून पुतनु आपल्या आईला म्हणाला–"आई, मी खाणे घेऊन तो ब्रह्मराक्षस रहातो तेथे जाईन. मला एक हजार रूपये मिळतील. त्या पैशांनी तुला आयुष्यभर सुखात रहाता येईल.

"बाळा, ह्याक्षणी मला कशाची कमी नाही, मी तर आनंदात आहे. तुला कुठेही जाण्याची काहीही जरूरी नाही." पुतनुची आई म्हणाली.

"आई, माझ्यावर कोणतेही संकट येणार नाही. मी चांगला सुखाने परत येईन." असे म्हणत आईला समजावत तो राजाकडे निघून गेला.

त्याने राजाला म्हटले–"महाराज, आपण मला आपल्या वहाणा छतरी, व तलवार आणि सोन्याच्या भांडयात ब्रह्मराक्षसाकरीता अन्न द्या. ते घेऊन मी जंगलातील ब्रह्मराक्षसच्या वस्तीपाशी घेऊन जाईन."

"अन्न घेऊन जाण्याकरीता इतक्या वस्तुची काय जरूर ?" राजाने विचारले.

"ब्रह्मराक्षसाला पराभुत करायला" पुतनने झटक्यात सांगितले. त्यानंतर पुतन



तलवार हातात घेतली. वहाणा पायात घालून व दुसऱ्या हातात छतरी घेऊन, सुवर्णपात्रात अन्न घेऊन दुपारच्या सुमारास ब्रह्मराक्षस जेथे रहात होता तेथे येऊन पोहोचला. परंतु तो झाडाच्या सावलीत गेला नाही. त्या झाडापासून जरा दूरवर छतरीच्या सावलीत उभा राहीला.

ब्रह्मराक्षस त्याचीच वाट पहात होता. तो म्हणाला–"तू उन्हातून बराच लांब चालत आला आहेस. थकला असशिल तर इथे झाडाच्या सावलीत येऊन आराम कर."

"नाही, मला तावडतोब इथून परत जायचे आहे. मी तर फक्त तुझ्यासाठी

खाणे घेऊन आलो आहे हे घे." असे म्हणत पुतनुने सुवर्णपात्र उन्हात खाली ठेवले व तलवारीने झाडाच्या सावलीत ढकलले.

पुतनुच्या युक्तिने ब्रह्मराक्षसाला अत्यंत क्रोध आला व त्याने किंचाळत म्हटले– "मी माझ्या अन्नाबरोबर अन्न घेऊन येणाऱ्याला सुद्धा खाऊन टाकत असतो."

"पण याद राख, तुला मला खाता यायचे नाही. मी तुझ्या झाडाच्या सावलीत आलो नाही. त्यामुळे तुला मला खायचा कोणता अधिकार आहे?" पुतनुने विचारले.

"हा तर खरा धोका आहे, दगाबाजी आहे. म्हणा मला तुझ्याशी काय करायचे मी सरळ जाऊन राजाला खाईन." असे म्हणत ब्रह्मराक्षस उसळून उठला.

तू कोणत्यातरी जन्मात भयंकर महापापे करून अशा प्रकारे ब्रह्मराक्षसाचा जन्म धारण केला आहेस. त्यामुळे राक्षस बनून ह्या झाडावर येऊन राहीला आहेस. असा निच जन्म धारण करून सुद्धा तुझी अक्कल जागेवर आली नाही नां? आताही उशीर नाही आपले मन बदल." असे म्हणत पुतनु त्याच्यावर रागावला.

त्यावर ब्रह्मराक्षसाने काळजीच्या स्वरात विचारले–"सांग! मग मी काय करू? ह्या पेक्षा चांगले आयुष्य घालविण्याचा काही उपाय आहे का?"

तू माझ्याबरोबर राजधानीला चल व तेथे किल्ल्याच्या दरवाजावर पहारा दे. तिथे मी तुला सात्वीक आहार पाठविण्याची व्यवस्था करतो. तेथे मानवाला फाडून खाण्याची जरूर नाही ती सवय तू सोडून दे." पुतनु म्हणाला.

ब्रह्मराक्षसाने ऐकले. पुतनु जिवंत परत आलेला पाहून राजाला अत्यंत आश्चर्य वाटले. तेव्हां त्याने सर्व घडलेली गोष्ट राजाला सांगितली. राजाला अतिशय परमानंद झाला व त्यानें पुतनुला आपला सेनापती केले. व त्याच्या सल्ल्याने तो सुखाने राज्यकारभार करू लागला.



## स्वतंत्रतेचा संग्राम

आपला भारत देश संस्कृति करीता खूप प्रसिद्ध आहे. विदेशी लोक कारभार करू लागले. त्यांना आपल्या देशातून बाजूला हटवण्याकरीता सगळ्यामध्ये एक प्रकारची नवी चेतना व जागृति निर्माण झाली. इंग्लंडमध्ये शिकणाऱ्या बऱ्याच भारतिय विद्यार्थांनी "लोटस एण्ड द डागर" नावाची स्थापना केली.



त्या सुमारास महाराष्ट्रात प्लेग सर्वत्र पसरला. त्यामुळे त्याचा फायदा घेऊन ब्रिटिश शिपायांनी जनतेला अतिशय त्रास दिला व अपमान केला. त्याच्या विरुद्ध बाळ गंगाधर टिळकांनी (१८३७ ते १९२०) एक जबरदस्त चळवळ सुरू केली. ते शेवट पर्यंत भारताच्या जनतेच्या प्रेमास पात्र बनले व मोठा नेता बनले.





१९०६ मध्ये सुरतला राष्ट्रीय कॉंग्रेस महासभेचे आधिवेशन भरले होते. त्या सभेत श्री. टिळक व अरविंद घोषनी असा प्रस्ताव मांडला की; भारताला पूर्ण स्वातंत्र्य मिळाले पाहिजे ह्यावर ह्याचे समर्थन करण्या करीता अरविंद घोष ह्यांच्या अध्यक्षतेमध्ये वेगळ्या रुपाने समारोह करतानां टिळ-



थोडया काळातच अरविंद जहाल पक्षाचे नेता बनले त्यानी विदेशी वस्तूंचा बहिष्कार. पंचाच्या द्वारा भांडणाचे प्रश्न सोडविणे, राष्ट्रीय शिक्षा प्राप्त करण्याला जनतेला सैनिकांची आवश्यकता इ. गोष्टीनी अरविंदनी इंग्रज राज्यकारभारा विरुद्ध घोर विरोध दर्शविला तेव्हां ब्रिटीश सैन्यांने त्याना वाईट तऱ्हेने त्रास दिला.

सन् १९१० मध्ये श्री अरविंदनी राज-नैतिक क्षेत्रातून पाय काढून त्यागपत्र देऊन आध्यात्मिक मार्ग अवलंबला. तरी सुद्धा त्यानी जनते समोर जे सिद्धान्त ठेवले होते. त्याचा उपयोग क्रांतीकारी चळवळी करीता जनतेला पुढे उपयोगी झाला. क्रांतिकारी नेता बाघ जतिन आणि त्यांचे अनुचर यांनी ब्रिटीश सैन्याशी बालासोर येथे लढून आपले प्राण त्याग केले.





कॅनाडामध्ये रहाणाऱ्या पंजाबीनी भारतीय स्वातंत्र्य चळवळी करीता. एक गदर नावाची संस्था स्थापन केली ३७२ भारतिय प्रवाशांनी भरलेल्या एक कोमगटमारू नावाच्या जहाजाला जेव्हां बाचानवर नावाच्या बंदरावर पोह्चायचे होते. तेव्हां त्याना शंका येऊन त्यांनी ते जहाज कलकत्याच्या बंदरावर नेले. ब्रिटिश अधिकाऱ्यानी त्यांच्यावर गोळया झाडल्या.

दक्षिण आफ्रिकेत गांधीनी ब्रिटिश लोकांच्या गोरे काळेच्या अत्याचारा विरुद्ध लढाई केली. ते भारतात १९२४ मध्ये परत आले. त्यांनी अहिंसा पद्धतीने स्वतंत्रता प्राप्त करण्याकरीता "सत्याग्रह" नावाची एक पद्धत निर्माण केली. बिहार महिलानी चंपादन जिल्ह्यातील शेतकरी मजुराचे संगठन करून तेथील गोऱ्याच्या अत्याचाराला तोंड दिले.





ब्रिटीशांनी स्वातंत्र्याच्या चळवळी मधील काही पुढाऱ्यांना बंदी केले. ह्यावर शांतीपूर्वक आपली असंमती दर्शविण्याकरीता १३ एप्रिल १९२९ मध्ये अमृतसर येथील जालीयनवाला बाग येथे हजारो भारतिय लोक एकत्र जमले त्यामध्ये जास्त संख्या बायका व लहान मुलांची होती. त्यावेळी अमृत-सरवर जनरल डय्यर ब्रिटिश अधि-काऱ्याचे वर्चस्व होते.

तेथे प्रथम जी सभा भरली. त्यात ब्रिटिश अधिकाऱ्यानी कोणत्याही तऱ्हेचे संकट आणले नाही. परंतु अचानक जनरल डय्यर याने नव्वद शस्त्रधारी सैनिकांना बरोबर घेऊन येऊन पूर्व सुचना न देताच त्या सभेला आलेल्या सर्व जमावावर गोळयांचा मारा केला. त्या गोळयांच्या माराने ३७९ लोक मरणपावले व १२०८ लोक जखमी झाले.














जालियनवाला बागचे हत्याकांड जिथे झाले. तेथे त्यावेळी मरणगती प्राप्त झालेल्या लोकांचे स्मारक बांधले गेले. देशाकरीता स्वतंत्रता मिळविण्याच्या हेतूने लढाई लढणारे सर्व धर्माचे सर्व प्रदेशातील हजारो लोकांच्या प्राणार्पणाचे जे दर्शन आपल्याला दिसले ते श्रद्धा व भक्तिचे स्मारक आज सुद्धा आपल्याला स्मरण देत आहे.

स्वातंत्र चळवळीचे अनेक प्रख्यात नेता त्यावेळेस त्रासदेण्या करीता अंदमानला पाठविण्यात आले. ते तेथे अनेक रोगाने त्रासून त्याचे आधीन झाले व तेथेच त्यांनी आपले प्राण सोडले.





ह्यावेळेपर्यंत महात्मा गांधी स्वातंत्र चळवळीचे प्रमुख नेता बनले. त्यांच्या आगमनानेचे चळवळीने एक वेगळेच वळण घेतले. मीठ बनवणाऱ्या गरीबांवर ब्रिटीशांनी कर लादले. त्यावर गांधीजींची संमती घेऊन हजारो लोकांनी कर भरणे नामंजुर केले व मीठाचा सत्याग्रह करून अनेक जण बंदी झाले. त्यांना अनेक प्रकारचे



# सुखी कोण आहे?

प्राचीन काळी मालव देशावर सुकेतू नावाचा राजा राज्य करीत होता. तो नेहमीच विलासात मग्न असे. त्यामुळे त्याच्या तोंडावर त्याची खोटी स्तुती करणारे अनेक जण होते. ते म्हणत असत– "महाराज, आपल्या ऐश्वर्या समोर इन्द्र सुद्धा फिका पडेल. आपल्या खजिन्यात असलेले धन कुबेरापेक्षाही कितीतरी पटीने जास्त आहे. तुमची त्याच्याशी तुलनाच होत नाही. ह्या जगतात सुखी कोण आहे? असा जर प्रश्न आला तर सर्वात प्रथम तुमचेच नाव घेऊन मगच दुसऱ्याचे घेणे योग्य." असे स्वार्थयुक्त बोलून खोटी खोटी राजाची स्तुती करीत असत.

एकदा राजाच्या दरबारात ज्ञानधनी नावाचा महात्मा आला त्याच्या महानते विषयी राजाने प्रथम बरेच ऐकले होते. म्हणून त्याचे स्वागत करीत राजा म्हणाला– "महात्मन्, आपल्या पायधुळीने माझे राज्य पवित्र बनले." असे म्हणून राजाने त्याची पादपुजा केली. आणि पंचपक्वान्न जेवावयास वाढून त्याच्याकरीता दरबारात एक संगीत कार्यक्रम आयोजित केला.

ज्ञानधनी ते सर्व पाहून गप्प राहिला. महाराजा सुकेतला वाटले की, हे सर्व पाहून लोक त्याची स्तुती करतात तशी तो करेल. परंतु त्याचे गप्प बसणे राजाला बरोबर वाटले नाही. त्याचा उत्साह मावळला. त्याला ते पाहून रहावले नाही. राजा म्हणाला–"महात्मन्! आपण अनेक देशांचे भ्रमण केलेत माझ्या सारखा सुखी तुम्हांला दुसरा कोणी आढळला कां?"

त्यावर ज्ञानधनी म्हणाले–"आमच्या गावात स्वकेशी नावाचा एक माणूस रहात होता. त्याला सर्वात सुखी म्हणून म्हणता येईल."



"स्वकेशी ? कोण आहे तो ? मी तर आजपर्यंत असे कोणते नाव ऐकले नाही. ही गोष्ट आश्चर्याची आहे." राजा म्हणाला.

"हि गोष्ट खरी आहे की, स्वकेशीने तुझ्यासारखे यश मिळवीले नाही. परंतु तो सर्वात सुखी आहे हे नक्की. कष्ट मोल-मजुरी करून त्याने आपल्या मुलाबाळांना सुखात ठेवले. नातवंडाना मांडीवर खेळवले कुठल्याही प्रकारचे चढ उतार न होता त्याने आपले आयुष्य घालविले. शेवटी साठ वर्षाचे आयुष्य आपल्या मातृभुमीवर युद्ध करून वीर मरण पत्करले." ज्ञानधनी म्हणाला.

"ठिक आहे. हे तर सांगा की कमीत कमी त्याच्यानंतर तरी माझा नंबर लागतो का ? थोड्याश्या खेदाने राजाने विचारले.

"नाही, नाही, स्वकेशी नंतर त्याच्या दोन लहान भावांचा नंबर लागतो. ते ही माझ्या गावचे रहाणारे होते. सुंदर शरिरयष्टी निर्मळ पवित्र हृदय व परोपकारी असे ते शेवटच्या घटके पर्यंत त्यांनी दोघांनी आपले प्राणार्पण केले." ज्ञानधनी म्हणाला.

ह्यावर राजा नाराज झाला व ओरडून म्हणाला—"मी असा विचार करून आपला मनांतील योजना काढल्या पण आपल्या मुखात अशी गोष्ट शोभून दिसत नाही. काय ते गरीब लोक माझ्यापेक्षा सुखी असतील कोणी ऐकतील तर हसतील."

ज्ञानधनी हसून म्हणाला—"राजन्, आपण कशाला निराश होता. ही गोष्ट तितकीच खरी आहे की, हे ऐश्वर्य व वैभव तुम्हांला स्वता:ला सुख मिळवुन देते. परंतु हे विसरू नका की, ह्या जगात कोणतीही गोष्ट शाश्वत नाही. कोण सांगू शकले की, आपण असे ऐश्वर्य किती दिवस भोगू शकू. व शेवट पर्यंत आपल्याला जीवन सुखमय जगता येईल." असे म्हणून ज्ञानी आपल्या वाटेने निघून गेले.

"प्रभु, आपण ह्यांची पांढरी दाढी पाहून धोका खाल्लात व त्याचा योग्य तो आदर सत्कार केलात. "गाढवाला गुळाची चव काय." म्हणी प्रमाणे ह्याला तुमच्या



ऐश्वर्य व सुखाच्या बाबतीत काय माहीत ? सर्व जगात जर सुखी कोण असेल तर सुकेतू राजाशिवाय दुसरा कोणी नाही. "महाराज ! सुकेतूचा जय असो !" असे म्हणत त्याच्या चोहीबाजूला असलेल्या त्यांच्या राजभाटानी त्याची स्तुती करीत जयजयकार केला. राजा सुद्धा ज्ञानधनीने सांगितलेले एक दु:स्वप्न आहे असे समजून विसरून गेला.

एक वर्ष उलटले. एकदा राजा गाढ निद्रेत असतांना राजाला एक आवाज ऐकू आला—"शत्रु अंतपुरांत घुसला आहे ! शत्रु आला आहे." तो आश्चर्यचकीत होऊन उठून बसला. तेवढ्यात राजभटाने येऊन सांगितले. "प्रभु ! सामंत राजा महाबलने आपल्या ससैन्येसह किल्ल्यावर हल्ला केला आहे. आपले सैनिक त्यांना तोंड देत आहेतच. पण काही उपभोग नाही.

दुसऱ्या क्षणीच—"महाराज महाबलचा जय असो ! अशा घोषणा देत शत्रूच्या सैन्याने किल्ल्यात प्रवेश केलेला स्वत: राजाने पाहिला.

सुकेतू राजाने विचार केला. आता एक क्षणाचा जरी विलंब लावला तरी जीवाला धोका आहे. म्हणून त्याने झटक्यात अंगावरचा राजाचा वेष काढून टाकला व साधे कपडे घातले. पण तेवढ्यात त्याला शत्रु



सेनापतीचे ओरडणे ऐकू आले—"कोण पळून जात आहे. त्याला पकडा." तेवढ्यात एका शत्रू सैनिकाने तलवार उगारली. ते पाहून राजाला वाटले आता जगण्यापेक्षा मरुन जाणे उत्तम असे समजून तो समोर येत म्हणाला—"मी पण पहातो मार पाहू."

त्याच वेळेला राजाच्या बरोबर त्याचा मुका मुलगा होता. त्याने आपल्या वडिलांवर येणारे संकट ओळखले व तो जोरजोरात ओरडून म्हणाला—"हे माझे वडील महाराज सुकेतू आहेत. ह्याना मारू नका." आश्चर्याचीच गोष्ट घडली त्या भीतीने मुक्या राजकुमाराच्या तोंडून शब्द बाहेर पडले. राजाचा वध करावयास गेलेला








सैनिक क्षणभर थांबला व त्याला पकडून त्यांने महाबलच्या समोर उभे केले.

महाबलने विचार केला की, शत्रुला जिवंत ठेवणे योग्य नाही त्याने आपल्या शिपायांना हुकून केला की–"ह्याला जिवंत जाळून टाका."

महाबलचा हुकूम मिळताच चिता बनवली, व त्याच्या मध्यभागी राजा सुकेतूला उभे केले. ते दृष्य पहायला असे लोकसुद्धा होते की, ते राजाची खोटी स्तुती करीत असत.

सुकेतूने चौफेर आपली दृष्टी वळवून पाहिले किल्ला अंतपुर बाग, असे एक एक त्याच्या दृष्टी समोरून निघून गेले तो असा विचार करून रडू लागला–"ह्या क्षणी ह्यातली कोणतीही गोष्ट माझी नाही. अरेरे! एका क्षणात हे परिवर्तन घडले. महाराजाचे वैभवपूर्ण जगलेले जिवन शेवटी कशा तऱ्हेनी संपूर्ण होत आहे. ज्ञानधनी म्हणत होता तेच खरे होते–"कोणतीही गोष्ट शाश्वत नाही! ह्या गोष्टीचा अंदाज लावला जात नाही. की जीवनाच्या शेवटच्या घटके पर्यंत सुखी कोण आहे? व दुःखी कोण? हे वाक्य खरोखरी सुवर्णाक्षरांनी लिहीण्या योग्य आहे." असा विचार करीत असतांनाच चितेला आग लावण्यात आली.

तो गद्‌गदून रडू लागला ज्ञानधनी! ज्ञानधनी! महाबलने ते शब्द ऐकले. तो विचारू लागला हा ज्ञानधनी कोण आहे?

तेथे जमलेल्या लोकांनी सर्व कहाणी सविस्तर सांगितली. त्यावर राजा महाबल विचार करू लागला–"ही गोष्ट खरी! कोणाला माहीत की, कोणावर केव्हां कशी परिस्थिती येईल. ह्याक्षणी तरी मी स्वतःला महान समजतो. पण ठाऊक नाही माझे भविष्य काय असेल. पुढच्या क्षणी काय होईल...खरे तर सुकेतूला मारणारा मी कोण? असा विचार मनात येताच. त्याला मनांपासून पश्चाताप होऊ लागला. महाबलने तावडतोब चिता विझविण्याचा हुकूम सोडला व सुकेतूला प्राणांपासून वाचविले.





# कष्टाचे धन

राम वीस वर्षांचा तरुण होता. तो जास्त शिकला सवरलेला नव्हता. तरी गप्पा मारण्यात एक नंबरचा पटाईत होता. त्यामुळे गावातील सर्वजण त्याच्याकडून गोड गोड गप्पा मारून काम करून घेत. राम गरीब स्वभावाचा असल्यामुळेच काय गावातील लोक त्याने केलेल्या कामाचे बरोबर पैसे त्याला देत नसत. त्यामुळे तो आपला उदरनिर्वाह व्यवस्थित रितीने करू शकत नव्हता. व त्याला अनेक कष्ट सोसावे लागत.

त्याच गावात सीता नावाची एक मुलगी रहात होती. रामचे मन सीतेवर जडले होते. सीतेलाही राम मनापासून आवडत होता. परंतु सीतेच्या वडीलांनी रामला बोलावून म्हटले–"अरे राम तू अत्यंत संकोची आहेस. त्यामुळे तू आपल्या बायकोला कधीही सुखी ठेवू शकणार नाहीस. जर तुझ्याजवळ कमीत कमी संपत्तीच्या नावाखाली जरी दोन एकर जमिन असेल तरच मी माझ्या मुलीचे लग्न तुझ्याशी लावून देईन.

गंगाधरच्या तोंडचे ते ऐकून राम अत्यंत काळजीत पडला. तेव्हां सीतेने गुप्तपणे रामला भेटून सांगितले–"तू घाबरू नकोस. माझे वडील तुझ्यावर नाराज नाहीत. तू जर माझ्या वडीलांना जरीचे धोतर आणून दिलेस तर ते आपल्या दोघांचे लग्न लावून देतील."

तावडतोब राम गावातील सावकाराकडे गेला व जरीचे धोतर मागू लागला.

सावकाराने निस्संकोचाने म्हटले–"ठिक आहे! मी तुला नक्की एक जरीचे धोतर देईन पण त्याच्या बदल्यात तू मला चार चांदीची नाणी द्यावयास पाहिजेत. तू जाऊन चार नाणी घेऊन ये."











ह्यापूर्वी रामने सावकाराकडे बरेच काम केले होते. परंतु सावकाराने त्याला बरोबर पैसे दिले नव्हते. तरी सुद्धा रामने तिकडे जाणुन बुजून दुर्लक्ष केले होते.

त्यानंतर गावातील अनेक जणांकडे जाऊन त्याने चांदीची चार नाणी मागितली होती. परंतु त्यातील कोणीही त्याला चार चांदीची नाणी द्यावयास तयार नव्हते. त्यावर राम अत्यंत निराश झाला. त्या दिवसापासून त्याने जास्तच कष्ट करून न खाता पिता एका आठवड्यात चार चांदीचे रुपये जमा केले.

ते घेऊन तो सरळ सावकाराकडे गेला. व त्याला ती चार नाणी देत त्याच्याकडून

त्याने जरीची किनार असलेले धोतर घेतले व तो सीतेच्या वडीलांकडे आला. सीतेचा बाप ते धोतर पाहून अत्यंत आनंदीत झाला व म्हणाला–"कित्येक दिवसांपासूनची माझी इच्छा पूर्ण होत आहे. सांग तुझी पण काही इच्छा असली तर ती मी पूर्ण करीन." "सीतेशी माझा विवाह करू द्या." रामने झटक्यात सांगितले.

सीतेचे वडील म्हणाले–"राम, तुझे गुण कौतुक करण्यासारखे आहेत. तू माझे मन खुष केलेस. देव तुझे कल्याण करो. माझ्या मुलीचे लग्न तुझ्याशी लावून दिले तर ती नक्की सुखी राहील. उद्याच मी तुमच्या दोघांचे लग्न लावून देतो."

परंतु ह्यामध्ये एक विचित्र घटना घडली. ज्या सावकाराकडून रामने जरीची किनार असलेले धोतर घेतले होते. त्याचा मुलगा बऱ्याच दिवसापासून आजारी पडला होता. परंतु कोणताही वैद्य त्याच्यावर उपचार करू शकला नाही. तेव्हां सावकार एका साधूला भेटायला गेला. साधूनी मुलाची तपासणी केली व म्हणाला–"तू जी पापे केलीस त्यामुळेच तुझ्या मुलाला आजारपण आले. मी ह्यावर औषध देतो परंतु त्याची किमत दिली पाहिजेस.

सावकाराने त्याचे म्हणजे मान्य केले तेव्हां तावडतोब साधूने त्याच्या मुलाला औषध दिले. सावकाराने त्याची किमत दिली, एक आठवडा उलटला परंतु सावकाराचा मुलगा काही बरा झाला नाही. त्यावर साधूला अत्यंत आश्चर्य वाटले सावकार आपल्या मुलाची अवस्था पाहून चिंताग्रस्त झाला.

त्याने साधुकडे जाऊन ह्याचे कारण काय ते विचारले तेव्हां साधु त्याला म्हणाला–"तू हे धन न्यायाने प्राप्त केले नाहीस त्यामुळे माझे औषध तुझ्या मुलाच्या उपयोगी पडले नाही.

"तू न्यायपुर्वक मिळविलेले धन मला दिलेस तरच माझे औषध बरोबर काम देईल. तू तर ठरलास सावकार. रोजच्या रोज तुझ्याकडे अनेक लोक येऊन आपले कर्ज फेडत असतील जेव्हां न्यायपुर्वक आलेले धन माझ्या हातात येईल तेव्हां त्याच क्षणी तुझ्या मुलाची तब्बेत ठणठणीत बरी होईल." साधूने सावकाराला सांगितले.

त्याप्रमाणे सावकाराने ज्या ज्या कर्जदारानी पैसे परत फेडले ते त्यांची नावे घेऊन साधूच्या हातात पैसे द्यायला सुरवात केली. पण जेव्हां सावकाराने रामकडून मिळालेली चार चांदीची नाणी नाव घेऊन साधूच्या हातात ठेवली तेव्हां आश्चर्य करण्यासारखी विचित्र घटना घडली. बेशुद्ध स्थितीत असलेला सावकाराचा मुलगा खाडकन उठून बसला.

"ह्रिच न्यायपुर्वक मिळवलेली संपत्ती आहे. तु ज्या व्यक्तिकडून हे धन घेतलेस ते





परत करून टाक. ते दुसऱ्याच्या उपयोगा-करीता नक्की मदतीस येईल." साधू म्हणाला.

त्यानंतर सावकाराने तावडतोब ती चार चांदीची नाणी रामच्या घरी पाठवून दिली. त्यावेळेस त्या सावकाराकडे गावचा तलाठी आला होता. सावकाराच्या मुलाची तब्बेत चांगली बरी झाल्याचे पाहून त्याने त्या साधूला आपल्या घरी बोलावणे धाडले.

साधूने तलाठयाच्या घरी जाऊन त्याच्या मुलाला पाहिले व म्हणाला—"तू केलेल्या पापाची फळे ह्या तुझ्या मुलाला भोगायला लागत आहेत. जर तुझ्या घरी न्यायपुर्वक मिळविलेले धन असेल तरच माझे औषध तुझ्या मुलाला बरे करेल.

तलाठयांनी त्याच्या बदल्यात साधूला दहा चांदीचे रुपये दिले, परंतु त्याचा मुलगा तसाच बेशुद्धावस्थेत पडून होता.

त्यावर असंतोष दाखवित साधू म्हणाला—"असे वाटते आहे की, ह्या गावांत न्यायाने धन कमावणारा कोणीच दिसत नाही हि अत्यंत काळजी वाटणारी गोष्ट आहे.

तलाठी म्हणाला—"साधू महाराज! सावकाराच्या मुलाचे दुखणे रामच्या दिलेल्या पैशाने बरे झाले ना." तर मी पण त्याच्याकडे जाऊन पैसे घेऊन येतो." असे म्हणत तलाठी त्याच्याकडे जाऊ लागला.

तेंव्हा साधुने त्याला थांबवत म्हटले—"माझे म्हणणे लक्ष देऊन ऐक रामने सावकाराला चांदीची चार नाणी दिली. हि खरी गोष्ट आहे. ह्यात शंकेचे कारणच नाही. कारण त्याने ते स्वकष्टाने कमावलेले धन होते. ते सावकाराने बक्षिस म्हणून त्याला परत केले. आता तो पैसा न्यायपुर्वक कमावलेला म्हणता येत नाही. जर त्याशिवाय रामच्याकडे काही धन असेल तर ते घेऊन ये." साधू म्हणाला.

तलाठयाने रामच्या घरी जाऊन साधूने सांगितलेली गोष्ट सांगितली तेंव्हा राम चिंता करीत म्हणाला—"महाशय! मी काय करू! माझ्याकडे ह्या चार चांदीच्या नाण्या व्यतिरिक्त एकही पैसा नाही."

तेंव्हा लाचार होऊन त्याने ती चार नाणी राम कडून घेतली व साधुला दिली नाहीत तोच तलाठयाचा मुलगा खाटवरून खाडकन् उठून बसला त्याचे दुखणे असे काही नाहीसे झाले की कोणीतरी जादू करावी.

तलाठी आश्चर्य वाटून म्हणाला—"साधू महाराज, रामच्या त्या चांदीच्या चार नाण्यांमध्ये काहीतरी महिमा आहे. त्याने सांगितले की, सावकाराने मला परत केलेल्या चार चांदीच्या नाण्यां व्यतिरिक्त काहीही नाही व तीच नाणी मला दिली. त्याच्याकडून आणून मी आपल्याला दिली.

हि गोष्ट ऐकताच संतापाच्या आवेशात येऊन साधू म्हणाला—"ह्याचा अर्थ असा... सावकाराकडून रामला जे धन प्राप्त झाले ते मी समजलो की, सावकाराने त्याला दान भावनेने प्रेरीत होऊन बक्षीस म्हणून दिले आहे. अन्याय करून दुसऱ्याचे धन जे लोक आपल्याकडे ठेऊन घेतात त्यांच्यांकडे अशीच रोगराई पसरते. न्यायाने मिळविलेले धनच त्याचे रक्षण करते." असे म्हणत साधू तेथून निघून गेला.

साधूने तलाठयाला जो उपदेश केला ते सर्व गावभर पसरले त्यांनी सर्व लोकांच्यात भीती निर्माण झाली. कारण कित्येक गावातील लोकांनी रामकडून काम करवून घेऊन त्याचे योग्य मुल्य त्याला दिले नव्हते. त्याकारणाने गावातील सर्व लोकांनी एकत्रित सहमत होऊन वर्गणी जमा केली व रामला एक घर व दोन एकर जमिन घेऊन दिली.

त्या दिवसापासून राम व सीता आपले आयुष्य आरामात घालवू लागले.

स्वकष्टाने व न्यायाने कमावलेल्या पैशांचा महिमा सर्वांनी आपल्या डोळयांनी पाहिला. त्यामुळे गावातील सर्व लोक तशाच प्रकारे न्यायपुर्वक व कष्ट करून संपत्ती कमावू लागले व रोगराई पासून मुक्त होऊन, आपापले जिवन सुखासमाधानाने घालवू लागले.



     



# स्वस्तातली फळे

एकदा मंगला व तिचा पती व्यंकटेश शेजारच्या गांवी एका नात्यातल्या लग्नाकरीता गेले होते. परत येत असतांना त्या गावचा आठवडयाचा बाजार भरला होता व तेथे केळयाचे घड विक्रीस ठेवलेले दिसले. ते पाहून मंगलाच्या मनात एक घड विकत घेण्याचा विचार आला.

तिने आपल्या नवऱ्याला ती गोष्ट बोलून दाखवत म्हटले–"हे बघा, इथे केळयांचे घड स्वस्तात असतात. आपण सुद्धा केळयाचा एक घड विकत घेऊन जाऊ या."

"पूर्ण केळयांचा घड घेऊन आपण काय करणार. आपल्याला थोडीच मुले-बाळे आहेत." व्यंकटेश नाराजीने म्हणाला.

आपण जर अर्धवट पिकलेली केळी नेली तर एक पंधरा दिवस तरी छान रहातील. इथे जो घड चार रुपयाला विकला जातो. तो आपल्या गावी दहा रुपयांच्या खाली मिळणार नाही. तुम्हीच जरा विचार करा." मंगला नवऱ्याला म्हणाली.

व्यंकटेशने बायकोला होकार दिला.

मंगलाने त्यातल्या त्यात एक मोठा घड पाहून खरेदी केला व आपल्या नवऱ्याच्या खांद्यावर दिला. त्यात कितीका फायदा होवो. परंतु तो व्यवस्थित नेणे त्याला आपल्या प्राणापेक्षा जास्त वाटले. म्हणून मध्य वाटेत त्याने तो घड खाली उतरवला.

त्याने जवळ जवळ अर्ध्या वाटे पर्यंत घड उचलून आणला होता. त्यामुळे मंगला खूप खुषीत होती. कारण बाजारा पासून घरापर्यंत तो घड घेऊन यायला नोकराने नक्कीच दोन रुपयांपेक्षा कमी पैसे घेतले नसते. आता एक रुपयात घरापर्यंत आणवला गेला असता.

रस्त्यात जो नोकर मिळाला. त्याला एक रुपया देऊन केळयाचा घड घरापर्यंत आणला. त्यामुळे मजुरीत सुद्धा एक रुपयाचा फायदा झाला. त्यामुळे तिचा आनंद गगनात मावेनासा झाला.

दुसऱ्या दिवसापासून केळयाच्या घडातील केळी एक एक करून पिकू लागली. ती खूपच चांगली लागत होती. त्यामुळे ते नवरा-बायको पोटभरून खाऊ लागले. हळूहळू त्याची भूक मंदावू लागली.

मंगला एक दिवस आपल्या नवऱ्याला म्हणाली–"पहाता नां..... अहो ! ह्या केळयामुळे आपल्या खाण्याचा खर्च सुद्धा किती कमी होऊ लागला आहे. त्यात सुद्धा फायदाच झाला.

केळी खाऊन खाऊन व्यंकटेश पूरा कंटाळून गेला. व म्हणाला–"आता जी काही केळी उरली आहेत. ती आजुबाजूच्या लोकांत वाटून टाक आता त्याचा हव्यास पुरे."

परंतु मंगलाने त्याचे म्हणणे ऐकले नाही. उलट त्याला खिजवत म्हणाली–"अहाहा ! एवढया दूरवरून कष्ट सोसून जी केळी आणली ती काय दुसऱ्यांना दान देण्याकरीता ?"

काही दिवसातच घडातील सर्व केळी पिकून गेली तेव्हां मंगला म्हणाली–"अहो, आता दोघे जेवणाच्या ऐवजी केळीच खाऊन राहू."

"खर तर, मंगला केळयाच्या घडातील एकही केळे फुकटचे कोणाला द्यायला










तयार नव्हती. त्यामुळे दोघांनी जेवणाच्या बदल्यात केळीच खाऊन ती पूर्ण संपवली."

परंतु ह्याचा परिणाम मात्र विपरित झाला ते दोघे हगवण व पोटदुखीच्या व्याधीनी त्रस्त झाले.

व्यंकटेश चेष्टेच्या सुरात आपल्या बायकोला म्हणाला—"पाहिलेस नां ! तुझा हट्टीपणा आणि फायदा. आता ह्यावर उपचार करण्याला तुझ्या बचतीपेक्षाही जास्तच खर्चाचा होणार आहे. आता प्रथम पोटदुखी पासून सुटका झाली पाहीजे.

"ही गोष्ट खरी आहे, परंतु ह्यावर एकच उपचार म्हणजे आपली पोटदुखी बंद होई पर्यंत उपवास करणे." मंगला ठसक्यात म्हणाली.

परंतु आता व्यंकटेशने तिचे म्हणणे मान्य केले नाही तो म्हणाला—"उपासाने आपल्या दोघांची शरीरे आणखीनच अशक्त होतील. त्यामुळे तो खर्च दुप्पट होईल. मी ही पोटदुखी सहन करू शकत नाही." असे म्हणून तो वैद्याच्या घरी निघून गेला.

वैद्याने त्याला तपासुन दोन रुपये घेऊन गोळ्या दिल्या व प्रत्येक जेवणानंतर दोन दोन खावयास सांगितल्या.

दोनच दिवसात व्यंकटेशची पोटदुखी बंद झाली. परंतु मंगलाची पोट दुखी जास्तच वाढली.

खरी गोष्ट मंगलाला फायदा करून घेण्याची व्याधी लागली होती. त्यामुळे तीने प्रत्येक जेवणानंतर दोन गोळ्या खाण्याऐवजी एकच गोळी खाल्ली होती. त्यामुळेच असा परिणाम झाला होता.

शेवटी व्यंकटेशला वैद्याना घरी आणणे भाग पडले—"वैद्याला मंगलाने केलेल्या स्वतःह्याचा उपचार पाहून हसू आले. त्याने आणखीन गोळ्या देत म्हटले—"मी ह्या गोळ्या फुकट देत आहे तू मी सांगितल्या प्रमाणे गोळ्या घेतल्यास तरच तुझी पोट दुखी निघून जाईल.

परंतु दुसरी गोष्ट अशी होती की, व्यंकटेशने वैद्याला गुप्तरूपाने दिलेले पैसे त्या दोघां शिवाय कुणालाच माहित नव्हते.





बुद्धांच्या आगमनाचा निरोप कळताच कपिलवस्तु नगरातील सर्वांनी त्यांचे स्वागत करण्याकरीता सर्व नगर फुलांनी सुशोभित केले. सर्व लोकाच्यांत आनंदोत्साह निर्माण झाला होता. की, सर्व जगतात ज्योतिमय बनलेले भगवान बुद्ध आपल्या नगरातील रहाणारे होते. राज्याचा राजा सिद्धार्थ बनणारे होते. परंतु ते विश्वाचे चक्रवर्ती बनले. ह्याचा अभिमान वाटून सर्व नगरवासियांनी रस्त्यावर फुलांच्या पायघड्या टाकल्या.

आपल्या मुलाला केंव्हा एकदा आपल्या बाहुपाशात घेऊन कवटाळतो असे राजा शुद्धोदनाला मनातून वाटत होते.

नगरात बुद्धांचे आगमन झाले. अर्धोन्मिलीत नेत्राने व गंभीर मुखमुद्राने निचलशांत करूणाची मुर्ती बनलेले बुद्ध व त्यांच्या पाठीमागून हजारो लोक 'बुद्धं शरणं गच्छामि', 'धर्मं शरणं गच्छामि', 'संघं शरणं गच्छामि', अशा जयजयकार करीत येत होते.

तिकडे राजमहालात यशोधरा राहूल व महाराज शुद्धोदन राजवाड्याच्या पायऱ्या उतरून मुलाची येण्याची प्रतिक्षा करीत होते. सारथी चेन्ना आंगणात पुढे जाऊन उभा होता. त्याच्या डोळ्यातून आनंदाश्रु गळत होते. तो आपल्या मालकाची उत्कंठतेने वाट पाहात होता.

बुद्ध हातात भिक्षा पात्र घेऊन राजमहाला समोर आले. राहुलने धावत जाऊन आपल्या वडीलांचे पाय धरले व नमस्कार



केला. अनेक वर्षाने दर्शन देणाऱ्या आपल्या पतीच्या प्रसन्न चेहऱ्याकडे यशोधरा एकटक नजरेने पहात राहिली. त्यांना तिने साष्टांग नमस्कार घातला व त्यांच्या पायाला स्पर्श करीत आपल्या डोळयातील अश्रूंने त्यांचे पाय धुतले.

बुद्धाच्या आलिंगना करीता पुढे आलेले महाराज शुद्धोदनाचे हात त्याचे ते परिव्राजक रूप व हातात भिक्षापात्र पाहून लुळे पडले. ते मतिभ्रष्ट होऊन निश्चल झाले. वृद्ध महाराजांचे काळीज भिक्षु रूपी आलेला आपल्या मुलाला पाहून तडफडू लागले. त्याच्या डोळयातून अखंड अश्रुधारा वाहू लागल्या.

"बाळा, सिद्धार्थ! गौतम! हे काय झाले? तू हे काय करून बसलास." असे म्हणत ते रडून कळवळू लागले आणि बेशुद्ध झाले.

बुद्धानी आपल्या वडिलांचे डोके आपल्या मांडीवर घेतले व त्यांना आपल्या शुभ्र वस्त्राने वारा घालू लागले. आपल्या मुलाचा स्पर्श होताच राजा शुद्धोदनना शुद्धीचा अर्थ प्राप्त झाला. बौद्ध रूपाने सिद्धार्थ म्हणूनच परत आलो आहे." हे ऐकताच शुद्धोदनांच्या कानांना अमृतवाणी ऐकल्यासारखे वाटले. त्यांच्या अर्धवट उघडलेल्या डोळयातुन एक तऱ्हेचा किरण प्रकाशमान झाल्यासारखे वाटत होते. बुद्धांच्या तोंडावर एक प्रकारचे तेजोवलय चमकत होते. त्या वलयाच्या अनिर्वचनी प्रभावाने शुद्धोदनला उत्तेजित केले. अशांततेतून शांतिकडे, अंधकारातून प्रकाशाकडे व भ्रमापासून सत्याकडे त्यानां खेचले गेले. "बुद्धं शरणं गच्छामि" हेच वाक्य त्यांच्या मनपटलावर वारंवार पडू लागले. त्यांच्या तोंडूनही ते शब्द बाहेर पडू लागले. राहुल सुद्धा तेच म्हणत होता. सर्व लोकांच्या तोंडूनही तेच शब्द बाहेर पडत होते. यशोधरा आपले डोळे मिटून छातीवर हात ठेऊन ध्यानस्थ मुद्रेने पुटपुटता म्हणत "बुद्धं शरणं गच्छामि" चा जप करीत होती.

त्या स्थितीत बुद्धाने राहुलच्या डोक्यावर हात फिरवीत म्हटले—"मी तुला आशिर्वाद देतो की; तू सुद्धा बुद्ध बनून धर्माचे व संघाचे अनुकरण करीत मानवा करीता सार्थकता मिळवून देशील. माहित आहे का? बुद्ध याचे तात्पर्य काय आहे? तुझ्या धारणेने केवळ मीच बुद्ध नाही. उत्तम धर्माचरण व अहिंसा पाळणारे सर्व बुद्ध होतात. बुद्धत्व हीच मानवता आहे. बुद्धत्व प्राप्त करणारा मनुष्यच बुद्ध होऊ शकतो. असा मनुष्य जन्म धारण करणारा बुद्ध च ह्या जगात मार्ग क्रमण करतो. बुद्धांच्या द्वारा उपदेशीत धर्मच मनुष्याच्या जिवनाला खरे पण मिळवून देते. हा धर्मच खरा मानवाला अनुकूल आहे.

ह्यानंतर यशोधरा आपले डोळे उघडीत बुद्धांकडे निश्चल दृष्टी टाकत म्हणाली—"स्वामी! मी मला स्वतःला आपल्या हातात भिक्षा रूपाने अर्पित करत आहे. आजपर्यंत मी एक गृहिणी म्हणून राहिले. परंतु आत्तापासून मी एक मानवाच्या सेवाधर्मा करीता म्हणून एक संन्यासिनी बनत आहे. आपल्या पावलावर पाऊल ठेऊन हे जीवन घालवणे हाच माझा आता धर्म आहे. ह्याकरीता आपण नारी जातीला



समाजात एक बौद्ध संघ काढून द्या." असे म्हणत यशोधराने बुद्धांच्या पायांना वाकून नमस्कार केला.

अशा तऱ्हेने यशोधरा बौद्ध धर्माचा स्वीकार करणारी पहिला महिला झाली.

बुद्धाना भगवान रूपात पहाणाऱ्या अखंड अश्रु वहात असलेल्या, चेन्नाला गौतम बुद्धानी पाहिले व त्याला आपल्या बाहुपाशात घेण्याकरीता ते पुढे झाले. तेवढ्यात खाली वाकत साष्टांग घालीत चेन्नाने त्यांना नमस्कार केला तेव्हां त्याला उठवत बुद्ध म्हणाले—"चेन्ना, कोणीही मनुष्य कितीका महान मोठा बनला, तरी लहानांनी मोठ्यांचाचा आदर केला पाहिजे.



त्याची पुजा केली पाहिजे. ह्या क्षणी तू माझा पुजनिय आहेस. ह्या कपिलवस्तु नगरातून ह्या विशाल जगात प्रवेश करून देणारा पुण्यात्मा तूच तर आहेस. मी ज्या सत्याचा व धर्माचाबोध व ज्ञान प्राप्त केले. त्या आधाराला धरून कोणीही मला देव समजला व माझी आराधना केली तर ते मला आवडणार नाही. कोणत्याही व्यक्तिची आराधना अनुचित आहे. भगवान मानणे सुद्धा तसेच आहे. खरे तर एक गोष्ट आहे मानव धर्माचे आचरण करणे."

बुद्ध भगवानाचे वचन ऐकून गद्‌गद्‌लेल्या स्वरात चेन्ना म्हणाला–"बुद्ध देवा! तसे मानण्याने आम्हाला एक प्रकारचा आंनदच प्राप्त होतो. ह्या भावनाचे एक कारण धर्माचरण किंवा संघ सेवाच्या करीता आमच्या हृदयात अत्यंत भक्तिभाव उत्पन्न होत आहेत. आम्ही एक शक्तिशाली संबध जोडत आहोत. तेव्हां कृपया आपण आपल्याला भगवान मानून आम्हाला आमच्या आराधनेच्या भावना व आपल्याला तसे, म्हणण्याच्या इच्छेला आडकाठी घालू नका."

तेव्हां पासून बुद्धांना बुद्धदेव व भगवान बुद्ध अशा नावाने संबोधले जाऊ लागले. असा उत्तम मनुष्यच देव आहे.

शाक्यवंशातील मोजके लोक सोडले तर बाकीच्या सर्वांनी बौद्ध धर्माचा स्विकार केला. व त्याच बरोबर बुद्धाच्या आदेश व उपदेशाचा प्रसार केला. ते सर्व भिक्षु बनले. त्यांनी सर्वांनी आपापली संपत्ती संघाला अर्पित केली. व ते सेवा धर्म स्वेच्छेने करायला तयार झाले.

देवदत्ताला सुरवाती पासूनच बुद्धांच्यावर द्वेषभाव होता. म्हणून त्याने ईर्षेने प्रेरीत होऊन बौद्ध धर्माला विरोध केला व बुद्धाच्या विरुद्ध आपले एक संगठन निर्माण केले.

बुद्ध कपिलवस्तु नगरातून जावयास निघाले. त्याच्या बरोबर अनेक अनुयायी शिष्य यशोधरा व राहूलही होते.



बुद्ध वाटेने जातानां सुजाताच्या घरी भिक्षु बनून गेले. बुद्धाने सुजाताच्या मुलाला आशिर्वाद दिला. आणि राहुलला म्हटले–" राहुल, सुजाताच्या मुलाला तुझा भाऊ मान. तुम्ही दोघांनी मित्र बनून भावांच्या प्रेमाने जाती वर्णभेद यांना तोडून विश्व मानवताकरीता कुटुंब एक आहे ही भावना जगाला पटवून द्या.

सुजाता बुद्धांची शिष्या बनून यशोधरा बरोबर चालू लागली. बुद्धाने त्यांना उपदेश केला. की, गृहिणींचा धर्म घर संसार चालवणे. बायकांनी बौद्ध धर्माचे अवलंबन करून आपल्या मुलाबाळांना उत्तम मानव बनवणाऱ्या माता म्हणून राहीले पाहिजे. हाच संदेश सर्व मनुष्य-जातीत पसरून त्यांनी धर्म संचालन करावे.

बुद्धाने आपल्या अनुयायी व शिष्यांना धर्मचक्राचे संचालन करण्याच्या हेतूने चोहोबाजूला पाठविले. व नंतर यशोधरा व राहुलला समजावले की; त्यांनी परत कपिलवस्तुला जाऊन वृद्ध शुद्धोदनाची देखभाल करावी व शाक्यवंशाला धर्माने चालण्यास सांगावे.

ह्यानंतर बुद्ध एकटेच मार्गक्रमण करू लागले व जंगलातून जाऊ लागले. त्या भयंकर जंगलात अत्याचार करणारा एक अंगुलीमाल नावांचा दरोडेखोर रहात



होता. त्याने माणसांची हत्या करून त्यांच्या बोटांची माळ करून गळयात बांधलेली होती. ती बोटे अशांची होती की, जी त्याला घाबरून त्याच्या आधीन होत. आणि आपले प्राण वाचविण्याकरीता त्याच्या हातून मारले जात."

अंगुलीमालला असे वाटे की, प्रकारे आपण प्रभावशाली बनण्याने लोक आपले नांव ऐकताच थरथर कापतील.

अरण्याच्या मध्यभागी गेल्यावर त्याला काही गुराखी भेटले. त्या रस्त्याने जाणाऱ्या बुद्धांना पाहून त्यांनी विचारले–"स्वामी, आपण त्या बाजुला जात आहात कां? चाळीस पन्नास माणसे एकत्र असल्याशिवाय














तिकडे जाण्याचे धाडस कुणी करीत नाहीत. तिकडे एक भयंकर डाकू रहातो. एकटा कोणी त्याच्या हातात सापडला, तर तो त्याला ठार मारल्या शिवाय रहात नाही."

बुद्ध त्यांचा म्हणण्याची पर्वा न करता त्या अरण्यमार्गाने जाऊ लागले.

समोरून एकट्याच येणाऱ्या बुद्धांना अंगुलमालने लांबूनच पाहिले. ते आपल्या भगव्यावस्त्रात काहीतरी लपवीत होते.

अंगुलीमाल आपल्या हातातील रक्ताने थबथबलेली चकचकीत धार असलेली कुऱ्हाड हवेत उगारीत जोरात ओरडून म्हणाला–"तू काहीतरी लपवलेले आहेस. ते ताबडतोब माझ्या हातात दे."

बुद्धाने मंदहास्य करीत आपल्या कफनीत लपवलेले भिक्षापात्र बाहेर काढले व अंगुलीमालच्या हातात दिले.

अंगुलीमाल ते उलट-सुलट करून म्हणाला–"उफ्! हे तर भिक्षापात्र आहे. तू भिक्षुक का असेनास. पण माझ्या शोधा करीता आलेला दिसतोस माझ्या समोर हसत रिकामे भिक्षापात्र द्यायची तुझी हि हिम्मत! तुला भीती वाटत नाही. माहीत आहे का मी कोण आहे?"

"तू मनुष्य आहेस. मी सुद्धा एक मनुष्य आहे. असे असतांना आपण एकमेकांना भ्यायचे कशाला" बुद्ध म्हणाले.

"तू मला घाबरून आपला अंगठा देऊन आपले प्राण वाचव. नाहीतर मी तुला मारून टाकेन. त्यानंतर तुझा अंगठा माझ्या माळेत अडकवीन.

तू मला मारून टाकणार, बस् एवढेच ना! मृत्यु हा केव्हांना केव्हांतरी येणारच आहे. मारून टाक मला. आनंदाने मी मरावयास तयार आहे. आज तू मला मारून टाकणार आहेस. उद्या तू मरणार आहेस. पण कायरे उद्या मरायच्या वेळेस तू हसत मरणाचे स्वागत करशील काय? मी कोणत्याही प्राण्याची हिंसा केली नाही. त्या संतोषानेच मी तुझ्या कुऱ्हाडी समोर आपली मान वाकवतो पण जेव्हां

तुझे मरण तुझ्या समोर येईल. तेव्हां तू हसतमुख त्याला सामोरा जाशील कां?" बुद्धानी विचारले.

हे ऐकताच अंगुलीमालचे डोके चक्रावल्यासारखे झाले. तो कोणत्यातरी गहन विचारात बुडून गेला. त्याला स्वतःने केलेल्या भयंकर कृत्यांची आठवण झाली. तो भीतीने थरथर कांपू लागला. त्याच्या पापांना कोणतेही प्रायश्चित नव्हते. मोठा पापे करणारा मी मला क्षमा करणारा कोण आहे? तो दयाळू व्यक्ति कोण आहे? त्याच विचारात असतांना बुद्ध त्याच्या मनासमोर साकार झाले. त्यांची महानता पुण्याई त्याने पूर्वी कैक वेळा ऐकली होती. असेही ऐकले होते की, त्याच्या दृष्टीला वाघ, हरीण, सांप व मेंढी सर्व एकसारखे दिसतात. ते करुणाकर आहेत. उद्धारक सुद्धा बुद्धच आहे. असा विचार त्याच्या मनांत मोठ्याने साद घालत होता. आपला तो आवाज मोठा होत गेला. "बुद्धं शरणं गच्छामि."

अंगुलीमाल! तो बुद्ध तर मीच आहे. तुझ्या करीताच मी येथे आलो आहे. तुझ्या हातात भिक्षापात्र दिले आहे. तू तुझे भुत काळचे आयुष्य सर्व विसरून जा. आणि एका बुद्ध भिक्षुच्या रूपाने माझा शिष्य बनून रहा.

"बुद्ध भगवान! असे म्हणत अंगुलीमालने बुद्धाच्या पायावर लोटांगण घातले, व त्याना निवेदन केले." भगवान, फक्त मला माझाच उद्धार व्हावा वाटत असे नाही. माझे इतर अनुचर सुद्धा आपले शिष्य आहेत. असे म्हणत अंगुलीमालने आपल्या सर्व साथीदारांना हांका मारले.

ह्यानंतर अंगुलीमाल व त्याचे सर्व साथीदार बुद्धाचे शिष्य बनले.

बुद्धाचा उपदेश ऐकून अनेक दृष्ट व अत्याचारी लोक मागील क्रूर जीवन आठवून पश्चाताप करत बुद्धाचे शिष्य बनले. भिक्षु बनले. त्यानी संघाची सेवा करीत आपल्याला समर्पित करून आपले शेष जीवन पुन्हा पुनीत केले. चांगले मार्गक्रमण केले.



# धंद्याचा धर्म

शिवपुर नावाच्या गावात रामनाथ नावाचा एक वैद्य रहात होता. तो गरीब लोकांवर फुकट उपचार करीत असे. त्यातून जे कोणी पैसेवाले त्याला पैसे देत ते तो घेई. एखाद्या गरीबाने स्वताःच्या ताकती पलीकडे पैसे दिले तर त्याला ते आवडत नसे.

एक दिवस रात्री रामनाथ गाढ झोपलेला असताना त्याचा दरवाजा कोणीतरी ठोठावला. त्याने उठून जाऊन दार उघडले. तेव्हां दारात त्याला एक तरूण व एक म्हातारा उभे असलेले दिसले. तो तरूण शेजारच्या गावचा होता. त्याची लहान बहीण पोट दुखीने आजारी होती. व तो म्हातारा त्याच गावातला होता. व त्याची नात तापाने आजारी होती.

रामनाथने त्यांना विचारले—"तुमच्या दोघांपैकी उपचाराचे पैसे कोण द्यायला तयार आहे."

तरूणाने झटक्यात म्हटले—"माझ्याकडे थोडी जमीन आहे. व पैसा आहे. त्यामुळे आपण जे मागाल ते मी देईन."

पण म्हातारा गप्प बसला. तेव्हां रामनाथने त्या तरुणाला समजावत म्हटले—"पुढच्या गल्लीत कृष्णाचारी नावाचे एक वैद्य रहातात. ते पैसा घेतल्याशिवाय इलाज करीत नाहीत. तू तर पैसे देण्याच्या स्थितीत आहेस. तेव्हां तू त्यानां तुझ्या बरोबर गांवी घेऊन जा. मी जर तुझ्या बरोबर आलो, तर ते कृष्णाचारी वैद्य ह्या गरिबाच्या घरी जायला नकार देतील. त्यामुळे तू वाईट वाटून घेऊ नकोस." असे समजावून सांगून रामनाथवैद्य त्या म्हाताऱ्याच्या बरोबर निघून गेले.











# शिस्त

इराक शहरातील एका छोटया गावांतील पाठशाळेत हसन अब्दाली नावाचा एक शिक्षक नोकरी करीत होता. त्याचा स्वत:संबधी असा गैरसमज झाला होता की, आपल्यासारखा शिकवण्यात व शिस्त लावण्यात दुसरा कोणी आपली बरोबरी करू शकणार नाही.

त्यानी शाळेतील विद्यार्थ्यांना अनेक कठीण नियम घालून दिले होते. जरी कोणी विद्यार्थी चुकून एक मिनीट उशिरा आला तरी त्याला. वेताच्या छडीचा मार मिळे. धडा शिकवत असतांना कोणी चुकून मान खाली घालून मागे पाहिले तर, त्याला दहा पट्टया खाव्या लागत. आणि कोणताही विद्यार्थी वर्गात शिंकला तर सर्व वर्गाला हात पाठीमागे बांधून उभे रहावे लागे. व "देव तुम्हांला माफ करेल" असे वाक्य तिनदा म्हणावे लागे. अनेक कडक शिक्षा ते गुरूजी देत.

अब्दालीच्या अनेक मित्रांनी त्यांला अशा शब्दांत सांगितले की, लहान लहान् मुलांना कडक शिक्षा करणे चांगले नाही. परंतु त्यांनी मित्रांच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केले. व आपले म्हणणे तेच खरे केले. तो म्हणे "छडी लागे छम् छम्, विद्या येई घम् घम्" त्याप्रमाणे मुलांना मारूनच चांगली शिस्त लागते. असे त्याचे म्हणणे होते. जर विद्यार्थी वर्गा मध्ये शिंकला तर सर्व वर्गातील विद्यार्थींना हात पाठीमागे बांधून उभे रहावे लागे. त्यांचे म्हणणे म्हणजे सर्व विद्यार्थ्यांच्यांत एकता निर्माण होऊ शकते.

ह्या नविन शिक्षकांच्या नविन शिक्षण पद्धतीने गावातील लोकांना जास्तीत जास्त आनंद होऊ लागला. ते अशा मोठ्या आवाजात त्याची तारीफ स्तुती करीत की, ते त्याला ऐकू जावे. ते म्हणत– "ह्या शिक्षकांच्या शिकवण्याने व शिस्तीने आमची मुले थोडया दिवसातच महापंडीत बनतील. ह्या शाळेत जितके म्हणून शिक्षक आले त्यांना फक्त शिकवणेच जमत होते त्यांना शिस्त लावणे जमत नसे.

शाळेतील सर्व विद्यार्थ्यांना वर्षातून एकदा कुठेतरी सहलीला नेत असत. त्याप्रमाणे अब्दालीने मुलांना गावा बाहेरच्या बागेत नेले. संध्याकाळ झाली व सर्वजण परत यावयास निघाले. परंतु काहीजणांनी तहान लागली असल्याचे सांगितले. त्यांनी बरोबर आणलेले पाणी संपल्यामुळे पाण्याची जवळपास शोधाशोध केली. व जवळच त्यांना एक विहीर दिसली ते पाहून अब्दाली म्हणाला–"पहा तेथे एक विहिर दिसते आहे. शेजारी एक डबा दोरी पण आहे. चला जाऊन आपण आपली तहान भागवू." असे म्हणत त्याने सर्वांना विहीरी पाशी आणले.

परंतु ती विहीर खोल असल्यामुळे तळाशी थोडेसे पाणी दिसत होते. आत विहीरीचे कठडे तुटून पडलेले होते. त्यामुळे एक घडाभर सुद्धा पाणी येईल की, नाही अशी शंका होती.

त्यामुळे अब्दालीने विद्यार्थ्यांना सांगितले- "मी दोरीच्या सहाय्याने विहीरीत उतरून पाणी भरून वर देतो. ते तुम्ही ओढून सर्वजण प्या. नंतर मी दोरीने परत वर



येईन." असे म्हणत त्यांनी ती दोरी कमरेला बांधली.

विद्यार्थ्यांनी रहाटावरून दोरी हळूहळू खाली सोडली व गुरूजींना खाली उतरवले.

अब्दालीने उतरून पाहीले तर तळातील पाण्यावर एक मोठा विहिरीचा तुकडा. तुटून पडला होता. त्यामुळे पाणी झाकले गेले होते तो तुकडा त्यांनी ढकलून बाजूला केला. व एक डबाभर पाणी काढून तो डबा दोरीला बांधला व विद्यार्थ्यांना तो डबावर ओढून घ्यावयास सांगितला. विद्यार्थ्यांनी तो वर खेचून घेऊन आळीपाळीने सर्वजण पाणी प्याले.

अशा तऱ्हेने अब्दालीने पांच वेळा डबा भरून वर दिला. नंतर तो डबा सोडवून त्यांनी दोरी खाली सोडली.

गुरूजीनी ती दोरी कमरेला बांधली व ते दोरीच्या सहाय्याने हळूहळू वर येऊ लागले. सर्व विद्यार्थी सावधतेने दोरी वर ओढून घेत होते. विहिरीच्या मध्यापर्यंत गुरूजी वर आले नाहीत तोच त्यातील एक विद्यार्थी जोरात शिकला. मग काय! दुसऱ्या क्षणीच गुरूजींना वर ओढत असलेल्या विद्यार्थ्यांनी झटक्यात दोरी सोडून दिली व ते हात पाठीमागे बांधून उभे राहिले व तोंडाने तिनदा म्हणू लागले "देव तुम्हाला माफ करेल."

परंतु विद्यार्थ्यांना आपल्या हातून झालेली चुक लगेच लक्षात आली. तोपर्यंत गुरूजी विहीरीत जाऊन पडले होते व त्याची कंबर खाली पडल्यामुळे मुरगळली होती. व अंग ठणकत होते.

गुरूजी त्या वेदनेने जोरजोरात विव्हळत होते. नंतर विद्यार्थींनी रस्त्यावर जाणाऱ्या येणाऱ्यांच्या मदतीने गुरूजींना विहीरीतून बाहेर काढले.

हा नविन अनुभव आल्यावर गुरूजीने त्या दिवसापासुन शिस्तीच्या नावाखाली कोणत्याही विद्यार्थ्याला पुन्हां त्रास व शिक्षा दिली नाही.



# अपमान

कमलपुरचा रहिवासी भूपतीने आपल्या मुलीचे लग्न गार्गेयपुरच्या रहाणाऱ्या प्रसादच्या मुलाशी करण्याचे ठरविले. प्रसादच्या घरची मंडळी भूपतीच्या घरी मुलगी पहावयला आली. मुलीला पाहून सर्वांनी आपली पसंती दर्शवली. प्रसादची शेतीभाती व इस्टेट पाहून भूपतीला अतिशय आनंद झाला.

त्यानंतर एक दिवस लग्नाचा मुहूर्त काढण्याकरीता भूपती आपला मित्र राघवदास ह्याला बरोबर घेऊन प्रसादच्या घरी गेला. प्रसादने गावातील चार पाच प्रतिष्ठीत माणसांना पण बोलावले होते. देणी घेणी व हुंड्यासंबधी मनमोकळी बोलणी झाली. तितक्यात प्रसादची धाकटी मुलगी सगुणा रडत बाहेरून आत आली. ती सुद्धा लग्नायोग्य झाली होती.

प्रसादने आपल्या मुलीला रडण्याचे कारण काय ते विचारले तेव्हां ती आपले अश्रु पुसत म्हणाली–"बाबा, मी देवळातून परत येत होते तेव्हां नारायणने माझी वेणी धरून ओढली.

"तो तर मवाली आहे. तू एकटीच देवळात कशाला गेलीस? प्रसादने आपल्या मुलीला दटावित म्हटले."

मी तर तुला किती वेळा सांगितले की, देवळात कधीही एकटी जाऊ नकोस. पण तुला काही अक्कल आली नाही. प्रसादच्या मुलाने आपल्या बहिणीची कान उघाडणी केली.

"प्रसादराव, मी परत केव्हांतरी येईन. असे म्हणत भूपती उठून जायला निघाला. घरातील सर्वांनी भूपतीला थांबण्याकरीता विनविले परंतु काही उपयोग झाला नाही."

रस्त्यात राघवदासने भूपतीला विचारले–"तू असा मधूनच उठून कां आलास?"

आपल्याच घरातील मुलीचा अपमान झाला असता सुद्धा ते बापलेक भील्यासारखे सहन करून गप्प बसले. सुनेच्या बाबतीत सुद्धा ते त्याच प्रमाणे वागतील. त्यामुळे मी माझी मुलगी त्या घरात सुन म्हणून द्यावयास तयार नाही. त्यांनी आपले म्हणणे सांगितले.



## चांदोबातील नवलाई

### अपूर्व दृश्य



मध्य युगीन योद्धा कशा प्रकारची कवच धारण करीत होती व कशी चालत होती. ही गोष्ट सांगण्याच्या उत्साहाने प्रेरीत होऊन ब्रिटन मध्ये रहाणाऱ्या एका बिक ब्राऊन नावाच्या माणसाने ११२ पौंड वजनाचे कवच धारण करून एडिम्बरो-पासून डमफ्रीझ पर्यंत तीन दिवस चालून दाखविले.

### कवीची समाधी



सर्व लोकांना पृथ्वीराज व संयोगिता ह्यांच्या शौर्यतेची गोष्ट माहीत आहे. पृथ्वीराजाच्या दरबारात चंदबरदायी नावाचा कवी होता. तो पृथ्वीराजाच्या अगदी निकटचा मित्र होता. आता नुकताच त्या कवीच्या समाधीचा शोध पुरातत्व विभागाच्या अधिकाऱ्यानी उत्तर प्रदेशातील हास्वा नावाच्या

### भाषांतर यंत्र



जपान भाषेचे इंग्रजी भाषेत भाषांतर करणारे एक अनोखे यंत्र नुकतेच जपानने तयार केले आहे. हे यंत्र प्रत्येक तासाला तीन हजार शब्दाचे भाषांतर करेल.

## तुम्हांला माहीत आहे का?

१. काय तुम्हांला माहीत आहे कां? प्रशान्त महासागराचे नामकरण कोणी केले ?

२. हिन्द महासागराचा सर्वात दाट प्रदेश कोणचा आहे ?

३. भारत व श्रीलंका ह्यांना वेगळे करणाऱ्या जलसंधीचे नाव काय ?

४. जगातील सर्वात लांब नदी कोणती ?

५. रोमच्या जवळून वहाणारी नदी कोणती ?



## घराची राखण

मणीपुर गावाच्या मध्यावर शिवनाथचे एक टुमदार घर होते. त्याच्या तरूणपणी त्याने खूप कष्ट मेहनत करून धन कमावले व त्याच पैशांनें त्याने हे घर बांधले. त्यामुळे त्या घरावर त्याचे अत्यंत आकर्षण होते.

एकदा शिवनाथची बायको श्यामला नवऱ्याला म्हणाली. "अहो ऐकता कां? आपल्या गावातील बरेच जण काशी यात्रेला जाण्याची योजना आखत आहेत. आपल्याला सुद्धा त्याच्या बरोबर जाऊन तिर्थक्षेत्र हिंडून देवादिकांचे करायला चांगली संधी आली आहे. आपण सुद्धा त्यांच्या बरोबर जाऊ या कां?"

शिवनाथ चिडून म्हणाला—" घर सोडून आपण यात्रेला गेलो तर आपल्या घराची राखण कोण करणार? काशी यात्रेहून यायला कमीत कमी सहा महिने तरी लागतील.

पतीच्या मुखातून हे शब्द बाहेर पडताच श्यामला निराश झाली व म्हणाली— "ह्या घरापाठीमागे तुमच्या आकर्षणाचे काहीतरी गुढ असावे. तुमच्या मुलांना ह्या घराची काही आवश्यकता नाही. तेच तुम्हाला म्हणत आहेत की, हे घरदार विकून तुम्ही आमच्याकडे येऊन रहा पण तुम्हाला काही अक्कल आली नाही. त्यांच्या म्हणयाप्रमाणे घर विका व घराच्या काळजीपासून निश्चित रहा. त्याच बरोबर यात्रेला लागणारा पैसा कर्ज घेण्याची सुद्धा संकटे वाटणार नाहीत. यात्रेनंतर परत आल्यावर आपल्याला मुलांकडे - रहाता येईल."

"बडबड बंद करून ऐक! मी जिवत असे पर्यंत हे घर विकण्याचा प्रश्नच उरत नाही." शिवनाथने आपल्या बायकोला दम देत म्हटले.



तरीपण श्यामला हट्टीपणाने म्हणाली– "मी जेव्हां कधी कुठे जाण्याचा विचार बोलून दाखवला की, तुम्ही नेहमी घरात रहाण्याचेच काढता. पण तुम्हांला हे समजत नाही की; आपले हातपाय जो पर्यंत हलताहेत तोपर्यंत ह्या यात्रा पूर्ण करावयास पाहिजेत. पाहीजे तर यात्रेहून परत येईपर्यंत घराच्या देखरेखी करीता माझ्या भावाला नाहीतर तुमच्या भाच्याला ठेवता येईल."

त्यावर शिवनाथ थोडा रागानेच म्हणाला–" जर कां मला कोणत्यातरी कारणाने घरातून बाहेर जावेच लागले तर मी घराला कलूपच लावून जाईन. कोणत्याही नातेवाईकाला घरात पाऊल ठेऊ देणार नाही." असे म्हणत त्याने डोके खाजवत विचार केला व झटवयात उठून म्हणाला–" ठिक आहे! तुझ्या इच्छेप्रमाणे आपण यात्रेला जाऊ या!"

यात्रेला जाण्याचे ऐकताच श्यामलाचा आनंद गगनात मावेनासा झाला.

शिवनाथ सरळ शेठ वरप्रसादच्या घरी गेला. व आपण काशी यात्रेला जाणार असल्याचे सांगत म्हणाला–" शेठ साहेब! तुम्ही माझे घर गहाण ठेऊन मला दोन हजार रुपये उधार द्या."

वरप्रसाद मनांतल्या मनांत खुष झाला परंतु वरवर त्याला कुचेष्टेने म्हणाला– "अशा प्रकारे गहाण का ठेवतोस? घरच विकून टाक म्हणजे कटकटच नाही. पाहिजे तर मी गावातल्या काही प्रतिष्ठीत लोकांना बोलावून आणतो व तुझ्या घरांची किंमत ठरवायला सांगतो."

शिवनाथ थोडासा चिडीला आला व म्हणाला–" मी माझे घर गहाण ठेऊन पैसे उधार मागत आहे. तुम्ही उधार पैसे दिले नाहीत तर मी दुसरा सावकार शोधतो.

"ठिक आहे, जशी तुझी मर्जी! परंतु एक ध्यानात ठेव! काशी यात्रेला जाऊन परत यायला एवढे दोन हजार पुरणार नाहीत. पाहीजे तर तुझ्याकडून शंभराला एक रुपया प्रमाणे वार्षिक व्याज घेईन तुझं घर तर पुष्कळ मोठे आहे त्या करीता मी पांच सहा हजार सुद्धा तुला उधार देऊ शकतो." वरप्रसाद म्हणाला.

शिवनाथने शेवटी सावकाराचे म्हणणे मान्य केले व पैसे उधार घेऊन घर गहाण ठेवले.

सावकाराच्या घरातून बाहेर पडून शिवनाथ आपल्या भाच्याच्या रंगनाथच्या घरी गेला व त्याला म्हणाला–" अरे, तू मला काही दिवसापूर्वी म्हणाला होतास की तुझ्या शेताला लागून असलेले शेत आपण खरेदी करणार होतो. ह्याकारणाने तू सावकार वरप्रसादकडे पैसे उधार मागितलेस. मग तुझे काम झाले कां?

रंगनाथ चिंतेच्या स्वरात म्हणाला– "तो कंजुसमारवाडी वरप्रसाद अशा साधेपणाने पैसे देणार होय. तो तर शेकडा दोन रुपये व्याज मागत आहे. त्यामुळे मी काळजीत पडलो आहे, की काय करू?"

हात्तीच्या! हीच गोष्ट कां आहे. तू हे पांच हजार रुपये घे. मी व तुझी मामी आम्ही काशी यात्रेला चाललो आहोत! मी परत येई पर्यंत ह्या पैशांवर मला एक रुपया शेकडा ह्याप्रमाणे व्याज देऊन माझे पैसे परत दे." असे म्हणत त्याने ती रक्कम आपल्या भाच्याला दिली.



घरी परत येऊन शिवनाथने आपल्या बायकोला सांगितले. की, काशी यात्रेला जायची तयारी कर. परंतु श्यामलाने आपल्या नवऱ्याची शंका येऊन पहात म्हटले. काशी यात्रेला जायला तुम्ही पैसे कोणाकडून घेऊन आलात? व ह्या घराची राखण करायला कोणाला ठेवणार आहात?

"काय ग! तुला सर्वच गोष्टी सांगितल्या पाहिजेत कां? शिवनाथने आपल्या बायकोला दटावले.

ह्यानंतर एका आठवड्यान ते दोघे इतर लोकांबरोबर काशीयात्रेला निघाले.

सहा महिने झाल्यावर ते दोघे जण काशीयात्रेहून परत आले. श्यामलाने

आपल्या नवऱ्याला सर्व घर हिंडून दाखवत म्हटले. "अहो पाहिलत कां? जर कोणाला सांगितले की, हे घर सहा महिने रिकामे आहे. तर कोणी विश्वास सुद्धा करणार नाहीत इतके घर आरशासारखे लख्ख आहे व परसातील झाडे सुद्धा अगदी पूर्वीपेक्षा बहरलेली आहेत.

शिवनाथ हसत म्हणाला–"हे तर सर्व सावकार वरप्रसादचे काम आहे?"

श्यामला आश्चर्य करीत म्हणाली–"घराची अशा तऱ्हेची राखण करायला सांगण्याची सावकारावर कां पाळी आली?

ह्या मागे एक खूप मोठे रहस्य आहे. सावकाराची आशा! तेव्हां मी तर फक्त त्याच्याकडे दोनहजार रुपयेच उधार मागितले. परंतु त्याने आपले घर गहाण ठेवायला सांगून जबरदस्ती पांच हजार रुपये मला उधार दिले. त्याने असा विचार केला असेल–"एक तर आपण काशीयात्रेहून जिवंत परत येणार नाही, त्यातून जर आलोच तर एवढी रक्कम उधार घेतलेली परत करू शकणार नाही. ही गोष्ट जाणून मी विचार केला. वरप्रसाद पेक्षां चांगला घर राखणदार आपल्याला कोठून मिळणार म्हणून मी त्याच्या हातात घराच्या किल्ल्या देऊन आलो"

"सावकाराकडून जे पैसे उधारीवर मिळाले त्यातील एक पैसा सुद्धा आपल्या यात्रेला खर्च केला नाही. मी मेहनत कष्ट करून पैसे कमावले होते ते थोडे शिल्लक होते तेच प्रवास खर्चाला वापरले. सावकाराकडून मिळालेले पांच हजार रुपये मी संधी मिळताच माझ्या भाच्याला उधारीने देऊन टाकले. उद्या मी ते जाऊन व्याजासकट परत घेऊन येईन ते सावकाराला परत देऊन आपले गहाण ठेवलेले घर सोडवून घेऊन येईन."

फक्त घराच्या राखणी करीता शिवनाथने असे नाटक केले. त्याच्या बुद्धिमत्तेवर प्रसन्न होऊन श्यामला एकदम आश्चर्य चकित झाली व त्याच्याकडे पहात राहिली.





# कांशाचा किल्ला

[ २ ]

[राजा यशोवर्धनने आपल्या दोन मुलांपैकी धाकटा मुलगा गुणवर्धन ह्याचा राज्याभिषेक करण्याचा निश्चय केला. परंतु वीरपुरचा सामन्त सूर्यवर्मा ह्याने त्याला विरोध केला. सर्पकेतू नावाचा सामन्त गुणवर्धनला जाऊन मिळाला. दोघांनी सूर्यवर्माला ठार मारण्याचा कट रचला. त्यांनी जंगलात लपून अचानक सूर्यवर्मावर हल्ला केला. पुढे..... ]

सूर्यवर्माला समजले की, आपण शत्रूच्या जाळ्यात सापडलो आहोत त्या शत्रूचा पण शोध त्याला लागला–"मारा कापा! सूर्यवर्मा जर जिवंत पळाला तर तुम्ही सर्वजण मारले जाल." असे शब्द त्याच्या कानावर पडले. त्याने आठवायचा प्रयत्न केला की, हा आवाज नक्की सर्पकेतूचाच आहे. दुसऱ्या क्षणाला सर्पकेतूची तलवार वायूमंडळ कापत सप् सप् आवाज करीत बाहेर पडली व समोर येणाऱ्या शत्रू सैन्याची मुंडकी कचाकच् कापू लागली. तेवढ्या अवधीत सूर्यवर्माला शत्रू सैन्याने चारीबाजूने घेरले व पकडले तेवढ्यात लांबून जोरजोरात सर्पकेतू सैनिकांना मागे हटवित पुढे येत होता.

सूर्यवर्माने विचार केला की, आपले मरण आता निश्चित आहे. त्याला अचानक त्याचा मुलगा चन्द्रवर्माची आठवण झाली.











व तो विचार करू लागला. त्याच्या मृत्युनंतर सर्पकेतू नक्कीच आपले सर्व राज्य राज्य हस्तगत करेल. त्याकरीता ह्या पूर्वीच कोणीतरी जाऊन आपल्या मुलाला सावध रहायला सांगितले तर चांगले होईल.

हा विचार येताच सूर्यवर्मा जोरजोरात ओरडू लागला–"सुबाहू! सुबाहू!" असे म्हणत समोरच्या आणखी एका शत्रूचे त्याने डोके तलवारीने उडविले. व घोड-याच्या छातीवर वार केला. तेवढीच संधी पाहून त्याने घोड्याचा लगाम खेचला व पाठीमागे वळवून घोडा भरधाव सोडला.

तेवढ्यात दूरवरून सुबाहूचे उत्तर ऐकू आले–"प्रभु! मी आपली काय सेवा करू? ताबडतोब हुकूम द्या!"

तू ताबडतोब वीरपुरला जाऊन चंद्रवर्माला सांग..... सूर्यवर्माचे बोलणे संपत नाही तोच पाठीमागून त्याच्या पाठीत शत्रूच्या सैनिकाने तलवार भोसकली.

तो कळवळत घोड्यावरून खाली कोसळला. ते पहाताच अनेक शत्रूंनी त्याच्यावर वार केले.

"पहा, पहा! दुसरा एक जण पळून जात आहे. त्याला पकडा व ठार मारा. सूर्यवर्मा मेल्याची बातमी प्रथम वीरपुरच्या जनतेला समजता कामा नये." सर्पकेतू दरडावत म्हणू लागला. तेवढ्यात चार पांच घोडेस्वार सुबाहूचा पाठलाग करीत त्याच्या पाठोपाठ येऊ लागले.

सुबाहू सूर्यवर्माच्या सैनिकांपैकी अत्यंत विश्वासपात्र होता. तो लहानपणापासून सूर्यवर्मांची देखरेख करीत होता. तो नुसताच संमजस नाही तर शूर, साहसी, पराक्रमी सुद्धा होता व अतिशय प्रसंगा-वधानी होता.

सुबाहूला समजले की, आपल्या राजाची रक्षा करता येणे संभव नाही. म्हणून तो निरोप सांगायला चंद्रवर्माकडे ताबडतोब निघून जाऊ लागला. परंतु तेवढ्यात त्याला सूर्यवर्माचे बोलणे ऐकू आले. त्याने ताबडतोब आपला घोडा वेगाने शत्रू सैन्यातून बाहेर काढून पहाडाच्या दिशेने भरधाव पिटाळला.

घोडा भरधांव पळत होता. सुबाहूला जर विरपुरला जायचे तर पूर्ण पहाडा-भोवती फेरी मारून जाणे भाग होते. पहाडातील रस्ता भयंकर अरूंद होता दोन घोडेच जेमतेम जाऊ येऊ शकत होते.

सुबाहूने आपला घोडा पहाडावर दामटला व वळून पाठीमागे पाहिले. तेव्हां शत्रू सैन्याचे घोडेस्वार पण त्याचा पाठलाग करीत पाठीमागे पहाडावर चढण्याचा प्रयत्न करीत होते.

आता सुबाहू व शत्रू सैनिकांत फक्त एक फुटाचेच अंतर काय ते उरले. सुबाहूला वाटू लागले ह्यांच्या हातून जर सुटका मिळवायची असेल तर हे अंतर थोडं वाढवायला पाहिजे नाहीतर शत्रू सैन्याचे बाण अंगावर येऊन पडू लागतील.

तेवढ्यात सुबाहूच्या अगदी जवळ शत्रूने सोडलेला बाण आला व थोडक्यात त्याच्या खांद्याजवळून निघून पहाडातील दगडाला लागून त्याचे तुकडे तुकडे होऊन खाली दरीत पडला.



सुबाहूने आपल्या घोड्याला सावध करीत लगाम घट्ट धरला व तो वेगाने धावू लागला. पाठीमागे सूं सूं बाणाचा आवाज व माणसांचा हलकल्लोळ ऐकू येऊ लागला. थोड्यावेळाने त्याने परत पाठीमागे वळून पाहिले. तेव्हां तर सैनिकांचे व त्याच्यातले अंतर अजूनही कमी झाले होते.

त्या खडकाळ पहाडातील अरुंद रस्त्याने सुबाहू आपल्या घोड्याला जबरदस्तीने दामटीत होता. एकीकडे भयंकर खोल दरी तर दुसऱ्या बाजूला उंच पहाड व दोन्ही मध्ये अरुंद रस्ता, जर का अशा स्थितित घोड्याचा पाय निसरला तर त्याचे तुकडे तुकडे होऊन खाली पडतील अशा विचारानेच त्याला घाम

फुटला व तो हळू हळू घोडा हांकू लागला.

घोड्याचेवेळातच संध्याकाळचे अंधारून आले. आकाशात चंद्र उगवला त्या प्रकाशात खडकाळ रस्ता दिसु लागला. अचानक शत्रू सैनिक व घोड्याचा टापाचा आवाज अगदी जवळ ऐकू येऊ लागला. आता दरडीत लपून बसण्याशिवाय गत्यंतर नाही असे समजून तो घोड्यावरून खाली उतरणार तोच एक बाण सूं सूं करीत त्याच्या अगदी जवळ आला व घोड्याच्या छातीत रूतला घोडा विव्हळत खाली पडला. त्याच बरोबर सुबाहू पण खाली कोसळला. घोड्याच्या रिकिबीत सुबाहूचे पाय अडकून बसले त्यामुळे तो दरीत न पडता तेथेच खडकात अडकून पडला त्याने पाच सहावेळा पाय बाहेर काढण्याचा प्रयत्न केला. शेवटी त्याच्या हाताला एका झाडाचा बुंध लागला. त्याला पकडून त्याने पाय खेचून बाहेर काढण्याचा प्रयत्न केला शेवटी एक हिसका मारताच त्याचा पाय रिकीबीतून बाहेर आला.

घोड्याचा आर्तनाद व दरी जवळच्या खडकाला लागून घोडा खाली उलटून पडण्याने दरीत कोसळता कोसळता त्याचे तुकडे तुकडे झाले.

दरीच्या पलीकडून हास्य ध्वनी व टाळ्याचा कडकडाट एकसाथ ऐकू आला. सैनिकांचा आनंद घोष ऐकू येऊ लागला. तेव्हां सुबाहूला समजले की, शत्रू आपण मरण पावलो असे समजून आनंदीत झाला आहे. त्याना वाटले की घोड्याबरोबर सुबाहूच्या सुद्धा दरीत पडून ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या असतील.

सुबाहू झाडांच्या फांदीवर गुपचूप बसून राहिला. तो प्रदेश सुद्धा भयाण वाटत होता. परंतु चांदणी रात्र असल्यामुळे जरा देखील फांद्याचा आवाज आला तर शत्रूला आपण दिसू इतका प्रकाश होता. त्यामुळे शत्रुला जर कळले तर एक बाण सुद्धा आपला प्राण जायला पुरेसा आहे. असे वाटून तो काही वेळ निश्चल बसून राहिला.

असा विचार करीत फांद्याच्या मधून सुबाहू शत्रू सैन्याला टेहळू लागला. ते सैनिक जेथून घोडा पडला तेथे आले व घोड्यावरून उतरून त्यानी दरीत वाकून पाहिले. व नंतर परत आपापल्या घोड्याजवळ येऊन सल्लामसलत केली. सुबाहूला एक विचार येऊन भिती वाटू लागली. की शत्रूने आपल्याला पाहिले तर नाही. तेवढ्यात त्यांचा हास्यध्वनी ऐकू आला. त्यानंतर शत्रू सैन्याने घोड्यांना पाठीमागे वळविले व त्यावर आरूढ होऊन ते त्यानां पळवू लागले.

सुबाहूने निश्चित पणाने पोट भरून श्वास घेतला त्याचा पाय अडकल्यामुळे खूप दुखत होता तरी पण त्या परिस्थितित ते दुखणे त्याला जास्त जाणवले नाही. त्याला एकाच गोष्टीचा आनंद वाटत














होता की, तो दुष्मनाच्या हातून बचावला. आता सूर्योदयाच्या आत विरपुरला जाऊन चन्द्रवर्माला ह्या दुर्घटनेचा निरोप देता येईल व सर्पकेतूचा बदला कसा घ्यायचा ह्याचा पण विचार करता येईल.

थोड्या वेळाने शत्रू सैन्य दिसेनासे झाले. ते पाहून सुबाहू झाडच्या फांदीवरून खाली उतरला त्याचे कपडे फाटून त्याच्या चिंध्या लोंबत होत्या. शरीरावर दगड काटे कुटे लागून खरचटले होते व त्यातून रक्त वहात होते. त्याने दोन मुठी भरून कसली तरी पाने गोळा केली व त्याचा रस काढून जखमांवर लेप लावला. त्याच वेळेला पहाडातून वाघाच्या डरकाळ्या ऐकू येऊ लागल्या. व भीतीने त्याच्या अंगावर सरसरून-कांटा आला.

त्या डरकाळ्या ऐकून सुबाहू निश्चल उभा राहिला. त्याला आठवले की ह्या पहाडत् फक्त वाघच नाहीत तर अस्वल व मोठमोठी अजगर सुद्धा आहेत. त्याना सामोरे जाण्याकरीता आपल्याला कोणत्या-तरी हत्याराची जरूरी आहे. परंतु त्याची तलवार व ढाल घोड्यावरून खाली पडताना कुठेतरी निसटून पडली होती. सुबाहूने आपली दृष्टी इकडे तिकडे वळविली. नतंर जवळच्याच एका झाडातून एक दणकट लांब काठी तोडून काढली व त्याचा आधार घेत तो पहाडातून सरपटत सरपटत पहाडाच्या त्या अरूंद रस्त्यावर आला.

तेथून विरपुरला जाणारा रस्ता सुबाहूला चांगला परिचयाचा होता. त्यामुळे तो अंधुक प्रकाशात मोठ्या निर्धाराने चालत पहाडातील घाटा पलीकडल्या एका गावांच्या जवळ येऊन पोहचला.

गांव तेथून थोडाच दूर होता. परंतु सुबाहूने लांबून पाहिले की बरेच लोक मशाली हातात धरून एकत्रित बसून काहीतरी चर्चा करीत आहेत. एवढ्या रात्रीच्या वेळी ह्या गावकरी लोकांना गावांच्या बाहेर येऊन गप्पा करण्यासारखे काय काम आहे? अशी त्याच्या मनांत शंका येऊ लागली. ते कोणी दरोडेखोर नाहीतर चोर असावेत. असे समजून तो कानोसा देऊन ऐकू लागला. तेवढ्यात घोड्यांच्या टापांचे आवाज ऐकू येऊ लागले. अतिशय वेगाने घोड्याना दामटवत ते लोक त्या मशाली घेऊन उभे असलेल्या लोकांच्या जवळ येऊन पोहोचले व त्यांना म्हणाले तुम्ही अजून पर्यंत इथेच थांबलात कां? हो हो चला, लवकर करा! असे सांगत ते लोक पुढे निघून गेले.



ते पाहून ह्या गोष्टीचे सुबाहूला आश्चर्य वाटले परंतु त्याच्या मनांत एक शंका उत्पन्न झाली. ते सर्व मशाली धरणारे डाकू लुटेरे असू शकणार नाहीत. त्या घोडेस्वाराच्या पोशाखा वरून तसे स्पष्ट दिसत होते. ते लोक विरपुरचे सैनिक आहेत कां? सर्पकेतूचे सैनिक आहेत? ह्याचा उलगडा लांबून लागत नव्हता. मशाली घेऊन उभे असलेल्या त्या लोकांना कोणत्या प्रदेशात जायचे होते. हे जवळ गेले तरच समजणार होते.

असा विचार करीत सुबाहूने मनाने निर्णय घेतला की, ह्या प्रश्नाचे उत्तर काढावयाचे असेल तर त्या मशाल घेऊन गेलेल्या लोकांच्या पाठोपाठ त्यांच्या प्रदेशातच जावयास पाहिजे आणि जर कां ते विरपुरचे लोक असतील तर त्यांच्या कडून एक घोडा घेऊन ताबतोब विरपुरला जाता येईल आणि जर कां शत्रू चे लोक असतिल तर..." त्याने हा विचार येताच, आपल्या कपड्यांकडे निरखून पाहिले. तेव्हां त्याच्या मनाला थोडा धीर आला. ह्या फाटक्या तुटक्या झालेल्या कपड्यांकडे पाहून आपण अमुक व्यक्ति आहोत म्हणून कोणी सुद्धा ओळखणार नाहीत. हिच एक चांगली युक्ति आहे असे समजून तो त्या मशाल घेतलेल्या लोकांच्या जवळ जवळ पोहाचला.

सुबाहू अगदी जवळ पोहोचला तेव्हां सर्वांनी त्याच्याकडे कुतुहलाने पहात त्यातील एक मशाल वाल्या लोकांपैकी एकजण म्हणाला–"ओहो पहा, कोणी एक भिकारी येत आहे. अरे भिकाऱ्या! आता ह्या पुढे तुला भिक मागण्याची जरूर पडणार नाही. आमच्या बरोबर चल. पहाट होण्या आधी आम्ही विरपुर गावं लुटावयास जाणार आहोत. तू पण आमच्या बरोबर चल. तुला दहा बारा पिढ्या पुरेल इतके धन दौलत मिळले!. काय चलतोस नां?" तुझे भाग्य चांगले आहे.

ह्या गोष्टी ऐकून सुबाहू आश्चर्य चकित झाला व स्वतःला सांभाळत म्हणाला. "हो, रे बाबा आपल्या सर्वांच्या बरोबर मी सुद्धा येतो. मला पगाराची जरूरत नाही. मला पोटभरून खायला मिळाले की. झाले." तो कोणाला न कळेल अशा गुळमुळीत पणाने त्यांना म्हणू लागला.

तो माणूस सुबाहूला काही म्हणणार तेवढ्यात काही घोडस्वार वेगाने त्या बाजुला आले व जोरजोरात ओरडू लागले–"महाराज, सर्पकेतूचा जय असो! सर्पकेतुचा जय असो! नंतर थोडावेळ थांबत ते शंका येत म्हणाले तुमच्या मधे जर कोणी विरपुरचे रहाणारे असले तर आताच शोधून पहा नंतर पश्चाताप करून काही फायदा होणार नाही." असे म्हणून ते सर्वांवर नजर फिरवून पाहू लागले.

त्या गर्दीतून एक व्यक्ति सुबाहूला इशारा करीत म्हणाली–"इथले सर्व लोक एकमेकांना चांगले ओळखतो. हा एक माणूस नविन आहे. दिसायला कोणीतरी भिकारी वाटतो आहे. आता आताच इथे आलेला आहे. त्याला आम्ही सर्वजण आताच पहातो आहोत.

तेव्हां सर्व घोडस्वार एकमेकांकडे पहात जोरजोराते ओरडत म्हणू लागले "अरे बाबा! असे म्हणत सुबाहूच्या बाजूला त्यांनी आपापल्या घोड्यांना वळविले. (क्रमशः)



# डाकू उग्रशील

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! काही लोकांना काही कामात यश येत नाही.. मला अशी शंका आहे की, आपल्या उपजिविके करीता व उन्नति करीता जे लोक कष्ट करीत आहेत. हे खऱ्या उपयुक्ति करीता नाहीत पण काही राजे वांकड्या बुद्धीचे असतात. त्यांच्या मनात त्या क्षणी जो विचार येतो त्यालाच ते अत्यंत उत्तम पद्धत मानतात. परंतु ती गोष्ट जनतेकरीता संकटाची ठरते. तुम्ही सुद्धा तशा राजापैकीच एक आहात नां! ह्याचे उदाहरण म्हणून मी तुम्हांला उग्रशील नावाच्या एका दरोडेखोराची गोष्ट सांगतो लक्ष देऊन



"ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वीची गोष्ट आहे. मणीकर्णिका नावाच्या देशावर सत्येंद्र नावाचा राजा राज्य करीत होता. त्या देशाच्या जंगलातील पहाडावर उग्रशील नावाचा एक लुटारू रहात होता. गुहांमधुन तो आपल्या साथीदारांबरोबर गुप्तरूपाने रहात असे. तो फक्त वाटसरूंवरच हल्ला करत नसे तर राज्यातील गांवामध्ये जाऊन हल्ला करून लोकांच्या वस्तु लुटून आणून पहाडातील गुहांमध्ये ठेवीत असे. तो हल्ला करण्याच्या वेळेस तोंडावर बुरखा घालून जाई. त्यामुळे सर्वांना उग्रशील त्याच्या टोळीचा नेता आहे हे माहित होते. परंतु त्याचे तोंड कोणी अद्याप पाहिले नव्हते.

उग्रशीलची बायको हिला त्याने लुटालुट व दरोडे घातलेले अजिबात आवडत नव्हते. तिने कित्येकदा आपल्या नवऱ्याला समजावून सांगून पाहिले की; हा सर्व धंदा सोडून देऊन आपण सामान्य माणसांसारखे जिवन घालवू या. परंतु त्यावर उग्रशील हसत म्हणे—"आता हे आयुष्य डाकू म्हणुनच जगावयास पाहिजे सामान्य तऱ्हेने जगणे ह्याजन्मी शक्य नाही."

उग्रशीलच्या लग्नाला पंचवीस वर्षेपूर्ण झाल्यानंतर त्याना एक मुलगा झाला. मुलाच्या जन्मापासून त्याच्या मनांत प्रेम व वात्सल्य निर्माण झाले. तो मुलाला प्राणापेक्षा जास्त जपत होता. तो केव्हां केव्हां लुट करावयास जाई, तेव्हां त्याला परत यायला चार पांच दिवस लागत. तेव्हां तो उदासिन दिसत असे. त्याच्या चेहऱ्यावर पहिल्यासारखी क्रुरता व आवेश दिसत नसे. तो ज्या घरात जाऊन दरोडा घाली त्या घरात जर एखादे लहान मुल दिसले तर त्यांला तो मांडीवर घेई व त्याचे चुंबन घेऊन प्रेम करीत असे. हे त्याचे वागणे त्याच्या साथीदारांना अजिबात आवडत नसे.

त्याचे साथीदार उग्रशीलला केव्हां केव्हां समजाऊन सांगत—"असे जर आपण लाडप्यार करत बसलो, तर केव्हांतरी राज्याच्या शिपायांच्या हाती पकडले जाऊ. काय हो! तुमच्याच घरी मुल आहेत आमच्या घरी नाहीत कां? चोर लुटारूंच्यात ही प्रवृत्ती अत्यंत घातक होऊ शकते.

ते एका अशा एका गावात पोहोचले की; पुर्वी त्यांनी तेथे दरोडा घातला नव्हता.

एका दिवशी उग्रशील एका झाडाच्या सावलीत विश्रांती घेत असतांना त्याचा डोळा लागला व त्याला एक स्वप्न पडले. स्वप्नात त्यांनी पाहिले राजाचे शिपायी पाठलाग करीत येत आहेत व आपण जोरात घोड्यावरून पळत आहोत. तेवढ्यात घोड्याचा पाय एका झाडाच्या फांदीत अडकून आपण खाली पडलो. पुन्हां उठून दुप्पट वेगाने पळू लागलो. परंतु तेवढ्यात शिपायाने नेम धरून आपल्यावर भाला फेकला. तो पाठीत जाऊन घुसला. अति वेदनेने आपण मुर्च्छा येऊन खाली कोसळलो. त्याच क्षणी त्याची बायकी व तीन महिन्याचा त्याचा मुलगा पहाडाच्या कड्यावरून खाली दरीत कोसळत असलेले आपल्याला दिसले.

उग्रशील ते दृश्य पाहून किंचाळत धडपडत उठून बसला. त्याचे सर्वांग थरथर कांपु लागले त्याला वाटले की; आपण जे स्वप्न पाहिले ते नक्कीच भविष्यात खरे ठरेल चोरी करणारा केव्हांना केव्हां तरी पकडला जातोच मग आपल्या बायकोचे व मुलाचे काय?















उग्रशीलने विचार केला. नंतर थोड्या दूरवर झोपलेल्या आपल्या साथीदारांना त्याने उठविले व म्हटले–"चला, आपण इथूनच परत आपल्या घरी जाऊ."

उग्रशीलच्या तोंडून बाहेर पडलेली गोष्ट ऐकून त्याचे साथीदार आश्चर्यचकित झाले. व त्याला म्हणाले–"हे काय आश्चर्य! आजपर्यंत कुठेही लूटालूट केल्याशिवाय आपण घरी परत गेलो आहोत का?"

उग्रशीलचा चेहरा लालबुंद झाला. त्याने म्यानातून तलवार बाहेर काढून दरडावीत म्हटले–"मी तुमचा नायक आहे. हा माझा तुम्हांला आदेश आहे."

त्यानंतर अनिच्छेनेच सर्व साथीदार उग्रशीलच्या बरोबर आपापल्या घरी परत आले. ते पाहून सर्वांच्या बायका-मुलांना आश्चर्य वाटले.

नंतर उग्रशीलने सर्वजणांना एकत्र बोलावून म्हटले–"आपण सर्वजण मानव होऊन सुद्धा एखाद्या क्रुर श्वापदासारखी आयुष्य घालवत आहोत. आपल्या मुला-बाळांना सुद्धा अशा प्रकारे आयुष्य घालवावे लागू नये. त्यामुळे सकाळ उजाडताच आपण आपल्या राजधानीला जाऊन राजाच्या शिपायांकडे आपण स्वतःला सपुर्द करू या. आपल्याला आपल्या कृत्यांची शिक्षा मिळाली तरी हरकत नाही. परंतु आपल्या कुटुंबाला व मुलाबाळांना चांगल्या तऱ्हेने आयुष्य घालवता येऊ दे."

हे ऐकताच बऱ्याच जणांनी विरोध दर्शवत उग्रशीलला म्हटले–"आजपर्यंत आम्ही लोकांनी जे भयंकर अपराध केले आहेत ते पाहूनच राजा आम्हाला भयंकर शिक्षा करेल. त्यामुळे हे जंगल सोडून आम्ही कोठेही जाणार नाही."

"तर तुम्हां लोकांची जशी इच्छा आहे तसे करा! मी मला स्वतःला राजाच्या शिपायाच्या ताब्यात देईन. तुम्ही घाई-गडबड न करता विचारपूर्वक काय तो निर्णय घ्या. व उद्या सकाळी मला सांगा.

उग्रशीलने आपल्या सर्व साथीदारांना योग्य सल्ला दिला.

आपल्या पतीमध्ये झालेले परिवर्तन पाहून उग्रशीलच्या बायकोला अत्यंत आनंद झाला.

उग्रशीलच्या सल्ला न जुमानता त्याला सर्वांनी विरोधच दर्शविला. त्यामुळे त्याला अत्यंत राग आला. तो रात्रभर शांततेने झोपू शकला नाही. रात्रीच्या तिसऱ्या प्रहरी तो उठून बाहेर पडला. बाहेर अत्यंत थंडी होती. तो एका झाडाखाली अंधारात जाऊन उभा राहिला. थोड्या दूरवर एका झाडाखाली त्याचेच दोन अनुयायी आपापसात बोलाचाली करीत असलेले त्याला दिसले ते काय बोलतात हे ऐकण्या करीता तो कान लावून ऐकू लागला.

त्यातील एकजण म्हणत होता–"एक मुलगा झाल्याबरोबर उग्रशीलच्या स्वभावात भलतेच परिवर्तन झाले. त्याने स्वतःला राजाच्या हाती सोपविले तर ते त्याचा नानातऱ्हेने छळ करून त्याच्याकडून आपला मागमुस काढून घेतील. त्यामुळे झोपेतून उठण्या आधीच सकाळ व्हायच्या आत त्याच्या सर्व कुटूंबाला मारून टाकले पाहिजे."

"मी तुझे म्हणणे मान्य करतो. आपला



सांगून त्यांची मदत घेतली पाहिजे" दुसरा म्हणाला.

हे ऐकताच उग्रशीलला तेथे रहाणे धोक्याचे वाटले. त्याक्षणीच जाऊन त्याने बायको मुलाला उठविले व घोड्यावर बसून तो राजधानीकडे निघाला.

दोन दिवसांनी तो राजधानीला पोहोचला. त्याने एका ठिकाणी घोड्याला सोडून दिले. व बायको मुलाला बरोबर घेऊन पायीच राजधानीत निघाला. कित्येक वर्षे जंगलात आयुष्य घालविल्यामुळे उग्रशीलच्या बायकोला तेथील गर्दीत चालणे मुष्किल होऊ



त्या दिवशी रात्री ते एका धर्मशाळेत उतरले. अर्धरात्री उग्रशील आपल्या बायकोला म्हणाला–"मी सकाळ उजाडताच राजभाटच्या हाती स्वतःला सुपूर्द करतो."

हे ऐकताच उग्रशीलची बायको घाबरून गेली व म्हणाली-"आम्हांला ह्या लोकांच्यात सोडून तुम्ही जर तुरुंगात गेलात, तर आमचे काय हाल होतील? पाहिजे तर आम्हांला दोघांना विष पाजून मारून टाका व मग जा."

आतामात्र उग्रशीलच्या समोर गंभीर प्रश्न उभा राहिला. त्याने जे धन आपल्या-बरोबर आणले होते. त्याने कोणताही धंदा काढून आरामात जिवन घालवणे शक्य होते. परंतु तो तर डाकू उग्रशील होता. शेवटी ही गोष्ट किती दिवस गुप्त राहू शकेल. नंतर जर हे राजाला समजले तर राजा भयंकर शिक्षा करेल. जर आताच राजा समोर उभे राहिले तर त्यातल्या त्यात कमी शिक्षा होईल.

उग्रशील असा विचार करून आपल्या बायको मुलाला गाढ झोपेत असतानाच सोडून निघाला. तो एक कुशल डाकूच त्यामुळे त्यांनी राजाच्या शिपायांच्या डोळ्यात धूळ फेकून राजाच्या महालात प्रवेश केला. तो राजाच्या पलंगापाशी जात नाही, तोच त्याचा पाय एका थाळीला लागला व त्याच्या आवाजाने शिपायी चोर! चोर! म्हणत राजाच्या महालात घुसले व त्यानी उग्रशीलला पकडले.

राजा सुद्धा त्या आवाजाने जागा झाला. उग्रशील जोरजोरात ओरडू लागला की; तो चोरी करण्याकरीता महालात आलेला नाही.

राजा सत्येंद्रने आपल्या शिपायांना हुकूम सोडला–"तुम्ही सर्वजण त्याची तपाशी करा. न जाणो त्याच्या जवळ काय काय हत्यारे असतील."

पहारेकऱ्यांनी त्याची तलाशी घेतली. परंतु त्याच्याकडे कोणतेही हत्यार सापडले नाही.

"त्याला इथेच सोडून तुम्ही सर्वजण जा." राजाने हुकुम सोडला. पहारेकरी निघून गेल्यानंतर उग्रशीलला राजाने विचारले–"तू चोरी करायला आला नाहीस तर मग कशाला आलास?"

उग्रशीलने राजाला नतमस्तक प्रणाम करून म्हणाला–"महाराज, मी जे अपराध केले आहेत. त्याची शिक्षा घेण्याकरीता आलो आहे. मी शिपायांच्या हाती बंदिस्त झालो असतो तर सर्व जनतेला हे समजले असते व अशा स्थितीत माझी बायको व मुलगा ह्यांना त्याचा त्रास सहन करीत दिवस काढावे लागले असते" त्यानी आपला सारा वृत्तांत राजाला सांगितला.

राजाने त्याची सर्व कहाणी ऐकली व संतुष्ट होत मान हलविली. नंतर शेजारच्या खोलीत जाऊन त्यांनी एक थैली आणली व उग्रशीलला म्हटले–"उग्रशील, ह्या थैलीत शंभर सोन्याची नाणी आहेत. पुढच्या वर्षी बरोबर ह्याच दिवशी तू मला दोनशे सोन्याची नाणी आणून द्यावयाचीस परंतु लक्षात ठेव ती तुझ्या स्वतःच्या कष्टाच्या कमाईची असली पाहिजेत." असे म्हणत त्याने त्याच्या हातात ती थैली दिली.

ह्यानंतर राजाने टाळी वाजवून आपल्या पहारेकऱ्यांना बोलावले व म्हटले–"तुम्ही



ह्याचा आदर ठेऊन ह्याला नेऊन राज-मार्गावर सोडून द्या."

पहारेकऱ्यांनी राजाच्या सांगण्या-प्रमाणे केले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा जेव्हां डाकू उग्रशीलने स्वतःला राजाच्या ताब्यात दिले. तेव्हां राजाने त्याला दंड न करता वर शंभर सोन्याची नाणी देऊन सोडून दिले. हि तर राजाची वांकडी बुद्धी म्हटली पाहीजे नां? ह्या गोष्टीची काय खात्री की तो भविष्यता-परत चोरी व लुटमार करणार नाही. राजाकडे तर अनेक पहारेकरी व शिपायी आहेत त्यामुळे त्याला तर डाकू पासून धोका

नाही परंतु सर्वसाधारण माणसाचे काय होणार? उग्रशीलमध्ये परिवर्तन झाले असेल, परंतु जंगलात रहाणाऱ्या त्याच्या बाकीच्या लोकांची काय खात्री? ह्या सर्व गोष्टीचा विचार केला तर राजाने मनांत आला तसाच निर्णय घेतला कां? ह्याचे गुपित मांहीत असून तू सांगितले नाहीस तर तुला माहीतच आहे की तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–" राजा सत्येन्द्रने डाकू उग्रशीलला दण्ड न देता मुक्त करून स्वताःचा मोठेपणाच दाखवून दिला. खरे तर शिक्षा देणे ह्याचा एकच उद्देश असतो की; अपराध्याला त्याची चुक समजून देणे. व त्याचा मनांत त्या गोष्टीचा बदल घडवून आणणे. परंतु त्याच्या शारिरिक दृष्टीनें छळ करणे हा नाही. उग्रशीलने आपल्या साथीदारांचे म्हणणे न ऐकता आपण केलेल्या अपराधाची शिक्षा भोगण्या करीता राजधानीला येऊन राजाच्या हाती स्वताःला सोपविले. ह्यावरून ह्या गोष्टीचा उलगडा होतो की, भविष्यात हा केव्हांही चोरी करणार नाही. व लुटमार करणार नाही. त्याने राजाला सांगितलेल्या सर्व गोष्टी ऐकून त्याने अंदाज लावला की, उग्रशीलचे इतर साथीदार कुठे आहेत व कुठे रहातात. त्या लोकांना कसेही कळेल की, राजाने त्याच्या नेत्याला दण्ड न करता क्षमा करून सोडून दिले आहे. त्यामुळे राजा हा धर्मात्मा आहे. समजून ते राजाच्या समोर येऊन उग्रशील सारखे क्षमा मागतील आणि तसे जर झाले नाही तर राजाचे शिपायी त्यानां पकडून आणतील ह्या सर्व कारणांमुळे आपल्याला समजून येते की, राजा वांकड्या बुद्धीचा नाही. व विचारपूर्वक निर्णय घेणारा आहे. त्याहुन तार्किक दृष्टी ठेवणारा व विवेकशील आहे."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि पुन्हां झाडाजवळ जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# अंधविश्वास

वल्लभपुर गावात रंगराव व सुजाता नावाचे दाम्पत्य रहात होते. एकदा त्यांचा पाच वर्षाचा मुलगा आजारी पडला. त्यांच्या गावात चांगला वैद्य कोणी नव्हता. त्यामुळे ते शेजारच्या गावातील एका प्रसिद्ध वैद्याकडे गेले. वैद्याने मुलाला तपासले व एका आठवड्याचे औषध दिले.

एक आठवडा उलटला, परंतु मुलगा बरा झाला नाही. सुजाताला फार काळजी वाटू लागली. वैद्याने दिलेल्या औषधावरचा तिचा विश्वास उडाला. त्यांच्याच गावात श्यामनाथ नावाचा एक देवीचा उपासक रहात होता. तो मंत्र-तंत्र करून आजारी लोकांना गंडे ताईत वगैरे देत असे. त्याच्या-वर सुजाताचा विश्वास होता. तो दर शुक्रवारी देवीची उपासना करून ताईत देत असे. त्या दिवशी श्यामनाथच्या घरी खूप गर्दी होई. दूरदूरहून लोक त्याच्या-कडे येत असत. सुजाताने नवऱ्याला सांगितले की, त्याने श्यामनाथकडे जाऊन मुलाकरीता ताईत घेऊन यावा.

"हे तर भोळे, अज्ञानी लोकांचे काम आहे. मी त्याच्याकडे जाणाऱ्या बऱ्याच जणांशी बोलतो आहे ते तर एकजात अंधविश्वासावर जगतात. ज्या रोगाला औषध बरे करू शकत नाही. त्या रोगाला ताईत काय बरा करणारा! मी परत वैद्याकडे जाईन व त्याची स्थिती सांगून औषध घेऊन येईन. तू घाबरू नकोस." रंगरावने आपल्या बायकोला समजावत म्हटले.

रंगराव जेव्हां वैद्याच्या घरी पोहोचला. तेव्हां वैद्य घरी नव्हता. घरातल्या लोकां-कडून त्याला समजले की, वैद्याची बायको बऱ्याच दिवसांपासून आजारी आहे. परंतु तिच्यावर औषधांचा काही परीणाम होत







नाही. त्यामुळे वैद्य श्यामनाथकडून ताईत आणावयास गेला आहे.

हि गोष्ट ऐकताच रंगरावला आश्चर्याचा धक्काच बसला. तो लगेच आपल्या गावी परतला व पाहातो तो काय श्यामनाथच्या घरी तुडुंब गर्दी. त्या गर्दीत त्याला वैद्यबुवा सुद्धा दिसले. रंगरावने जवळ जाऊन वैद्याला मुलाबद्दल सांगितले.

वैद्याने आपल्या हातातील पिशवीतून काही औषधे बाहेर काढून रंगरावच्या हातात दिली. व एक आठवडाभर औषधे घेऊन नंतर काय उपयोग झाला किंवा नाही हे कळविण्यास सांगितले.

रंगरावने औषधे हातात घेऊन वैद्यांना विचारले–"काय हो! आपण तर वैद्यक-शास्त्रातले गाढ पंडीत तरी सुद्धा तुम्ही ताईत आणायला आलात?"

रंगरावच्या बोलण्याचे वैद्याला हसू आले तो म्हणाला–"ह्या गंडे दोऱ्यावर मी विश्वास ठेवू कां नको ठेवू हि गोष्ट वेगळी. परंतु खरी गोष्ट अशी आहे की, कित्येक दिवसांपासून माझ्या बायकोवर औषधांचा इलाज करीत आहे. परंतु तिचा आजार काही बराच होत नाही. तेव्हांपासूनच माझ्या बायकोचा ह्या ताईतवर इतका विश्वास बसू लागला. तिला वैद्यक शास्त्राचे ज्ञान तर नाही परंतु औषधांचे गुण चांगले माहीत आहेत. माणसाचा वैद्याच्या औषधांवर विश्वास असायला हवा मी समजलो की, माझ्या औषधांवरचा माझ्या बायकोचा विश्वास उडाला आहे."

जेव्हां रंगराव शेजारगावी वैद्याच्या घरी गेला होता. तेव्हां नकळत त्याच्या बायकोने श्यामनाथकडून ताईत आणून गुपचूप मुलाच्या कमरेला बांधून ठेवला होता.

एका आठवड्याने औषधांमुळे त्याचा मुलगा खडखडीत बरा झाला. त्यावर रंगरावने विचार केला की, वैद्याने दुसऱ्या खेपेस दिलेल्या औषधाचा चांगला उपयोग झाला. परंतु सुजाताची खात्री झाली की, आपण बांधलेल्या ताईताच्याच महिम्याने आपला मुलगा बरा झाला.





# दानाचा महिमा

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्वांनी त्याच्या कारकुनाच्या रूपाने अवतार ग्रहण केला. ते ऐंशी करोड सुवर्ण नाण्यांचे मालक होते. परंतु त्यांच्या मनातून संसारा विषयी वैराग्य उत्पन्न झाले. त्यामुळे त्यांनी राजाला सांगितले की, ह्या सर्व संपत्तीचा तुम्ही स्विकार करावा.

"माझ्याकडे धनाची काही कमतरता नाही. त्यामुळे तुम्ही तुमचे धन इतर कोणत्याही प्रकारे कारणाला लावा"–राजा म्हणाला. त्यानंतर कारकुनाने राजाच्या संमतीने काशी नगरात सहा धर्मशाळा उघडल्या. ज्यात गरीबांना फुकट रहाणे खाणे मिळे त्याच बरोबर त्यांना दानही मिळत असे.

ह्या धर्मशाळा अनेक वर्ष चालवल्यामुळे त्याचे फळ म्हणूनच की, काय मरणानंतर त्या कारकुनाला स्वर्गात इंद्राचे स्थान प्राप्त झाले. त्याच्या मुलाने सुद्धा वडीलाच्याच पाऊलावर पाऊल ठेवून कार्य केल्यामुळे त्याला चंद्राचे स्थान प्राप्त झाले. चंद्राच्या मुलाने सूर्याचे स्थान मिळविले. सूर्याच्या मुलगा मातली व मातलीचा मुलगा पंचशिखाग्नी रूपाने जन्मले. अशा तऱ्हेने सर्वांनी देवत्व प्राप्त केले.

परंतु पंचशिखच्या मुलापर्यंत पोहोचता पोहोचता त्याच्या वंशाचे आचरण व क्रम नाहिसे झाले. कारण पंचशिखचा मुलगा ऐंशी करोडो सोन्यांच्या नाण्याचा अधिपती असुन सुद्धा नंबर एकचा लुच्चा कंजुस होता. त्याने सर्व धर्मशाळा बंद करून टाकल्या. अन्नछत्रे बंद पाडली. कैक इमारती जाळून टाकल्या. त्याला वाटे की, आपले सर्व पुर्वज मूर्ख होते. त्यामुळे त्यांनी दानधर्म करून सर्व पैसा व्यर्थ खर्चला.











अन्नछत्र बंद झाल्याबरोबर गावातील सर्व गरीब लोक कंजुसमारवाड्याच्या घरा समोर गोळा झाले व हात जोडत विनंती करू लागल–"सरकार, दान देण्याच्या कमात अडथळा आणू नका. अन्नछत्र बंद करू नका." परंतु त्याच्या विनविण्याला त्याने दाद दिली नाही. उलट आपल्या नोकरांकरवी हाकलून लावले.

कंजुसमारवाडी सुद्धा करोडोपती होता. व आपल्या आजोबा पणजोबांसारखा राजाकडे कारकुनी करीत होता. परंतु तो आपले आयुष्य ऐष आरामात घालवित नसे. स्वत: पोट भरून जेवत नव्हता व बायकोमुलांनापण खाऊ देत नव्हता. तो थोड्या कांदा मिरची बरोबर भाकरी खात होता व आबंट ताक पित होता.

एक दिवस तो कंजुस कारकुन दरबारात जायच्या वेळेला आपल्या सहाय्यक कारकुनाला पण बरोबर घेऊन जावे ह्या विचाराने त्याच्या घरी गेला. तेव्हां त्याचा सहाय्यक आपल्या बायको मुलांबरोबर बसून हलवा खात होता. त्याला पहाताच तो झटकन् उठून उभा राहिला व त्याला खाण्याची विनंती केली.

कजुंस मारवाडी असा विचार करून घाबरला की, जर आता आपण हलवा खाल्ला तर, केव्हां ना केव्हांतरी ह्या सर्वांना आपल्या घरी जेवायला बोलावणे भाग पडले. त्यामुळे तो म्हणाला–"मित्रा, आज तर मला भुक नाही. थोड्यावेळा पूर्वीच मी पोटभर जेवलो.

परंतु त्या क्षणी कजुंसमारवाड्याला हलवा खाण्याची तीव्र इच्छा झाली. पण जर घरी हलवा तयार केला, तर आपल्या बरोबर केकजण तो खातील त्यामुळे त्याने ती इच्छा घरी प्रकट करून दाखविली नाही व तो मनातल्या मनात खंगत आजारी पडला.

त्याच्या बायकोने विचारले–"काय तुम्हांला बरे वाटत नाही कां? औषधपाणी कां घेत नाही?"

"तुच आजारी असशील, मी तर अगदी ठिकठाक आहे." तो आपल्या बायकोला म्हणाला. परंतु बायकोने बरीच छेडछाड केल्यानंतर तीने नवऱ्याच्या मनातील इच्छा जाणली व म्हणाली–"आपण काय थोडेच कंगाल आहोत. हलव्याच्या कारणाकरीता आजारी पडण्याचे काय कारण! मी तर काशी नगरातील सर्वांना हलवा खायला घालीन. सर्व लोक पोट भरून खाऊन प्रसन्न होतील."

"हो! हो! मला माहीत आहे नां! तुझ्या माहेरचे गंडगंज लोक आहेत. त्याच्या कडून पैसा आणून सर्व गावाला हलवा खायला घाल." कंजुसमारवाडी बायकोला टोचेल असे बोलला. तेव्हां बायकोने नवऱ्याला समजावत सल्ला दिला. "ते जाऊ दे. आपल्या चाळीतील लोकांना तरी हलवा देता येईल. तेव्हां त्याने चिडून विचारले–"तुझा त्या लोकांशी काय संबध." "बर तर, मग आपल्या कुंटुबाकरीता बनवते." पत्नी म्हणाली–त्याला सुद्धा त्याने विरोध केला. "ठिक आहे, मग आपल्या दोघांकरीताच बनवते" बायको त्याला म्हणाली.

"तुला काय जरूर आहे?" पतीने चिडून म्हटले.



"बरं तर, तुमच्या एकट्या करीता करते! बरोबर ना?" बायकोने विचारले.

"खरे तर, घरी हलवा बनविण्याची काही एक जरूर नाही समजले! तू थोडा रवा दूध, तुप व साखर माझ्या हातात दे. भांडे पण दे. मी जंगलात जाऊन तेथे हलवा करून खाईन"–नवरा म्हणाला.

बायकोने साऱ्या वस्तु आणून कंजुसमारवाड्याच्या हातात दिल्या. त्या त्याने एका नोकराच्या डोक्यावर ठेवल्या व स्वता: तोंडावर बुरखा पांघरून नदीच्या काठाकांठाने जंगलात पोहोचला. तेथे कोपऱ्यात एक चुल पेटवून त्याने नोकराला हुकूम सोडला. "तू जाऊन रस्त्याच्या












मध्यावर उभा रहा. जर कोणी तेथून जाऊ लागला तर मला तावडतोब सांग. आणि मला काही जरूरी वाटले तर मी तुला हांका मारेन तो पर्यंत तू माझ्याकडे येऊ नकोस. समजले!"

तोपर्यंत इन्द्राने आपल्या सहाव्या पिढीतील कंजुसमारवाड्याविषयी सर्व गोष्टी ऐकल्या होत्या.

इंद्राने विचार केला—"पंचशिख पर्यंतच्या पिढीतील लोकांनी दान करून पुण्य मिळवून देवत्व प्राप्त केले. परंतु पंचशिखचा मुलगा कंजुस मारवाडी बनून आपल्या पिढीचे आचरण न करता त्याला तिलांजली देऊन स्वतः हलवा खायला बसत आहे. जर मी त्याला वेळवरच ज्ञानोदय केला नाही तर तो नक्कीच नरकात जाईल. असा विचार करून इंद्राने, चन्द्र सूर्य मातली व पंच शिख यांना सर्वांना बोलावले व पुढे काय करायचे ते सांगितले.

ह्यानंतर इंद्राने एका ब्राह्मणाचे रूप घेतले व तो त्या कंजुसमारवाड्याजवळ आला. व त्याने विचारले—" काय हो, काशीकडे जाणारा रस्ता कुठून जातो."

तुम्हांला काशीला जाणारा रस्ता माहीत नाही? इकडे कशाला आलात? इथून निघून जा." कंजुस मारवाडी जोर-जोरात ओरडू लागला.

"ओरडतोस कां? अच्छा, हलवा करतो आहेस काय? म्हणजे ब्राह्मण भोजन घालणार वाटते. त्याच्या पंक्तिला मी सुद्धा येऊन बसेन." इंद्र हंसत हंसत म्हणाला.

"जेवणाचे आमंत्रण वगैरे काही नाही" "जा इथून चालू पड!" कंजुस मारवाड्याने चिडून म्हटले.

"मुला, नाराज कां होतोस. मी एक अभ्यागत आहे. तू जे काय करतो आहेस त्यातले थोडे आम्हाला पण दे. त्याने तर तुला पुण्य लागेल पाप नाही" इन्द्र म्हणाला.

"मी तुला थोडा पण देणार नाही! इथे जो हलवा बनवतो आहे. तो माझ्या-करीता सुद्धा पर्याप्त नाही मी स्वतःने याचना करून आणला आहे. त्यातून ह्यातला तुम्हाला देऊ ते काही होणार नाही" कंजुसमारवाड्याने स्पष्ट सांगून टाकले.



"त्यातले थोडे मला दान म्हणून दे. एकट्याने कधीही खाऊ नये. दान करून तुला चांगल्या लोकांची गती मिळेल." अशा प्रकारे इंद्राने त्याला उपदेश केला. कंजुसमारवाडी नाईलाजाने म्हणाला—"ठिक आहे! तिथे बैस. तुला थोडा हलवा देतो."

तेवढ्यात तेथे चंद्र पण ब्राह्मणाचा वेष घेऊन आला. त्याने त्याला हलवा मागितला. त्याला पण हलवा खायला बसवणे भाग पडले. त्यानंतर क्रमाने सूर्य मातली व पंचशिख सर्व एकापाठोपाठ तेथे आले व ब्राह्मणांच्या पंगतीला बसले.

लवकरच हलवा तयार झाला. तेव्हां कंजुसमारवाडी सर्वांना उद्देशून म्हणाला—"तुम्ही सर्वजण पत्रावळी घेऊन या. मग हलवा वाढतो." ब्राह्मणांनी आपले हात पुढे केले. तेव्हां तावडतोब चाकाएवढी कमळाची पाने त्याच्या हातात आली.

"मी एवढ्या मोठ्या पानांवर वाढणार नाही. मंदाराची पाने घेऊन या." कंजुस-मारवाड्याने सांगितले. तसे मंदाराची पाने हातात आली. ती केळयांच्या पानाहूनही मोठी होती. त्यावर कंजुसमारवाड्याने हलवा वाढला. सर्वांना वाढून झाल्यावर सुद्धा भांड्यात खूप हलवा उरला होता.

तेवढ्यात पंचशिखने कुत्र्याचे रूप घेतले. व तो त्या भांड्यात तोंड घालणार तेवढ्यात कंजुसमारवाड्याने झटकन् पातेल्यावर झांकण घातले पण तेवढ्यात त्याचे तोंड त्याच्या हाताला लागलेच.

त्याने त्या ब्राह्मणांना हुकुम सोडला—"मला हात धुण्याकरीता पाणी घेऊन या. परंतु त्या सर्वांनी स्पष्ट सांगितले—"आम्ही पाणी आणणार नाही."

"तुम्ही माझा हलवा खाल्लात. माझ्या बद्दल तुम्हा लोकांना एवढी पण दया येत









नाही." कंजुसमारवाडी म्हणाला. त्याचा काहीही परीणाम त्या लोकांवर झाला नाही. तेंव्हां तो म्हणाला–"तर मग, तुम्ही माझ्या भांड्याकडे लक्ष ठेवा. मी स्वत:जाऊन पाणी घेऊन येतो. असे म्हणत तो कंजुसमारवाडी पाणी आणण्याकरीता नदीत उतरू लागला त्याचक्षणी कुत्र्याने त्याच्या भांडयात तोंड घातलेच.

ते पाहून त्या कंजुसमारवाड्याला अतिशय राग आला. त्याने एक काठी घेतली व तो त्या कुत्र्याला मारायला त्याच्यापाठी मागे धावू लागला. तेवढ्यात त्या कुत्र्याने घोड्याचे रूप घेतले व तो कंजुसमारवाड्याच्या पाठीमागे पळत येऊ लागला. तो पळता पळता कधी छोटा तर कधी मोठा असे नानविविध आकार घेऊ लागला. ते पाहून प्राणाच्या भीतीने कंजुस थरथर कांपू लागला. व त्या ब्राह्मणांच्या पाया पडत त्यांना आर्जवू लागला. "हे महात्मन्, या घोड्यापासून माझे रक्षण करा."

दुसऱ्या क्षणी ते सर्व आपल्या खऱ्या रूपात प्रकट झाले.

"आपण सर्वजण मानव नाहीत देव आहात! आपण कृपा करून सांगा. तुम्ही कोण आहात? आणि इथे कशा करीता आला आहात?" कंजुसमारवाड्याने विचारले.

"आम्ही तुझे पुर्वज आहोत. मनुष्य जन्मात दान पुण्य करून त्याचा परिणाम स्वरूप स्वर्गलोकात देवत्व प्राप्त केले आहे. तू कंजूस बनून आपल्या वंशाने आचरण न करता नरक लोकांत जायला पाहातो आहेस. ह्या करीता आम्ही तुला चांगला धडा मिळावा ह्या हेतूने आलो आहोत. तू आपल्या घरी परत जा. व आमच्या सारखे दान पुण्य संपादन करून देवत्व मिळव." इन्द्र म्हणाला.

इंद्राचे बोलणे ऐकून कंजुस मारवाड्याचे मन बदलले. त्याने घरी जाऊन आपली सर्व संपत्ती गोरगरीबांना वाटून टाकली. व तो तपश्चर्या करण्याकरीता हिमालयात निघून गेला.





# स्वातंत्र्याची प्राप्ती

सन् १७३७ मध्ये पश्चिमेकडच्या देशात युद्ध झाली. ती हळूहळू पुढे पसरत चालली. अजेय रूपातील प्रसिद्ध इंग्लंड देशाला अचानक एका शक्तिशाली शत्रुदेश जर्मनी बरोबर लढा द्यावा लागला. विमानाच्या द्वारा बॉम्ब वर्षा करणे आता सुलभ झाले. त्यामुळे युद्धांची भीती जास्त वाढली.

जर्मनीचा नेता हिटलर ह्याने भिषण हत्याकांड व क्रूर कृत्ये करण्यास आरंभ केला. स्टॅलीनच्या अधिपत्या-खाली त्याने रूस बरोबर मैत्रिचे संबंध जोडले व त्याच्यानंतर त्या देशा-वर हल्ला केला. हिटलरने यहुदी लोकांना खूप त्रास दिला. आपल्या देशातले व इतर आजुबाजुच्या देशातील सर्व यहुदी लोकांची कत्तल केली.





एशिया खंडातील येणाऱ्या जपानने हिटलरबरोबर मैत्री करण्याकरीता हात पुढे केला. जपानचा राजा शांतीचा उपासक होता. परंतु अन्य लोक राजनैतिक नेते व अधिकारी लालची होते. तिकडे मुसोलिनच्या कारभारात असलेल्या इटली देशाने सुद्धा जर्मनी व जपान बरोबर मैत्री संपादन











ब्रिटन अमेरीका सुद्धा येऊन मिळाली. परिणामी दुसरे महायुद्ध सुरु झाले. गांधीजीने ब्रिटनला सुचना केली की, जर ब्रिटनने भारताला स्वातंत्र्य देण्याचे वचन दिले तर युद्धात भारत ब्रिटनला सहकार्य करेल. परंतु ब्रिटनने तसे आश्वासन दिले नाही. ब्रिटीशांनी भारत सोडून जावे 'क्विट इंडिया' चळवळ सुरु झाली. ब्रिटीशांनी भारतियांना त्रास द्यावयास सुरवात केली.

त्याच सुमारास जपानने ब्रिटीशांच्या आधीन असलेल्या मलाया व सिंगापूर वर हल्ला केला. ब्रिटीशांना सिंगापूर म्हणजे एक तट वाटत होता. त्याच्या पराजयामुळे सर्वांनाच आश्चर्याचा धक्का बसला. अशी वेळ आली होती. की, जर्मनी व जपान जर एकत्र आले तर ब्रिटन व अमेरीका मित्र राष्ट्र पण पराजित होतील.





ब्रिटीश सरकारच्या कडून बंदिस्त असलेले भारताचे नेता श्री सुभाषचंद्र बोस तुरुंगातून निसटून काबूलला पळून गेले. तेथून १९४२ मध्ये ते सिंगापूरला पोहोचले. तेथे पराभव पावलेल्या ब्रिटीश सैन्यातील भारतीयांना एकत्र करून "आजाद हिन्द फौज" ह्या नावाने त्यांना सैनिक प्रशिक्षण देऊ लागले. श्री सुभाषचंद्र बोसनी इंग्रजांना

आजाद हिन्द फौजने अनेक संकटांना तोंड देऊन भारत देशात आपले पाय ठेवले व मणिपूरच्या कोहिमा मध्ये प्रवेश केला. ह्यानंतर शस्त्रास्त्राच्या अभावामुळे सेना पुढे जाऊ शकली नाही. जपानला सुद्धा विजय मिळवणे प्राप्त झाले नाही. ह्यानंतर १९४५ ऑगस्टला सुभाषचंद्र बोस गुडलेने नाहीसे झाले.





त्याच सुमारास मुस्लिम लीगचे नेता मोहम्मद अली जिन्हा ह्यांनी पाकिस्थान नावाने अलग राज्य करण्याची कामना केली. अनेक देशातील नेत्यांनी त्यांची समजूत घातली असे करणे बरोबर होणार नाही. तरी ब्रिटीशांना आपल्या बरोबर घेऊन त्यांनी पाकिस्थान अलग करण्याचा चंगच बांधला.

अनेक वर्षांपासून हिंदू व मुसलमानामध्ये बंधुत्व निर्माण झाले होते. परंतु पाकिस्थान वेगळे होण्याचे समजताच जनतेच्या मनात धर्माचे बी पेरले गेले. मुस्लिम लीगने आपल्या बाजूने लढा देण्याकरीता १९४६ ऑगस्ट १६ ला सुरवात केली. कलकत्ता, दिल्ली, व अनेक ठिकाणी दंगल झाली. भिषण खून हत्या झाली. हजारो लोकांनी



    




स्वतंत्र चळवळीचे प्रमुख नेता व महान राजनीतिज्ञ जवाहरलाल नेहरूंनी १९४६ मध्ये स्थापित तात्पुरते सरकारी नेतृत्व धारण केले. नेहरूंनी मुस्लिम लीगला अनेक प्रकारे समजावले. भारताच्या फाळणीच्या खटपटीस न पडता भारताला एक करण्याकरीता हात पुढे करावा. परंतु मुस्लिम लीगने मानले नाही. त्यामुळे भारताला स्वतः:च्या स्वातंत्र्य प्राप्ती करीता मोठ्या त्यागाने तयार व्हावे लागले.

दुसऱ्या महायुद्धाच्या लढयाचा महान सेनापतीच्या रूपात प्राप्त झालेल्या मौट बैंटन हा भारताचा गर्व्हनर जनरल म्हणुन नियुक्त झाला. त्याच्या बरोबर बातचीत करताना नेहरूंनी ३ जून १९४६ ला अशी घोषणा केली की भारताच्या विभाजना करीता राष्ट्रीय महासभा कॉंग्रेस त्यांना सहमत आहे. त्यांच वर्षी १५ ऑगस्टला भारताला स्वातंत्र प्राप्ती मिळाली.





भारताच्या फाळणी नंतर त्याचे फळ म्हणून अनेक दंगेधोपे मार्या युद्ध ह्या संकटांना देशाला तोंड द्यावे लागले. तरीही सर्व भारतियांनी आपल्या बळाने एकी साधून आपल्या प्राचीन वैभवांचे स्मरण करून उज्वल भविष्याच्या हेतूने एकसाथ दिली.

# ईमानदारी

नारायणवरम् एक शेतकीचे गाव होते. तेथील चंद्रवसु नावाचा गावचा पाटील वयाच्या साठ वर्षापर्यंत स्वता:जमिनदारी चालवत होता. एक दिवस अचानक त्याचा देहान्त झाला. तेव्हां गावातील सर्व गावकरी एकत्र जमले व ते जमिनदार साहेबांच्या घरी आले व त्यांनी सांगितले–"मालक, चंद्रवसुंना कोणीही वारस नाही. त्यामुळे त्यांच्याच सारखा विश्वासू माणुस तुम्ही गावाच्या अधिकारीच्या पदावर नियुक्त करावा."

जमिनदाराने गावकरी लोकांना दिवाणजींकडे पाठविले. "ह्या पदावर राहून कोणत्याही माणसाच्या विश्वासुपणाचा शोध लागेल काय ? परंतु एका कामधंदा नसलेल्या माणसास जर ह्या गावाचे अधिकारी पद दिले. तर कसा शोध लागणार की, तो विश्वासूच असेल."

"हि गोष्ट खरी आहे." असे म्हणत दिवाणाने नारायणवरम् गावच्या अधिकाऱ्याच्या पदावर भरती करण्याकरीता गावात दवंडी पिटवली व अशी सुचना केली की, ज्यांना ह्या पदावर यावयाचे असेल. अशा उमेदवारानी जमिनदार साहेबांच्या खजिनदाराला प्रथम भेटावे.

एका आठवड्याने अनेक उमेदवार येऊन खजिनदाराला भेटले. खजिनदाराने वेगळ्या तऱ्हेने त्यांच्याशी बोलणे केले. त्यांनी दुसऱ्या दिवशी दहा वाजता त्यानां जमिनदार साहेबांच्या इथे यावयास सांगितले.

खजिनदाराने जो उमेदवार निवडला त्याचे नाव नागवर्मा होते. त्याला अधिकारी पदावर नियुक्त केले गेले. त्यामुळे बाकीच्या नऊ जणांनी नापसंती दर्शवत म्हटले–"मालक, हा तर खरोखरी अन्याय आहे. आम्हाला ही नोकरी देण्याचे वचन देऊन ह्या खजिनदाराने प्रत्येकांकडून एक हजार रूपये लांच घेतली.

त्यावर दिवाणसाहेब मध्ये म्हणाले–"खजिनदाराकडुन तशी परिक्षा मीच घेतली. ह्या पदावर तुमच्या सारख्या लांच देण्याऱ्या लोकांना नियुक्त केले तर काय खात्री की, ते पद मिळाल्यानंतर तुम्ही लांच घेणार नाहीत. तुमच्यामध्ये विश्वासुपणा नाही. लांच देण्यास नागवर्माने झाडून नकार दिला. त्यामुळे ह्यात शंकाच उरली नाही की, ह्या अधिकारी पदावर नागवर्मा हाच एक योग्य माणूस आहे.





# नशिबवान गुलाम

एका समुद्रव्यापाऱ्याकडे वामांग नावाचा एक गुलाम होता. वामांगने आपल्या मालकाला व्यापारात खूप मदत केली. व त्याचा खूप लाभ मिळवून दिला. त्यावर त्याचा मालक त्याच्यावर प्रसन्न होत म्हणाला–"मी तुला गुलामीतून मुक्त करत आहे. तू माझ्या जहाजातील एक जहाज घे. व स्वतंत्र व्यापार करून आपले आयुष्य सुखाने घालव."

वामांग एक जहाज घेऊन समुद्रात व्यापार करण्यास निघाला. परंतु समुद्राच्या मध्यावर त्याचे जहाज तुफान वादळात अडकले, व पाण्यात बुडाले. सर्व जहाजावरचे लोक बुडाले एकटा वामांग पाण्यात फळकुटीला धरून तरंगत एका किनाऱ्यावर येऊन पडला. किनाऱ्यापलीकडे एक वस्ती दिसत होती. तो चालत चालत थोडा पुढे गेला व तेथील एका राज्यात पोहोचला.

राज्यातील सर्व जनता रस्त्यावर उभी असलेली दिसली. वामांगला ते पाहून गंमत वाटली, इतका वेळ ही माणसे आपलीच वाट पहात आहेत. की काय? तो त्याच्या जवळ पोहोचला नाही तोच सर्व लोक गर्जना करून मोठमोठ्याने घोषणा करू लागले–"महाराज की जय!" ते ऐकून त्याला जास्तच आश्चर्य वाटू लागले. व मनातल्या मनात तो विचार करू लागला–"हि माणसे मला पाहून दुसरा कोणी माणूस समजून भ्रमात तर पडलेली नाहीत ना?"

त्यानतर सर्वांनी वामांगला घेरले. व लगेच एक सजवलेला हत्ती तेथे आणला गेला. वामांगला अंबारीत बसवून राजाच्या थाटात राजमहालात आणण्यात आले.

नंतर त्याचे सर्व कपडे काढून ते एका पेटीत ठेवण्यात आले व त्याला चांगले स्नान घालून राजोचित वेष घालण्यात आला.

वामांगने त्या गर्दीला उद्देशुन विचारले–"तुम्ही लोकांनी अशा तऱ्हेने मला राजा बनवलेत ह्याचे काय गुपीत आहे? तुम्ही मला ओळखत नाहीत व मी तुम्हांला ओळखत नाही. एका संकटात सापडून माझे जहाज समुद्रात बुडाले व संयोगाने मी इथल्या किनाऱ्यावर येऊन पडलो. मी कोणत्याही खास हेतूने इथे आलेलो नाही.

त्यावर तेथील लोकांनी त्या देशाचा रीती-रिवाज सांगितला बावीस वर्षापूर्वी त्या देशावर कुणाचेही राज्य नव्हते सर्वत्र अराजकता माजली होती. त्याच वेळेस एक अपरिचीत व्यक्ति तेथे आली. त्याने सर्वांना सांगितले–"एका राजाच्या नेतृत्वा खाली एक वर्ष राज्य कारभार चालू झाला तर त्या देशाचा विकास होऊ शकेल. अशा तऱ्हेने राजाच्या राज्यकारभारामुळे अनेक देशांचे विकास झाले. जर राजा लोभी असेल जनताचे शोषण करणारा असेल तर ह्याला एकच उपाय दरवर्षी एका परक्या नविन माणसाला राजा नियुक्त करावे. तो राजा त्याच देशातला नसावा. व दुसऱ्या देशातला असावा तर तो राज्यकारभार चांगला करू शकतो." त्यावेळेपासून वर्षाच्या सुरवातीला जो कोणी नवा ह्या देशात येईल त्याला जनता राजा करीत आलेली आहे. एक वर्ष पुर्ण झाले की, त्या राजाला जवळच्या घनदाट



     

अरण्यात सोडून दिले जाते व नव्या माणसाची वाट पहावी लागते. जंगलात गेलेल्या माणसाबद्दल जनतेला किंचित सुद्धा काळजी वाटत नाही.

अशा तऱ्हेने ह्या राज्यातले बावीस राजे झाले. तू तेवीसाव्वा राजा आहेस.

वामांगला मनातून राजयोग व एक वर्ष का. होईना? राजा बनण्याचे सार्थक वाटून अति उत्साह वाटू लागला. त्याने अनेक शिपायांना बरोबर घेऊन शेजारच्या जंगलात जाण्याचा विचार केला. तेथे जाण्याकरीता नांवामधून जावे लागत असे.

वामांग काही शिपायांना बरोबर घेऊन जंगलात पोहोचला. त्यानंतर चार-पांच दिवस तेथेच राहून त्याने पूर्ण जंगलाची पहाणी केली. त्या जंगलात माणूस जिवत रहाणे शक्यच नव्हते. परंतु तेथे उत्तम प्रतीचे लाकूड व सुपिक जमिन मात्र होती.

जंगलातील झाडे कापून तेथे एक सुंदर नगर बनवले जाऊ शकले असते. असा विचार करून वामांगने बऱ्याच लोकांना तेथे कामावर लावले. त्याच्या वर्ष पूर्ण होण्यापूर्वीच जंगलात एक सुंदर नगर वसविण्यात आले.

नगराच्या चोहोबाजूला बागा करण्यात आल्या. त्या नगराचीनिर्मिती करणाऱ्यांना सुद्धा तेथेच रहावे असे वाटू लागले.

एक वर्ष पूर्ण झाले. वामांग जंगलातील नविन नगरात येऊन राहू लागला. त्याच्याबरोबर अनेक नगरातील लोक व नगर निर्माण केलेले लोक सुद्धा येऊन राहू लागले.

ह्या घटनेनंतर जुन्या नगरातील लोक सुद्धा वामांग पासून दूर रहाणे टाळू लागले. त्या सर्व लोकांनी एक सभा बोलावून विचार विनिमय केला की, वामांग ह्याला जुन्या व नव्या दोन्ही नगराचा महाराजा म्हणून कायम स्थान द्यावे. तेव्हां पासून तो दोन्ही नगरांचा राज्यकारभार आनंदाने सांभाळू लागला.





# सज्जनतेचा आदर्श

मुकुंद जात्याच स्वभावाने चांगला आणि बुद्धीमान होता. त्याला वाईट नाद होता. तो म्हणजे दुसऱ्याची चेष्टा मस्करी करून त्यात स्वतःचे मनोरंजनच करी. तो दररोज गावांच्यावेशी बाहेर आपल्या मित्रांना घेऊन जाई व जाणाऱ्या येणाऱ्या लोकांना छेडे त्यांची मजा बघे. सुरवातीला लोक उखडत असत परंतु कालातंराने त्याच्या खट्याळपणाकडे सर्वजण दुर्लक्ष करू लागले. ह्याचे मुख्य कारण म्हणजे मुकुंदला त्या गावाच्या जमिनदाराकडे नोकरी होती.

जमिनदाराच्या मनांत मुकुंदा विषयी अपार वात्सल्य होते. ते गावातील लोकांना माहित होते. जमिनदाराच्या घरी कामावर लागल्यापासून तर त्याचा खट्याळपणा जास्तच वाढला होता.

एक दिवसी संध्याकाळी मुकुंद मित्र मंडळीना घेऊन गावा बाहेरच्या तळ्याकाठी जाऊन बसला. तेव्हां त्याला दुरून गावाच्या बाजूला येणारी एक व्यक्ति दिसली.

तो माणूस जरा वयस्कच दिसत होता. त्याचे कपडे धुळीने मळले होते. त्याच्या पायात चप्पल सुद्धा नव्हत्या. दिसायला तो गरीब असावा असे त्याच्या पेहरावरून वाटत होते.

मुकुंदाने तो जवळ येताच त्याच्याकडे कुचेष्टेने पहात आपल्या मित्रांना म्हटले "अरे पहा! जमिनदाराच्या घरी कोणी पाहुणा आलेला दिसतो आहे. ह्याला वाट दाखवा.

ती व्यक्ति मुकुंदच्या जवळ येत हात जोडत म्हणाली–"बाळा, तुला कसे कळले की, मी जमिनदाराच्या घरीच चाललो आहे."

मुकुंदाला खदखदून हसू येऊ लागले. तो म्हणाला वाह् ! पांढऱ्या मोगऱ्या सारखी तुमची शुभ्र वस्त्र व महागातल्या चप्पल



आणि आता तर तुम्ही इतक्या भारी गाडीतून उतरलात आणि त्या शिवाय तुमच्या चेहऱ्यावर विलसणारे तेज पाहून– "ह्यांनी तर अंदाज लावता येतो की, जमिनदार साहेबाचे तुम्ही खास नात्यातले आहात ?"

"हो बाबा! मी ज्या गाडीतून आलो त्या गाडीचे एक चाक मोडलें व मी गाडीतून खाली पडलो व माझे कपडे धुळीने भरले म्हणून तर मी गाडीवानला परत पाठवून चालत आलो माझ्या गाडीवानाचा जायचा रस्ता सर्व काटयाकुटयानी भरला असल्यामुळे माझ्या चपला काढून मी त्याला दिल्या. मला वाटलेच होते. तू माझ्या चेहऱ्यावरच्या सर्व गोष्टी निट समजावून घेतल्यास ना ?" व्यक्तिने विचारले.

"अच्छा! असे आहे काय! तर मग काय तुम्हांला मी सरळ जमिनदाराच्याच घरी घेऊन जाऊ कां? आपले हसू दाबत मुकुंदा म्हणाला."

"ह्या अवस्थेत जमिनदाराला भेटणे बरोबर वाटत नाही. म्हणून तू मला प्रथम त्यांच्या धर्मशाळेत पोहोचव. माझा गाडीवान परत आला की, मी कपडे बदलून त्यांना भेटायला जाईन" त्या व्यक्तिने शांतपणे सांगितले.

यात्री व वाटसरूंना रहाण्याकरीता जमिनदाराने चांगल्या सुखसोयीनी उपयुक्त असलेली धर्मशाळा बांधली आहे. परंतु गरीब लोकच त्याचा जास्त उपयोग करतात. कारण तेथील खाणेपिणे फुकट मिळत. म्हणून श्रीमंत लोक धर्मशाळेत उतरणे म्हणजे कमीपणाचे मानतात. त्यातून त्यात जे गरीब लोक जास्त काळ कंठीत ते असा बहाणा करीत की, त्यांना रस्त्यात कोणी चोर उच्चक्याने लुबाडले. व धर्मशाळेत रहाण्यावाचून आता गत्यंतर नाही. त्यामुळे मुकुंदाला वाटू लागले की त्यामाणसांपैकीच ही व्यक्ति असावी.

"आपला गाडीवान कोणत्या वेळेपर्यंत परत येईल" मुकुंदाने विचारले.

"मी तशी वेळ काही सांगू शकत नाही" ती व्यक्ति म्हणाली.

"ठिक आहे! मी माझ्या गाडीवानाचे कपडे तुम्हाला देतो ते तुम्ही बदला."

त्यावर त्याचे मित्र खदखदून हसु लागले.

ते पाहूनही त्या व्यक्तिला अजिबात राग आला नाही. त्यांनी शांतचित्ताने विचारले–"तर मग मी तुझ्या घरी येतो. तू मला कपडे दे."

हे उत्तर ऐकून मुकुंदाला वाटले की तो माणूस भिकारी असावा. त्यामुळे त्याला खिजवत तो म्हणाला–"तुम्ही गाडीवानाचे कपडे घातलेत तर तुम्हांला जमिनदाराचे दर्शन होऊ शकणार नाही."

"ते माझ्या कपडयाकडे पहाणार सुद्धा नाहीत. कारण माझा तो जिवश्चकंठश्च मित्र आहे. इतके ते मला मान देतात." ती व्यक्ति म्हणाली.

"मग एवढी कपडयांची कशाला फिकीर ह्या कपडयात सुद्धा तुम्ही त्याला भेटू शकता." मुकुंद म्हणाला.

"हे पहा बाबा! प्रत्येक माणसाला कोणत्याही गोष्टीचे काही नियम घातलेले आहेत ते त्याला पाळावेच लागतात. जसे देवळात जातांना स्नान करूनच चप्पल काढून मगच जावे लागते. तसे कोणी अत्यंत प्रिय व जवळचा भेटणार असेल तर स्वच्छ कपडयात त्याला भेटणेच योग्य त्यामुळे मला तू आपला





# दिवाणाची परिक्षा

मलकापुरच्या जमिनदाराला घोडदौड करणे, शिकार करणे व कुस्ती खेळणे ह्याचा खूप शौक होता. त्यांनी आपल्या जमिनदारीच्या जवळपास येणाऱ्या गावांमध्ये आखाडे व व्यायामशाळा उघडल्या.

एकदा ते आपल्या शेजारगावी विष्णुपुरच्या जमिनदाराला भेटावयास गेले व त्याच्याबरोबर बरीच गावे हिंडून परत आले. त्या गावातील शाळा व शाळेतील मुलांच्या शिक्षणा संबधी विष्णुपुरच्या जमिनदाराने घेतलली अभिरूची पाहून मलकापुरच्या जमिनदाराला अतिशय आनंद वाटला.

आपल्या गावी परत आल्यावर मलकापुरच्या जमिनदाराने दिवाणाला बोलावणे धाडले. व म्हटले–"आपण सुद्धा आपल्या जमिनदारीच्या मध्ये येणाऱ्या गावांमध्ये पाठशाळा उघडल्या पाहिजेत. ह्या संबधी जो काही खर्च होईल त्याला भ्यायचे कारण नाही. तुम्ही तावडतोब शाळा उघडून त्यात शिक्षकांची नेमणुक करा."

दिवाण साहेब खर्च करण्यास घाबरत होते. ते सुद्धा जमिनदारा सारखेच शिकार खेळणे कुस्ती खेळणे ह्यातच जास्त रस घेत. त्यांना जमिनदाराने सांगितलेला आदेश पाळणे भागच होते. त्यामुळे त्यांनी प्रत्येक गावात एक पाठशाळा उघडली. त्याच्या समोर शिक्षकांची समस्या दत्त म्हणून उभी राहिली.

दिवाणांनी जमिनदाराशी सल्लामसलत केली. शेवटी सर्व गावांतून असा हुकूम जाहीर केला की, ह्यावेळी जे लोक व्यायाम शाळेचे शिक्षक म्हणुन नेमले त्यांनी दिवसा मुलांना शिकवावे व सूर्यास्तानंतर व्यायाम शाळा चालवावी.

अशा प्रकारे मलकापुरच्या सर्व गावांमधुन अशा शाळत चालू झाल्या. एक वर्षानंतर दिवाण स्वता: शाळेची पहाणी करण्याकरीता निघाले.



दिवाणसाहेब प्रथम गंगासागर नावाच्या गांवी पोहोचले. तेथील शाळेची पहाणी केली. तेव्हां अनेक विद्यार्थ्यांच्या बरोबर स्वता: शिक्षक सुद्धा डुलक्या घेत होते. व बाकीचे दंगामस्ती टवाळकी करीत होते.

ते पाहून दिवाणाला भयंकर राग आला. त्याने डुलक्या घेत असलेल्या एका मुलाला जागे करीत विचारले–"तुम्ही इथे काय झोपायला येता! मी आता तुला प्रश्न विचारतो तुमचे कुठपर्यंत शिक्षण झाले आहे पाहू ? असे म्हणत त्यांनी त्या मुलाला विचारले–"अरे बाळा! सांग, रामायण व महाभारताची रचना कोणी केली ?"

ह्यावर मुलगा थरथर कांपु लागला व घाबरत म्हणाला–"साहेब, मला मारू नका! पण खरोखरी ते दोन्ही ग्रंथ मी लिहीले नाहीत."

ते ऐकताच दिवाणाला अत्यंत क्रोध आला व त्याने शिक्षकाच्या खांद्यावर थापटत त्याला उठवले व रागावत म्हटले–"काय मुलांना तुम्ही हेच शिक्षण देता का? मी तुमच्या विद्यार्थ्याला विचारले की रामायण व महाभारताची रचना कोणी केली? तर तो म्हणतो आहे–"मी ते ग्रंथ लिहीले नाहीत?"

दिवाणसाहेबांना समोर पहाताच शिक्षकांची झोप खाडकन् उडाली. ते दोन्ही हात जोडत नमस्कार करीत म्हणाले–"महाशय, मला माफ करा. त्याने झोपेत तसे उत्तर दिले असेल. मला विश्वास आहे की, त्या ग्रंथांची रचना त्यानेच केली असावी."

हे उत्तर ऐकून तर दिवाणजीचा राग-अनावर झाला. ते सरळ मुख्याध्यापकांकडे गेले. व त्याना सर्व गोष्ट सविस्तर सांगितली व विचारले–"मी कधी असे मनातही आणले नव्हते की, शाळेच्या

दिपक केहरे

शिक्षणा बाबतीत असे वाईट हाल असतील. ह्यावर तुमचे काय विचार आहेत?

मुख्य शिक्षण अधिकारी घाबरून म्हणाले- "दिवाण साहेब, आपण उगाच भलताच विचार करू नका. ह्या गावचे लोक भोळे भाबडे आहेत. मुलांना शिकवण्याच्या वेळेस जर आम्ही त्यांना रागावलो तर ते त्यांना दुसऱ्या दिवसापासून शाळेत पाठवायला नकार देतील. तुम्ही जे कठीण प्रश्न विचारले ते हे बिचारे छोट विद्यार्थी कसे काय देऊ शकतील. कृपा करून सांगा? रामायण व महाभारत स्वता: तुम्हीच लिहीले आहेत नां?

हे ऐकताच दिवाणजींचा पारा चढला ते परत आपल्या गांवी आले. व जमिनदाराला भेटून बोलले-"साहेब! एका वर्षापूर्वी आपण जी शाळा उघडली. त्यांची पहाणी करण्याकरीता मी गंगासागर नावाच्या गांवी गेलो. तेथील शाळेतील परिस्थिती खूप वाईट आहे. तेथील विद्यार्थी व शिक्षक ह्याच्या बुद्धीत मला काहीच फरक आढळून आला नाही. मी त्यांना विचारले रामायण व महाभारताची रचना कोणी केली? ह्याचे बरोबर उत्तर एकालाही देता आले नाही. की, त्याच्यापैकी कोणालाही उत्तर सांगणे जमले नाही रामाने रामायण लिहीले व भरताने महाभारताची रचना केली. ह्यामुळे मला आश्चर्याबरोबर दु:ख पण झाले.

जमिनदाराला दिवाणाच्या बोलण्याची बुद्धीची किव आली. ते म्हणाले-तुम्ही आमच्या सर्व जमिनदारीतील गांवांची पाहाणी करण्याच्या ह्या कामाकरीता मदतीला आमच्या शिकारी कुत्र्याचे पर्यवेक्षक श्री भैरवशास्त्री आणि घोडे-स्वारीचे अश्ववती ह्यांना आपल्या बरोबर घ्या आपल्या बरोबर ते सुद्धा विद्यार्थ्यांना अनेक प्रश्न विचारून त्यांची परिक्षा घेतील ह्या कामा करीता मी एक लाख रूपये मंजूर करीत आहे. जमिनदाराच्या म्हणण्याचा आशय समजून शरमिंदेने दिवाणसाहेबाने स्विकृती सुचक मान हलविली.





# शिष्यपुराण

अहिंसा, शांततामय जिवन, जाति धर्म व वर्ण ह्यांना धरून रहाणाऱ्या समाजाची स्थापना करून बौद्धधर्माची शिकवण देणारा वटवृक्ष प्रस्थापित झाला.

मानव जगतातला उद्धार करणारे करुणाकर बनून आलेले सिद्धार्थ- "गौतमबुद्ध" किंवा बोधिसत्व ह्या नावाने भगवान रूपात अवतरले. गुण हिमालयाच्या शिखरापर्यंत वाढतच गेले.

वृद्धावस्थेत सुद्धा गौतमबुद्ध सर्वत्र भ्रमण करीत समाजाच्या कनिष्ठ वर्गातील अभागी लोकांचे, श्रेष्ट जातीतील लोकांनी केलेले अत्याचार व अपमान सहन करीत राहिलेले दलीत पिडीत लोकांना आपल्या उपदेशांद्वारा सभ्य व सुसंस्कृत बनवून त्यांना आपले शिष्य करून घेत होते. ह्या कारणामुळे देवदत्तला बुद्धांबरोबर प्रतिकार करण्याकरीता चांगली संधी मिळाली.

त्याने बुद्धाच्या विरोधकांचे संगठन करून त्याच्यावर हल्ला केला. व अनेक युक्त्या योजल्या.

एकदा देवदत्तने बुद्धांची टिका करीत त्यांना म्हटले-"तुम्ही तर अहिंसेचा प्रचार केलात हि तर छान गोष्ट झाली. ह्याच सिद्धान्ताला प्रभावित होऊन बरेच लोक बौद्धभिक्षु बनले.

"बाळ देवदत्ता! मी सांगितले आहे की, बौद्ध धर्माच्या अनुयायांनी अहिंसाचे पालन केलं पाहिजे. परंतु गरीबी मुळे काही वेळा ज्यावेळी जे काही मिळेल ते मांसाहार खाऊन







शिक्षणा बाबतीत असे वाईट हाल असतील. ह्यावर तुमचे काय विचार आहेत?

मुख्य शिक्षण अधिकारी घाबरून म्हणाले- "दिवाण साहेब, आपण उगाच भलताच विचार करू नका. ह्या गावचे लोक भोळे भाबडे आहेत. मुलांना शिकवण्याच्या वेळेस जर आम्ही त्यांना रागावलो तर ते त्यांना दुसऱ्या दिवसापासून शाळेत पाठवायला नकार देतील. तुम्ही जे कठीण प्रश्न विचारले ते हे बिचारे छोट विद्यार्थी कसे काय देऊ शकतील. कृपा करून सांगा? रामायण व महाभारत स्वता: तुम्हीच लिहीले आहेत नां?

हे ऐकताच दिवाणजीचा पारा चढला ते परत आपल्या गांवी आले. व जमिनदाराला भेटून बोलले-"साहेब! एका वर्षापूर्वी आपण जी शाळा उघडली. त्यांची पहाणी करण्याकरीता मी गंगासागर नावाच्या गांवी गेलो. तेथील शाळेतील परिस्थिती खूप वाईट आहे. तेथील विद्यार्थी व शिक्षक ह्याच्या बुद्धीत मला काहीच फरक आढळून आला नाही. मी त्यांना विचारले रामायण व महाभारताची रचना कोणी केली? ह्याचे बरोबर उत्तर एकालाही देता आले नाही. की, त्याच्यापैकी कोणालाही उत्तर सांगणे जमले नाही रामाने रामायण लिहीले व भरताने महाभारताची रचना केली. ह्यामुळे मला आश्चर्याबरोबर दु:ख पण झाले.

जमिनदाराला दिवाणाच्या बोलण्याची बुद्धीची किंव आली. ते म्हणाले-तुम्ही आमच्या सर्व जमिनदारीतील गांवांची पाहाणी करण्याच्या ह्या कामाकरीता मदतीला आमच्या शिकारी कुत्र्याचे पर्यवेक्षक श्री भैरवशास्त्री आणि घोडे-स्वारीचे अश्ववती ह्यांना आपल्या बरोबर घ्या आपल्या बरोबर ते सुद्धा विद्यार्थ्यांना अनेक प्रश्न विचारून त्यांची परिक्षा घेतील ह्या कामा करीता मी एक लाख रूपये मंजूर करीत आहे. जमिनदाराच्या म्हणण्याचा आशय समजून शरमिंदेने दिवाणसाहेबाने स्विकृती सुचक मान हलविली.



झाले तर श्रेष्ठ वर्गीतील लोकांचा आदर कोणीच करणार नाहीत. त्याचे महत्वच निघून जाई. त्यांची सेवा करणाऱ्याचा सुद्धा खतमा केला पाहिजे.

जीवक वेगळ्या जातीतला होता व बुद्धांचा शिष्य होता. बौद्धधर्मावर त्याचा गाढ विश्वास होता.

देवदत्ताने जीवकला प्रलोभने दाखवून आपल्या गटात सामिल करून घेतले. व त्याला सांगितले. बुद्ध जे काही सांगतात ते सर्व खोटे आहे. तुझ्या जातीतले व वर्णातील लोकांना आपला धर्मात ओढून घेण्याकरीता ते सर्व मानव प्राणी एकच आहेत म्हणून सांगतात. पण काय ते स्वत: तुमच्या सारख्या लोकांचे आयुष्य घालवू शकतील कां? तुमचे खाणे-पिणे खाऊ शकतील कां?" असे सर्व सांगून जीवकचे मन परिवर्तन देवदत्तने केले व बुद्धाला भिक्षा घेण्याकरीता निमंत्रित केले.

जीवकने बुद्धांना आपल्या घरी भिक्षा घेण्याकरीता येण्याची विनंती केली. तेव्हां जीवक बरोबर बुद्ध त्यांच्या घरी भिक्षा घेण्याकरीता आले. देवदत्त लपून बसुन सर्व पहात होता.

जीवकने बुद्धांना आपल्या घरी बोलावून आणले खरे पण आता भिक्षा द्यावयास संकोच करू लागला. तेव्हां ते जाणून



बुद्ध त्याला म्हणाले-"बाळा, जीवक, तू असे वाटून संकोच करू नकोस मला द्यावयाला तुझ्याकरीता जे तयार केले आहेस त्यातलेच मला दे. आज मी तुझ्या घरच्या भिक्षेवर अवलंबून आलो आहे.

जीवकने आपल्या थरथरत्या हाताने त्यांना भिक्षा घातली. बुद्धाने संतोषाने ते ग्रहण केले.

परंतु वार्धक्यामुळे बुद्धांची तबेत ठिक नव्हती त्यांना ते पचवणे जड जात होते. त्याची पचनशक्ति, क्षीण झाली होती. जीवकने जी भिक्षा घातली तो मांसाहार होता तोही चांगला प्रतीचा नव्हता.

त्यानंतर जीवकला आशिवाद देत बुद्ध



तेथून निघून गेले. जीवकच्या मनांमध्ये पाप घडल्याची भीती वाटू लागली. अपराधी भावनेने त्याचा चेहरा कोमेजून गेला. लपून पहात असलेला देवदत्त मनांतल्या मनांत आश्चर्यचकित होऊन आतल्या-आत पश्चातापाने होरपळू लागला.

बुद्धांना जीवककडे खाल्लेल्या मासांहाराची सवय नव्हती. त्यामुळे ते आजारी पडले रोजच्या रोज त्याचे स्वास्थ बिघडू लागले. व त्यांची शेवटची घटका जवळ आली.

बुद्धाच्या शय्येभोवती त्याचे सर्व प्रमुख शिष्य मान खाली घालून चिन्तेने उभे होते. सर्वत्र शांतता स्तब्धता होती. त्याच क्षणी हातून घडलेला अपराध जाणुन जीवक व देवदत्त मान खाली घालून लटपटत्या पायांनी चारी बाजूला आपली घाबरेली दृष्टी टाकत तेथे येऊन पोहोचले. त्याचा चेहऱ्यावर असा भाव प्रकट झाला होता की; "प्रभु, आम्ही आपल्या चरणांचा स्पर्श करून क्षमेची याचना करीत आहोत. आम्ही केलेल्या दुष्ट कृत्याने आम्हांला पश्चाताप होत आहे. त्यामुळे आमच्यावर आपण कृपा करा."

बुद्धानीं त्यांच्यां येण्याचे कारण ओळखले. डोळे उघडून प्रेमाने त्या दोघांना आपल्या जवळ बोलावून घेतले. व सांगितले— "तुम्ही दोघे काळजी करू नका, केव्हांना केव्हांतरी मृत्यु हा मनुष्याला येतोच. बस्, तुम्ही माझ्या मार्गाचे अंतिम यात्रे-पर्यंत सहकार्य करा. मी तुमचा कृतज्ञ आहे. मृत्यु तर तिसऱ्या डोळ्यांनी दिसणारा एक प्रकाश आहे. ज्योत जेव्हां विझते तेव्हां त्यावेळी त्याचा प्रकाश जिथे पोहोचतो. त्याच मार्गाने मी पण जात आहे.

बुद्धांच्या सांगण्याने देवदत्तच्या मनांत एकदम परिवर्तन घडले. त्यांनी बुद्धांच्या चरण कमलांना स्पर्श करण्याची अनुमती मागितली. बुद्धानी त्याला आपल्या जवळ बोलवत त्याचा खांद्यावर हात ठेवत म्हटले— "बाळ देवदत्ता! जो मनुष्य मानवाच्या कल्याणाच्या हेतुने आपल्या बुद्धीचा



उपयोग करून कष्ट करतो. तोच बुद्ध आहे. तो बुद्ध कधीच मरत नाही. मानवांच्या उद्धाराकरीता निर्माण झालेले सर्वच महात्मा बुद्ध आहेत. तू ज्ञानाच्या रूपाने वैर ओढून स्वतःच्या मनांमध्ये माझ्याबद्दल द्वेष भाव निर्माण केलास. तू आता माझ्या अंता बरोबरच द्वेषभावाचा अंत कर, माझ्या निर्वाणा नंतर तू असे मान की; माझ्या जागी तू आहेस. माझे भाईबंधू सुद्धा राज्याचा त्याग करून बौद्ध भिक्षु बनले आहेत व मानव समाजाच्या सेवा करण्याकरीता त्यांनी आपल्याला अर्पित केले आहे. तू सुद्धा माझे अनुसरण करून बौद्धधर्म स्विकार व त्यांचा प्रसार कर. बौध संगठनेच संचालन कर. बौद्ध धर्मियांना सरळ मार्गाने जावयास शिकव. ह्या कार्याकरीता तू एक समर्थ व्यक्ति आहेस ! असे सांगून बुद्धांनी देवदत्तच्या माथ्यावर हात ठेऊन आशिवाद दिला.

देवदत्त त्याने पुलकित झाला. त्याच्या डोळयातून अश्रुबिंदू वाहू लागले–" बुद्धं शरणं गच्छामि, धर्मं शरणं गच्छामि, संघं शरणं गच्छामि ! असे तीन वेळा जप करीत म्हणाला." हे बुद्ध भगवान ! मानवाला देवाच्या रूपात बदलून टाकणारा मार्ग दाखवून आपला असा एक उच्च आदेश प्राप्त होणारा धर्म तुम्हीदाखवून दिलात देवाच्या संबधात् विचार करण्याला सुद्धा काही वेगळे असे स्थान नाही. त्यामूळे आपण स्वतःच भगवान् आहात! असे म्हणत देवदत्तने गहिवरत हात जोडून बुद्धांना नमस्कार केला.

तो वैशाख पोर्णिमेचा दिवस पूर्ण चंद्र आकाशात प्रकाशमान झाला होता. पूर्व दिशा फाकून प्रज्वलीत होऊन बुद्धांच्या निर्वाणाला यश प्राप्त करीत होत्या.

बुद्धानंतर त्यांच्या द्वारे प्रचारित झालेला धर्म, उपदेश सुत्रे इत्यादी बौद्ध-धर्माच्या रूपाने प्रचलित झाले. बुद्धांना भगवानाचे रूप सर्वजण मानू लागले. व ते एक अवतार पुरुष म्हणून मानू लागले. महर्षि सुतने अशा प्रकारे बुद्धावताराची कथा समाप्त केली. दशावतारांपैकी दहावा अवतार कल्की यांच्या विषयी सांगण्यास सुरवात केली.

कृत, त्रेता, द्वापर, व कलीयुग हे चारयुग एकत्र केले की एक महायुग म्हटले जाते. प्रत्येक महायुगाच्या शेवटी कलीयुगाच्या शेवटी जेव्हां कलीचा प्रभाव वाढत जातो तेव्हां सारा विश्व संकटात सांपडतो.

त्या युगात अशा शंका उत्पन्न होऊ लागतात की, देव आहे का नाही ? आणि दुसऱ्या बाजूला अशीपण शंका वाटते की मानव प्राणी पण आहे किवा नाही ? असा हा काळ आहे.

एकीतून अशा विभिन्न माणसाची समाजात उत्पती होऊ लागली आहे की, वर्गभेद, वर्गकलह जात-पात, भेद-भाव, अत्याचार, राक्षस निती, हिंसा असे अनेक दुर्गुण वाढू लागले आहेत. व चांगल्या लोकांना जगणे मुष्किल होऊ लागले आहे.

अशा संकटाच्या वेळी विष्णु असा अनुभव करतात की, दुष्टांचा संहार करून दुष्ट लोकांना शिक्षा करण्याशिवाय दुसरा कोणताही उपाय नाही. ह्या विचाराने त्यांनी कल्कीचा अवतार धारण केला. त्यालाच कल्की अवतार म्हणतात.



शंकर आपल्या अंशापासून एका पांढऱ्या घोड्याची परिकल्पना करून कल्कीची पुर्ती देत आहेत. तो महान अश्व कालापेक्षां अधिक तिव्र गतीने पांढऱ्या शुभ्र धुक्याच्या रूपाने सोडत धूमकेतु प्रमाणे आकाशात भ्रमण करत इतर ग्रहांच्या पुढे पळत जात आहे.

त्या अश्वावर आरूढ होऊन कल्की आकाशाला स्पर्श करीत लांब शस्त्र हातात घेऊन दुष्ट लोकांचा संहार करण्याकरीता जात आहे. प्रलयाच्या वेळी. कभिन्न ढगांमध्ये विजेच्या रूपात राहिलेली आकाशातून पृथ्वीवर गळून पडत दुष्टांचा संहार करत आहे.








कलकीचा अवतार हा म्हणणे एक स्वरूप वीर योद्धा प्रमाणे चम्चम् करणाऱ्या एक कवच धारण केलेले व चांगल्या करीता त्याचा उपयोग करणारे सुंदर पुरूषाच्या रूपात् व दुष्टांच्या करीता एका महाभयंकर रूपात दर्शन देत आहे.

विष्णुच्या द्वारा अर्वातिण झालेला. कल्कीचा अवतार वेगवेगळ्या देशांत वेगवेगळ्या रूपात दर्शन देत. वेगाने घोड्याच्या बरोबर जात आपले कार्य पूर्ण करीत आहे.

कलकीच्या आक्रमणानं कलीचा प्रभाव अत्यंत कमी होत आहे तेव्हा आपल्या धारदार शस्त्राने दुष्टांना भिऊन पळविणारे. व जगातील दुष्ट, अत्याचारी, पापी ह्यांचा संहार करीत गर्विष्ठ लोकांची व चांगल्या लोकांची रक्षा करत.

कलकीच्या अवतारा बरोबरच एका नवीन त्युगाचा प्रारंभ होत आहे. ग्रहांची वेगमर्यादा बरोबर मार्गाने येऊ लागली आहे. भूदेवी (पृथ्वी माता) कलकीचा अवतार असलेल्या विष्णुची स्तुती करू लागते. तेव्हां ब्रह्म व इतर देवता सप्तऋषि-फुलांची वर्षा करीत त्याची प्रार्थना करत आहे. नारदमुनी महतीवीणा वर साम-गानचे गाणे गात आहे.

कलकी स्वता: पृथ्वीवर राज्यकारभार अत्याचार, अधर्म अन्याय इत्यादींचा नाश करून मानव समाजात विभिन्नता बरोबर एकता व शांतीपूर्ण सहजिवन मार्गक्रमण करायला शिकवत आहे. तेव्हां कृत युगाचे बीज रोवले जाईल. व आणि एका महायुगाचा आरंभ होईल. तेव्हां विष्णु आपल्या कलकीच्या रूपाने परत येऊन सर्व विश्व व्यापेल.

ह्या सांगण्याने एवढेच कळते की, विष्णु सर्वव्यापी परिणाम स्वरूप आहे. वेळ हीच त्यांची स्थिती आहे व अस्तित्व आहे. हे महाविश्व त्याचे परिपूर्ण स्वरूप आहे. असा प्रकाश पाडून सूत महर्षिनी दशाव-तारांपैकी प्रमुख बनलेल्या विष्णु पुराणाचे समग्र रूप संपूर्ण केले. (समाप्त)



# अंतिमइच्छा

कमलनाथ नावाचा एक श्रीमंत माणुस म्हातारपणी एका दुर्धर रोगाने आजारी पडला. व त्याने अंथरूण धरले. त्याला बायको मुलेबाळे कोणीच नव्हती. पण त्याला वारस म्हणून राहीलेला मंगलदास त्याची रात्रंदिवस सेवा करीत होता.

किशनलाल नावाचा वैद्य कमलनाथला औषधपाणी देत होता. एकदा त्याने रोग्याचे निदान करून मंगलदासला वेगळे बोलावून सांगितले–"तुझ्या मामाची तब्बेत अत्यंत नाजुक झाली आहे ते शुद्धीत नाहीत ते थोडे शुद्धीवर आले तर कुठल्याही परिस्थितीत तू ह्या दोन गोळ्या त्यांना खायला दे. म्हणजे तुझे काम होऊन जाईल.

वैद्य निघून जाता क्षणीच कमलनाथने डोळे उघडले व त्याला जवळ बोलावत म्हटले– "बाळा, जमिन-जायदाद मिळवणे जितके कठीण आहे. तसाच त्याचा सांभाळ करणे सुद्धा"

ह्यावर उदास चेहरा करीत मंगलदास म्हणाला–"मामाजी, असे काय बोलता ! तुमची काही अखेरची इच्छा असल्यास सांगा. ह्या स्थितीत पूर्ण करणे मी माझे कर्तव्य समजतो.

कमलनाथ क्षणभर थांबत म्हणाला–"वैद्य किशनलाल औषधाच्या दोन गोळ्या देऊन गेला आहे ना ? अशा माझ्या स्थितीत मी तुझ्या कडून जास्त काय अपेक्षा करू शकतो. त्यांनी सांगितल्या प्रमाणे माझ्या तोंडात त्या दोन गोळ्या घालून त्याचा काय परिणाम होतो त्याची फक्त वाट पहात रहा."

कमलनाथच्या तोंडातून पडलेली वाक्ये ऐकून मंगलदास आवाक् होऊन पहातच राहिला.





# घाईगडबड

पर्शियातील एका लहानश्या गावी अब्दुलरसूल नावाचा एक तरूण रहात होता. तो त्याच्या आईवडिलांचा एकुलता एक मुलगा होता. ते गरीब होते. रसूलचा बाप बरीच कष्टाची कामे करून आपल्या कुटुंबाचा उदरनिर्वाह करीत असे.

रसूल जेव्हां सोळा वर्षाचा झाला. तेव्हां त्याची आई मरण पावली. व पाठोपाठ सहा महिन्यांनी बापही वारला.

आईवडिल वारल्यानंतर रसूलचे मन गावात लागेनासे झाले. तो दिवसभर अंगमेहनत करून जे कमावत होता. ते त्याला सुद्धा पोटभरीचे नव्हते. त्याने पूर्वी ऐकले होते की, दूरच्या एका गावांत कष्ट केल्यास बरीच मिळकत मिळत असे. त्यामुळे त्याने आपला गाव सोडून दिला व तो त्या शहरात गेला.

शहरात रसूलला एका व्यापाऱ्याकडे नोकरी लागली. शहरात अनेक ठिकाणी ह्या व्यापाऱ्याची दुकाने होती. रसूलचे काम एका दुकानातून दुसऱ्या दुकानात माल आणण्या नेण्याचे होते.

दहा वर्षे मेहनत करून रसूलने खूप पैसे जमा केले. त्याने आपला खाण्या-पिण्याचा खर्च सोडून इतर बरेच पैसे मिळवले. व करमणुकी करीता सुद्धा व्यर्थ पैसा खर्चला नाही.

दर महिना रसूलला जे मासिक वेतन मिळत असे. त्यातील पैसे साठवून तो ते एका काजीकडे जमा करीत होता. त्याप्रमाणे दहा वर्षात मोठी रक्कम जमा झाली. त्याच्या मनात विचार येऊ लागला की, शहर सोडून आपल्या गावात परत जाऊन एक छोटासा व्यापार आपण कां करू नये?

त्याने तो विचार काजीला सांगितला. काजीने त्याला आनंदाने आशिर्वाद देत म्हटले "तुला ह्या कार्यात यश लाभो. असे म्हणून" त्याने त्याचे जमा झालेले सर्व पैसे रसूलला परत देऊन टाकले.

रसूल ते सर्व पैसे एका गाठोड्यात बांधून दुसऱ्या दिवशी सकाळी आपल्या गावी जायला निघाला. दुपार पर्यंत कुठेही न थांबता अखंड चालत राहिला. परंतु उन्हाच्या तडाख्याने त्याला पुढे चालणे जड जाऊ लागले. आणि कुठेही विश्रांती घ्यावी म्हटले तरी रस्त्याच्या दोही बाजूनेखजूरांच्या उंच झाडाऐवजी दुसरे सावलीचे कोणतेही झाड नव्हते. म्हणून तसाच रसूल एका खजूरांच्या झाडाखाली उभा राहून आपल्या चामड्याच्या पिशवितले पाणी पिऊ लागला.

त्यांच वेळेला त्या रस्त्याने एक घोडेस्वार येतानां दिसला. तो जेव्हां त्याच्या जवळ आला. तेव्हां त्याने घोडेस्वाराला विचारले- "भाऊ साहेब, सांगता कां तुम्ही कोणीकडे जाणार आहात?"

घोडेस्वार घोड्याचा लगाम खेचत म्हणाला- "समोर जो गाव दिसतो आहे नां! तेथून मी शहरात जाणार आहे. त्या शहरात मी नोकरी करतो."



घोडे स्वाराने म्हटलेले ऐकून रसूलला परमावधीचा आनंद झाला. तो त्याला म्हणाला- "वाह्! वाह्! किती नशिबाची गोष्ट आहे. त्या गावच्या धर्मशाळचा मालक माझा नातेवाईक आहे. माझी ही थैली घेऊन जाऊन त्याच्या हाती सोपवाल कां? मी संध्याकाळ पर्यंत गांवी पोहोचून त्याच्या हातून मी माझी थैली परत घेईन ही तेथ पर्यंत वाहून नेणे मला फार जड जात आहे?"

रसूलचे बोलणे ऐकून घोडेस्वार हसत त्याला म्हणाला- "मित्रा, त्या थैलीला वाहून नेणे तुला कठीण वाटते तसेच माझ्या घोड्याला सुद्धा वाटेल नां! मला माफ कर








बाबा?" असे म्हणत तो घोडेस्वार घोड्याला चाबूक मारीत पिटाळू लागला.

परंतु थोडा पुढे गेला नाही तोच घोडेस्वाराच्या मनात एक विचार आला. की त्या वाटसरूची थैली आपल्या घोड्यावर न घेण्यात आपण एक मुर्खपणाच केला. जर कां? त्या गाठोड्यात किंमती वस्तु असतील, तर गावाच्या धर्मशाळेचा मालकाकडे न जाता आपल्याला त्या वस्तु घेऊन सरळ शहरात जाता आले असते. व तेथे एखादा धंदा करता आला असता.

असा विचार करीत त्याने परत आपला घोडा मागच्या दिशेला वळविला. व रसूलच्या जवळ येऊ लागला. तेवढ्या अवधीत रसूलच्या डोक्यात एक कल्पना आली. आपण तरी किती मूर्ख होतो. नाहीतर दहा वर्ष अत्यंत श्रम करून मिळवलेला पैसा माहीती नसणाऱ्याच्या हातात सोपवणार होतो. आणि तो घेऊन गेला असता व त्याने ते पैसे धर्मशाळेच्या मालकाला दिलेच नसते तर आपण काय करू शकलो असतो. जे धन कमवायला आपण दहा वर्ष कष्ट मेहनत केली ते धन थोडावेळ वाहून नेऊ शकणार नाही काय?

रसूल असा विचार करीतच होता. तेवढ्यात घोडेस्वार त्याच्या जवळ पोहोचला व म्हणाला–"मित्रा, मी तुझ्या बोलण्याचा परत एकदा विचार केला. तेव्हां मला मनोमन वाटू लागले की, तुला मदद करणे माझे कर्तव्य आहे. तेव्हां ती थैली माझ्याकडे दे!"

रसूल हसत हसत म्हणाला–"अरे बाबा! मी सुद्धा परत ह्याबाबतीत विचार केला. की ही माझी थैली मीच घेऊन जाणे जास्त हिताचे आहे. तसे तर मी घाई-गडबडीने तुला थैली देत होतो पण तू ती थैली घेऊन जावयास थोडा उशिरच केलास.

त्या दोघांनी एकमेकांच्या मनातील गोष्ट जाणली. मग काय झाले घोडेस्वाराने आपला घोडा पाठीमागे वळविला व तो आपल्या रस्त्याने निघून गेला. व रसूल थैली सांभाळत गावाच्या दिशेने चालू लागला.



# महामूर्ख

विमलदास व गोपालदास ह्यांचा असा विश्वास होता कि आपण एक दुसऱ्या पेक्षां जास्त हुषार आहोत. ह्याच कारणाने ते रोजच्या रोज भांडत असत. एकदा रस्त्याने जात असताना ते भांडत असलेले पाहून कमलनाथने त्यांना अडवत म्हटले–"मी तुमच्या भांडणाचे कारण शोधून काढतो. तुमच्या दोघांपैकी एकाला मी एक प्रश्न विचारतो. जो त्याचे बरोबर उत्तर देऊ शकले. तोच सर्वात हुषार समजला जाईल आणि जर कां ह्याचे उत्तर कोणीच देऊ शकले नाही. तर तुम्ही दोघे महामुर्ख समजले जाल व मीच तुमच्या पेक्षा जास्त हुषार समजला जाईन! ठिक आहे ना!"

"मी प्रश्नाची उत्तरे देणार नाही!" असे म्हणत गोपालदास तेथून निघून गेला

ह्यावर कमलनाथ म्हणाला पाहिलस नां! तुमच्या मध्ये गोपालदासच जास्त हुषार आहे.

त्यानंतर विमलदास गोपालदासाच्या घरी गेला व त्याला सर्व वृत्तांत सांगून म्हणाला–"कमलनाथने तर तुलाच जास्त हुषार आहेस म्हणून मान्य केले."

गोपालदास आश्चर्यचकित होत म्हणाला–"मित्रा! अचानक माझ्या पोटात जोरात दुखायला लागले. ही गोष्ट मला तुम्हांला सांगायची नव्हती. त्यामुळेच मी खोटे बोललो व घरी निघून गेलो. खरे तर ह्या खोट्या बोलण्यानेच मला जास्त हुषार बनवले."

"अशी पोटदुखी तर मला रोजच्या रोज होत होती. परंतु त्यावेळी दरिद्री पोटदुखी कां आली नाही." असे म्हणत विमलदासाला नेमकी त्याच वेळी पोट दुखी कां आली नाही ह्याचा पश्चाताप होऊ लागला.





# कष्टाची कमाई

गंगाप्रसादनी लहानपणापासूनच खूप कष्ट, मेहनत करून बराच पैसा मिळवला होता. तो ते व्यर्थ खर्च करीत नसत त्यामुळे सर्वजण त्याला काटकसरी म्हणत असत.

गंगाप्रसादांची जेव्हां साठी उलटली तेव्हां सुद्धा ते आपले काम स्वतःच करीत. दुसऱ्यांवर अवलंबून रहात नसत. त्यांच्या बायकोची पण तिच स्थिती होती. परंतु त्यांची तीन मुले एक नंबरची कामचुकार व आळशी होती. ती आपल्या वडिलांचे म्हणणे केव्हांही ऐकत नसत.

गंगाप्रसादांच्याकडे वीस एकर जमीन होती. शेती सुद्धा चांगली चाले. परंतु आता वार्धक्यामुळे शेतीभातीचे काम मजुरांकडून करून घेणे. त्यांना जमत नव्हते. त्यामुळे त्यांनी आपल्या मुलांची मदत मागितली. परंतु मुलांना रोज शेतात जाणे येणे कठीण वाटू लागले. म्हणून त्याने त्यांची जमीन त्याच गावातील एका शेतकऱ्यांला दिली शेतकरी शेतात जे काही पिकत असे त्यातले अर्ध्यांच्यावर स्वत: घेत असत. व मनांत जर आले तर थोडे फार धान्य गंगाप्रसादकडे पाठवित असत.

अशाप्रकारे गंगाप्रसादनी आपल्या सावकारीचे काम सुद्धा एका दिवाणजींकडे सोपविले. व इतर कामकाज एका माहितीतल्या माणसाकडे दिले. ते सर्वजण त्यातील जो काय फायदा होई. तो गुपचुप स्वत: घेत असत गंगाप्रसाद मनांत म्हणत जर हीच कामे आपल्या तीन मुलांनी केली असती तर, आपल्याला निश्चिंतपणे जगता आले असते. परंतु ती मुले बाहेरात खर्च करण्यातच जास्त आनंद मानीत. त्यामुळे गंगाप्रसादांना



मुलांबाबतीत जास्त काळजी वाटू लागली.

गंगाप्रसादच्या घरा भोवताली मोठे आवार होते. तो जेव्हां कामकाज सोडून घरात राहू लागला. तेव्हांपासून त्याने आवारात भाजीपाला फळफळावळ लावण्यास सुरवात केली. काहीदिवसांतच घराच्या सभोवताली बाग फळाफुलांनी डवरली. भाजीपाला भरपूर येऊ लागला. झाडांना खतपाणी घालायला गंगाप्रसादची मुले अजिबात मदत करीत नसत. परंतु उलट आपल्या वडीलांची टिंगल करीत. म्हणत असत की–"म्हातारपणी सुद्धा पैसा कमावण्याची हांव सुटत नाही नां!"

गंगाप्रसादना बागेतून सुद्धा बरीच मिळकत होवू लागली. त्यांत उगवलेला भाजीपाला, फुले, फळे थोड्यावेळातच विकली जात: परंतु त्याचबरोबर अप्रत्यक्ष-रित्या त्याच्या समोर एक कठीण समस्या उभी राहिली.

गंगाप्रसादच्या शेजारी सोमनाथ नावाचा एक नवीन भाडेकरू रहावयास आला. तो दुधाचा व्यापार करीत होता. त्याच्या-कडे वीसएक बकऱ्या होत्या. बकऱ्यांना तो काय खायला घालत होता माहीत नाही पण त्याची नजर मात्र गंगाप्रसादच्या बागेकडे होती. बकऱ्या डोळा चुकवून बागेत शिरत नासधूस करीत व पाला खाऊन निघून जात. ज्या बागेची प्राणापेक्षा जास्त काळजी घेतली. ती नासधूस झालेली गंगाप्रसादना पाहावली नाही: त्यामुळे त्यांनी आपल्या तिन्ही मुलांना बोलावून आळीपाळीने बागेवर पहारा देण्यास सांगितले. परंतु मुलांनी बापाचे म्हणणे झुगारून लावले.

त्यामुळे हताश होऊन त्यांनी बागेच्या चारी बाजुला कुंपण बांधले. परंतु त्यातुनही केव्हां केव्हां बकऱ्या आत घुसत. तेव्हां गंगाप्रसादनी कांट्याचे कुंपण घातले व बागेच्या आत जायच्या वाटेवर एक लाकडाचे दार करून घेतले व त्याला कडी घातली.

हा उपाय थोडे दिवस चांगला उपयोगी पडला. परंतु त्या हुषार बकऱ्यांनी आपल्या शिंगानी दार उघडून आत येण्यास सुरवात केली.

शेवटी नाईलाजाने गंगाप्रसादने आपला शेजारी सोमनाथ यांच्याकडे आपली तक्रार करीत. सांगितले–"अहो बाबासाहेब, तुम्ही कशा तऱ्हेनी तरी आपल्या बकऱ्या सांभाळा."

"वारे वा वारे, हे छान आहे! तुझी तीन मुले जेथे माझ्या बकऱ्यावर पाळत ठेवू शकत नाहीत. तेथे बापडा मी काय सांभाळू शकणार खरी गोष्ट तर अशी आहे. ह्या गावांत तुम्ही सोडलात तर कोणी माझ्या बकऱ्यांविषयी तक्रार केली नाही." सोमनाथ म्हणाला.

गंगाप्रसादना त्याच्या बोलण्यात खरे पणा दिसून आला. त्यानी बागेच्या दारापुढे तीन फूट खोल एक खड्डा खणला व त्याला गोलाकार सळ्या बसवल्या की, त्यावर बकऱ्यांना चालून येणे शक्य होणार नाही. व बागेत अनायासे बकऱ्या शिणार नाहीत.

काही दिवस गेले. गंगाप्रसादला वाटले की, आता आपल्या पाठीमागची बकऱ्यांची कटकट गेली. परंतु एक दिवस एका बकरीने चलाखीने दारातून सळ्यांवर



पाय न ठेवताच उडी मारली. तीचा बरोबर त्या शेवटच्या सळीत पाय अडकला व तीची दयनिय अवस्था झाली. ते पाहून सहन न होऊन गंगाप्रसादने बकरीला उचलले व दारा बाहेर नेऊन सोडले. परंतु बकरीला त्याचे काहीच वाटले नाही तिने पुन्हां दुसऱ्या दिवशी तशीच उडी मारून बागेत प्रवेश केला.

बकरी मस्त झाडाची पाने खात होती. तेव्हां गंगाप्रसाद बाहेर आले. त्या झाडाची पाने खाणाऱ्या बकरीकडे काही हालचाल केल्या शिवाय निश्चलपणे पहात राहिले.

पण तेवढ्यात गंगाप्रसादची तिन्ही मुले तेथे आली. व त्यानी आश्चर्य वाटून










वडीलांना विचारले–" बाबूजी, आपल्या प्राणापेक्षा प्रिय असलेल्या बागेत बकरी चरत आहे. आणि तुम्ही शांत उभे कसे आहांत? स्वत:च्या मेहनतीवर पाणी पडल्यामुळे उदास झाला आहात कां ?

गंगाप्रसाद मान डोलावीत गप्प बसले. व नंतर म्हणाले–" अरे, चरू दे रे! मी तर बाग त्या बकरी करीताच लावली आहे. तिच्या खाण्यामुळे माझी पापे तरी धुतली जातील. त्या बरोबर मला थोडे पुण्य पण मिळेल.

तिन्ही मुलांनी आश्चर्यचकित होऊन विचारले–"तुम्ही काय म्हणालात आम्हांला समजले नाही ?"

"आपल्या स्वत:च्या खाण्याकरीता ही बकरी तिन फूट लांब उडी मारून आली आहे. तुमच्यासारख्या आळशी कामधाम न करणाऱ्याचे पालनपोषण करून मी पापाचा भागिदार होत आहे. ते ह्या मेहनत करून खायला आलेल्या बकरीला खाऊन देऊन ते पाप तरी धुतले जाईल. आज पासून मी माझी सारी संपत्ती इस्टेट अशालाच देणार आहे की, जो इमानदारीने कष्ट अंगमेहनत करतो." गंगाप्रसादने आपल्या मनातली गोष्ट सांगितली.

गंगाप्रसादचे बोलणे ऐकून त्यांची तिन्ही मुले शरमिंदि झाली. मनांत म्हणू लागली स्वत:चे खाणे प्राप्त करण्या-करीता बकरी मेहनत करते तेवढी मेहनत आपण आपल्या खाण्याकरीता सुद्धा करीत नाही. आता बकरीवर दया येऊन वडीलांनी तिला बागेत चरून दिले तसे भविष्यकाळात एखादा चोर किंवा गरिबाने केलेले कष्ट पाहून आपले वडील सारी संपत्ती त्यांना दान करून टाकतील."

अशा तऱ्हेची भीती वाटू लागल्या बरोबर त्या तिन्ही मुलांनी आपला आळशीपणा सोडून वडीलांच्या सांगण्याप्रमाणे कष्ट करण्यास व वडीलना उद्योगधंद्यात हातभार लावण्यास सुरवात केली व आपल्या वडीलांना संतुष्ट केले.






[ ३ ]

[ सूर्यवर्मा मेला पाहून सुबाहू नावाचा एक सेवक ताबडतोब हा समाचार त्याचा मुलगा चंद्रवर्मा ह्याला देण्याकरीता घोड्यावरून निघाला. रस्त्यात त्याच्यावर हल्ला करून सर्पकेतूच्या अनुचरांनी त्याचा घोडा मारून टाकला. तेवढ्यात काही मशाली घेतलेले ग्रामवासी त्याच्या दृष्टीपथात आले. नंतर.....]

सुबाहू क्षणभर निश्चल राहीला, तो असा विचार करून भयभीत झाला की, आता आपले मरण जवळ आले. आपल्या महाराजांचा हा समाचार वीरपुरला पोहोचून मग आपल्यावर काहीही संकट कोसळले असते तरी हरकत नव्हती, परंतु अशा परिस्थितीत आपले मरण राज्याकरीता बिनाशास नक्कीस कारणीभुत होईल. तो विचारमग्न झाला. जर देवाच्या कृपेने ह्यां घोडस्वारांना चुकवून आपण जर पळालो तर चांगले होईल!

"अरे अे, तू कोण आहेस? बोलत कां नाहीस?" असे म्हणत एक घोडेस्वार त्याच्याजवळ आला. व त्याचे केस पकडून त्याची मान खेचू लागला.

तेवढ्यात या गावकऱ्यांच्या पैकी एक जण जोरात ओरडत म्हणाला–" अरेरे बिचारा,




ह्या भिकाऱ्याला त्रास देऊ नका. असे वाटते की, तो भुकतहानेने अर्धमेला होऊन त्याची वाचा बंद पडली असावी. ते ऐकताच सुबाहू थोडा अस्वस्थ झाला. त्याला वाटले की भिकाऱ्याचे ढोंग करणे म्हणचे काही मुष्किल नाही." तो दिसत ही होता तसाच.

"बाबा भिकाऱ्यावर दया करा. एक भाकरीचा तुकडा द्या." असे म्हणत सुबाहूने-घोडेस्वारांच्या पुढे दिनवाणेपणे हात पसरले आणि घोड्याला थांबवले.

"छी: छी: हि काय कटकट रे. मी असा विचार केला की हा कोणी गुप्तचर असावा तर हा निघाला भिकारी."

असे म्हणत तो घोडेस्वार टांच मारून पुढे निघून गेला.

"हा कसला गुप्तचर! ह्याच्या अंगात तर त्राण सुद्धा नाही आणि ह्याच्या कपड्याच्या ह्या चिंध्या....आणि ह्याचा कुरूप चेहरा! कोणी शनीची पिडा वाटते आहे." अरे, तू आपले शरीर सुद्धा झांकून घेतले नाहीस कां? आणि हातात कांठी सुद्धा मजबूत घे बरं." असे म्हणत दुसऱ्या घोडेस्वारांनी त्यांची मजा उडवली.

"हुजूर, पहाडातील रहाणाऱ्या चित्ते, अस्वल ह्यांना घाबरवण्याकरीता" सुबाहूने झटक्यात उत्तर देत म्हटले.

सुबाहुने असे म्हणताच घोडेस्वारांच्या बरोबर गर्दीतले इतर गावकरी लोक सुद्धा पोटधरून हंसू लागले. त्यातील एकजण उपहासाने त्याला डिवचत म्हणाला–"अरे, तू कसला शिकारी आहेस. तुझ्यातर जमिनी-वर एक पाऊल सुद्धां इतरांसारखे ठेवण्या इतकी शक्ति नाही. तशा अवस्थेत तू चित्यांना वाघाना कसा घाबरून सोडणार?"

"सरकार, एक भाकरीचा तुकडा टाका. मग पहा माझा पराक्रम! इथे एक आठवड्यापासून मी पाणी पिऊन जगतो आहे" सुबाहू म्हणाला.

ह्या गोष्टीवर घोडेस्वारांनी दुर्लक्ष केले. घोडेस्वारांच्या सरदारांनी आपल्या जमावाला एकत्रित करून सांगितले– "तुम्हां सर्वांना ताबडतोब राक्षसटिळावर पोहोचायला पाहिजे. तेथे तुम्हांला आवश्यक ती शस्त्र देण्यात येतील, सकाळच्या आत विरपुर आपल्या कब्जात आले पाहिजे" नंतर त्याने मोठ्या आवाजात घोषणा करीत म्हटले "महाराज सर्पकेतुचा जय असो!" असे म्हणत सर्वजण निघून गेले.

तो घोडस्वार गेल्यानंतर काहीजण सुबाहुजवळ आले व त्यानी त्याला घेरले त्यातील एकांनी जिज्ञासेने विचारले– "अरे बाबा, तू तर दिसायला तरुण आहेस! तुझे हातपाय पण चांगले आहेत अशास्थितीत तुला दारोदार भटकून भिक मागायची वेळ कां आली?"

"हेच रहस्य जाणण्याकरीता मी पांच वर्षापासून ह्या पहाडातील गुरुची सेवा करीत होतो. परंतु आजपर्यंत माझ्यावर त्यांचा अनुग्रह झाला नाही. एका तासापूर्वी ते माझ्यावर प्रसन्न झाले. व मशाली घेतलेल्या तुम्हां लोकांकडे हात दाखवित म्हणाले–"आज पहाटेच्या आत तुझ्या पाठीमागची शनीची पिडा सुटेल आणि तुमच्या पाठीमागे जे लोक येतील त्यांची पण साडेसाती सुटले. त्यामुळे हे पहा, समोर ज्या मशाली दिसतात तेथे ताबडतोब जा." असे त्याने मला सांगितले.




त्यामुळे घाईगडबडीने मी पहाडातून उतरून तुम्हां लोकांजवळ येऊन पोहोचलो." सुबाहु म्हणाला.

सुबाहुने सांगितलेली गोष्ट ऐकताच चारीबाजुनी त्याला घेरलेले लोक आश्चर्य-चकित झाले. त्यांच्या तोंडून आवाजही फुटला नाही. काहीवेळाने ते म्हणाले– "अनेक लोकांच्या तोंडी सुद्धा आम्ही त्या महापुरुषांच्या संबधी ऐकलेले आहे. परंतु आजपर्यंत आम्ही कोणीही त्यांना पाहिले नाही. आज पहाटेच्या आत आम्ही लोक वीरपुरवर हल्ला करून ते काबिज करून लुटणार आहोत. ते महापुरुष तर सर्वज्ञानी असणार तेव्हां आम्ही

करणारा हल्ला त्याना आधीपासुनच माहित झाला असावा. आता आमचा विजय नक्कीच! चला, चला, आपल्याला लवकरच जायला पाहिजे."

असे म्हणत काही लोक गावाच्या दिशेने निघून गेले. व सुबाहुकरीता खाण्यापिण्याकरीता फळे-दुध घेऊन आले. सुबाहुने संतोषाने ते सर्व खाल्ले. त्यानंतर त्यातील लोकांनी त्याच्यासमोर चांगले कपडे ठेऊन त्याला ते बदलावयास सांगितले. सुबाहुने सुद्धा मनांत विचार केला की, चांगले कपडे धारण केल्यावर त्यातील आपल्याला ओळखणारा जरी एखादा निघाला! तर सगळेपाण्यात असा विचार करीत त्याने सर्वांकडे प्रेमाने पहात म्हटले—

"प्रियजनो. मी आपला कृतज्ञ आहे. परंतु गोष्ट अशी आहे कीं, मी आता हे नवीन कपडे घातले तर, माझ्या गुरूची आज्ञा मोडल्या सारखे होईल. माझ्या शरीराला त्रास देणारा जो शनी आहे. त्याचा सकाळच्या आत नायनाट होईल. त्यानंतर मी नविन कपडे धारण करेन."

सुबाहुच्या म्हणण्याला सगळ्यानी संमती दर्शवली व काही लोक "जय...." असे म्हणत घोषणा करू लागले. हे शब्द सर्वत्र घुमले इतरांनी सुबाहुकडे वळत म्हटले तू आपले नांव नाही सांगितलेस. आम्हांला कळायला पाहिजे!"

माझे नांव.....माझे नांव..... असे म्हणत सुबाहु अडथळत म्हणाला—"माझ्या आई वडीलांनी जे नाव दिले त्याच्याशी आता काय संबंध आजपर्यंत मी साडेसातीचा शिकारी बनलो. त्याने माझा छळ झाला. गुरूंच्या आदेशाने आज तर माझा पिच्छा सुटणार आहे....." असे सुबाहु म्हणु लागला. तेवढ्यात जमावातील एक माणूस झटक्यात म्हणाला आजपासून आपल्या सर्वांची शनीची पिडा सुटणार आहे. त्यामुळे आम्ही तुझे नांव "शनिमर्दन" ठेवतो. "शनिमर्दना चा जय असो" अशा घोषणेंनी सर्व आकाश दुमदुमले.

त्यानंतर सर्व लोक मशालींच्या उजेडात वाट काढीत राक्षस टेकडीकडे निघाले. सुबाहुच्या बरोबर चालणाऱ्या लोकांच्या बोलण्यावरून त्याला समजले की, हे सर्वजण दारिद्र्याने गांजलेले आहेत व सर्पकेतूने त्यांना धन-धान्यांच्या लोभाने स्वतःकडे खेचले आहे व त्या लालसेने प्रेरीत होऊन ते वीरपुरवर हल्ला करावयास निघाले आहेत.

मला वीरपुरच्या संबधी काही माहीत नाही. काय वीरपुरचा राजा सूर्यवर्मा जनतेचे शोषण करणारा आहे? सुबाहुने गर्दीतल्या एका माणसास विचारले.

ते ऐकून तो हसू लागला—"ह्या राजांच्यात असा कोणता राजा आहे की, तो जनतेचे शोषण करत नाही." तसे आम्ही सूर्यवर्माच्या बाबतीत माहीतगार नाहीत. परंतु सर्पकेतुसारखा माणुस ह्या जगात अजूनपर्यंत तरी झाला नाही. होणार नाही."







तेव्हां वीरपुरला लुटण्याकरीता आपण कशाला जायला पाहिजे. असे केले तर सर्पकेतुला आपण मदत केल्यासारखे सिद्ध होईल नां!

तेव्हां त्याचे बोलणे ऐकून आणखीन चारपांच लोक त्यांना येऊन मिळाले सुबाहूने सांगितले ते ऐकून सर्वजण खदखदून हंसू लागले. खरी गोष्ट अशी आहे. आम्ही सर्पकेतूला मदत करण्याच्या इरादाने जात नाही. त्यांनी आम्हाला वीरपुरवर चाल करून लुटण्याच्या कामी मदत करण्याचे आश्वासन दिले आहे. आम्ही जे लूटून आणू त्यावर आमचाच हक्क सिद्ध होईल. सर्पकेतू व त्याच्या साथीदाराचा त्यावर अजिबात हिस्सा रहाणार नाही. सुबाहूला असे वाटू लागले की, ह्या भोळयाभावड्या ग्रामवासियांसमोर आपण कसेही समजाऊन सांगितले तरी त्याचा उपयोग आता होणार नाही. त्या लोकांच्या दृष्टीला सर्व राजे एकासारखेच ह्या लोकांना एकच माहीती की, दुसऱ्यांनी आपल्याला लुटले की, आपण त्यांना लुटायलाच पाहिजे. ही त्याची नीती,

थोड्यावेळाने सर्व लोक राक्षस टेकडीच्या जवळ पोहोचले. तेव्हां पर्यंत पुष्कळ लोक तेथे जमा झालेले होते. त्यातील बहुतेकांच्या हातात जळत्या मशाली होत्या. त्यांना सर्वांना सैनिक एका ओळीत उभे करीत होते. सुबाहु-बरोबर आलेल्या लोकांना पण तसेच उभे केले गेले.

नंतर त्या दलाचा नेता पुढे येत म्हणाला—" अत्यंत महाशुर व दयाळू राजा सर्पकेतु ह्याच्या मदतीमुळे आपण सर्व आज दारिद्राच्या जंजाळातून मुक्त होणार आहोत. परंतु आता आपल्या पुढे एक मोठे संकट उभे राहीले आहे. ते म्हणजे वीरपुर राज्यात प्रवेश कसा करायचा? नगरद्वाराच्या द्वारपालांना दगा देऊन नगराचे प्रवेश द्वार उघडले तर आपल्याला आत जायला कोणी अडवणार नाही. त्याकरीता आपल्या पैकी शंभर लोकांनी प्रथम दाराजवळ पोहोचले पाहिजे व तेथे हा:हा:कार माजवून मोठ्याने आर्तनाद करीत आत घुसले पाहीजे, जसे काही सर्पकेतुचे सैनिकच गांवावर हल्ला करून लुटमार करीत असल्यासारखे. म्हणजे तो आवाज ऐकून द्वाररक्षक दारे उघडतील तेव्हां संधी सापडताच बाजूने आमचे नागरीकांच्या वेषातील सैनीक आत घुसतील. नंतर तुम्ही मनाला येईल तसे शहर लुटले तरी चालेल. व वेळ येताच आपल्याला अशा घोषणा द्यायला पाहिजेत "महाराज यशोवर्धनचा जय असो" तेव्हां आमचे सैनिक अशा भ्रमात पडतील की, महाराजा यशोवर्धनचे तुम्ही समर्थक आहात व आपल्यावर ते हल्ला करणार नाहीत. बाकीच्या लोकांवर हल्ला करून त्यांना मारून टाकतील पण लक्षांत ठेवा की, कोणीही सर्पकेतुचे नाव तोंडातून काढायचे नाही." असे त्या नेत्याने सर्व जमावातील लोकांना सांगितले.

दलप्रमुख आपले बोलणे संपवत नाही. तोच जमावामधुन जोर जोरात ध्वनी उमटू लागला—" महाराज, यशोवर्धनचा जय असो! सुबहुला जेव्हां हे सर्व समजले की, वीर पुरवर कबजा मिळविण्याकरीता



केवढे षडयंत्र रचले जात आहे. ते पाहून तो आश्चर्यचकित झाला. व मनात विचार करू लागला की, ह्या लोकांच्या नजरा चुकवून कसेही वीरपुरनगरात प्रथम प्रवेश केला पाहिजे. म्हणजे चंद्रवर्माला भेटून सर्व सविस्तर त्याला सांगता येईल. परंतु सर्वांच्या डोळ्यात धुळ झोकून कसे निसटायचे?"

सुबाहु असा विचारमग्न झाला नाही तोच माणसांचा घोळका वेगाने पुढे जाऊ लागला. सुबाहुला समजले की, त्यातील साधारण पोषाख केलेले बरेच सर्पकेतुचे सैनिक आहेत. सर्वात प्रथम जाणाऱ्या शंभर सैनिकांच्यात सुबाहु जाऊन मिळाला.

पहाता पाहाता ते नगरद्वारापाशी येऊन पोहोचले. तेवढ्यात त्यातील बरेच जण आर्तस्वरात किंकाळ्या फोडून ओरडू लागले की, "प्रभो, दार उघडा सर्पकेतुचे सैनिक आपल्या गावांवर हल्ला करून येत आहेत. आम्हाला सर्वांना लुटले आहे. व जनतेचा छळ करीत आहेत. राजाकडून आम्हांला तावडतोब मदत पाहिजे.', लवकर दार उघडा.

द्वाररक्षकांना समजेना की, दार उघडावे किंवा नाही, तेवढ्यात आणखी कांही लोकांचा गोंगाट ऐकू येऊ लागला–"प्रभो, आम्ही लोक महाराजा सुर्यवर्माला शरण आलो आहोत! आम्हांला सर्वांना त्यानां भेटण्याची संधी द्या."

असे म्हणताच नगराचे प्रवेशद्वार रक्षकांनी उघडले. व संधी मिळताच साधारण नागरीकांचा पोषाख केलेले सैनिक आत घुसले व द्वारपालकांवर हल्ला करू लागले. काही लोकांना मारून टाकून बाकींना बंदी केले. सर्व जनतेमध्ये हल्कल्लोळ माजला व सर्वत्र धावपळ सुरु झाली.

सुबाहुने निमिषार्धात एका ढांगेत उडी मारून निसटून जायचा प्रयत्न केला. परंतु तेवढ्यात पाठीमागुन टाळ्याचा आवाज ऐकू आला व कोणीतरी बोलले– "तो कोण पुढे चालला आहे रे! सर्वांनी एकदमच आत जायचे आहे. त्याला पकडा."

दुसऱ्याक्षणी सर्पकेतुचे सैनिक मागे धावून जात ओरडू लागले–"थांब, पळून जाऊ नको थांब."

सुबाहुने मनांत निश्चय केला की, आता जगण्यामरण्याकडे लक्ष न देता प्रथम कसेही करून राजमहालात शिरायला पाहिजे म्हणून तो झटक्यात वळला व त्याने आपली तलवार बाहेर काढली. व समोर जो येईल त्याला तलवारीने वार करू लागला व वेळ येताच वळून तो राजमहालाच्या बाजूने पळून जाऊ लागला. (क्रमशः)



# अंध-विश्वास

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजन्! ह्या मध्य-रात्रीच्या वेळी हे अतोनात जे श्रम तू करीत आहेस. ह्या पाठीमागे काही गुढ शक्ति काम करीत असावी. अशी शंका माझ्या मनात येत आहे. नाहीतर ती अत्यंत साहसी पराक्रमी व प्रेम करणारी व्यक्ति आपल्या मनातल्या साऱ्या इच्छांची पूर्ती करू शकत नाही. त्याच्या इच्छेमध्ये बांधा डालणारी आणखी एक बाह्य शक्ति त्याला मदत करीत असावी. ह्याचे उदाहरण म्हणून तुला मी एक विद्याधर नावाच्या समुद्र व्यापार करणाऱ्या व्यापाराची गोष्ट सांगतो लक्ष देऊन



ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

विद्याधर व्यापारी मोठ्या किंमती वस्तु विदेशी जहाजाद्वारे नेऊन विकत असे. ह्या व्यापारामध्ये त्याने लाखो रूपये कमावले होते. परंतु एकदा कर्मधर्म-संयोगाने त्याच्या व्यापाराला गालबोट लागले व त्याचे खूप नुकसान झाले. समुद्री लुटारूंनी त्यांच्या जहाजावर हल्ला करून सर्व माल लुटून नेला.

हि घटना ऐकल्या बरोबर विद्याधरचा एक मित्र त्याचे सांत्वन करीण्याकरीता घरी आला. व त्याचा हात हातात धरून बराच वेळ एकटक त्याच्या बोटाकडे पहात राहीला. व म्हणाला—"मित्रा, तू हि पोवळे जडवलेली अंगठी केंव्हां केलीस?

"मी थोडचा दिवसांपूर्वीच केली. पण असे कां विचारतोस? मला वाटते की काहीतरी खास कारणाकरीता तू मला हा प्रश्न विचारत आहेस?" विद्याधर म्हणाला.

"हे सांग, तू काही उद्देशाने बनविली तर नाहीस नां! ही घातली तर आपले भाग्य उजळेल म्हणून बनविलीस कां? सहज मनांत आले." मित्राने विचारले.

मी तशा कारणाने तर अजिबात बनविली नाही. तू तर अशा वेळेस मला धीर द्यावला पाहिजेस, तर मला काहीतरी गोष्टी सांगून फितवतोस, मला पोवळे चांगले वाटले म्हणून मी अंगठी बनविली." विद्याधर म्हणाला.

ह्या रत्नाच्या कारणामुळेच तुला व्यापारात नुकसान आले. ही गोष्ट मात्र ध्यानात घे. असे म्हणत त्याचा मित्र तेथून निघून गेला.

मित्राच्या तोंडून ते ऐकल्या बरोबर त्याच्या मनाची चलबिचल होऊ लागली. त्याला त्याची शंका खरी वाटू लागली. त्याने आपल्या माहितीतल्या प्रतिष्ठीत लोकोकडे त्या पोवळचा विषयी चौकशी केली. त्या सर्वांनी पण एकसाथ तेच उत्तर देत म्हटले—"विद्याधर, प्रत्येक माणसाला कोणते नां कोणते तरी रत्न लाभदायक असते. ही गोष्ट विदीतच आहे."



आता विद्याधरला त्या गोष्टींची भीती निर्माण झाली. शेजार गांवी हिरे बसविणारा व्यापारी सोमशेखर रहात होता. तो हिरे पण विकत असे. त्याला माहीत होते की, कोणते रत्न कोणत्या माणसाला वर आणेल. तेच रत्न तो त्याला विकत असे. हे समजल्यावर विद्याधर त्याला भेटावयास गेला.

सोमशेखरने त्याचे बोलणे शांतपणे ऐकले नंतर त्याने त्याच्या बोटातली पोवळयाची अंगठी काढून त्यातले पोवळे एका हत्याराने कुशलतेने बाहेर काढले व समोर असलेल्या टोपलीत फेकून दिले. नंतर त्याने विद्याधरचे नांव गोत्र नक्षत्र वगैरे विचारले व बोटांवर आंकडे मोड करीत बाजूला ठेवलेली एक डबी हातात घेऊन उघडली.

त्या डबीतून निळया रंगाचे एक रत्न बाहेर काढले. व विद्याधरच्या अंगठीतल्या पोवळयाच्या जागी ते बसवले व ती अंगठी त्याने त्याच्या हातात देत म्हटले—"हे उत्तम प्रतिचे रत्न आहे. हे तुम्ही नेहमी वापरू शकता. ह्या रत्नाचा प्रभाव ह्याची किंमत ही भारी नाही. आपल्या सांगण्यावरून मला समजले की, व्यापारात् आपल्याला खूप नुकसान झाले आहे. त्यामुळे मी ह्या रत्नाचे फक्त मुल्य एक हजार सुवर्ण मुद्राच लावत आहे."

विद्याधर मुकाट्याने खिशातल्या एक हजार मुद्रा सोमशेखरच्या हातावर ठेऊन घरी निघून गेला.

थोडचा दिवसांनी विद्याधर सोमशेखरच्या दुकानी आला. त्याला पहाताच सोमशेखरने विचारले—"सांग! निळ्या प्रभाव आपल्यावर कसा पडला आहे."

"माझ्यात काहीही फरक पडला नाही.



सोसावे लागले आहे." विद्याधर म्हणाला. "खरे! खरे सांग! व्यापारात किती व कसे नुकसान झाले." सोमशेखरने विचारले.

विद्याधर उदासपणे म्हणाला–"काय सांगू! मी माल भरून जी चारी जहाजे पाठविली होती. त्यातले एक वादळात सापडून बडून गेले. नुकसानाचा हिशोब केला तर पन्नास लाख मुद्रा होतील.

त्यावरहसत सोमशेखर म्हणाला-"ह्याचा असा अर्थ की, बाकीची तिन जहाजे सुरक्षित किनाऱ्याला लागली. होय नां?"

"होय हो! विद्याधर म्हणाला."

मी जे निळे रत्न आपल्याला दिले होते. त्याचाच हा प्रभाव आहे. त्याने आपले हितच झाले. ह्या गोष्टीवर तर तुम्ही अजिबात लक्ष देत नाहीत. की, आपली तिन जहाजे सुखरूप किनाऱ्यावर लागली. तर ह्याचे काय कारण होऊ शकते ही गोष्ट साफ आहे की, ह्या निळेचाच हा प्रभाव आहे. नाहीतर चारी जहाजे बुडून गेली असती. व आता पर्यंत आपण भिकारी बनला असतात." सोमशेखरने समजावत म्हटले.

ह्यावर गुपचुप विद्याधरने ती अंगठी काढून सोमशेखरच्या हातात ठेवली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, अनेक शंका ह्या गोष्टीवरून माझ्या मनात उठल्या आहेत. अंगठीतल्या रत्नामुळे विद्याधरची तीन जहाजे समुद्रात न बुडता वाचली. ही गोष्ट सोमशेखरने विद्याधरला स्पष्ट सांगितली. तर असे वाटते की, विद्याधरने ती गोष्ट समजून घेतली नाही. ह्या कारणांमुळे भविष्यात व्यापारावर भयंकर नुकसान होण्याची शक्यता आहे. विद्याधरने केवळ आपल्या अज्ञानानेच ती अंगठी सोमशेखरच्या हातात काढून दिली नां? या शंकाचे समाधान कारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर परीणाम माहीतच आहे तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील.

ह्यावर विक्रमादित्य म्हणाला– "विद्याधरने हौसेखातर पोवळे बसवलेली अंगठी करून घेतली होती. तो त्यावेळी हे जाणत नव्हता की, कित्येक लोक अंध-विश्वास ठेवतात की, कोणत्या रत्नानी कोणता परीणाम होतो. परंतु त्या रत्नांमध्ये कोणत्यातरी अलौकिक शक्ति असतात व त्या माणसावर होऊ शकतात. असा विश्वास विद्याधरच्या मित्राने त्याच्यामधे निर्माण केला. समुद्रामध्ये वादळ उठणे हे स्वा-भाविक आहे. त्यामुळे त्यावेळेस समुद्रात असणारे जहाज वादळात सांपडून बुडणे शक्य आहे. काही जहाजे वादळ वाऱ्याने आपोआप किनाऱ्याला जाऊन पण लागतात.

परंतु सोमशेखर एक समजुतदार सोनार होता. तो एक गोष्ट छान जाणून होता की, अंगठीत बसवलेल्या रत्नाच्या प्रभावानेच त्याच्यावर विश्वास ठेऊन अनेक लोक येतात. त्याने आपल्या चालाखीने विद्याधरवर आपला विश्वास बसवला हे सांगून की, तुझी तीन जहाजे तर ह्या अंगठीच्या प्रभावानेच वांचली ह्याकडे त्या सोनाराचा स्वार्थीपणाचा पत्ता लागतो. त्यांने पुढे असे सांगूनही निळेच्या ऐवजी दुसरा खडा दिला असता की, भविष्य काळात ह्या खड्याच्या प्रभावाने तू भिकारी होऊ शकशील खरे तर ह्या गोष्टीचा विश्वास विद्याधरचा मित्र ह्याने पोवळ्याची अंगठी पहात म्हटले म्हणून त्याचा त्याच्यावर विश्वास बसू लागला. व अंधविश्वासावर तो जगू लागला. त्याचा आत्मविश्वास नाहीसा होऊ लागला.

जर अशा तऱ्हेने आत्मविश्वास घालवून अंधविश्वासावर जगू लागलो तर, अनेक अनर्थांना बळी पडावे लागले. हे जाणून त्याने हातातील अंगठी काढून सोमशेखरच्या हातात देऊन टाकली. परंतु त्याने हे आपल्या अज्ञानाने केले नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहिसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# व्यवहार कुशलता

भद्रशील नावाचे गुरूजी गोष्टी सांगणारे गावोगांवी हिंडून सत्य व धर्म इत्यादिचा सरळ साध्या भाषेत अर्थ सांगून ठिकठिकाणी फिरत असत. त्यांच्या बरोबर त्यांचे कंकण व लोहक नावाचे दोन शिष्य सुद्धा होते. म्हातारपणामुळे गुरूजी नेहमी आजारी पडत. अशा वेळेस त्याच्याकडून गोष्टी सांगण्याचे काम होत नसे. म्हणून ते कंकणला गोष्टी सांगण्याचे काम सोपवत.

त्यामुळे ही गोष्ट लोहकच्या मनांत नेहमी खटकत् असे. त्याला त्याच्या गुरूनी एकदा सुद्धा गोष्ट सांगण्यास सांगितले नाही.

तेव्हां एकदा लोहकने भद्रशिलना विचारले–"गुरूजी! तुम्ही मला जनतेसमोर धर्मशास्त्रा संबधी ज्ञान देण्याची एकदा सुद्धां संधी दिली नाहीत. म्हणजे ह्याचा अर्थ असा होतो की, धर्मशास्त्रा संबधी माझे ज्ञान अपूर्ण आहे. होय ना? किंवा आपल्या सेवेत् माझ्याकडून काही कमी केले जाते. किंवा कंकण व माझ्यातील आपल्या मनांत काही भेदभाव असावा कृपा करून सांगा. म्हणजे माझी चुक मला सुधारता येईल.

भद्रशिल मंद हसत म्हणाले–"तुला धर्मशास्त्रा संबधी खूप ज्ञान आहे परंतु खरी गोष्ट अशी आहे की, तुला कंकण पेक्षा थोडे जास्तच ज्ञान प्राप्त आहे."

गुरूंच्या तोंडी आपले कौतुक ऐकून लोहकला खूप आनंद झाला. भद्रशिल थोडे थांबत म्हणाले–"सर्व साधारण जनतेच्या मनांमध्ये रूजण्या लायक अशा सुलभ शैलीचे धर्मशास्त्र संबधी ज्ञान प्राप्त करून दिले पाहिजे. नाहीतर ते त्याचा उलट अर्थ करून आपल्या इच्छे विरुद्ध काहीही करू शकतील. माझ्या विचाराने तर तू एक भाषणकार्यच नाही तर त्यापेक्षा जास्त एक प्रवक्ता व व्याखाता बनून लोकप्रिय होशील."

लोहक खिन्न होत म्हणाला–"आचार्य! मला एकदा सुद्धा संधी न देता माझ्याबद्दल आपण अशी कल्पना केलीत. ह्याचेच मी दुर्भाग्य समजतो."

भद्रशिल थोडा थांबत म्हणाला–"ठिक आहे! तुझ्या मनांमध्ये गैरसमज उत्पन्न झाला आहे. तेव्हां तो दूर करण्याकरीता मी एक संधी तुला देतो. आज रात्री मला सिरपुरच्या शंकराच्या देवळात व्याख्यान द्यावयाचे आहे. माझ्या जागी तू भाषण कर त्याकरीता तू तयार हो."

गुरूनी सांगितलेले ऐकून लोहक अतिशय प्रसन्न झाला. त्या दिवशी रात्री शिवालयात सर्व ग्रामवासियांच्या समोर उभे राहून त्याने भाषण द्यावयास सुरवात केली. सर्वात प्रथम त्याने–"धनमूलमिदजगत्" नावाच्या सुत्रावर अनेक उदाहरणे देऊन विवेचन केले.

त्याने असे सांगितले जिवन जगायला धन हेच एक मुल्य असत नाही. ह्याच्या समर्थना करीता त्याने अनेक उदाहरणे दिली. एक तास निघून गेला. तरी त्याचे भाषण चालूच होते भद्रशिलच नाही तर बाकी सारी जनता सुद्धा त्याच्या संभाषणाने उबून गेली.



थोडचा वेळाने लोहक क्षणभर थांबला व लोकांना उद्देशुन म्हणाला–"आता पर्यंत मी काय सांगितले ते तुम्हांला समजले असेलच की, फक्त धन असुन आपण सगळयाच गोष्टी विकत घेऊ शकत नाही."

"होय होय आम्हाला छान समजले!" असे म्हणून लोहकने आपले भाषण थांबवावे ह्या दृष्टीने सर्वजण उभे रहात टाळचा वाजवू लागले.

परंतु लोहकने तिकडे दुर्लक्ष करीत जास्तच दुप्पट उत्साहाने आपले भाषण देणे सुरू केले. काय आपण धन देऊन आनंद विकत घेऊ शकतो? मैत्रीची व प्रेमाची किंमत लावू शकतो?" नंतर त्याने पुढच्या ओळीत बसलेल्या एका मुलाला जवळ बोलावले व म्हटले–"बाळा, जर तुला मी एक शंभर रूपये दिले व तुझ्या आई वडीलाची तुच्छता कर सांगितले तर तू काय तसे करशिल?"

तो प्रश्न विचारताच तो मुलगा आश्चर्य-चकित झाला व बावच ळल्या सारखा इकडे तिकडे पाहू लागला. एवढयात त्याच्या शेजारी बसलेला माणूस उठून उभा रहात म्हणाला–"मला जर माझ्या मामाचा तिरस्कार करावयास सांगितलात तर काही कठीण काम होणार नाही. तर त्या बद्दल तुम्ही मला किती पैसे द्याल?"

सर्व लोक फिदी फिदी हसू लागले. एक एक करून उठून जाऊ लागले.

भद्रशिल त्याच्या खांद्यावर थापटत म्हणाले–"तुला आता तरी समजले नां! कि अद्यापपर्यंत भाषण देण्याची संधी तुला का नाही दिली?" तू तर जास्तच ज्ञान ग्रहण केले आहेस. हि गोष्ट खरी आहे. परंतु तुझा व्यवहार लोकांना कटांळवाणा होता. मी तुझ्या व्यवहाराच्या बाबतीत जो अंदाज लावला होता तो बरोबर होता. चूक नव्हता?"

लोहक गुरूनां कोणतेच उत्तर देऊ शकला नाही. त्याने मुकाटचाने मान हलविली ह्यानंतर त्याने फिरून कधीही भाषण देण्याचे नांव काढले नाही.





# हसण्याचे रहस्य

भोजपुरी व गजपुरी हि एकमेकानां लागून असलेली राज्ये होती. दोन, चार पिढयांपासून त्या दोन्ही राज्यात वैर निर्माण झाले होते. परंतु दोन्ही राज्ये आर्थिक व सैनिक दृष्टीने समान शक्तिशाली होती.

हळूहळू गजपुरी राज्य सैनिकांच्या दृष्टीने दुबळे होऊ लागले. त्यावेळी गजपुरीवर राजा चंद्रसेन राज्य करीत होता. त्यानी भोजपुरीकडून होण्याऱ्या लढाईच्या संकटाचा विचार केला.

भोजपुरीचा राजा शिवसेन ह्याला एक विवाह योग्य मुलगा होता. गजपुरीच्या राजा चंद्रसेनला रत्नमंजरी नावाची सुंदर कन्या होती. राजा चंद्रसेनने विचार केला की, आपल्या मुलीचा शिवसेन राजाच्या मुलाबरोबर विवाह लावून दिला तर हे संकट टळण्यास मदत होईल.

अशा प्रकारे विचार करून राजा चंद्रसेनने आपल्या दूताकरवी असा संदेश पाठविला की, माझ्या मुलीकरीता मी आपल्यामुलाशी संबध जोडत आहे. परंतु त्यापुर्वीच शिवसेनचा मुलगा प्रसन्न ह्याने रत्नमंजीरीच्या अनुपम सौंदर्याविषयी बरेच ऐकले होते व त्याला मनापासून तिच्याशीच विवाह व्हावा असे वाटत होते. हि गोष्ट समजताच प्रसन्नच्या वडीलांनी रत्नमंजीरीच्या वडीलांना आपला होकार कळविला.

विवाहपूर्व साऱ्या गोष्टी बोलण्यासाठी त्यांनी राजा चंद्रसेनला आपल्या राज्यात निमंत्रित केले. व त्याला मेजवानी देण्याची जय्यत तयारी केली. त्या मेजवानीला त्याने चंद्रसेन बरोबर त्याची बायको जयन्तीदेवी व मुलगी रत्नमंजीरी हिलापण बोलावले. भोजनात दासदासीं अनेक



पदार्थ वाढीत होत्या. त्याच वेळेस एक मालती नावाची दासी वाढता वाढता हंसत सुटली. ते हसणे पाहून सर्वजण विस्मयाने बघू लागले. प्रत्येक व्यक्तिच्या पाठीमागे हसण्याचे एकच कारण होते.

शिवसेनराजाने आपल्या बायकोजवळ असे घोषीत केले होते कि, चद्रसेन राजाने आपल्याला हुंडा व भेट म्हणून काय काय गोष्टी दिल्या पाहिजेत. त्यामुळे हे कारण असावे म्हणून ती हसली असावी की "आपल्या राजाकडे इतकी धनदौलत संपत्ती असून सुद्धा हा इतका लोभी कां?"

शिवसेन राज्याच्या बायकोला वेगळेच हसण्याचे कारण वाटले म्हणून तीने मनातील गोष्ट इतर बायकांपासून गुप्त राखली.

चंद्रसेनला तिच्या हसण्याचे वेगळेच कारण वाटले त्याला वाटले तीला आपण लढाईत पराजित होऊ ह्यामुळे आपण मुलीचा संबध जोडला असावा असे समजून हसू आले असावे तसे वाटून त्याचा चेहरा कोमेजून गेला.

चंद्रसेनची बायको नेहमी डोक्याला कलप लावीत असे, आज गडबडीत ती लावायचा विसरली त्यामुळेच दासी हसली असेल असे तिला वाटले.

रत्नमंजीरीला वाटले व तिने तिव्र कटाक्षाने प्रसन्नकडे पाहिले बहुतेक ह्या-कारणामुळेच दासी हसली असावी असा तिचा समज झाला. हे समजूत ती आश्चर्य करू लागली व मान खाली घातली.

आता प्रसन्नच्या आश्चर्याचे कारण वेगळेच होते. तो राजकुमारीशी एकांतात बोलण्याकरीता संधी पहात होता. व आपल्या एका मित्राकरवी तो निरोप तिला पाठवणार होता. ते समजून तर ती दासी हसली नसेल नां? अशा विचाराने तो आश्चर्यचकीत झाला.

राजा शिवसेनचा मंत्री सुधर्म अत्यंत चाणाक्ष होता. त्याने एक गोष्ट जाणली की, जे जे भोजन करीत होते. त्यांच्यात नक्कीच काहीतरी बदल झाला असावा. त्याने विचार केला की, दासीच्या हसण्याचे कारण प्रत्येकजण आपापल्या मनाने अर्थ लावून मन व्याकुल करून घेत आहेत.

थोड्यावेळाने भोजन संपले. सुधर्मने मालतीला आपल्याजवळ बोलावून विचारले—"पंक्तीमध्ये तू इतकी जोर-जोरात कां हसत सुटलीस ह्याचे खरे काय कारण आहे?"

सर्वांनी अशा तऱ्हेनें रागारागाने पाहिले की, आपल्या कारणामुळेच मालतीला हंसू आले असावे. परंतु मालती ते कारण सांगायला कांकू करू लागली.

ह्यावर सुधर्मने समजावत म्हटले—"ऐक, मालती, तुझ्या हसण्याचे अनेक अर्थ लावून हे प्रत्येक जण दुःखी होत आहेत. मी तर असा विचार करत होतो की, तू तुझ्याबाबतीतच काहीतरी विचार मनांत आणून हंसली असावीस. कारण आम्हांला सर्वांना पाहून एक साधारण दासीला हसण्याची हिम्मतच व्हायची नाही. त्यामुळे तुला तुझ्या हसण्याचे कारण सांगितलेच पाहिजे."

ह्यावर मालती लज्जीत होत म्हणाली—"माझे पती अगदी विसरभोळे आहेत मी त्यांना किती दिवसांपासून सांगत आहे की, मला कोणत्यातरी नविन तऱ्हेच्या बांगड्या आणा. परंतु ते रोजच विसरतात. त्यामुळे आज पुन्हां मी त्यांना त्या गोष्टीची आठवण करून दिली. व माझी जुनी एक बांगडी त्यांच्या हातात घातली की ते विसरू नयेत. परंतु नेहमी प्रमाणेच ते विसरून गेले व हातातल्या बांगडीनिशीच अंतपुरात आपल्या पहाऱ्यावर आले. ते पाहून मला हंसू आवरले नाही व मी हसत सुटले" असे उत्तर देत मालतीने पहारेकरी मल्लवर्माकडे कटाक्ष टाकला.

मल्लवर्माच्या हातातल्या बांगडीकडे पाहून मालतीच्या हसण्याचे कारण सर्वांना समजले. अशा तऱ्हेने सर्वांचे शंकानिरसन झाले. व सर्वांना आपल्या शंका आठवून जोरजोरात हसायला येऊ लागले.





# विश्वासघातकी

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असता, बोधिसत्वांनी गरुडांच्या राजाच्या रूपे जन्म धारण केला. त्यावेळी पांचशे व्यापारी दुसऱ्या देशांत व्यापार करण्याच्या हेतूने जहाजात बसून निघाले. परंतु मध्यसमुद्रांत त्यांची बोट बुडाली. त्यातील एकच माणुस वांचला बाकीच्या सर्व लोकांना माशांनी खाऊन टाकले. जो माणुस वाचला तो तरंगत समुद्राच्या कांठावर बसलेल्या करंबिया नावाच्या किनाऱ्यालां लागला. व तेथील गावांत भीक मागून आपले पोट भरू लागला. व आपला निर्वाह करू लागला.

त्याच्यावर दया येऊन गावातील लोकांनी त्याला अनेक वस्तु देऊ केल्या. परंतु त्या वस्तु घेण्यास तो नकार देऊन म्हणाला–"हे सर्व मला कशाला! मला तर फक्त खाणे व कपडा पाहिजे." ह्यावर लोकांनी विचार केला. "अरेरे, हा कोणी महान तपस्वी नाहीतर साधू दिसतो आहे! म्हणून त्यांनी त्याला पर्णकुटी बांधून दिली. व त्याला त्यात राहून तपश्चर्या करावयास सांगितली.

त्या पर्णकुटीत राहून त्यांनी आपले नाव करंबिया महामुनी असे धारण केले. व जनतेच्या मनात आपल्या बद्दल आदरभाव प्राप्त केला. त्याची ही लोकप्रियता ऐकून राजा सुद्धा त्या महामुनीच्या दर्शनाला आला. अशा प्रकारे करंबियाची मैत्री प्राप्त करणाऱ्यामध्ये सर्पांचा राजा पंडरक आणि गरुडांचा राजा बोधिसत्व दोघेही होते.

एक दिवस गरुडांच्या राजाने येऊन मुनींना नमस्कार केला. व त्याच्या समोर बसत म्हणाला–"स्वामी, आमच्या गरूड व सर्पांच्या मध्ये जेव्हां भांडणे होतात तेव्हां सर्पांच्या ऐवजी गरूडच जास्त मरण पावतात. ह्याचा अर्थ असा होतो की, गरूडांना सर्प पकडण्याची कला माहीत नसावी. तेव्हां आमची एकच विनंती आहे की, आपण सर्पांच्याकडून ते रहस्य जाणून आम्हाला सांगण्याची कृपा करावी."

करंबियाने गरूडराजाचे म्हणणे मान्य केले. तेव्हां गरूडराजा संतुष्ट होऊन तेथून निघून गेला. नंतर जेव्हां सर्पराज करंबियाला भेटायला आला तेव्हां त्याने त्याला विचारले–"सर्पराज, मी असे ऐकले, गरुड जेव्हां तुम्हांला पकडतात. तेव्हां तेच अधिक संख्येने मरण पावतात. मग ह्याचे काय कारण आहे? हे रहस्य मला सांग?"



ह्यावर सर्पराज म्हणाला–"स्वामी, ह्यांत एक गुपित आहे. मी जर तुम्हांला ते सांगितले तर, मी आमच्या जातीतला द्रोह करणारा होऊन भूत बनेन. व आमच्या जातीच्या विनाशास कारण होईन. त्यामुळे कृपाकरून मला हे सांगण्याबद्दल जास्त जोर करू नका."

"काय तू माझ्यावर शंका करतोस कां? मी तुझ्याकडून ते रहस्य काढून घेऊन गरुडराजाला सांगेन म्हणून ह्याचे कारण हेच नां? असे कधीही होणार नाही. मी केवळ कुतुहल म्हणून तुला विचारतो आहे. जरी हे मला तू सांगितलेस तर तुझ्या जातीवर कोणतीही आपत्ती कोसळणार नाही. तुझ्यावर संकट येणार नाही." करंबिया म्हणाला.

सर्पराजने त्याला ते रहस्य सांगण्याचे वचन दिले व तो तेथून निघून गेला. दुसऱ्या दिवशी जेव्हां परत सर्पराज करंबियाला भेटायला आला. तेव्हां त्यांनी त्या गोष्टीची आठवण करून दिली. तेव्हां सर्पराज गप्प राहिला. जेव्हां तिसऱ्या वेळेस सर्पराज त्यांना भेटावयास आला तेव्हां त्यांनी सर्पराजला विचारले–"मी, तुला तिसऱ्यावेळीही तोच प्रश्न विचारतो तू ती गोष्ट काय ती कां नाही सांगितलेस?"



सर्पराज संकोचाने म्हणाला-"महानुभाव, मला ह्याची भीती वाटते की, तुम्ही ते रहस्य जाणून दुसऱ्यांना सांगाल!"

"मी तुला वचन देतो. मी कोणालाही हे रहस्य सांगणार नाही." करंबियाने आश्वासन देत म्हटले. त्यानंतर सर्पराजाने ते रहस्य करंबियाला सांगत म्हटले– "आम्ही मोठ मोठे दगड गिळून आमचे शरीर जड बनवून पडून रहातो. गरुड जेव्हां आमच्यावर हल्ला करतात. तेव्हां तोंड उघडून आम्ही त्यांच्याबरोबर लढतो. गरुड आमचे तोंड पकडून आम्हांला उचलून उडू लागतात. आमच्या भारी वजनाने त्यांच्या अंगातले त्राण नाहीसे होते. व ते खाली पडून मरून जातात. जर कां? ते मूर्ख गरुड आमचे डोके न धरता त्याबद्दल शेपटी धरून हवेत उडायला लागले तर आम्ही गिळलेले सर्व दगड तोंडावाटे बाहेर पडतील व आमचे शरीर हलके होऊन जाईल. व अशा तऱ्हेने गरुड आम्हाला सहजतेने उठून घेऊन जाऊ शकतील. हेच आमचे रहस्य आहे.

सर्पराज निघून गेल्यानंतर गरुडराजने करंबियाला विचारले–" महात्मा, काय तुम्ही सर्पराजचे रहस्य विचारलेत कां? ह्यावर करंबियाने सर्पाचे रहस्य गरुडाला सांगितले.

" सर्पराजाने आपल्या जातीबद्दल भयंकर अन्याय केला आहे. आपल्या जातीचा सर्वनाश त्याने उघडा केला आहे ते रहस्य सांगितले आहे. मी आताच जाऊन त्याला पकडतो." असे म्हणत गरुडराजने पंख फडफडवत जाऊन सर्पाची शेपटी पकडली व उंच उडाला.

तोंड उलटे लटकत असल्यामुळे सर्पाच्या तोंडातील सर्व दगड खाली पडले व चिंतेच्या स्वरात काकुळतीला येऊन म्हणाला–" अरेरे, शेवटी विनाशास मीच कारण झालो. त्या धोकेबाज, दुष्टाला महामुनी समजून मी सारे गुपित सांगितले."

ह्यावर गरुडराज म्हणाला–" अरे मुर्खा, तू आपले रहस्य सांगून त्या कपटी संन्याशावर कशाला उखडतोस? मरण हे अटळ आहे. परंतु मानवाचा मुख्य धर्म म्हणजे विवेक आहे. तुझ्या दुर्गतीचे कारण मी नाही. किंवा तो संन्यासीही नाही. परंतु तुझा मुर्खपणा आहे. प्रत्येक मानव-प्राण्यांला त्यांच्या आईवडीलांपेक्षा जास्त प्रेम कुणाचे नसते. अशा आईवडीलांना तू आपले रहस्य सांगणे बरोबर नाही अनेक भाऊ व मित्र असतात. सुंदर बायको असू शकते परंतु त्या सर्वांपासून हे रहस्य दूर ठेवणारा माणूसच शत्रूला दूर ठेऊ शकतो.

" महात्मन् मला आपला उपदेश समजला. आई आपल्या मुलावर जितके प्रेम व वात्सल्य दाखवते. तेवढेच तुम्ही माझ्यावर दाखविलेत." असे सर्पराजा गरुडराजाला म्हणाला.

मुले तिन प्रकारची असतात–"एक शिष्य, सांभाळलेली मुले व स्वत:ची मुले. तू माझा शिष्य बनला आहेस. म्हणजे माझा मुलगाच झाला आहेस. म्हणून मी तुला जीवदान देतो. असे म्हणून गरुडाने सर्पाला जमीनीवर उतरवले. व आपल्या पंजातून मुक्त केले

ह्यानंतर सर्प नागलोकांत निघून गेला. गरुडराजाने आपल्या वस्तीत जाऊन गरुडांना म्हटले मी सर्पराज पंडरकाला आपला मित्र बनवले आहे. परंतु मी ह्याची परिक्षा घ्यावी असे म्हणतो. तो



माझ्याबद्दल कोणता आदर भाव ठेवतो." असे म्हणत तो नागलोकात गेला व गरूडराजने आपले पंख फडफडवून तेथे वादळ निर्माण केले. तेवढ्यात सर्पराजाने भराभर दगड गिळले व पडून राहून आपली शेवटी अंगाखाली लपवून फणाकाढून फुंकारू लागला.

त्यावर गरूडराज म्हणाला–"सर्पराज हे तू काय करीत आहेस? आपण तर मैत्रि केली आहे नां! आणि तू तर मला मारायला तयार झालास?"

सर्पराज म्हणाला–"मित्रा, विवेकशिल व्यक्ति कोणावरही विश्वास करत नाही. आणि तू तर कालपर्यंत माझा शत्रू होतास. तेव्हां मी कसा विश्वास करू?"

गरूडराज हंसत म्हणाला–"तू माझा धडा मलाच शिकवतोस? चल तर, आपण जाऊन त्या भोंदू संन्याशाला भेटू."

ह्यानंतर ते दोघे त्या करंबियाकडे जाऊन पोहोचले व सर्पराजने करंबियाला विचारले–"मी तुझी वेषभुषा पाहून तुला महान तपस्वी समजलो व माझे गुपित तुला सांगितले. ते रहस्य तू गरूडराजला सांगून माझ्याशी विश्वासघात केलास?"

"मी हे काम अज्ञानानी केले नाही. तुम्ही दोघे माझे मित्र आहात. परंतु त्याहून गरूडराजावर माझे प्रेम जास्त आहे. म्हणून मी त्याला तुझे रहस्य सांगितले." करंबिया म्हणाला.

"छीः छीः, अरे दुष्टा! तू तर सर्वस्व त्याग केले म्हणतोस. तरीपण तुझे मन पक्षपात व शत्रुभाव ठेवतेच नां? तू कसला मुनी म्हणूवून घेतोस. तू असाच सर्व जगाला धोका देत आहेस नां? ह्या अपराधा करीता तुझ्या डोक्याचे तर तुकडे तुकडे होऊन पडतील. तुझा सर्वनाश होईल. अशा तऱ्हेने करंबियाला सर्पराजाने शाप दिला.

मग काय! दुसऱ्याक्षणी करंबियाचे डोके फुटले. त्याच्या खालची धरणी दुभंगली व अशा तऱ्हेने तो संन्याशी सरळ नरकात गेला.





आपल्या नद्या :

## नर्मदा

नर्मदा नदीच्या संबंधी एक पुराण कथा आहे. मैकाल पर्वत प्रदेश हा निसर्ग सौंदर्याचे उगम स्थान आहे. तिथे मानव वस्ती नाही. परंतु देव यक्ष तिथे जात. प्रत्येक ऋतुत तेथे नविन नैसर्गिक शोभा पहावयास मिळे.

असेच एकदा शंकर तेथे गेले असता तेथील निसर्ग सौंदर्यावर लुब्ध झाले. व तेथेच ध्यानधारणेत मग्न झाले कित्येक वर्षे उलटली परंतु शंकर तेथून हालले नाहीत. शंकराची ती दिव्य तेजमुर्ती पाहून निसर्ग देवता त्यांच्यावर मुग्ध झाली.





परमात्मा शंकर ह्यांच्यापासून एका अद्भुत् दिव्य तेजातून एका सुंदर कन्येने रूप धारण केले. तिने शंकराला नमस्कार केला. व प्रार्थना करीत म्हटले–"बाबा, मला सतत माझ्या मनाप्रमाणे आनंदाने रहाण्याचा वर द्या!"



"तथास्तु" म्हणत शंकराने आशिर्वाद दिला. व तिचे (कोमलांगी) नर्मदा हे नामकरण केले. तेव्हांपासून ती अनेक फुलापानांनी भरलेल्या पहाडांवर वनदेवी व वारेव्यालेल्या वावटळी सारखी स्वेच्छापूर्वक आनंदाने वागडू लागली.

हरीणे, मोर, ससे अन्य प्राणी तिचे मित्र बनले. त्यांच्या बरोबर ती लपंडाव खेळू लागली. व स्वता:चे जिवन आनंदाने घालवू लागली. तिच्या नाचण्याने पर्वत प्रदेशांची शोभा द्विगुणीत झाली.





त्या प्रदेशात येणारे देव-देवता तिला पाहून तिच्या सौंदर्यावर मुग्ध झाले. ती जेव्हां इतर व प्राण्यां बरोबर खेळे तेव्हां ते लपून तिचा खेळ पहात. ती जिकडे जाई तिकडे ते तिचा पाठलाग करत. व तिची टेहळणी करीत.

थोडे दिवस उलटले. आता त्या देवगणांना तिच्याशी मैत्री केल्यावाचून रहावेनासे झाले. तिच्याकडे ते जास्तच आकर्षित होऊ लागले. परंतु त्यातील कोणाही बरोबर मैत्री करणे. अगर त्यातील कोणाबरोबर तरी विवाह करणे. नर्मदेला अजिबात आवडले नाही. तिने नेहमी करताच स्वेच्छेने आपले आयुष्य घालविण्याचा निश्चय केला.





देव आता तिचा पिच्छा पुरवू लागले. परंतु ती नेहमी त्यांना दूर ठेवू लागली. ते तिचा पाठलाग करीत ती एका डोंगरावरून दुसऱ्या डोंगरावर जाऊन लपे. व त्यांच्या तावडीतून सुटे.

असे करता काही दिवसांनी नर्मदा एका पर्वताच्या शिखरावर चढली. देवानी विचार केला की, तिला तेथे पकडणे सोपे. तिथून तिला कुठेही जाता येणार नाही. असे समजुत ते अति उत्साहाने पर्वत शिखरावर चढू लागले. नर्मदाने एकदाच त्यांच्याकडे पाहिले व पर्वताच्या दुसऱ्या बाजूला पहात एक क्षण निश्चल उभी राहीली.





दुसऱ्याक्षणात एका कन्येचे रूप घेऊन ती पर्वतावरून खाली वाहू लागली. देव असहाय्य होऊन इकडे तिकडे पाहू लागले. नर्मदा ही नर्मदा नदीच्या रूपाने बदलून पहाडात दऱ्याखोऱ्यात पार करीत शेवटी ब्रोच जवळ समुद्राला जाऊन मिळाली नर्मदा नदी मध्यप्रदेश, महाराष्ट्र व गुजराथ ह्या देशातून वहात जाते.

प्राचीन काळापासून नर्मदा ही अत्यंत पवित्र नदी मानली जाते. त्या नदीच्या कांठी अनेक ऋषि मुनिनी तपश्चर्या केल्या. भक्त लोक ह्या नदीला प्रदक्षिणा करतात म्हणजे नर्मदा नदीचे जन्मस्थान अमरकंटकच्या एका बांधापासून ब्रोंच पर्यंत यात्रा करतात व तेथून नदी पार करून दुसऱ्या बांधापासून परत अमरकंटक पर्यंत परत येतात.





अमरकंटकच्या जवळ नर्मदादेवीचे देऊळ आहे. हजारो संख्येने लोक देवीच्या दर्शना करीता देवळात येत जात असतात. अशा प्रकारे ते एक महत्वाचे तिर्थक्षेत्र मानले जाते.

# वसुली

पेठगावांत लक्ष्मीपती नावाचा सावकार रहात होता. तो एक नंबरचा कंजुस मारवाडी होता. गावांत त्याचा विषय जेव्हां निघत असे तेव्हां गावकरी त्याला कंजुस लक्ष्मीपतीच संबोधत.

एकदा सर्व गावकऱ्यांनी गावांत एक धर्मशाला बांधण्याची योजना आंखली व वर्गणी गोळा करू लागले. सर्वांना एकच विचार पडला की, लक्ष्मीपती कडून पैसा कसा मिळवावा.

त्या गावांत नुकताच स्थाईक झालेला एक भूपती नावाचा तरुण रहात होता. तो मोठा हुषार व बोलण्यात पटाईत होता. कोणतीही गोष्ट करून घेण्याबाबतीत त्याची ख्याती होती. त्यामुळे गावकरी त्याला कार्यकर्ता म्हणत.

एक दिवस भूपती गावांतील दोन तरुणांना बरोबर घेऊन लक्ष्मीपतीच्या घरी गेला. व सविस्तर माहिती सांगून वर्गणी मागितली. लक्ष्मीपतीने आश्चर्याने त्याच्याकडे पहात म्हटले– "वर्गणी पाहिजे ? आणि ती सुद्धा माझ्याकडून ? अरे, आजपर्यंत मी कुणालाही एक पैसा वर्गणी दिली नाही. तुमच्यापेक्षा पुष्कळ शहाणे माझ्या घरी आले परंतु सर्व रिकाम्या हातांनी परत गेले!"

ते ऐकून किंचीत हसत भूपती म्हणाला–"महाशय, मी त्या लोकांसारखा मूर्ख नाही. मला सर्व गावकरी कार्यकर्ता म्हणतात. समोरच्या माणसात थोडी तरी बुद्धीमत्ता व समजुतदारपणा असेल तरच मी त्याच्याकडे वर्गणी मागतो."

"मग काय, लक्ष्मीपतीला झकत वर्गणी देणे भाग पडले."





# चांदण्याची शिडी

विजयनगरावर कृष्णदेवराय याचा राज्य-कारभार होता. त्यावेळी एक लुटारू नेहमी राज्यातील एकेका घरी चोरी करीत असे राजाने त्याला पकडण्याचे अनेक उपाय योजले परंतु त्याचा काही फायदा झाला नाही.

राजाच्या दरबारात तेनाली राम् नावाचा एक कवी होता. त्याच्या मनात त्या चोराला पकडण्याची इच्छा उत्पन्न झाली. तो गावातल्या प्रत्येक चौकात जाऊन एकच गोष्ट बोलू लागला–"कोणास ठावूक मला अशी भीती वाटते की, तो चोर माझे घर केव्हां लुटून नेईल. माझ्या घरी तर खूप मौल्यवान संपत्ती ठेवलेली आहे.

कानोकानी ही बातमी चोराला सुद्धा समजली की, तेनाली रामच्या घरात भरपुर संपत्ती आहे. तेनाली रामला सुद्धा तेच पाहिजे होते की, ही गोष्ट ऐकून चोर आपल्या घरी चोरी करावयास येईल व त्याला आपण युक्तिने पकडू शकू. चोर जेव्हां आपल्या घरी येईल तेव्हां काय काय करावयाचे व कसे बोलावयाचे. त्या गोष्टी त्याने आपल्या बायकोला समजावून सांगितल्या.

शेवटी एके दिवशी तेनाली रामच्या घरात चोर घुसला. त्याच्या येण्याकरीता तेनाली रोज जागरण करीत होता. त्याने आपल्या घराच्या छतावर चोराच्या चालण्याचा आवाज ऐकला व तावडतोब आपल्या बायकोला इशारा केला.

दुसऱ्या क्षणी तेनाली रामच्या बायकोने उच्च स्वरात बोलणे सुरू केले–"अहो, मला तर खूप भीती वाटते चोर आपल्या घरी येणार नाही नां?

"अग, जा ग चोरानी आपली संपत्ती नेली तर त्याच्या चौपट तुझ्याकडे आणून टाकीन." तेनाली म्हणाला.

"मी पण रोज तुम्हांला विचारीन म्हणते पण विसरूनच जाते अहो, ती संपत्ती तुम्ही कोठून घेऊन येता? तेनालीच्या बायकोने विचारले.

"अग, अग, जरा हळू बोलनां! मी सुद्धा हे सर्व धन चोरूनच आणतो."

"कुठे हो चोरी करता?" बायकोने विचारले.

त्याच्याशी तुला काय करायचे?. जास्त बडबड करू नकोस मुकाटयाने झोप पाहू! तेनाली म्हणाला.

"मला खरी गोष्ट काय ती सांगा! तरच मला झोप येईल नाहीतर चोरी करतांना तुम्हांला कोणी पकडले तर?" बायको म्हणाली.

"अग, साक्षात ब्रह्मदेव समोर येऊन उभा राहीला तरी मला पकडू शकणार नाही मी एक मंत्र शिकलो आहे."

"सांगा ना कोणता मंत्र?" बायको म्हणाली.



तेनाली आपल्या बायकोला दरडावीत म्हणाला–"तू तर शनीसारखी मला पिडतेस सांगतो थांब तुला ते रहस्य. राजमहालात जो खजिना आहे नां! त्यात दहा हात उंच धनांचा ढिग रचलेला आहे. त्याच्या छताच्या थोडयाशा खाली एक माणूस घुसून जाईल एवढा एक छोटा झरोका आहे. माहीत आहे कां? चांदण्या रात्री मी खजिन्याच्या खोलीतल्या छतावर चढतो व चांदण्याचा प्रकाश झरोक्यातून खजिन्यात जाईल ह्याची वाट पहात रहातो चांदण्याचा प्रकाश आत शिरला की लगेच मी ॐ भ्रुत, ॐ भ्रुत, ॐ भ्रुत म्हणत मंत्राचा जप करतो. तो मंत्र म्हणताच चांदण्याची किरणे माझ्या हातात दोरी सारखी येतात. तेव्हां त्याचा आधार घेऊन मी खजिन्याच्या आत उतरतो नंतर एका गाठोडयात बरेच धन गोळा करतो व परत किरणांच्या दोरीच्या शिडीने बाहेर येतो व छतावर चढतो. त्यामुळे ब्रह्मदेव रुद्रदेवाला सुद्धा समजू

शकत नाही. की खजिन्यातली चोरी कशी होते. अशा प्रकारे मी रोज थोडे धन चोरून घेऊन येतो. त्यामुळे मला कोणी पकडू शकले नाही."

"आहो! अशी गंमत आहे काय? असे म्हणत तेनालीच्या बायकोने संतोष व्यक्त केला." व डोळयांतून अश्रु आणण्याचे खोटे नाटक केले.

त्या नवरा-बायकोंच्यात झालेल्या गप्पा त्या चोराने ऐकल्या आता त्याच्या मनांत तेनालीच्या घरी चोरी करावयाची इच्छा झाली नाही. त्याने निश्चय केला की, आता लुटायचा तर राजमहालातील खजिनाच.

दुसऱ्या दिवशी पायऱ्या चढून तो राजमहालातील खजिन्याच्या खोलीच्या छतावर चढाला. तेनाली रामने सांगितल्या सारखा तेथे झरोका होता. तो जमिनी-पासून दहा हात उंच होता. चोराने पण चांदण्याची किरणे झरोक्यातून आत जायची वाट पाहू लागला. व किरणे आत जाता क्षणीच त्याने ॐ भूत, ॐ भूत, ॐ भूत, असे तिनदा म्हटले व मंत्र म्हणत त्याने झरोक्यातून पाय खाली सोडले व किरणांना धरण्याकरीता हात लांब केले व हातात आली समजून खाली उडी टाकली.

परंतु त्याच्या हातात हवे शिवाय काय आले. वरून पडण्यामुळे मात्र दोन्ही हातांना चांगला मार बसला. दुसऱ्या दिवशी राजाच्या खजिनदारांनी खजिन्याची दारे उघडली तेव्हां न हालण्याच्या स्थितीत चोर त्यांच्या नजरेस पडला. अशा तऱ्हेने चोर सहज त्यांच्या हातात सांपडला चोरानी लूटलेला सारा माल सुद्धा मिळाला.

ह्यानंतर तेनाली रामने राजदरबारात जाऊन चोराला पकडण्या करीता केलेली युक्ति सविस्तर राजाला सांगितली ते ऐकूनच राजदरबारातील लोक पोट धरून हसत सुटले.

चोराला पकडून देण्याच्या कामगीरी-बद्दल श्री कृष्णदेवरायने तेनाली रामला एक मोठे इनाम दिले.



# फुकटचे काम

एका गावात धनगुप्त नावाचा मोडक्या वस्तु विकणारा दुकानदार रहात होता. तो कोणतेही काम असुदे व्यवहारी दृष्टीने करत असे. परंतु तो असे सांगत फिरत असे की, मी फुकटचे काम कधी करत नाही. .

धनगुप्तच्या शेजारी गंगानाथ नावाचा एक माणुस रहात होता. त्याच्या मनात एक उत्सुकता होती की, धनगुप्तला पैसा घेतल्याशिवाय एखादे काम करताना पहावे. परतु खूप दिवस उलटले त्याची ती इच्छा पुर्ण झाली नाही. शेवटी गंगानाथला ऊबग आला. धनगुप्तच्या जवळून कोणतेही काम फुकट करून घ्यायचा त्याने चंगच बांधला. व त्याने त्याच्याकडे जाऊन एक सुई मागितली. धनगुप्तने ताबडतोब दिली. गंगानाथने आपला फाटका सदरा शिवला व ती सुई त्याने लगेच परत केली.

गंगानाथला संतोष वाटला की, त्याने धनगुप्तकडून फुकटचे काम करून घेतले. आणखी थोडया दिवसांनी त्याने हातोडी मागितली. व दोन दिवसांनी परत केली. ह्याखेपस धनगुप्त गप्प बसला. काही एक बोलला नाही.

गंगानाथला रहावले नाही. तो कळवळा दर्शवित म्हणाला–".मी तुझ्याकडून फुकटच्या दोन वस्तू नेल्या. काहीही किंमत न देता ?"

धनगुप्त हसत म्हणाला–"मी फुकटचे काम स्वप्नात सुद्धा करून घेत नाही."

"मी तुझी सुई घेतली. त्याला जो दोरा शिल्लक राहीला होता. त्याने मी माझे धोतर शिवून घेतले." धनगुप्तने उत्तर दिले.

"मग हातेडीचा काय मामला आहे ?" त्याची मुठ ढिली झाली होती. "तेवढयात ती हातोडी तू मागितलीस." धनगुप्त म्हणाला.

तेव्हांच गंगानाथला आठवले कि आपण जेव्हा खुंटी ठोकायला गेलो. तेव्हां तो दांडा निसटून आला व पडला. आपण तो परत चांगला ठोकून दिला होता.





# विलक्षण युक्ति

हसन नगरातील सीमे जवळ असलेल्या गावातील काही लोक दुपारचे अंमल झाडाच्या सावलीत गप्पाटप्पा करीत होते. तेवढ्यात एक मध्यमवयीत गृहस्थ त्यांच्याजवळ आला. तो कोणी नवखा वाटत होता. त्याच्या अंगावरचे कपडे फाटके व मळके दिसत होते. तो असे डोके हलवत चालत होता की, दुरून पहाणाऱ्याला तो कोणी वेडा आहे की काय असेच वाटले असते.

त्या अभ्यागताने झाडाखाली बसलेल्या सर्व लोकांचे चेहरे निरखी तत्यांने विचारले– "सुखा बरोबर दुःख हे येतेच. व विजया बरोबर पराजय पण होतोच!"

ग्रामवासियांनी त्या नवख्या माणसाला विचारले–"सांगा! तुम्हांला काय म्हणायचे आहे?"

मी मला आलेल्या अनुभवाचा जो साक्षात्कार पाहिला तोच तुम्हां लोकांना सांगणार आहे. असे म्हणत सर्वांना एकत्र करीत तो ती गोष्ट ऐकवू लागला.

मी किल्ल्यातील दरवाजा पैकी एका दारावरील पहारेकरी असतांना एका चांदण्यारात्री दाराला खेटून बसून पेंगत होतो. तेव्हां एका कोमल हाताचा स्पर्श माझ्या खांद्याला झाला. मी खाडकन् डोळे उघडून पाहिले. तो समोर एक सुंदर गौरवर्णी स्त्री हसत उभी होती.

मी त्या तरुणीला विचारले. "तू कोण आहेस? ह्या अशा अर्ध्यारात्री तुझे इथे काय काम आहे?"

त्या स्त्रीने माझ्या कोणत्याच प्रश्नाचे उत्तर दिले नाही. उलट काही चांदीचे रुपये माझ्या हातात देत हसत सुटली.

मी तिला म्हटले–"मी कोणी लांचखाऊ माणुस नाही."





"ही लांच नाही, लांच म्हणजे वाईट कामाकरीता दिला गेलेला पैसा. मी आत्ता तुला ह्याकरीता पैसे देत आहे की, मला एका चांगल्या कामात तुझी मदत हवी आहे." ती स्त्री म्हणाली.

"ते चांगले काम कोणते आहे?" त्याने विचारले.

दोन अलग झालेल्या मैत्रिणींना एकत्र आणण्याचे काम. काय हे काम चांगले नाही कां? नगरातील काजीची मुलगी व मी. आम्ही दोघी सख्या मैत्रिणी आहोत. परंतु काय झाले कळत नाही. काजीला आमचे दोघींचे भेटणे आवडत नाही. त्यामुळे काजीची मुलगी माझ्या विरहाने तडफडत आहे. आजची रात्र काजीच्या घरात रहाण्याकरीता तू मला मदत केली पाहिजेस.

"हे कसे शक्य आहे?" मी आश्चर्य करीत म्हणालो.

तू जर मनांपासून मदत द्यायची तयारी केलीस तर कोणतीही गोष्ट कठीण नाही. असे म्हणत त्या स्त्रीने मी काय काय करायचे ते स्पष्ट सांगितले.

मी त्या स्त्रीला घेऊन काजीच्या घरी पोहोचलो. व दरवाजा खड्खड्वला काजीनेच येऊन दरवाजा उघडला. त्यावर मी त्याला म्हटले–"महाशय, ही स्त्री दुसऱ्या गावातली रहाणारी आहे. ही इथे एका नातेवाईकाला भेटायला आली होती. परंतु तीच्या जवळचा पत्ता हरवला. आपल्या घराच्या गल्लीत मी हिला रडतांना पाहिले. मी ह्या स्त्रीच्या वडीलांना ओळखतो. एक प्रतिष्ठीत व चांगल्या घराण्यातली आहे. हिच्या अंगावर बरेच सोन्याचे दागीने पण आहेत. म्हणून आजची रात्र तुमच्या घरी रहाण्याची परवानगी करून द्या."

काजी न्यायाध्यक्ष असल्यामुळे त्याने माझे म्हणणे नाकारले नाही व त्या स्त्रीला त्यांनी रहावयास सांगितले.

त्या रात्री पहाऱ्याचे काम पूर्ण करून पहाटे मी माझ्या घरी परत गेलो. परंतु












थोड्या वेळाने माझ्या दारावर कोणीतरी ठक्‌ठक् केले. उघडून पाहिले तर शिपायी दार ठोठावत धमक्या घालत होते.

मी रागाने दार उघडून धमक्या देण्याचे कारण विचारले. तेव्हां शिपायांनी कोतवालानीं बोलावले असल्याचे सांगितले. मी त्यांच्या बरोबर कोतवालाकडे गेलो.

तेथे कोतवाला बरोबर काजीसुद्धा बसलेला दिसला. काजीने मला पाहून संतापाने ओरडत विचारले–"अरे दुष्टा! तुझी ती दुष्ट मैत्रिण कोठे आहे?"

हे ऐकताच मला आश्चर्याचा धक्का बसला. त्यानंतर मला समजले की, ज्या स्त्रीला काजीने आश्रय दिला होता. ती बाई रात्री काजीकडचे सर्व दागदागिने धनदौलत घेऊन पसार झाली होती.

"अरे, लुबाडया चोरा तुझे मरण आता नक्कीच जवळ आले आहे." असे म्हणत काजी भडकून गेला.

मी भीतीने थरथर कांपू लागलो. व म्हणालो–"सरकार, कायद्या प्रमाणे गुन्हेगाराला आपण निर्दोष आहोत हे सिद्ध करण्याकरीता व त्यामुळे जे काही नुकसान झाले ते भरण्याकरीता तीन दिवसांचा अवधी दिला जातो. त्यामुळे मला सुद्धा तीन दिवसांची अवधी द्या.

माझी विनंती कोतवाला बरोबर काजीने सुद्धा मान्य केली. मी त्या बाईच्या शोधार्थ दोन दिवस नगरात फिरून घालवले. पण ती बाई काही मिळू शकली नाही. आता मला भीती वाटू लागली.

परंतु तिसऱ्या दिवशी रात्री एका दुकानाच्या खिडकीत त्या बाईचा चेहरा मला परत दिसला. मला पहाताच ती हसू लागली. व तिने मला जवळ येण्याचा इशारा केला. मी तिच्याजवळ धावतच दांतओठखात रागाने जात म्हणालो–"अग चांडाळणी, आता माझ्या तावडीत आलीस. आता पाहू कुठे पळून जातेस ते.

ती जराही विचलीत झाली नाही. व जरा धिटाईनेच पुढे येत हसत म्हणाली–"मी तुझ्या हाती सांपडले नाही. परंतु कोणताही उपाय न करता तुलाच माझ्या तावडीत सांपडवले बघ."

"तुला माहीत आहे कां? तुझ्यामुळे मी कोणत्या संकटात सापडलो आहे ते?"

आज तुझ्यामुळे मी किती त्रास सहन केला. ते तुला तरी माहीत आहे कां?" त्या स्त्रीने उलट उत्तर करीत म्हटले.

"माझ्यामुळे तुला कष्ट पडले? ते कसे? मला सांग तरी?" मी विचारले.

ती मंदहास्य करीत. क्षण-दोनक्षण गप्प बसली नंतर म्हणाली–"तू पण किती भोळा आहेस! तुला माहीत आहे मी खिडकीतून वाकून किती वेळ वाट पहात होते. मला माहीतच होते की, तू ह्या वाटेने केव्हांना केव्हांतरी जाशिलच.

तू फालतू बडबड करू नकोस, माझ्या मदतीमुळे तू काजीच्या घरात पोहोचलीस. आणि तू त्याचे सर्व घर लुटलेस. आता तुला माझ्याशी काय काम आहे? मी धमकावणीच्या सुरात तिला विचारले.

काजीने जो अन्यायपुर्वक पैसा मिळविला आहे. तोच तर मी चोरला आहे. ही गोष्ट तर खरी आहे. माहीत आहे? मी हे काम कां केले? बघ, मी अशा आशेने हे काम केले की, ह्यानंतर आपण दोघे लग्न करून आयुष्य आरामात घालवू." असे म्हणत



तिने एक कपाट उघडले. त्यात सोन्याचे दागिने व त्याच बरोबर बराच पैसा अडका रचून ठेवलेला दाखवला.

मी विस्फारित नजरेने धन पहातच राहिलो, व म्हणालो आता तरी मी संकटात सांपडलो आहे. माझ्यावर असा आरोप लावला आहे की, काजीच्या घरात जी चोरी झाली त्यात माझा पण हात आहे."

"अच्छा हेच नां! घाबरू नकोस! मी एक युक्ति शोधून काढली आहे. त्यामुळे आपण असे सिद्ध करू की, खरे पाहिले तर काजीच गुन्हेगार आहे." असे म्हणत तिने ती योजना त्याला सांगितली.



तो उपाय ऐकून आम्ही दोघे पोट धरून हसू लागलो. त्यानंतर मी कोतवालाच्याकडे गेलो. व म्हणालो–"हुजुर, मला असा संशय आहे की, ती स्त्री आता सुद्धा काजीच्याच घरात आहे. मी इकडे तिकडे हिंडून ती खात्री पक्की करून घेतली. आता माझा त्या दोन्हीवरून नक्कीच विश्वास बसला आहे मी काजीच्या घराची झडती घ्यावी म्हणतो.

ह्यानंतर कोतवाल व मी काजीच्या घरी पोहोचलो आमचे म्हणणे ऐकून काजीला आश्चर्याबरोबर संताप आला. तरीही त्याने घराची झडती घेण्याची परवानगी दिली.

मी काजीच्या सर्व खोल्यांची पहाणी करीत करीत अशा एका कोठडीमध्ये पोह्योचलो की, तेथे मोठ मोठ्या लाकडाच्या पेट्या रचून ठेवल्या होत्या. त्या पेट्यांच्या पाठीमागून तिची वस्त्रे बाहेर काढीत मी काजीला दरडावत म्हटले–"अहो महाशय, त्या बाईने जी वस्त्रे अंगावर घातली होती तिचा रंग कोणता सांगू शकाल कां?"

"मला असे वाटते....ती पिवळी रंगाची वस्त्रे घालून आली होती" काजी म्हणाला.

दुसऱ्या क्षणार्धात मी पेटाऱ्यांपाठीमागून त्या बाईने जी वस्त्रे घातली होती ती बाहेर काढली. त्याचा रंग सुद्धा पिवळाच होता. त्यावर बरेच रक्त सांडलेले होते.

ते पाहूनच कोतवाल व काजी आश्चर्यँविमुढ झाले. दोन क्षण शांतता पसरली. कोतवालाने आपला घसा खाकरून साफ करत म्हटले–"तुम्ही त्या बाईचा खून कां केलात?"

"खून! काय त्या बाईला मी मारून टाकले? असे म्हणत काजी पांढरा फटक झाला व बेशुद्ध पडला.

कोतवालाला काजीवर दया आली. तो काजीची सांत्वना करीत म्हणाला–"तुम्ही घाबरू नका! हा खून तुमच्या घरातील दुसऱ्या कोणीतरी व्यक्तिने केलेला असावा. मी आपल्यावर थोडा विश्वास करतो. आपल्यावर न्यायालयाची काही आफत येणार नाही. जे काही झाले ते सर्व विसरून जा. नंतर ते माझ्याकडे वळत मला विनंती करीत म्हणाले–"ऐक, ही गोष्ट या कानांची त्या कानांला समजणार नाही ह्याचे वचन दे!"

"हुजुर, मी आपल्या आज्ञेचे पालन जरूर करेन." मी आत्मसंतोषाने उत्तर देत म्हणालो.

ह्या गोष्टीनंतर मी कोतवालाच्या बरोबर काजीच्या घरातून बाहेर पडलो. मनातल्या मनात आनंद करीत त्या बाईच्या घरी पोहोचलो. मी त्या बाईची चलाख बुद्धी व समजुदार पणापाहून थक्कच झालो. तीने तर एक काजीचे घर लुबाडले होते व वर आपला खून झाल्याची खुणपण सोडून आली होती.

मी खोलीशी पोहोचलो पण पहातो तर दाराला कुलूप. मी खूप वेळ वाट पहात बसलो. शेवटी कंटाळून उठलो. व शेजारच्या घरच्या मालकाला विचारले की ती मालकीण कुठे गेली?"

"काय म्हणालात! त्या घराची ती मालकीण आहे? हे घर तर कित्येक दिवसांपासून उजाड पडले आहे. परंतु एक गोष्ट खरी आहे. की, दोन तिन दिवस एक बाई इथे रहात होती. ती आजच खोली रिकामी करून कुठेतरी निघून गेली" शेजारी म्हणाला.

ह्यानंतर मी एका भटक्या सारखा इकडे तिकडे शोधत राहिलो.

अशा प्रकारे आपली कहाणी संपवून झाडाखाली बसलेल्या लोकांना त्यांनी विचारले–"त्या धूर्त बाईला काजीचे घर लुटण्याकरीता मी मदत केली. प्रतिष्ठा पूर्वक जिवन चालवणाऱ्या काजीची अब्रू माझ्यामुळे धुळीला मिळाली. ह्या गोष्टीचे एकच कारण म्हणजे माझा मुर्खपणा असा माणुस एक साधारण मानव म्हणुन जगण्याला काय लायकीचा तुम्हीच सर्वजण सांगा?"

गावकऱ्यांना माझ्या बद्दल सहानभुती निर्माण झाली. त्या लोकांनी त्यांच्या बरोबर झाडाच्या सावलीत बसण्याकरीता मला विनंती केली.











# खरे रहस्य

गोपीनाथ व दिनानाथ हे दोघे शिवापुरीचे व्यापारी होते. त्या दोघांचे सामान जहाजातून विदेशांत पाठवून विकले जाई. एकदा ते सर्व माल विकून टाकून जेव्हा शिवापुरीला येत होते. तेव्हां दिनानाथ गोपीनाथला आपल्या जवळचे दोन हिरे दाखवत म्हणाला– "मी माझ्या आयुष्यात प्रथमच बरेच पैसे जमवून हे दोन हिरे खरेदी केले आहेत. परंतु मला आता चाचेगिरी लोकांची भीती वाटत आहे."

गोपीनाथने त्याला एक उपाय सांगितला की, ते दोन हिरे त्याने आपल्या धोतराच्या टोकाला गुंडाळून कमरेला खोचून ठेवावे. त्याने तसे केले. दुसऱ्या दिवशी त्यांच्या जहाजाला डांकूनी घेरले व त्यांना पकडले. डांकूच्या सरदाराने दरडावत त्या दोघांना म्हटले–" तुम्ही फुकट आपले प्राण घालवून बसाल. तुमच्या जवळ ज्या कांही मौल्यवान वस्तु असतील त्या माझ्या हातात द्या."

त्यावर गोपीनाथ व दिनानाथने विदेशांत वस्तु खरेदी केल्या होत्या त्या दिल्या. "तुम्ही सर्व वस्तु दिल्यात कां आणखी काही लपवून ठेवले आहेत ?" असे म्हणत तो डांकू पुढे येऊ लागला. तेवढ्यांत गोपीनाथ दिनानाथला उद्देशून म्हणाला–"अरे बाबा, प्राणापेक्षा आपल्याला धनाचे कां महत्व जास्त आहे ? ते दोन हिरे पण देऊन टाक ना."

ह्यावर दिनानाथने धोतरात बांधून ठेवलेले हिरे काढून त्या डांकूच्या हातात देऊन टाकले. डांकू गेल्यानंतर दिनानाथ अतिशय रागाने गोपीनाथला म्हणाला–"मित्रा, मी मनांत सुद्धा कल्पना केली नव्हती की, तु असा माझा विश्वासघात करशील !"

गोपीनाथने शांतपणे आपल्या कमरेला खोचलेली चामड्याची बंद थैली उघडली व ती दाखवत दिनानाथला म्हटले–"ह्यात तुझ्या हिऱ्यापेक्षा कितीक पटीने जास्त किमतीचे वीस हिरे आहेत. तू चार हिरे घे. मी डांकूच्या सरदाराला असे कां म्हणालो हे रहस्य तुला माहीत नाही जर कां मी तसे म्हणालो नसतो तर तुझ्या वस्त्रांबरोबर माझीही झडती त्यांनी केली असती व सारे हिरे लुबाडले असते."






सृष्टीच्या प्रारंभापूर्वी सर्व विश्व जलमय होते. पदार्थरहित शून्य असल्यामुळे सर्वत्र अंधःकार असतांना पाण्यातून एक महान ज्योति उद्भवली आणि हळूहळू ती ज्योतिर्लिंगात परिवर्तित झाली. तोच तेजपुंज परमेश्वर शिव होय. त्या ज्योतिर्लिंगाच्या अर्ध्या भागातून महाशक्ति जन्मली. त्या महाशक्तिलाच प्रकृति किंवा महामाया म्हणतात.

कालक्रमाने परमेश्वर व परमेश्वरी दोघांनी विष्णूची सृष्टी केली विष्णूच्या नाभीतून एक मोठे कमळ उदभवले. ते अनेक योजने वाढत गेले. त्या कमळातून पंचमुखी ब्रह्मदेव जन्मला. ब्रह्मदेवाबरोबरच सरस्वतीपण जन्मली.

ब्रह्मदेवाला सर्व विश्व जलमय दिसले म्हणून त्याच्या मनात, त्याचा जन्म ज्या कमळातून झाला. त्या महापद्माचा शोध लावण्याची इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां ब्रह्मदेव उर्ध्व व अधः लोकांचे भ्रमण करीत महापद्माच्या गर्भस्थानी पोचला. त्याने ओंकाराचा जप केला आणि त्यामुळे विष्णु प्रगट झाला. ब्रह्मदेवाने विष्णुला विचारले–" आपण कोण? आणि येथे येण्याचे कारण काय ?"

सृष्टी प्रारंभ करण्यासाठी मी आपल्या नाभिकमळातून तुझी सृष्टी केली माझे नाव विष्णु ! विष्णु म्हणाला.

ब्रह्मदेवाचा अहंकार जागृत झाला. तो म्हणाला–"तुझा हा गर्व तू सोड नाहीतर

१. दक्ष यज्ञ



माझ्याशी युद्धास तयार हो! मी स्वयंभू आहे या सृष्टीचा कर्ता आहे!" माझे म्हणणे मान्य कर.

ते ऐकून विष्णु ध्यानमग्न झाला. शंकर ज्वालालिंग रूप घेऊन ब्रह्मदेव व विष्णु यांच्या मध्ये प्रगट झाला. विष्णु ब्रह्मदेवाला म्हणाला–" या ज्वालालिंगाचा आदि अंत जो सांगू शकेल तोच मोठा ठरेल" ब्रह्मदेवाने ती अट मान्य केली. परंतु दोघे हार मानून आपापल्या स्थानी निघून गेले आणि शंकराचे ध्यान करू न त्यात मग्न झाले.

शंकर प्रगट होऊन ब्रह्मदेवाला म्हणाला– "तू पंच महाभूतांनी युक्त विश्वाची सृष्टी करण्यासाठी विष्णूच्या नाभीकमलातून जन्मला आहेस तू सृष्टीचा प्रारंभ कर." असे शिवाने त्याला सांगितले.

ब्रह्मदेवाने शंकराला पाहून विचारले– "तू कोण? माझ्या सारखीच तुला पांच मुखे आहेत ही कशी काय? मी सृष्टीकर्ता आहे म्हणून मला पांच मुखे आहेत ही गोष्ट सहज लक्षात येते. तुला कशी त्याचे काय कारण!"

ब्रह्मदेवाची ती गर्वोक्ती ऐकून शंकराने रूद्रावतार धारण केला. आणि आपल्या डाव्या हाताच्या करंगळीच्या नखाचा तलवारीसारखा उपयोग करून ब्रह्मदेवाचे पांच डोक्यांपैकी एक डोके छाटून टाकले. तेव्हां ब्रह्मदेवाचा गर्व परिहार झाला. त्याने कळवळत हात जोडून स्वतःच्या संरक्षणाच्या करीता प्रार्थना केली. व विनवणी केली.

शंकर शांत रूप धारण करीत ब्रह्मदेवाला म्हणाला–"ब्रह्मदेवा! सृष्टी करण्यासाठी तू आणि तुझ्या सृष्टीचे रक्षण करण्यासाठी विष्णू निर्मिले गेले आहांत. मी लय करणारा शिव रूद्र आणि ईश नावाने ओळखला जाईन. तुम्हीं ज्वालालिंगाची पार्थिव लिंग किंवा शिवलिंग या नावाने पूजा करा" असे सांगून शंकर ज्वालालिंगात विलीन झाला.

त्यानंतर ब्रह्मदेव व विष्णू वेद इत्यादि घेऊन पद्मासन घालून ध्यान लावून बसले व तोंडाने ओंकाराचा जप करू लागले. तेव्हां पाण्यावर पडून एक अंडे ब्रह्मदेवाकडे प्रवाहाबरोबर वहात आले त्यावेळी त्या अंड्यातून 'ओम' स्वर प्रस्फुटित झाला. तो स्वर ज्या मार्गाने आला होता. त्याच मार्गाने ब्रह्मदेवाने त्या अंड्यात प्रवेश केला. आत घनांधकार होता. ब्रह्मदेव तेथे आपला देह सोडून चर्तुमुख रूप घेऊन पुन्हा जन्मला. ब्रह्मदेव त्या अंड्यातून बाहेर आला. तेव्हां ते अंडे दोन भागात विभक्त झाले. त्यातला खालचा भाग पृथ्वी रूपाने व वरचा भाग आकाश रूपे बदलला. व सर्व पाणी वाळून गेले. व आकाश व पृथ्वी असे दोन वेगवेगळे भाग झाले.



ते दृश्य पाहून ब्रह्मदेवाला अतिशय अत्यानंद झाला. त्याने संपूर्ण पृथ्वीवर चराचर सृष्टीचा निर्माण करण्यास आरंभ केला. ब्रह्मदेवांनी सर्वात प्रथम सनकसनंदन इत्यादींची सृष्टी केली. त्यांच्या मनात पुढे सृष्टी चालू ठेवण्याची अजिबात इच्छा नव्हती, म्हणून ते शंकराचे ध्यान करून तपश्चर्या करू लागले. ते पाहून ब्रह्मदेवाच्या डोळ्यातून अश्रु वाहू लागले. त्याच्या डोळ्यातून जी टिपे पृथ्वीवर पडली त्या अश्रुतून तेजःपुंज शिवाचा जन्म झाला. शिवाचा जन्म झाला. शिवाचा वर्ण गौर होता. त्याच्या तेजाचा प्रकाश चर्तुदिक पसरला. तेव्हां ब्रह्मदेवाने त्याला विचारले–"कोण तू?" तुझा निर्माण कसा झाला?

शंकर म्हणाला–"मी शिव रुद्र आहे!"

तेव्हां विष्णू प्रगट होऊन म्हणाला– "हे ब्रह्मदेवा! तू सृष्टी करतोस, मी त्याचे भरण पोषण करतो. आणि सृष्टीचा लय करणारा हा परमेश्वर शिव रूपे अवतरला आहे."

त्यानंतर तिघांकरीता तिन ठिकाणे निर्माण झाली. ती अशी ब्रह्मदेवासाठी










सत्यलोक निर्माण झाले विष्णूसाठी वैकुंठाची योजना केली गेली व शिवासाठी कैलास अशी निवास स्थाने ठरली. प्रत्येकजण आपापल्या निवास स्थानी निघून गेले. तेथे जाऊन निश्चिंतपणे राहू लागले. ब्रह्मदेव सत्यलोकी गेला. आपल्या मदती साठी त्याने मरीचि, कश्यप, दक्ष, गौतम, वसिष्ठ कर्दम इत्यादिक नऊ उपब्रह्मदेवांची सृष्टी केली. त्यात दक्षाला चौसष्ट मुली झाल्या. त्यापैकी दहा कन्यां बरोबर कश्यपाने विवाह केला. आणि त्यांची अपत्ये वाढली. अदितीच्या पोटी इंद्रादिक देव जन्मले. दितीच्या पोटी दैत्य जन्मले. विनताच्या पोटी गरुड व अनूर यांनी जन्म घेतला. कद्रूच्या पोटी सर्पांनी जन्म घेतला आणि स्वसच्या पोटी यक्षादि राक्षस जन्मले. अशातऱ्हेने कश्यपांच्या बायकांना अनेक अपत्ये झाली.

शंकराच्या बरोबर विवाह करण्याच्या हेतूने महेश्वरी दक्षाच्या पोटी सती नामक कन्येच्या रूपाने जन्मली. त्यांच्या विवाह प्रसंगी ब्रह्मदेव, विष्णु इंद्रादिक देव उपस्थित होण्यासाठी आले. आणि त्यांनी शिव व सती यांचे स्तोत्रगान सुरू केले. अतिथी सत्कार करण्यासाठी नंदी व कालभैरव यांची नेमणूक करण्यात आली. ते सतीबरोबर कैलासात जाऊन सुखपूर्वक राहू लागले.

असाच आणखी काही काळ लोटला. कित्येक थोरामोठ्यांनी प्रयाग येथे मोठा यज्ञ करण्याचे ठरविले. ब्रह्मा, विष्णु व इंद्रादिक देव इतर लोकांचे निवासी सर्वांना निमंत्रण करून यज्ञारंभ करण्यात आला.

यज्ञासाठी येणाऱ्या अतिथीची रहाण्याची यथोचित व्यवस्था करण्यात आली आणि त्यांना त्यांच्या दर्जाप्रमाणे बसण्यास आसने देण्यात आली. सर्व यथास्थान बसून मग्न होऊन तन्मयतेने यज्ञ समारंभ पहात होते. त्याच वेळी दक्ष आपल्या शिष्यासह आला. सर्व उपस्थितांनी उभे राहून दक्षाचे स्वागत केले. दक्षाने चारी बाजूला नजर फिरविली. व ब्रह्मदेव व विष्णूचे सादर वंदन केले. परंतु शिव उठून उभा राहिला नाही किंवा काही विचारपूस केली नाही. त्याला त्याचा भयंकर राग आला. त्यावर दक्ष म्हणाला–"तुम्ही सर्वांनी सामोरे येऊन माझा सत्कार केलात पण शंकराने जावई असून विचार पूस सुद्धा केली नाही. जाणून बुजून माझा अपमान केला. मोठ्याचा आदर कसा करावा हे देखील त्याला कळत नाही." असे सांगून दक्ष आपल्या शिष्यासह यज्ञ मंडपातून रागावून निघून जाऊ लागला.

तेव्हां ब्रह्मदेव, विष्णु इत्यादिकांनी दक्षाला थांबवून त्याला समजावून सांगितले– "शिव हा परमेश्वराचा अवतार आहे. त्याचा तू आदर केला पाहिजेस. त्याचा निरादार किंवा निंदा करता कामा नये" परंतु दक्षाने तिकडे दुर्लक्ष केले.

तेव्हां नंदीने दक्षाला शाप दिला– "तुम्ही रुद्राचे अनुयायी वेदांपासून दूर रहाल आणि अंगाला भस्म लावून पांखडी म्हणून गणले जाल." असा रागाने शाप देत निघाला.

त्यानंतर शंकर यज्ञसमाप्तीपर्यंत तेथेच राहिला. व त्याने शिवगणासंह कैलासला प्रस्थान केले.



दक्ष आपल्या भृगु आदिक शिष्यवर्गा-बरोबर आपल्या आश्रमात परतला आणि त्याने वाजपेय नामक यज्ञ आरंभिला. त्याला शंकरावर राग होता. म्हणून त्याने त्या यज्ञात शंकराला हविभाग दिला नाही. व त्याला आमंत्रण पण पाठविले नाही.

तरी देखील यक्षाचा शंकरावरचा राग काही कमी झाला नाही. म्हणून त्याने बृहस्पतीनामक एक महायज्ञ करण्याचा संकल्प केला. आणि त्यासाठी आवश्यक सर्व यज्ञसामुग्री एकत्र करून देव न ऋषिंना निमंत्रण केले. अतिथि सत्काराची जबाब-दारी त्याने आपल्या शिष्य मंडळीवर व नातेवाईकांवर टाकली. या यज्ञातही



त्याने शंकराला निमंत्रण पाठविले नाही. अगर त्याला भाग दिला नाही. व बोलावले सुद्धा नाही.

या यज्ञाला विश्वदेव, मरुत, पितृगण गंधर्व अप्सरा, सिद्ध विद्याधर, किन्नर, यक्ष आणि कश्यप अगस्त्य, अत्रि, भृगु मरीची, नारद, पराशर इत्यादि मुनी उपस्थित होते. ब्रह्मदेव व विष्णु शिवाय इतर सर्व देव दक्षाच्या भीतीने उपस्थित होते. त्या सर्वांच्या उतरण्याची व्यवस्था करण्याचे काम दक्षाने विश्वकर्म्याला सांगितले होते.

दक्षाने यज्ञदीक्षा घेऊन यज्ञशालेत पत्नीसह प्रवेश केला. सर्व सभासदांना नमस्कार केला. निमंत्रण न मिळाल्यामुळे शंकर उपस्थित नव्हता. ब्रह्मदेव व विष्णु दोघांनी बोलावले तरी तो आला नाही. अनेक देव आणि मोठे मोठे ऋषि सभेत उपस्थित होते. दधीचि, भृगु मरीचि इत्यादि शिवभक्त पण उपस्थित होते. त्यांनी सभेत चहूंकडे एकदा नजर फिरवून दक्षाला विचारले–"दक्षा तू शंकराला निमंत्रण पाठविले नव्हतेस का? ते येथे उपस्थित नसण्याचे कारण काय?"

दक्ष म्हणाला–"शंकर कर्मभ्रष्ट झाला आहे. म्हणून मी त्याला निमंत्रण पाठविले नाही. तो अपवित्र, कपालधारी, स्मशान-वासी व प्रेतांचा प्रभु आहे."

शंकराची निंदा ऐकून दधीचि म्हणाला–"दक्षा! तुझाहा यज्ञ यशस्वी होणार नाही. शंकराशिवाय तू हा यज्ञ आरंभ करून स्वत: संकटाला आव्हान केले आहेस." दधीचिच्या तोंडचे ते शब्द ऐकून वामदेव मरीचि गौतम पिलाह वगैरे अनेक ऋषी यज्ञशालेतून निघून गेले ऋषी निघालेले पाहून दक्ष म्हणाला–"हे लोक मूर्ख व पाखंडी आहेत म्हणून इतरांनी त्यांच्याकडे लक्ष न देता माझा यज्ञ पुरा होईपर्यंत उपस्थित रहावे."

सती कैलास पर्वतावर आपल्या पतीच्या सेवेला हजर होती. एकदा ती

आपल्या सखींबरोबर विहार करीत असतांना तिला विमाने दिसली. सतीने ती विमाने कोठे चालली आहेत. याची चवकशी करून यायला आपल्या सखींना सांगितले सखींनी चवकशी करून, विमाने दक्षाने आरंभिलेल्या यज्ञासाठी जात असलेल्या देवादिकांची आहेत असे येऊन सांगितले.

आपल्या पित्याने आरंभिलेल्या यज्ञप्रसंगी आपण देखील पतीसह जावे असे सतीला वाटले. ती शंकराजवळ जाऊन म्हणाली– "माझे वडील यज्ञ करीत आहेत. आपण देखील रुद्रगणांना बरोबर घेऊन यज्ञाला जाऊ या."

ते ऐकून शंकर म्हणाला–"सती! तुझे वडील माझ्यावर रागावले आहेत. त्यांनी आपल्याला निमंत्रण पाठविले नाही. आगंतुकासारखे जाण्यात शहाणपण नाही. आपण गेलो तर आपला अपमान होईल आणि परिणाम सुखाचा होणार नाही.

"तर मग आपण जाऊ नये, मी एकटीच जाते. माझे वडील माझा अपमान कां करतील? मी त्यांना समजावून सांगून आपल्याला निमंत्रण पाठविन. नंदी वगैरेना माझ्या बरोबर पाठवूनन मला वडिलांकडे पोंचविण्याची व्यवस्था करावी."

"सती! तुझ्या शिवाय मला मुळीच करमणार नाही. तु मला एकटा सोडून पित्याच्या यज्ञाला जात आहेस. तुझा नक्कीच अपमान होणार म्हणून जरां विचार कर" शंकराने पुन्हां सतीची समजूत घालण्याचा प्रयत्न करून पाहिला.

परंतु शंकराने केलेली सूचना सतीच्या लक्षात आली नाही. तिचे आईवडील तिचा अपमान करतील ते तिला खरेच वाटेना.

शंकराने विचार केला. व्हायचे असेल ते होईलच. त्याने रुद्रगणाला बरोबर सोबत पाठवून सतीला दक्षयज्ञ पहावयास पाठविले.





# मंत्र-सिद्धि

महादेव शास्त्री नांवाचे एक पंडीत पाठशाळा चालवत होते. त्यांच्या त्या पाठशाळेत वृषभ नावाचा एक विद्यार्थी होता. त्याचा स्वभाव अत्यंत उतावळा होता. त्याच्या मनांत एक दिवस असा विचार घोळू लागला की, गुरुकुलातील सर्व विद्यार्थ्यांच्या पेक्षां एका दिवसांच्या आत सर्व शास्त्रांचे ज्ञान संपादन करून येथून निघुन जावे.

गुरूंच्या घरातील माळयावर बरेच जुने पुराणे ताडपत्राचे ग्रंथ पडलेले होते. सर्वांना वाटे की, ते सर्व ग्रंथ मंत्रशास्त्राच्या संबधीच असावेत वृषभच्या मनांत कित्येक वेळा ते ग्रंथ पहाण्याची उत्सुकता व कुतुहल निर्माण झाले होते. परंतु गुरूंनीं त्याला हात लावण्यास मनाई केली होती. त्यामुळे कोणत्याही विद्यार्थीनी ते ग्रंथ पहाण्याचा प्रयत्न केला नाही. परंतु वृषभच्या मनांत ते ग्रंथ वाचण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली.

एकदा महादेवशास्त्री काही कामा करीता राजधानीला जाणार होते. त्यांनी आपण राजधानीहून आठवड्याने परत येण्याबद्दल शिष्यांना सांगितले. व ते राजधानीला निघून गेले.

त्या दिवशी रात्री जेव्हां सर्व विद्यार्थी गाढ निद्रेत होते. ते पाहून वृषभ उठला व घरातील माळयावर चढला. व त्याने गुपचुप एक ताडपत्रीचा ग्रंथ उघडून पाहीला. त्यात एक मंत्र लिहीला होता. तो त्याने वाचला की, जो मनुष्य ह्या मंत्राचा जप करेल त्याला आपल्या इच्छानुरूप कोणतेही रूप धारण करता येईल. वृषभने दोन तीन वेळा वाचून तो मंत्र पाठ केला. व अतिशय उत्साहाने माळयावरून खाली आला.

हर्षद बर्वे



वृषभला मनांतल्या मनात इतर विद्यार्थ्यांपेक्षा आपण खूप महाज्ञानी झालो असे वाटू लागले. व त्याचा आनंद गगनात मावेनासा झाला.

दुसऱ्या दिवशी सर्व शिष्य पहाटे उठून समिधा व फुलेफळे गोळा करण्याकरीता जंगलात गेले. तेथे गेल्यावर वृषभ मनावर ताबा ठेवू शकला नाही. त्याने जोरजोरात ओरडून सर्व शिष्यांना एकत्र गोळा केले व त्या सर्वांसमोर आपल्याला कसा एक अद्भुत मंत्र येतो ते सांगून त्याचे वर्णन केले. परंतु वृषभच्या बोलण्यावर कोणी विश्वास ठेवला नाही. व त्याची सर्वजण टिंगल व थट्टा करू लागले.

त्यामुळे वृषभला अतिशय राग आला तो घमेंडीत म्हणाला "मी पाहीजे तर हा जप म्हणून कोणतेही रूप घेऊ शकतो."

एका शिष्याने चेष्टेने हसत म्हटले– "मगतर तुझे नाव वृषभ आहे ना! तुझ्या नावाप्रमाणे बैलाचे रूप घे पाहू?"

तेव्हां मागचापुढचा विचार न करता उतावीळपणे त्याने तो मंत्र म्हटला. व बैलाचे रूप धारण केले. ते पाहून सर्व शिष्य विस्मयाने आश्चर्यचकित होऊन पाहू लागले.

तेवढ्यात जंगलात लांबवर वाघाची गर्जना ऐकू आली व एक जनावर त्यांच्या बाजूने पळत येताना दिसले. ते पाहून सर्व शिष्य घाबरून जवळपासच्या झाडांवर चढून बसले. परंतु बैलाचे रूप धारण केलेल्या वृषभला मात्र चढता आले नाही. त्याने केलेली चूक त्याला समजली. त्याला फक्त मंत्र म्हणून रूप घेता येत होते ते नाहीसे करण्याचा मंत्र मात्र अवगत नव्हता. त्यामुळे त्याला पुन्हां मानव रूप घेता आले नाही.

तो आता काय करावे असा विचार करीत असताच त्याच्या पाठीमागून वाघ आला ते पाहून तो जोरजोरात धापा टाकत पळू लागला. व कसाबसा जंगल पार करून गावात जाऊन पोहोचला. तोपर्यंत जेवणाची वेळ झाली होती. खूप दूरवर पळत आल्यामुळे त्याला सडकून भूक लागली होती. त्याला समजून चुकले की, बैलाच्या रूपात असल्यामुळे कोणताही माणुस आपल्याला खाणे देणार नाही. मग आता आपल्या भुकेचे करावयाचे काय? हा प्रश्न त्याच्या समोर पडला.

शेवटी अनिच्छेने तो शेजारी असलेल्या एका ज्वारीच्या शेतात घुसला परंतु त्या शेताच्या राखणदाराने तो घुसताच त्याला पाहीले व काठी घेऊन त्याला मारायला धावला व एक दोन काठ्या त्याला पाठीवर बसल्याच. त्या वेदनेने तो विव्हळत गावांत पळाला.

वृषभच्या पाठीमागचा त्रास तेवढ्यानेच भागला नाही. तो गावात गल्लोगल्ली भटकू लागला. एका ठिकाणी एक प्रचंड सांड त्याला दिसला. तो पहाताच भीतीने तो पळत सुटला सांड त्याचा पाठलाग करू लागला. व हुल्ला करून आपले शिंग तो मारणार तेवढ्यात हत्तीचे बळ आणून वृषभ धूम पळाला व त्याच्या नजरेआड झाला.

त्यानंतर थोड्यावेळाने एका झाडाच्या सावलीत तो दम घेत उभा राहीला. तेव्हां भैरवनाथ नावाच्या एका गुरेपाळणाऱ्याने त्याला पाहिले. तो बैल पहाताच त्याला कळले की, हा बैल आपल्या गावचा नाही. तो कुठून तरी वाट चुकून आलेला दिसतो.

भैरवनाथने हळूहळू वृषभच्या जवळ जाऊन त्याला धरेल व तो त्याला आपल्या









कोंडवाड्यात घेऊन आला. व तेथे एका खुंटाला त्याने त्याला बांधले.

तो दिवसभर भुकेने कासावीस झाला होता. शेवटी नाईलाजाने त्याला गुरांचा चाराच चघळावा लागला. तेव्हां त्याला बैलांचे जीवन म्हणजे केवढा नरकवास आहे हे जाणवले.

दुसऱ्या दिवशी भैरवनाथने आपल्या दुसऱ्या बैलाबरोबर त्याला गाडीला जुंपले परंतु वृषभला दुसऱ्या बैलांबरोबर चालणे कठीण होऊ लागले. वृषभने नामुष्कीलीने चार-पाच दिवस आपल्याला सवय लावण्याचा प्रयत्न केला. परंतु व्यर्थ शेवटी चिडून भैरवने एका नंदीबैलावाल्याला विकून टाकण्याचा विचार केला.

नंदीबैलवाला वृषभला पाहून आनंदीत झाला. व त्याला म्हणाला उद्या येऊन पैसे देऊन त्याच्या नाकात वेसण बांधून घेऊन जाईन.

नाकात दोरी शिवण्याची गोष्ट ऐकताच वृषभच्या छातीत धडकी भरली. कारण त्याने प्रत्यक्षात ती क्रिया करताना पाहिले होते. व त्यावेळेस बैल कसा वेदनेने तडफडतो ते ही पाहिले होते.

त्याच रात्री त्यांनी सर्व बळ एकवटून गळयातील दोरी तोडली. व पळत पळत सुर्योदयापूर्वी गुरुकुलात येऊन पोहोचला.

त्या वेळेपर्यंत त्याचे गुरू राजधानी मधुन परत आलेले होते. व शिष्यांनी त्यांना घडलेला सारा वृत्तांत सांगितला होता. बैल रूपात डोळयांतून अखंड अश्रु-धारा वहात असलेल्या वृषभला समोर आलेला पाहून गुरूंना त्याची फार किव आली. त्यांनी कांही मंत्र जपून त्याला पुन्हां मानवरूपात आणले.

वृषभने गद्‌गद्‌लेल्या स्वरात रडत सर्व कठीण यातनांचा उल्लेख त्याने आपल्या गुरुंच्या समोर सविस्तर केला.

त्यानंतर पुन्हा चुकूनही त्यांनी मंत्र विद्येची गोष्ट काढली नाही व घाई-गडबड न करता स्वता:च्या मनावर ताबा ठेऊन संयम ही गोष्ट शिकली.





# मोर

पिसारा फुलवून उभा असलेला मोर अवर्णनीय दिसतो. निळया हिरव्या, पिवळया अशा रंगाचे मिश्रण असलेला पिसाचा चमकणारा मोर नर आपले पंख फडफडवून लोकांना आनंद देतो. परंतु मोराचा आवाज मात्र अत्यंत कठोर असतो.

प्राचिनकाळा पासून आपल्या देशातच नाही तर ग्रीक, चीन इत्यादि देशातून सुद्धा मोराच्या पंखाचे सजावटीच्या कामाकरीता उपयोग करतात प्राचीन ग्रीक लोकांचा असा विश्वास आहे की, आगसी राजकुमारीच्या रक्षणाकरीता हीरादेवीने एक हजार डोळे असलेल्या मोराची निर्मिती केली होती. त्यामुळे ते लोक मोराला हीरापक्षी म्हणुनच संबोधतात. चीनचा राजा अधिकाऱ्याचा सत्कारासाठी मोराची पिसे असलेल्या पंखा भेट म्हणून देतो.

सोने आणि रत्नमाणके बसवलेले मोंगल कालीन मयुरासन तर जगप्रसिद्धच आहे.

युरोपात अखंड बागांची शोभा वाढविण्याकरीता मोर पाळत आलेले आहेत. तरीही मोर भारतात व श्रीलंका मध्येच जास्त उत्पन्न होतात.

पृथ्वीवर लोंबणाऱ्याच्या झाडांच्या फांद्यावर मोर आपली घरही बनवतात. मोरणी एका वेळेस सहा अंडी घालते. दोन वर्षापर्यंत मोर व मोरणी मध्ये तसा फरक दिसुन येत नाही. नंतर मोराला सुंदर पिसे येऊ लागतात. फांद्यावर आपले पंख पसरून उभा राहिलेला मोर उडून जाताना फारच सुंदर दिसतो. मोर आपला राष्ट्रीय पक्षी आहे.





# दोन शेजारी

सिताराम व गंगाराम हे एकमेकांच्या शेजारी रहात होते. कोणतीही गोष्ट घडली तरी घाबरून जाणे ही सितारामची सवय होती. परंतु कुऱ्हाड कोसळली तरी शांत रहाणे गंगारामच्या स्वभावात होते.

एके दिवशी सितारामच्या घरातली चार चांदीची नाणी हरविली. त्याने सारे घर धुंडाळले परंतु ती मिळाली नाहीत. शेवटी त्याने ती गोष्ट आपल्या बायकोला सांगितली व तिला विचारले– "काय ग, तू तर ते पैसे उचलले नाहीस नां ?"

"तुमच्या सांगण्याशिवाय मी एका पैशाला सुद्धा हात लावला आहे कां ?" बायको म्हणाली.

त्यानंतर त्या दोघां नवराबायकोंनी संपूर्ण घरात शोधाशोध करून पाहीली. सितारामची बायको म्हणाली–"हे पहा, तुम्ही तर पैसे नेहमी त्या फडताळात ठेवता. ही काही चांगली सवय नाही. आपली मोलकरीण नेहमी इकडे तिकडे फिरत असते तिलासामान उचलण्याची अत्यंत वाईट सवय आहे. स्वयंपाक घरात काम करता करता कुठे तांदुळ, डाळ नाहीतर चिंच आपल्या लुगड्याच्या आत लपवून घरी नेत असते.

"त्या वेळेस तू काय केलेस." त्याने आपल्या बायकोला विचारले.

"ती भयंकर खोटारडी आहे. मी तिला विचारले काय ग, तांदुळ बांधून कशाला घेऊन चालली आहेस ! तर तीन उलट झटक्यात काय सांगितले माहीत आहे, " अहो माई, तुम्हीच तर मला घेऊन जा म्हणालात नां ! नको म्हणत असलात तर आता ठेवून टाकते !"



"मग काय तुझीच तर फूस तिला तुच तिला चोरी करण्याचा उपाय शोधून दिलास. आज पैसे चोरीला गेले. उद्या दुसरे काहीतरी जाईल. पण तू ही गोष्ट मला पहिल्यादांच कां नाही सांगितलीस." सिताराम रागावू लागला.

त्या दोघांचे भांडण पाहून मुलगा त्या दोघांच्या मध्ये पडत म्हणाला—"बाबा आता मोलकरणीला दोष देण्यात काय फायदा! अशा गोष्टीपासून आपण प्रथमच सावध राहिले पाहिजे."

हे ऐकताच वडिलांचा क्रोध अनावर झाला. ते जोरजोरात ओरडून त्याला रागावू लागले. ते त्याचे किंचाळून बोलणे ऐकून आजुबाजूचे शेजारीपाजारी गोळा झाले त्याचे म्हणणे ऐकुन काही लोकांनी त्याला सांगितले की, तुझीच चुक आहे.

ह्यामुळे सितारामने दोन दिवस घरात काही खाल्ले नाही. ही गोष्ट सितारामच्या बायकोने आपल्या आजुबाजुच्या बायकांना काळजी युक्त स्वरात सांगितली. काही दिवसाने ही गोष्ट सर्वजण विसरून गेले.

ही गोष्ट गावांत घडली त्या दिवशी गंगाराम गावात नव्हता. परंतु त्याची बायको गावातचहोती. गंगाराम आठ दिवस दुसरीकडे राहून तिसऱ्या दिवशी गावात आला. त्याच्या दुसऱ्या दिवशीच त्याच्या घरातील दहा चांदीची नाणी चोरीस गेली. त्यानी आपल्या बायकोला पैसे चोरीस गेल्याचे सांगत विचारले— "काय ग, तू तर पैसे घेतले नाहीस नां?"

बायकोने आपण घेतले नसल्याचे सांगितले. मुलांना विचारताच त्यानेही तसेच उत्तर दिले. सितारामच्या घरची मोलकरीणच गंगारामच्या घरात धुण्या-भांड्याचे काम करीत होती.

गंगारामच्या बायकोला सितारामच्या घरात झालेल्या चोरीची आठवण आली ती म्हणाली—"हे काम मोलकरणीचेच दिसते आहे. आठ दिवसांपूर्वी सितारामच्या घरी सुद्धा तिनेच चोरी केली होती."



"आपल्या घरात मोलकरणीला चोरी करतांना तू केव्हांतरी पाहीले आहेस?"

"नाही!" ती म्हणाली.

"ऐक, जे लोक नोकरांबरोबर दयाप्रेम दाखवतात व संकटाच्या वेळी त्यांना मदत करतात. अशा लोकांच्या घरांत कधीही चोरी होत नाही. जास्त काम करून घेऊन जी माणसे कमी पगार देतात. त्यांच्या घरातील काम करणारी माणसे काहीशी जिद्दी स्वभावाची असतात.

"पण असा विचार करून आपण काय गप्प बसायचे कां? कामवालीला विचारून तिला थोडा धाकदपशा दाखवून तिच्या तोंडून खरे काय ते वदवले पाहिजे." गंगारामच्या बायकोने सांगितले.

त्यावर गंगाराम चिडून म्हणाला— "हे पहा, आजपर्यंत आपल्या घरी केव्हांही चोरी झाली नाही. एखादेवेळी माझ्याच चुकीमुळे तसे झाले असेल ह्यापुढे आपण निट सावधतेने राहू म्हणजे झाले.

"मग कामवालीला बोलावून विचारण्यात चूक काय? पत्नीने विचारले."

"जर खरोखरी तिने पैसे घेतले नसले तर त्याचा तिला खूप राग येईल. ह्यानंतर ती चोरी करण्यास सुरूवात करेल ईमानदार राहूनही खोटाच संशय घेऊ लागलो. तर तिचे मन म्हणू लागेल इतके चांगुलपणे राहूनही खोटेपणाच पदरी पडत असेल तर चोरीच करण्यास काय हरकत आहे." गंगाराम म्हणाला.



गंगारामच्या बायकोला हे त्याचे सांगणे तितकेसे रूचले नाही. तिने चिडत म्हटले–"तुमचा स्वभावच असला आहे. दहा चांदीचे रूपये चोरीला गेले तरी तुम्हांला त्याची जरा देखिल फिकीर वाटत नाही. तिथे त्याची चार नाणी चोरीस गेली तर त्याने आरडाओरडा करून सारा गाव जमवला होता.

"अच्छा, अशी गोष्ट आहे काय? तर चल, सितारामच्या घरी काय झाले त्याचा उलगडा तरी लागेल? गंगाराम बायकोला घेऊन सितारामच्या घरी आला."

त्यावेळी सिताराम घरीच होता. गंगारामला पहाताच त्याने त्याचे हसून स्वागत करीत म्हटले–"ये गंगाराम, कसे काय येणे केले?

"तसे काही नाही! मी ऐकले तुझ्या घरची चार चांदीची नाणी चोरीस गेली. म्हणून तुम्ही ओरडाआरडा करून चार माणसे जमा केलीत. काय घडले! गंगाराम म्हणाला.

सीताराम खुदुखुदु हसत म्हणाला–"हे कारण काय? असेच समज त्या दिवशी माझ्या बायकोने व मुलाने माझ्याकडून खूप रागावून घेतले. त्यामुळे सर्व गाव आमच्या भोवताली गोळा झाला.

"मग काय हरवलेले पैसे मिळाले का? गंगारामने विचारले." "नाही, पण हे सांग तू मला हे का विचारतोस!"

"जर पैसे मिळाले असतिल तर मला सांग. म्हणजे मी पण तुझ्यासारखा ओरडाआरडा करून सारा गांव माझ्या-भोवती जमा करेन? आज माझे पैसे पण चोरीला गेले आहेत."

त्या दोन्ही शेजाऱ्याचे संभाषण ऐकून गंगारामच्या बायकोला एक गोष्ट उमजली व तिला सत्याचा शोध लागला. की, कोणतीही गोष्ट आरडाओरडा किंवा चिडून सोडवली जात नाही. परंतु ती गोष्ट शांततेने विचारपूर्वक सोडवली जाते. ही गोष्ट घडल्यानंतर तिच्या घरी पुन्हां कधीही चोरी झाली नाही.






[ ४ ]

[ सुवाहूने भिकाऱ्याचे सोंग घेतले. व तो सर्पकेतुच्या शिपायांच्या तावडीतून कसाबसा सुटला. सर्पकेतुच्या सैनिकांनी गुप्तकट करून वीरपुरच्या नगराचे दार उघडले व ते आत घुसले. पुढे येणाऱ्या संकटाची सुचना देण्याकरीता सुवाहु आपला मालक चन्द्रवर्मा याच्या महालाच्या बाजूने आत घुसला...पुढे ]

सुबाहु थोडावेळा पुरता तरी संकटातून वाचला. परंतु काहींना त्याच्या पावलाचा आवाज ऐकू आला व ते त्याचा पाठलाग करीत पुढे धावू लागले. तेवढ्या अवधीत सुबाहुला पाठीमागे वळून पहाण्यास मिळाले नाही. तो भराभर ढांगा टाकीत पुढे चालू लागला. त्याच्या डोक्यात आता एकच विचार होता की, कसेबसे राजमहालात पोहोचून राजाला खबर देणे. व त्याला येणाऱ्या संकटाची सुचना करणे. त्याच्यापाठीमागुन गर्जना व हांहांकार ऐकू येत होता. तेवढ्यात सुबाहु राज-महालाच्या समोरच्या जलकुंडासमोर येऊन पोहोचला व ते पार करीत दारा-पाशी येत त्याने द्वारपालांना जोरात ओरडून म्हटले–"मी सुबाहु आहे! मला आत जाऊ दे. माझा पाठलाग करणारे सर्पकेतुचे शिपायी आहेत. त्यांना तेथेच



आडवा व आपल्या शिपायांना सावध रहाण्याचा इशारा करा." समोर येतिल तसे त्यांना मारुन टाका. असे म्हणत दोन ढांगेत तो राजमहालात घुसला. व चोहोबाजूला निरखून पाहू लागला.

तेवढ्यात पाठीमागुन येणाऱ्या सर्पकेतुच्या सैनिकांवर द्वाररक्षकानी हल्ला केला. व त्यांच्यात हाणामारी सुरू झाली.

सुबाहु राजमहालाच्या पायऱ्या घाई घाईने चढत चंद्रवर्माच्या नावे मोठमोठ्याने ओरडत आत शिरत म्हणाला–"युवराज, जागे व्हा. आपल्या समोर भयंकर कठीण समस्या उभी आहे. सर्पकेतुचे सैनिक नगरात घुसले आहेत. व चोहोबाजूने हल्ला करीत आपल्या नागरीकांना मारीत सुटले आहेत व जाळपोळ करीत आहेत. नगराची नासधुस चाललेली आहे.

सुबाहुचा आरडाओरडा ऐकताच चंद्रवर्मा झोपेतून खाड्कन् जागा झाला. व अंतपुरातुन धावत बाहेर आला. त्याला समोर राजमार्गावर बराच गडबड गोंधळ चालू असलेला दिसला. तेवढ्यात धावत सुबाहु तेथे येऊन पोहचला व धापा टाकीत त्याने घडलेला वृत्तांत चंद्रवर्माला थोडक्यात सांगितला. चंद्रवर्माला ते ऐकून काही सुचेनासे झाले.

चन्द्रवर्मा क्षणभर विचल स्थितीत उभा राहिला. तेवढ्यात राजमहालाच्या बाजुच्या दोन्ही इमारतींना आगी लावण्यात आल्या होत्या. व त्याच्या ज्वाळा वरवर येत होत्या. त्या सोबत घोड्यांचे खिंकाळणे सैनिकांचा कोलाहल, माणसांच्या आर्तनादाने सारे आसमंत दुमदुमत होते. परिस्थिती भयंकर होत चालली होती.

तेव्हां चन्द्रवर्माने सुबाहुकडे वळत– म्हटले–"माझे वडील कुठे आहेत? त्यांच्या बरोबर तुम्ही यशोवर्द्धन राजाकडे गेला होतात ना?" ते कुठे दिसत नाहीत? ते परत आले नाहीत कां? ते परत न येण्याचे कारण काय? असे एकापाठोपाठ प्रश्न चंद्रवर्माने सुबाहुला विचारले.





हे प्रश्न ऐकताच सुबाहु थरथरू लागला. त्याने बोलाव म्हणून खुप प्रयत्न केला. पण लगेच काय घडले ते सांगू शकला नाही. त्याच्या डोक्यात तेवढ्यात प्रकाश पडला ही गोष्ट ह्याला इतक्यात न समजलेली बरी. प्रथम सर्पकेतुच्या सैनिकांचा नायनाट केला पाहिजे. नंतर शांततेने सर्व समाचार चंद्रवर्माला सांगता येईल. तो पर्यंत ही सर्व गोष्ट त्याच्यापासून गुप्त ठेवलेलीच बरी.

अशा विचाराने सुबाहु चंद्रवर्माला म्हणाला–"युवराज, आपले वडील वीरपुरच्या रस्त्यावरील वाटेत थोडे विश्रांतीसाठी थांबले आहेत. आता आपल्या वरील संकटाचा प्रथम विचार करा. सर्पकेतुचे सैनिक नगरात घुसुन सर्व घरादारांना आगी लावीत आहेत ते कोणत्याही क्षणी राजमहालात प्रवेश करण्याची शक्यता आहे."

तेवढ्यात राजमहालाच्या पायऱ्यांवर गडबड चाललेली ऐकू येऊ लागली. सुबाहुला मनातून वाटले की, ते शत्रुचे सैनिकच बहुतेक असावेत तो एका क्षणार्धात राजमहालात घुसला व तेथे भिंतीवर लटकलेल्या दोन तलवारी घेऊन बाहेर आला. व एक चन्द्रवर्माच्या हातात दिली. व त्याला लढायला स्फुर्ती दिली.

त्याचक्षणी पायऱ्यावरून जोरजोरात आवाज ऐकू येऊ लागला. "युवराज! युवराज! तो आवाज त्यांनी ओळखला व चन्द्रवर्मा मोठ्याने किंचाळत म्हणाला–"कोण? सेनापति?"

ते ऐकताच वीरपुरचा सेनापती धीरमल्ल सरळ चंद्रवर्माच्या जवळ धावत येत म्हणाला–होय! मीच सेनापती धीरमल्ल!

"युवराज, सर्व शहर अत्यंत संकटात सापडले आहे. परिस्थिती खूप चिघळली मला समजत नाही की, यशोवर्द्धनने कां आपल्या बरोबर दुष्मनी केली? त्याच्याकडून पाठवलेले सर्व सैनिक नगरात घुसून जिकडे तिकडे आगी लावत हिंडत फिरत











आहेत. नगरातीलही अनेक लोक त्यांना जाऊन मिळाले आहेत. व ते त्यांना मदत करू लागले आहेत." धीरमल्लने उत्तर दिले.

यशोवर्धनकडून पाठविलेले हे सैनिक आहेत हे ऐकताच चंद्रवर्मा उभा थरथरू लागला व तो काही म्हणणार...सेनापति ? तेवढ्यात सुबाहु म्हणाला–"युवराज, हे सैनिक यशोवर्धन कडून पाठविले गेलेले नाहीत. नगरात प्रवेश मिळविण्याकरीता व आपल्याला धोका देण्याकरीता सर्पकेतूने रचलेले हे कुटील कारस्थान आहे! त्याच्या बरोबर मी ह्या असल्या फाटक्या तुटक्या कपड्यात सरहद्दीपासुन इथपर्यंत आलो. आहे. नागरीकांच्या पेहरावातील असलेली माणसे आपल्या शहरातील नाहीत. आपल्या राज्याच्या सीमेपारचे ते लोक आहेत. त्यांना गांव लुटण्याच्या आशेने येथपर्यंत आणले गेले आहे. त्यामुळे शेजारगावचे लोक आशेने नासधुस करीत आहेत.

हे ऐकताच धीरमल्ल किंकर्तव्य विमूढ झाला. नंतर चंद्रवर्मा कडे वळत म्हणाला–"युवराज, सुबाहु म्हणतो ते खरे आहे! तो अशा प्रकारच्या युक्ती करण्यात प्रवीण आहे. त्याच्याकडून महिष्मती नगरात गेलेल्या आपल्या राजाला धोका होण्याचा पण संभव आहे. मला काहीतरी ह्यात गडबड असावी असे वाटते.

"सेनापती, आपण प्रथम हा विचार सोडून पुढे चालत आलेला प्रश्न सोडवला पाहिजे की, हे संकट कसे निस्तरायचे प्रथम आपल्या सर्व सैनिकांना एकत्र करून शत्रुसैन्याला नगरातून हाकलून लावले पाहिजे त्या करीता काहीतरी युक्ति योजली पाहीजे. त्याचा उपाय काय?" सुबाहुने विचारले.

चंद्रवर्माने सुद्धा त्याच्या म्हणण्याला होकार देत मोठ्या उत्सुकतेने सेनापतीला विचारले–"सेनापती, राजमहालाच्या सुरक्षीतेकरता योग्य तो प्रबंध केला पाहिजे. त्या करीता तुम्ही काय करणार?" आम्हांला थोडी कल्पना तरी द्या.





चंद्रवर्माला उत्तर देत धीरमल्ल म्हणाला–"युवराज, काही सशस्त्र सैनिक राजा यशोवर्धनचा जयजयकार करीत राजमहालात घुसत आहेत. परंतु त्याच्याशी सामना करून आपल्या सैनिकांना त्यांनी धारातिर्थी पाडले आहे. सुबाहू कडून आपल्याला ते सैनिक आपले नाहीत परंतु सर्पकेतुचे आहेत हे प्रथम सांगून माहीत झाले. हे ठिक झाले. आता त्यांचा सूड आपण घेतला पाहिजे. त्याचा कावेबाजपणा आपल्याला आधीच समजला

तेव्हां आपल्या सर्व सैनिकांना एकत्र करा. घोड्यांना राजमहालाच्या पहाऱ्यावर ठेवा. बाकीच्यांना घेऊन तुम्ही नगरांत जा व सर्पकेतुच्या सैनिकांचा वध करा. एकाही शत्रू सैनिकाला ठेवू नका. चंद्रवर्माने सेनापतीला आदेश देत म्हटले.

"युवराज, मी सारी तयारी आधीच करून ठेवली आहे. तेथे यशोवर्धनच्या जयजयकारामुळे मी विकल झालो. व धावत आपल्यापाशी आलो. आपल्याला ह्या समाचार सांगण्या करीता." सेनापती धीरमल्ल म्हणाला.

तोपर्यंत नगरात जिकडे तिकडे ज्वाला भडकतांना दिसत होत्या. नगरात चोहीकडून कर्णभेदी किंकाळ्या, गर्जना, आर्तनाद ऐकू येत होते. चंद्रवर्माने किल्ल्याच्या तटावर उभे राहून नगराचे ते भयानक दृष्य पाहिले तो व्याकुळ झाला. नंतर पायऱ्या उतरून खाली राजमहालात समोर आला. तेथे शंभर सैनिक ओळीने उभे असलेले त्याला दिसले. काही घोडेस्वार हातात मोठे भाले घेऊन लढायला सज्ज होते. चंद्रवर्मा ते पाहून आश्चर्यचकित झाला. त्याला ते पाहून अत्यंत धीर आला.

चंद्रवर्माने त्यातील पन्नासजण व काही घोडेस्वार राजमहालाच्या रक्षणाकरीता नियुक्त केले. बाकीचे दोन गट करून एकाला धीरमल्लच्या नेतृत्वाखाली दिले व धीरमल्लला म्हणाला–"सेनापती, मी नगराचे द्वार पार करून पूर्वदिशेला जाईन




तुम्ही पश्चिमेकडे वळून जा. आपण दोन्ही बाजूने घेरा घालून शत्रु सैनिकांना पाठीमागे हटवत उत्तरेच्या दाराकडे खेचून आणू. त्यातुन परमेश्वराची इच्छा जसे घडले तसे आपण आपला विचार योजून शत्रुला सामना करा. त्याहुन मला काही उपाय सापडत नाही.

"जशी आज्ञा, युवराज! तुम्ही कृपा करून अति उत्साहाने संकटात सापडू नका. ह्या अंधारात शत्रु सैन्यांचा उलगडा होणे कठीण. तरी सावधगीरीने रहा." धीरमल्लने युवराजाला सांगितले.

नंतर दोन्ही सैन्याच्या तुकड्या "महाराजा सूर्यवर्माचा जय असो." असे म्हणत राजमहालातून नगराच्याकडे निघाल्या. तो पर्यंत आकाशात शुक्राचा तारा उगवून टिमटिमत होता. मशालीच्या उजेडात सुबाहु जळती घरे पाहून चंद्रवर्माजवळ येत म्हणाला–"युवराज! सर्पकेतुने आपली काही षड्यंत्र सफल केली आहेत. त्याच्या सैनिकांमध्ये सुशिक्षित सैनिक खूपच कमी आहेत. बरेच जण लुटमार करण्याच्या हेतूने आलेले ग्रामवासी आहेत. आपण त्यातील निवडक लोकच घेऊन त्यांना मारले तर बाकीचे घाबरून नगर सोडून गावाकडे धूम ठोकतील. म्हणजे उरलेल्या लोकांची आपल्याला युक्तिने लढा देणे कठीण जाणार नाही. तुमचा काय विचार आहे?"

चंद्रवर्माला त्याचे सांगणे बरोबर वाटले त्याने आपल्या सैनिकांना सावध केले व नंतर इकडे तिकडे पळत असलेल्या लोकांच्यावर तुटून पडला. दुसऱ्या क्षणी कैक लोकांच्या पाठीत घोडेस्वारांनी भाले खुपसले. तेवढ्यात सूर्यवर्माचे सैनिक आले. सूर्यवर्माचे सैनिक आले असा आरडा ओरडा करीत. ते सर्व ग्रामवासी लोक सैरावैरा पळू लागले. सर्व नगरात तोच ध्वनी उमटू लागला. "काय म्हणालास? सूर्यवर्माचे सैनिक? कुठे आहेत? असे बोलत पळणाऱ्या घोडेस्वाराच्या घोड्यांचा टापांचा आवाज





जवळ ऐकू येऊ लागला. ते पाठलाग करीत मागे येऊ लागले.

शत्रु सैनिकांचा वध करण्याची ही चांगली संधी चंद्रवर्माला मिळाली. त्याने ताबडतोब आपल्या अर्ध्या सैनिकांना एका रस्त्यावर बाजूला ओळीने उभे केले. दुसऱ्या बाजूला स्वतः उभा राहिला. तिकडे राजपथावर चाललेली मारामारी संपवून शत्रु सैनिक तेथूनच आत घिरतील मग त्यांना एक एक करून मारणे सोपे जाईल. असा चंद्रवर्माने प्रथमच विचार केला. त्याने तो सैनिकांना सांगितला.

त्याची योजना सफल झाली. शत्रु सैनिक खुशीने लोकांना मारहाण करून विजय मिळाल्याच्या आनंदाने राजपथ ओलांडून राजमहालाच्या दिशेने त्या बाजूला वळून चालले होते. ते आत येताच चंद्रवर्माच्या सैनिकांनी त्यांच्यावर हल्ला केला बहुतेक त्यातील बरेच शत्रु सैनिक मारले गेले. काही पाठीमागे वळून पळू लागले व स्वतःचा बचाव करू लागले.

ह्या गोष्टीने चंद्रवर्मामध्ये जोष निर्माण झाला. व त्याचा आत्मविश्वास वाढला. ते सर्व गर्जना करीत–"सूर्यवर्मा महाराजाचा जय असो." सूर्यवर्मा महाराजांचा जय असो! असे म्हणत राजमार्गावर येऊन पोहोचले. तेथे जे लोक लुटालुट करीत पळत होते. त्यांना सूर्यवर्माच्या सैनिकांनी जबरदस्त जखमी केले. ते घायाळ अवस्थेत तिथेच तडफडत पडून राहिले. नगरातील लोकांना पण ते पाहून उत्साह आला. जो तो जे शस्त्र हातात येईल ते घेऊन शत्रुचा सामना करू लागले. व त्यांच्यावर तुटून पडले. दोन्ही सैन्यात रणधुमाळी माजली.

अशा प्रकारे समोर जो शत्रुसैनिक येईल त्याला हाणीत मारीत चंद्रवर्मा उत्तरेकडील दारापाशी येऊन पोहोचला. तेवढ्यात चंद्रवर्मा उत्तरेकडील दारापाशी येऊन पोहोचला. तेवढ्यात दूरवर पश्चिमेच्या बाजूने गेलेला धीरमल्ल त्याचा

पाठलाग करीत येत असलेला त्याला दिसला. तो धापा टाकीत जवळ येऊन पोहचला.

क्षणार्धात जवळ येत धीरमल्ल चंद्रवर्माला म्हणाला–"युवराज आपल्याला ताबडतोब किल्ल्यातील राजमहालात जाऊन पोहोचावयास हवे कारण सर्पकेतु स्वतः मोठ्या सैन्यानिशी आपल्यावर चाल करून येत आहे. आपल्याला थोड्याश्या सैनिकांना बरोबर घेऊन त्याच्याबरोबर लढणे म्हणजे अशक्य व मृत्युला सामोरे जाण्या सारखेच आहे. किल्ल्याला आपला तट करून त्याचा आसरा घेऊन आपल्याला लढले पाहिजे. त्यापूर्वी आपली सीमेवर असलेली सेना आपल्या मदती करता इथे येईलच.

सर्पकेतुच्या थोड्या सैन्याने नगरात प्रवेश सुद्धा केला आहे. हे ऐकताच सूर्यवर्माला डोक्यावर कुऱ्हाड कोसळल्या सारखे वाटले. त्याला समजुन चुकले की, आता सर्वमायापाश सोडून युद्ध करण्याकरीता सिद्ध झाले पाहिजे.

मग काय! चंद्रवर्माने झटक्यात घोड्याला मागे पिटाळले सुबाहु व धीरमल्लने आपापले घोडे युवराजाच्या दोन्ही बाजुला घेतले. त्याच्याबरोबर थोडे सैनिक सुद्धा होते. ते सर्वजण अत्यंत वेगाने राजमहालाच्या दिशेने धावू लागले. वाटेत त्यांना अनेक सैनिकांशी तोंड द्यावे लागले. परंतु ते जेव्हां राजमहालापाशी पोहोचले तेव्हां त्याना दारावर शत्रु सैन्याचे अनेक घोडेस्वार व सैनिक दिसले ते सर्वजण कोंडाळे करून दाराशी दार उघडण्याच्या व फोडण्याच्या बेतात उभे होते. ते पहाताच चंद्रवर्मा आपल्या सैन्यांसह त्यांच्यावर तुटून पडला. दोन्ही सैनिकांच्यात भिषण हाणामारी सुरू झाली अनेक शत्रूचे सैनिक घायाळ अवस्थेत खाली पडले व कण्हू लागले. दोन्ही सैन्यांत रणधुमाळी माजली. (पुढे...)



# बदल

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजन, ह्या अर्धरात्री तू जे कष्ट सहन करीत आहेस. ते पाहून मला तुझी दया येते. कोणताही राजा कोणतीही गोष्ट साध्य करण्याकरीता आपल्या सेवकांच्या मदतीने ती साध्य करून घेतो. तेव्हां अशा परिस्थितीत तू स्वतः श्रम करून काय साध्य करणार आहेस? शेवटी कार्यात यश मिळविल्यानंतर तू सौगध देशाच्या युवराजासारखाच मतीभ्रष्ट झाल्यासारखा व्यवहार करणार तर नाहीस नां? म्हणून तुला मी रूपसेन राजकुमाराची गोष्ट सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.



सौगंध देशाच्या युवराजाचे नाव रूपसेन होते. त्याने गुरूंच्या बरोबर आश्रमात राहून राजाला प्राप्त असलेल्या सर्व विद्या शिकल्या मुख्य करून राजकुमाराला सौंदर्याच्या द्वारा व्यक्त होण्याऱ्या कलेत जास्त अभिरूची होती. त्याला एकच वाईट गुण होता. तो म्हणजे प्रमाणापक्षां जास्त चिडत असे. जेव्हां तो फालतू गोष्टी करीता जास्त चिडे तेव्हां घाईने करू नये तसली कामे करीत असे. आपल्या मुलाचे तसे वागणे पाहून वृद्ध महाराज गुणसेन ह्यांना काळजी लागून राही.

एकदा रूपसेन उद्यानात विहार करीत असतांना त्याला थोडया दूरवरून मधुर संगीताचे स्वर ऐकू आले. युवराजांनी लक्षपूर्वक ते गाणे ऐकले. व ते थांबताच सेवकांना आदेश केला. जो आता कोणी गात होता. त्याला माझ्या समोर आणून उभा करा. ते गीत गाणारी महाराणींची प्रिय दासी चंद्रावती होती.

रूपसेन म्हणाला–"चंद्रावती, तू इतके सुंदर गातेस! हे सांग! हे गाणे तू स्वत:रचले आहेस कां?"

चंद्रावती नम्रतापूर्वक म्हणाली–"मी एका विद्वांन संगीतकाराच्या तोंडी ऐकून हे गाणे शिकले आहे."

"अच्छा, ठिक आहे! एवढे मधुर भावनेने ओथंबलेले गीत करणाऱ्या विद्वांन गीतकाराला मला पहावयाचे आहे?" रूपसेन म्हणाला. दुसऱ्या दिवशी चंद्रावती बरोबर त्या विद्वानाला बोलावण्यात आले.

रूपसेनने आदरसत्कार करून त्यांना विचारले–"महानुभाव! आपण ह्या गाण्याचा राग इतका मधुर बनवला आहे. तर काय ते गाणे तुम्हीच रचले आहेत कां?"

"नाही, युवराज! माझ्या एका कवी मित्राने ते गाणे रचले आहे." त्या विद्वांनाने उत्तर देत म्हटले.

त्यानंतर रूपसेनने त्या कवीला बोलावून त्याचा सन्मान केला. तेव्हां तो म्हणाला–"प्रभू! असे मधूर गाणे बनवण्याचे श्रेय तर माझा चित्रकार मित्र वसंतमिश्रला प्राप्त व्हावयास पाहिजे. त्याने जे चित्र रेखाटले आहे. त्या स्त्रीच्या सौंदर्य, लावण्य, मुखावर विलसणारे तेज ह्यांने प्रभावित होऊन मी गाणे रचले आहे."

त्यानंतर रूपसेनने आपल्या शिपायांच्या करवी त्या चित्रकारला सुद्धा चित्रासकट बोलावून आणले. तो चित्रकार त्या चित्रासहीत दरबारात हजर झाला. ते चित्र पहाताच युवराज मंत्रमुग्ध होऊन पहातच राहिला. व म्हणाला–"वसंत मिश्र! काय ही तरूणी जिवत सुंदरी आहे? कां तुझी कल्पना सुंदरी आहे?"

"युवराज! हे अशां सुंदर तरूणीचे चित्र आहे की, ती जिवंत आहे. ती तरूणी सुवर्णपुरच्या जमिनदाराची एकुलती एक मुलगी आहे. तिचे नांव स्वर्णमंजिरी. तीला मी एका मंदीरात पाहिले होते. तीचे सौंदर्य पाहून मी प्रभावित झालो व तिचे हे चित्र काढले." वसंत मिश्र म्हणाला.

वसंत मिश्रचे म्हणणे ऐकून त्या चित्रावर प्रभावित होऊन युवराजाने त्या मुलीला दरबारात घेऊन येण्यास सेवकांस आदेश दिला. सेवक परत येत युवराजास म्हणाले–"प्रभु! एका आठवडयापूर्वीच स्वर्णमंजिरीचा विवाह झाला व ती आता तिच्या सासरी आहे."

हे ऐकताच युवराज निराश झाला. व रागाने चिडून म्हणाला–मला अशा प्रकारे निराश करणाऱ्या ह्या चंद्रावती,





संगीत विद्वान कवी आणि चित्रकार वसंतमिश्र ह्या सर्वांना तुरुंगात बंद करून टाका. रूपसेनला वाटत होते ह्या सर्वांनी आपले मन दुःखीत केले आहे. त्याच्या सांगण्याला कोणाकडेच काही उपाय नव्हता.

असेच एक वर्ष निघून गेले. त्याकाळांत ही गोष्ट युवराज पूर्णपणे विसरून गेला. परंतु त्याच्या रागाची शिकार झालेले ते निर्दोष चौघंजण फुकटचेच तुरुंगात सडत राहिले.

सौगंध देशाजवळच त्याच्याच सारखा जयंत देश होता. त्या देशाचा राजा दरवर्षी वैभवपुर्वक वसंतोत्सव करीत असे. ते निमंत्रण घेऊन सौगंधचा युवराज रूपसेन तेथे गेला. त्या उत्सवाच्या कार्यक्रमात संगीताचा कार्यक्रम सुद्धा आयोजित करण्यात आला होता. त्या कार्यक्रमाच्या समारोहा प्रसंगी एका तरूण युवतीने आपल्या अद्भुत संगीत स्वरलहरीने गोड आवाजाने सर्वांना व रूपसेनला आपल्याकडे आकृष्ट केले.

रूपसेनने ती मुलगी कोण आहे? हे जाणण्याची इच्छा प्रकट केली. तेव्हां जयंत देशच्या युवराजाने सांगितले– "रूपसेन, ही मुलगी तर तुमच्याच देशांची आहे हिचे नाव स्वर्णमंजिरी. ही सुवर्णपुरच्या जमिनदाराची मुलगी आहे. आमच्या देशातील नविन नावाच्या तरूणाची ती बायको आहे. तो गायक आहे. एका वर्षापूर्वीच त्याचा विवाह झाला. व ती इथे आली. ती एक मधुर गाणारीच नाही तर सर्वगुणसंपन्न आहे."

स्वर्णमंजिरीची माहिती कळताच त्याला सर्व पूर्व घटना आठवल्या तावडतोब त्याला अत्यंत क्रोध आला. कां तर ती एक तरूणी होती. व विवाहिता होती.

उत्सव समाप्तीनंतर त्याने स्वर्णमंजिरी बरोबर बोलण्याची इच्छा प्रगट केली. आपल्या पतीला बरोबर घेऊन येऊन ती युवराज रूपसेनला भेटली. तिने त्याच्याबरोबर खूप गप्पागोष्टी केल्या. त्या गप्पांनी रूपसेनच्यात आश्चर्यजनक बदल घडून आला. तिच्या चेहऱ्यावरचे हावभाव, गोड आवाज, संस्कार व्यवहार कुशलता त्याने तो मुग्ध झाला.

त्याच दिवशी तो आपल्या राज्यात आला. राजधानीला येताच त्याने प्रथम काम केले ते म्हणजे-तुरूगांत बंदी झालेल्या चौघाजणांना त्यांनी मुक्त केले. व त्याना दरबारात बोलावून त्यांचा आदर सत्कार करून त्यांना यथोचित भेट दिली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, रूपसेनच्या ह्या विचित्र स्वभावा विषयी तुझा काय विचार आहे? ज्या स्त्रीची त्याने अभिलाषा धरली होती. ती न मिळताच त्याने रागाच्या आवेशात येऊन त्या चौघा निष्पाप लोकांना बंदी केले. व तिला स्वतः पहाताच त्याने सर्वांना तुरूंगातून मुक्त केले. तिला पहाताच त्याच्यात जो बदल घडला त्याचे कारण त्याची मुर्खबुद्धीच म्हटली पाहिजे नां? या शंकाचे समाधान कारक उत्तर माहित असून तू दिले नाहीस, तर तुला माहितच आहे की, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–" रूपसेनच्यात त्याच्या पूर्व संस्काराचा मिलाप झाला आहे त्याचे अज्ञात रूप त्याच्यांत दडलेले आहे. त्याच्यातला संस्कार ढगाच्यां आड दडलेल्या चंद्राच्या प्रकाशासारखा क्रोधाग्नीने दबलेला होता. भयंकर ढग आल्यामुळे केव्हां केव्हां विजेच्या गर्जने बरोबर पाऊस कोसळू लागतो. तशाच प्रकारे त्याचा सुद्धा राग असाच अनावर होत असे. त्याचे परिणाम स्वरूप म्हणून त्याच वेळेला नेमकी कोणीही चांगली व्यक्ति त्याची शिकार बनत असे जसे सुर्याच्या प्रखर किरणांमुळे ढग नाहीसे केले जातात तसेच स्वर्ण मंजिरीच्या स्वच्छ स्वभावाने त्याच्यात परिवर्तन घडून आले.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृष्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# उत्तम शिष्य

कोशल देशाच्या राजधानी जवळच एक जंगल होते. त्या जंगलात कमलानंद नावांच्या ऋषिचा आश्रम होता. ते समस्त शास्त्रात निष्णात होते. त्यांच्याकडे श्रीमंत लोकांची तसेच राजा महाराजांची मुले विद्याभ्यास शिकावयास येत.

गुरुवर्य कमलानंदाचे एक वैशिष्टय होते. ते शिष्यांना शिकवितांना कधीही परमेश्वराचे नाव घेत नसत. जर कोणी शिष्यानीं ईश्वर भक्ति व भगवानासंबधी काही प्रश्न विचारले. तर ते एवढेच म्हणत असत–"हे प्रश्न तुमच्या भावी जिवनाच्या समस्या सोडवणारे नाहीत. तुम्हांला जर आपल्या जीवनकाळात उन्नति प्राप्त करावयाची असेल. तर तुमचा विवेकशिलपणा ज्ञान आणि प्रसंगावधान तुम्हांला मदत करू शकतील.

कमलानंदाच्या शिष्यांमध्ये दोन राजकुमार होते. त्यातील एक मणिपुरचा राजकुमार चंद्रसेन व दुसरा नागपुरचा सुर्यसेन होता.

दोन्ही राजकुमारानीं गुरूंकडे विद्या संपादन केली व ती पूर्ण होताच, आपापल्या देशी निघून गेले. व थोडया दिवसांनी तेथील राजा बनले.

एकदा कमलानंद आपल्या दोन्ही शिष्यांचा राज्य कारभार कसा चालला आहे हे पहाण्याकरीता निघाले. त्यांच्या बरोबर त्यांचा मुख्य शिष्य रामदासपण होता. सर्वात प्रथम गुरू मणिपुरला आले. तेथे राजधानीत त्याना जिकडे तिकडे देवळेच देवळे दिसून आली. व देवळांसमोरच्या प्रांगणात बरेच लोक अन्नदान वाटप करीत असलेले दिसले.

राजा चंद्रसेनने गुरूंचा यथोचित आदरसत्कार केला. नंतर गुरूंनी चंद्रसेनला विचारले–"मी तुझ्या राजधानीत अनेक देवळे पाहिली. मला ते पाहून असे वाटू लागले की, तुझ्यात देवाविषयी गाढ श्रद्धा विश्वास निर्माण झाला आहे! मी म्हणतो ते खरे आहे नां?"

"गुरूवर्य! देवाविषयी माझ्या मनांत बिलकुल आस्था नाही!" चंद्रसेनने सांगितले.

"तरमग, तुझ्या राजधानीत इतकी देवळे कशी?" कमलानंदनी विचारले.

"गुरूदेव! माझ्या प्रजेतील जनतेमध्ये देवांविषयी भक्ति आहे!" चंद्रसेनने उत्तर दिले.

त्यानंतर कमलानंद सूर्यसेनला भेटण्या-करीता नागपुरला जाऊन पोहोचले. परंतु आश्चर्याचीच गोष्ट होती. त्या देशात देवाचे एकही देऊळ दिसत नव्हते.

त्यांनी गावातील बऱ्याच लोकांना विचारले–"काय तुमचा कोणाचा देवावर विश्वास नाही कां?"

"आमचा देवावर विश्वास आहे हो. परंतु राजाचा ईश्वरावर अजिबात विश्वास नाही." लोकांनी सांगितले.

राजा सूर्यसेनने सुद्धा गुरूंचा उचित स्वरूपात आदर सत्कार केला. ते आपल्या दोन्ही शिष्यांचा कुलक्षेम विचारून आपल्या आश्रमात परत आले. व त्यांनी रामदासला विचारले–"सांग, तुझ्या मता-प्रमाणे सूर्यसेन व चंद्रसेन ह्यांच्या मध्ये उत्तम शिष्य कोण आहे?"










"ह्यात संदेह कोणता सूर्यसेनच आपला उत्तम शिष्य आहे." रामदास म्हणाला.

"कसा? कमलानंदनी विचारले.

"चंद्रसेननें सांगितलेच होते की, माझा देवावर विश्वास नाही. तरी सुद्धा गंमत म्हणजे त्याच्या राज्यात अनेक देवळे आहेत. सूर्यसेनच्या राज्यात आपल्याला एकही देऊळ दिसले नाही. त्यामुळे सूर्यसेनच आपला उत्तम शिष्य आहे." रामदास म्हणाला.

कमलानंद क्षणभर विचार करीत म्हणाले–"मी केव्हांही शिष्यांना विद्या शिकवितांना देवाच्या अस्थित्वा संबधी कधीही काहीही सांगितले नाही. जेव्हां ते मला त्या संबधी प्रश्न विचारीत तेव्हां मी त्याचे शंका समाधान करीत होतो. परंतु खरी गोष्ट अशी आहे. सूर्यसेन व चंद्रसेनने माझ्या सांगण्याचा उद्देश बरोबर समजून घेण्याचा प्रयत्न केला नाही. त्याचे हेच एक कारण आहे की, त्या लोकांनी देवळाचे आस्तित्व हेच एक प्रमुख कारण समस्यारूप असल्यासारखे लोकांच्या समोर ठेवले आहे. परंतु दोघांनी भिन्न भिन्न मार्गाने तेच अनुकरण केले आहे. सूर्यसेनच्या मनांत ईश्वरसंबंधी अजिबात विश्वास नाही. पण त्याच्या प्रजेच्या मनांत खूप विश्वास आहे. त्यामुळे एका देशाचा राज्यकारभार करताना प्रजेच्या इच्छेनुरूप रहाणेच राजाचे कर्तव्य आहे. उलट आपल्या अधिकाराने त्याने आपले विचारच जनतेवर लादले हाच त्याचा खरा निर्णय नाही."

"तरमग चंद्रसेनचे कसे? रामदासने विचारले."

"तो आपल्या जनतेनुसार राज्य चालवणारा राजा आहे. त्याने देवळे बांधली. व अन्नदान सुद्धा करून तो प्रजेचे प्रेम व विश्वास संपादन करून घेत आहे. हेच उत्तम राजा होण्याचे लक्षण आहे त्यामुळे तोच माझा उत्तम शिष्य आहे!" गुरूवर्य कमलानंदने रामदासला आपला निर्णय सांगितला.





# मंत्र्याची जबाबदारी

कुमारवर्माचा जेव्हां राज्याभिषेक झाला त्यावेळी त्याच्या राज्याची आनंदगिरीची आर्थिक स्थिति अत्यंत बिकट झाली होती. ह्यापूर्वी त्याच्या वडिलांनी शत्रू राज्यांशी युद्ध करून त्यापायी राज्यातील सर्व खजिना रिकामा केला होता.

राजा कुमारवर्माने आपला मंत्री मुकुलशर्मा बरोबर सल्लामसलत करून जनतेवर अनेक कर लादले होते. त्यामुळे त्याला ह्या बाबतीत असे सांगणे भाग पडले. राजाला तो म्हणाला–"महाराज, कृपया हे नविन कर लादण्याची घोषणा आपण स्वत: करू नये. हे काम राज्यातील अधिकाऱ्यांच्या हाती द्यावे."

राजा कुमारवर्माला मंत्र्याच्या राज्यकारभारा विषयीच्या सल्ल्याचा चांगला अनुभव होता. त्यामुळे त्यांनी मुकुलशर्माचे म्हणणे मान्य केले.

थोडे दिवस उलटले. एक दिवस राजा व मंत्री ह्यांनी विचार केला की, आपल्या राज्यकारभारा विषयी जनतेचे मत काय आहे. हे अजमावे अशा विचाराने एका रात्री ते दोघे गुप्तवेष करून राजधानीत हिंडू लागले.

थंडीचे दिवस होते. एका ठिकाणी काही लोक एक शेकोटी पेटवून हात शेकीत गप्पा मारत असतांना त्यांना दिसले. हे दोघेही गुपचुप त्याच्यात जाऊन हात शेकू लागले.

ती माणसे नविन लादलेल्या करां विषयी बोलत होती. त्यातील एक वृद्ध माणूस सर्वांना उद्देशून म्हणाला–"ह्यावेळी आपण जे मोठे मोठे नविन कर भरतो आहोत तसे ह्यापूर्वी कधी भरले नव्हते. ह्या कर लादण्याला काही सीमाच उरली नाही. राज्याचे अधिकारी व कर्मचारी आपल्या

प्रकाश गुणे



लोकांना घाकटपशा दाखवून कर वसुल करीत आहेत." असे म्हणत सर्वांना आपल्याला ह्यापासून कसे कष्ट सहन करावे लागतात ते वदवित होता.

राजा व मंत्री थोडावेळ तेथेच थांबून मग तेथून उठून निघाले.

रस्त्यात वाटेने येत असतांना मंत्र्याने राजाला म्हटले—"प्रभु तुम्ही ऐकलेत नां? जनतेवर कर तुम्ही लावलेत परंतु जनते-मध्ये असंतोष व जनता आपल्या अधि-काऱ्यावर चिडून आहे."

राजा क्षणभर विचारमग्न झाला व म्हणाला—"काही कां असेना परंतु ह्या-वरून असे स्पष्ट होते की, राज्यातील जनता आपल्या कारभारा विषयी असंतोषीत आहे. आता ती दूर करण्याचा काही उपाय सांगा काय करायला हवे?"

मंत्र्याने विनम्रतापूर्वक मान हलविली व म्हटले—"महाराज! आपल्याला घाबरून जाण्याची काही एक आवश्यकता नाही. आता आपल्या राज्यातील खजिना पूर्ण भरला आहे. हि गोष्ट मला खनिजदाराने कालच सांगितली. आपली जर आज्ञा मिळाली तर जनतेवरचे नविन कर तावड-तोब काढून टाकता येतील.

राजा अत्यानंदीत झाला व मंत्र्याला म्हणाला—"तुम्ही ही गोष्ट आधीच कां नाही सांगितलीत. नविन कर रद्द करण्याची सुचना राज्यातील अधिकाऱ्यांना देऊन त्यांना जनतेला सांगण्याची लवकरात लवकर सुचना द्या.

राजाचे म्हणजे ऐकून मुकुलशर्मा गाला-तल्या गालात हसत म्हणाला—"महाराज! नविन कर रद्द केल्याची घोषणा जर आपण स्वतः जनतेला सांगितलीत तर जास्त हिताचे होईल."

राजा आश्चर्यचकित नजरेने मंत्र्याकडे पाहू लागला. "होय, महाराज तुम्ही जेव्हां नविन कर वसुल करण्याविषयी जेव्हां घोषणा करण्याचा विचार व्यक्त केलात तेव्हां तुम्हांला मी अडवले. आपला विचार कोणत्याही बाबतीत उत्तम असला तरी नविन कर लादण्याची गोष्ट जनतेच्या दृष्टीने असंतोषजनकच असते."

"तरी सुद्धा अधिकाऱ्यांनी कसेही करून जनते कडून नविन कर वसूल केलेच नां!" राजाने विचारले.

"म्हणुन तर जनतेचा राग आपल्यावर नाही तर आपल्या अधिकाऱ्यावर आहे. असे न करता जर कर लादण्याची सुचना जर आपण स्वतः दिली असतीत तर जनतेचा राग आपल्या राज्यकारभाराप्रती झाला असता." मंत्री म्हणाला.

"आपले म्हणणे अगदी युक्तिवादक आहे. परंतु नविन कर रद्द करण्याची घोषणा मला का द्यावयास पाहिजे." राजाने विचारले.

"नवे कर रद्द करण्याची बातमी जन-तेच्या दृष्टीने एक शुभ समाचारा सारखी आहे हे काम जर आपल्या हातून घडले तर जनतेचा आपल्या विषयीचा आदरभाव वाढेल आपली प्रतिष्ठा मान किती तरी पटीने वाढले. केव्हांही राज्याचा राज्यकारभार सांभाळताना जनते मध्ये काही असंतोषाचे कारण होणारी गोष्ट सांगावयाची असेल तर ती गोष्ट नेहमी त्याने आपल्या अधिकाऱ्यांवरच सोपवायची असते. तसेच जनतेला प्रसन्न करणाऱ्या गोष्टी नेहमी राजाने स्वतःनेच जनतेपुढे मांडल्या पाहिजेत. आपल्या राज्यकार-भारात ढवळाढवळ करून राज्य चालवणे मंत्री ह्या नात्याने माझी पण जबाबदारी आहे नां?" मंत्री मुकुलशर्मा म्हणाला.

राजा कुमारवर्माला आपल्या मंत्र्याची बुद्धीमता तल्लखता प्रतिभा पाहून मना-पासून आनंद झाला. त्यांनी दुसऱ्यां दिवशी जनतेला एकत्रित करून नविन कर रद्द केल्याची घोषणा जाहीर केली.

अशा प्रकारे अत्यंत समर्थपणे मंत्री मुकुलशर्माशी विचारविमर्श व सल्ला मसलती करून राजा कुमारवर्माने अनेक वर्षे आनंदगिरी वर चांगला राज्यकारभार केला.





# जंगाची रीत

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असता बोधिसत्वांनीं कौशांम्बी नगरात कृष्णद्वैपायन नावाने जन्म धारण केला. ते जंव्हा मोठे झाले. तेव्हां त्यांनी लौकिक-आशा यामुळे होणाऱ्या दुष्परिणामांचे ज्ञान प्राप्त केले. शेवटी आपल्या जवळील सर्व संपत्ती दानधर्मात खर्ची घालून त्यांनी संन्यास घेतला. पन्नास वर्षे हिमालयात राहून आपला वेळ तपश्चर्येत घालवला. अनेक वर्षे फक्त कंदमुळेफळे खाऊन त्यांनी आपल्या शरिराला जे कष्ट दिले त्या तपश्चर्येचे फळ त्यांना मिळाले नाही.

त्यानंतर कृष्णद्वैपायन, ह्यांनी हिमालय सोडून देऊन ते तिर्थाटन करीत करीत काशी राज्यात येऊन पोहोचले. तेथे त्यांना त्यांच्या बालपणचा मित्र मांडव्य हा भेटला. त्याने त्यांचा यथोपचित आदर सत्कार केला. त्यांना तेथेच एक झोपडी बांधून दिली. व तेथे आपल्या बरोबर रहावयास सांगितले. तो त्यांना काय हवे नको ते पाहू लागला.

एक दिवस मांडव्य ह्याचा लहान मुलगा यज्ञदत्त चेंडू खेळत होता. खेळता-खेळता तो चेंडू एका सापाच्या बिळात जाऊन पडला.

यज्ञदत्तला माहीत नव्हते की, बिळाच्या आत साप रहातो. त्यामुळे त्याने चेंडू काढण्याकरीता बिळात हात घातला. झटक्यात सापाने त्याला दंश केला. त्याचे विष त्याच्या शरीरात भिनू लागले. व तो बेशुद्ध पडला.

त्या अवस्थेत मांडव्य व त्याच्या पत्नीने त्याला पाहिले व त्यांनी त्याला उचलले व कृष्णदैपायनाच्या पायाशी आणून ठेवले.

त्यानंतर त्या दोघांनी हात जोडत त्यांना विनंती केली—"महाप्रभु! आपल्या तपोसामर्थ्याने ह्याला जिवंत करून आम्हांला पुत्रभिक्षा घाला.

परंतु कृष्णद्वैपायनांना समजेना की, काय करावे. ते म्हणाले आपल्याला भ्रम झाला असावा असे वाटते. खर तर असली कोणतीही शक्ति माझ्यामध्ये नाही. मी अनेक वर्षे तपश्चर्या केली आहे. परंतु ती सफल झाली नाही. मला तर औषधांचे सुद्धा ज्ञान नाही. तेव्हां मी आपल्याला काय मदत करू शकेन.

त्यावर मांडव्य म्हणाला-"वाऽऽवा आपली तपश्चर्या सफल झाली नसली तरीही इतकी वर्षे केलेल्या तपश्चर्येचे काहीतरी फळ मिळालेच असेल नां! तेव्हा आपण शपथ घेऊन सांगा. माझा मुलगा नक्कीच जिवंत होईल. माझा आपल्यावर विश्वास आहे."

मांडव्यच्या म्हणण्याचा उद्देश कृष्ण-द्वैपायन डावलू शकले नाहीत. त्याचे म्हणणे मान्य करून त्यांनी काही श्लोक म्हणण्याची शपथ घेतली.

सत्ताहं एवाहं प्रसन्नचित्तो,
पुंज्ञत्थिको आचरिं ब्रह्मचरियं,
आधापरं यं चरितं ममयिदं
वस्यानि पंशास समाधिकानि,
अकामको वा हि अहं चरामि,
एतेन सच्चेन सुवत्थि होतु,
हतं, विसं, जिवतु यंजदत्तो.



[मी मनांत पुण्याची कामना करून एक आठवडाभर निर्मळ मनाने ब्रह्मचर्याचे पालन केले. त्यानंतर मी जी पन्नास वर्षे तपश्चर्या केली. ती मनापासून प्रेरणा मिळून केली गेली नाही. माझ्याकडून घेतली गेलेली ही शपथ ह्याचे परिणाम स्वरूप समजून ह्या मुलाच्या शरिरात भिनले गेलेले विष बाहेर पडून यज्ञदत्त पूर्णपणे जिवंत होऊ दे.]

हा श्लोक समाप्त होताच यज्ञदत्तच्या वक्षस्थळातून थोडे विष बाहेर पडले व ते पृथ्वीवर पडून नाहिसे झाले. यज्ञदत्तने एकदा डोळे उघडून आपल्या आईवडीलांकडे पाहिले व हात उठवून "आई" म्हणत परत खाली कोसळला व बेशुद्ध झाला.



तेव्हां कृष्णदैपायन मांडव्यला उद्देशुन म्हणाले–"मित्रा, पाहिलेस नां! पूर्णतया विष बाहेर काढणे माझ्याकडून संभवत नाही. त्यामुळे तू सुद्धा सत्याची शपथ घेऊन प्रयत्न कर. त्याचा सुद्धा उपयोग होऊ शकेल.

मांडव्यने त्यांचे म्हणणे मान्य केले व त्यानी खरेपणाची शपथ घेऊन म्हणावयास सुरवात केली.

यस्मा दानं न अभिनंदि कदाचि,
दिखानाहं अतिथी वा सकाले
न चापि मे अप्पियं अलेदुं
बहुस्सुंता समणा ब्राह्मणाय
अकामको बाद्रि अन्नं ददामि
एतेन सच्चेन सुवत्थि होतु
हतं दिसं जीवतु यंज्ञदत्तो.

[मी अतिथींचा सत्कार जरूर केला आहे. परंतु शुद्ध मनाने नाही. हे ज्ञानीदाता श्रोताब्राह्मण ह्यांना हे समजले नाही की. मी जो आदर सत्कारं केला आहे तो अनिच्छेने प्रेरीत होऊन केला आहे. मी सांगितलेली ही गोष्ट खऱ्या स्वरूपात फलश्रुत होऊन ह्या विषाचा प्रभाव कमी होऊन यज्ञदत्त पूर्णपणे बरा व्हावा ]

मांडव्यने म्हटल्याबरोबर यज्ञदत्तच्या पाठीतून आणखी थोडे विष बाहेर पडले. व जमिनीवर पडून वाळून गेले. मुलगा उठून बसला. परंतु उठून उभा राहून शकला नाही. तेव्हां मांडव्यने आपल्या पत्नीकडे वळून पहात म्हटले–तू पण शपथ घे. म्हणजे आपला मुलगा पहिल्या सारखा हिंडू फिरू लागले. माझ्या कडून तुम्ही खऱ्याची शपथ घेववता परंतु मी आपल्या समोर तशी घेऊ शकत नाही. बायको चिंतेच्या स्वरात म्हणाली.

"वेडी, तू शंका कां करतेस? आपल्या मुलापेक्षा आपल्याला दुसरी कोणती ऐवढी गोष्ट पाहिजे आहे" शपथ घे! असे म्हणून मांडव्यने आपल्या बायकोला प्रेरणा दिली. तेव्हां त्याच्या बायकोने तशी शपथ घेतली व ती म्हण लागली.

"[illegible]
ये तं अदट्ठि पतरा इदञ्चि
तस्मिचं मे अप्पियताय अज्ञ
पितरी च ते नत्थि कोचि विसेसो
एतेन सच्चेन सुवत्थि होतु
हतं विसं जीवतु यज्ञदत्तो!"

[बाळा, आज ज्या बिळातल्या सापाने तुला डसले ते पाहून तर मला त्याची अतिशय घृणा वाटत आहे. तशीच तुझ्या पित्याकडे पाहून सुद्धा माझ्या मनांत घृणा निर्माण होत आहे. माझ्या दृष्टीने ह्या दोघांच्यात काहीही फरक नाही. मी ही जी शपथ घेत आहे. ह्याचे परिणाम स्वरूप म्हणून तुझ्या शरिरातील सर्व विष निघून जाऊन तू पूर्वपणे जिवंत व्हावेस.]

असे म्हटल्याबरोबर यज्ञदत्तच्या शरिरातील सर्व विष बाहेर पडून जमिनीत शोषले गेले. त्यानंतर ते बाळ उठून परत पूर्वी सारखे खेळू लागले.

ह्यानंतर मांडव्यनी कृष्णद्वैपायनना विचारले–" महात्मन् ! तपस्वीकरीता असलेले सर्वोत्तम जिवन आपण स्विकारलेत परंतु ते सुद्धा अनिच्छेने चालवलेत ह्याचे काय कारण आहे?"

"ह्यामागे एकच कारण आहे. एकदा जर एक माणुस संन्यास घेऊन घराबाहेर पडला व पुन्हां येऊन त्याने गृहस्थाश्रमात प्रवेश केला. तर तो लोकांच्या निंदेला कारणीभुत बनतो व मुर्ख समजला जातो. संन्यास जीवनात माझी इच्छा नसतांना











दुसऱ्यांच्या आदरास प्राप्त होण्याकरीता जबरदस्तीने मी तपस्वी बनावयास गेलो. आता तुच सांग तू आलेल्या लोकांचा अतिथिसत्कार अशा अनिच्छेने का करतोस? ह्या पाठीमागे सुद्धा काही कारण असेलच नां?"

माझे वडील व आजोबा जगातील दानशुर म्हणवले जात होते. त्यामुळे मला सुद्धा त्यांचेच अनुकरण करावे लागत आहे. त्यामुळे मी केलेल्या कामामुळे त्यांच्या यशाला काळीमा लागू नये. त्यामुळे मी दाता बनून दानधर्म करीत आलो आहे. परंतु मनापासून नाही. मांडव्य उत्तर देत म्हणाला नंतर आपल्या पत्नीकडे वळून तिला म्हणाला—"तू लहानपणीच माझी बायको बनून माझ्या घरी आलीस व अनेक वर्षे माझ्याबरोबर संसार केलास तरी सुद्धा तुझ्या मनांत माझ्या विषयी जरा देखिल प्रेमभावना किंवा स्नेह नाही उलट माझी घृणाच तू करते आहेस. ह्या पाठीमागे काय रहस्य आहे?

"आमच्या वंशात स्त्रीने आपल्या पतीचा संसार करणे हेच तिचे कर्तव्य समजले जाते. ते तिला करणे भागच आहे. म्हणुन मी हे आज असे सहन करीत आहे. जर तुम्हांला सोडून मी इतर कुणाशी लग्न केले. असते तर समाजाने मला कुलटा कलंकीणी समजले असते. परंतु आपण मुलाच्या जीवन करीता आज माझे हे रहस्य मी उघडे केले" मांडव्याच्या बायकोने सांगितले.

"तू खरे कार्य तेच सांगितलेस. म्हणून मी तुझी निंदा नालस्ती करीत नाही. मी आता शप्पथ घेऊन सांगतो मी तुझ्याबरोबर प्रेमपुर्ण संसार करेन" मांडव्य आपल्या बायकोला म्हणाला.

"तू दान करणार म्हणतोस तर ते मनापासून कर अनिच्छेने करू नकोस. मी सुद्धा आजपासून माझे तपस्वी जिवन पूर्णतयेने घालविन" असे म्हणत कृष्ण-द्वैपायन यांनी मांडव्यला सांगून ते आपला मार्ग आक्रमु लागले.





आपल्या नद्या :

## यमुना

महाकवी कालिदास यानी देवतात्मा व पर्वतराज म्हणून ज्या हिमालय पर्वताचे रसभरीत वर्णन केले आहे. त्या हिमालयाच्या पर्वतशिखरांमधूनच बहुतेक नद्यांचा उगम होतो. आपल्या पुराणात नद्या ह्या केवळ निसर्ग प्रमाणितच नाही. तर त्या नद्यामधून सजीव आत्मे सुद्धा दर्शन देतात.

उदाहरण म्हणून यमुना नदीला पुराणात सूर्य व संध्यादेवी ह्यांच्या पासून झालेली मुलगी मानतात. ती यमराजाची बहीण आहे असे म्हणतात. त्या वरून तिचे नाव यमुना पडले. असे म्हटले जाते. पृथ्वीवरच्या सृष्टीवर आपल्या हिस्सा वाटण्या करीता तिने नदीचे रूप धारण केले असावे.





कालिंदि पर्वताच्या पायथ्यापासून हिमालय पर्वतातील यमुनोत्री पर्यंत आपल्याला यमुनेचे दर्शन होते. समुद्र सपाटी पासून दहाहजार आठशे फुट उंचावर असलेले यमुनोत्री हे एक अभुत रम्य ठिकाण आहे त्या पवित्र प्रदेशात यमुना नदीचे एक दउळ आहे.




सुरवातीला यमुना नदीचा प्रवाह भोवऱ्या प्रमाणे अत्यंत तीव्र गतिने वहात होता. त्यामुळे उगमापाशी कोणा मनुष्य-प्राण्यास जाता येत नव्हते. त्या पाण्याच्या प्रवाहाचा आवाज एक हजार सिंहनादाइतका मोठा व भीती-दायक आहे. वरुन पडणाऱ्या नदीच्या ह्या धबधब्यातील तुषार कोसळ-णाऱ्या पावसासारखे अद्‌भुत रम्य दिसतात.

एकदा कृष्णाचा मोठा भाऊ बलराम ह्याला पर्वतातुन विहार करीत असताना यमुना नदीला पाहून त्यात स्नान करण्याचा विचार आला. त्याने जलप्रवाहाच्या जवळच्याच एका शिळेवर उभे राहून यमुनेला जवळ येण्याकरीतां हांक मारले.





बलरामाच्या बोलावण्याकडे यमुनाने दुर्लक्ष केले. त्याने पुन्हां पुन्हां हांका मारले. त्याचाही काही उपयोग झाला नाही. म्हणून त्यानी त्या जलप्रवाहात उडी मारली. परंतु प्रवाहाने त्याला दूर फेकण्याचा प्रयत्न केला ते पाहून बलरामाला अतिशय राग आला.

ते तिच्या काठावर आले व त्यानी आपल्या नांगरानी तिला टोचले व तिला घाटातून पहाडातून मैदानातून ओढत आणून आपल्या इच्छेप्रमाणे कसेही वाकडे तिकडे करीत नेले. यमुनाला बलरामाच्या नांगराचे अनुकरणाने जाणे भाग पडले.





शेवटी यमुनेने एका स्त्रीचे रुप धारण केले. व त्या रागाने बेकाम झालेल्या बलरामाला प्रार्थना केली की, मला मुक्त कर. बलरामाने शांत होत तिला सोडून दिले. हा अनुभव आल्यावर यमुना थोडी शांत गतीने वाहू लागली.

नंतर यमुना नदी पुराण प्रसिद्ध हस्तिनापुर व इंद्रप्रस्थ नगरांमधून वाहू लागली. कालानुसाराने अदृष्य झालेल्या ह्या दोन नगरांच्याच परिसरातच आज नवी दिल्ली हे शहर निर्माण झाले आहे. इतिहास काल प्रसिद्ध ह्या किल्ल्याजवळूनच हि नदी वहात जाते.





प्राचीननगरी मथुरा हीला लागुनच ही नदी वहाते. मथुरानगराचा राजा कंस ह्याच्या तुरुंगातच श्रीकृष्णाचा जन्म झाला. जन्मतःच जेव्हां कृष्णाच्या पित्याने वसुदेवने त्याला जेव्हां मथुरेतील यमुनानदी पार करुन गोकुळात आणले तेव्हा सर्पराज वासुकीने आपला फण्याचाच आधार देऊन प्रवाहापासून त्याला वाचविले.

यमुना नदीच्या काठीच वृन्दावन आहे. कृष्णाने आपल्या बासुरी वादनाने इथेच पशुपक्षी, भक्त सर्वांना मंत्रमुग्ध केले होते. कृष्णाच्या बालपणीच्या काळात यमुनेचा व त्याचा खुप दाट संबंध आला.





प्रयागयेथे अंतर्गत वहात येणाऱ्या सरस्वती नदी व गंगा यमुना ह्या नद्याचा त्रिवेणी संगम होतो. त्यामुळे भक्त व श्रद्धाळू लोकांचा विश्वास आहे. की, ह्या संगमात स्नान केल्याने पुण्य प्राप्त होते.

# तेव्हांच डोळे उघडले.....

राजा मार्तण्डकडे सुबुद्धी नावाचा चलाख मंत्री होता. व त्याच्या दरबारात कामाला अनेक गुलाम होते. राजा त्यांना जनावरांसारखा राबवित असे.

"एक दिवस मंत्री सुबुद्धी राजाला निवेदन करीत म्हणाला–" महाराज, ह्या गुलामांना सुद्धा माणसांसारखे जिवन जगु देत."

त्यावर राजा उत्तर देत म्हणाला–"जसे राजाचा वारस राजा होतो, तसाच गुलामांचा गुलाम."

काही दिवस उलटले एक दिवस मंत्री राजाला निवेदन करीत. म्हणाला–"महाराज, आजचा दिवस आपल्या पुर्वजांच्या संस्मरणाचा दिवस आहे. चला जाऊन त्याचा कार्यविधी पार पाडूया. म्हणुन राजाला घेऊन तो स्मशानात आला."

ह्या आधीच दोन दिवस पावसामुळे जिकडे तिकडे पाणी वाहून जाऊन स्मशानातील हाडे इकडे तिकडे विखूरली गेलेली होती. मंत्र्याने त्यातील काही वेचुन आणून त्यांचा ढिग केला व राजाला म्हणाला–"महाराज, मला माहीत नाही की, तुमच्या पुर्वजांची हाडे कोणती आहेत व गुलामांची हाडे कोणती? जर आपण ओळखू शकलात तर बाकीचा कार्यक्रम काय ते मी पाहून घेईन."

ते ऐकताच राजाचे डोळे उघडले त्या दिवसांपासून त्यांनी सर्व गुलामांना मुक्त केले. व त्यांना माणसांसारखे स्वतंत्र आयुष्य जगण्याची मुभा दिली.





# ही दाढी माझी आहे!

एका गावात दोन जिवलग मित्र रहात होते. त्या दोघांनी व्यापार करून बराच पैसा मिळविला होता. त्यातील पहिला माणूस पैसा व्यर्थ खर्च करीत असे व दुसरा अत्यंत लोभी होता. पहिल्याची डोक्याची चकोटी होती तर दुसऱ्यानी आपली दाढी खूप लांब वाढविली होती.

एक दिवस दोघे मित्र अशाच गप्पा मारत बसले होते. तेव्हां पहिल्याने विचारले–"मित्रा, मी आज पर्यंत तुला ही गोष्ट सांगितली नाही. पण खरोखरी तुझ्या दाढीकडे पाहिले नां की, काय मजा येते आज पर्यंत इतके म्हातारे मी पाहिले; पण खरे सांगतो, तुझ्या सारखी दाढी या जगात तरी कोणाची नसणार!"

हे ऐकून दुसऱ्याचा आनंद गगनात मावेनासा झाला तो म्हणाला–"होय रे बाबा! सगळे लोक मला असेच सांगतात. तेच नाही तर कोणाची माझ्या दाढीला दृष्ट लागेल. ते लोक संधी मिळताच माझी दाढी विकत घ्यायला सुद्धा टपून बसलेले आहेत." असे म्हणत दुसऱ्याने आपल्या हाताने दाढी कुरवाळायला सुरवात केली.

ते ऐकून पहिला म्हणाला–"कोणी कशाला विकत घ्यायला पाहिजे. मीच ती विकत घेतो.! काय ह्याची किमत सांग?

दुसऱ्या लोभीच्या मनात दाढी विकत देण्याच्या अनेक कल्पना तरळून गेल्या त्याने झटक्यात हावरटपणाने किमत सांगितली–"बरं तर, एक हजार नाणी दे!

"त्यात काय हे घे! मला वाटले ह्यापेक्षा जास्त मागतोस की काय? असे म्हणत त्याने खिशात हात घालून थोडे पैसे बाहेर काढले व अगाऊ रक्कम म्हणुन त्याच्या हातातर ठेवले.

ते पहाताच दुसरा आश्चर्याने त्याच्याकडे पहात राहिला ते पाहून पहिला त्याला आपली अट घालत म्हणाला–"ठिक आहे! मित्रा हे बघ आज पासून ही दाढी माझी आहे! परंतु माझी एक अट आहे. मी जोपर्यंत पुरी रक्कम देत नाही व ही दाढी खरेदी करीत नाही तो पर्यंत ह्यांचे रक्षण करणे तुझे काम आहे. ह्या माझ्या दाढीला माझ्या मर्जीप्रमाणे तुला तेल मसाज करावयास पाहिजे. मी सांगेन तेव्हांच हजामत करावयास पाहिजे!"

"हात् तिच्या, ह्यात काय कठीण आहे! दुसऱ्याने पहिल्याचे म्हणणे मान्य केले. ह्यानंतर दोघांनी स्वतःच्या हस्ताक्षराने त्याचा करारनामा लिहीला नंतर पुन्हां पहिल्या माणसाने त्याला उत्तेजित करीत म्हटले आणि हे पहा आजपासून जर कां कोणी ह्या दाढीची स्तुती करू लागले तर तू त्यानां सांगून टाक–"महाराज, ही दाढी माझी नाही. कोण्या एका माणसाची त्याने पैसे देऊन खरेदी केली आहे. मी त्याच्याच करीता ही जपून सांभाळत आहे. असे तू सांगायला पाहिजे. समजले!"

दुसऱ्या दिवसापासून पहिला रोजच्या रोज दुसऱ्याच्या घरी खेटा घालू लागला. ते पाहून दुसऱ्याने विचारले–"मित्रा, काय झाले कां येणे केलेस तर तो त्याला



म्हणे–"तशी काही विशेष गोष्ट नाही. मी माझ्या दाढीला पहायला आलो होतो.

काही दिवसांनी तो त्याच्यावर उगीच उखडू लागला व त्याला दम भरत म्हणू लागला–"मित्रा, हे काय? तू माझ्या दाढीची नासघुस करतो आहेस. प्रथम माझी दाढी कशी चकाकीत दिसत होती. तू स्वस्तातील तेल लावू लागला आहेस वाटेत. म्हणुनच ती अशी उस्कटल्या सारखी दिसते आहे."

अशा प्रकारे आपल्यावर अधिकार गाजवण्याला पाहून दुसरा वैतागुन गेला. शेवटी दोघा मित्रांच्यात वैमनस्य वाढू लागले. ते पाहून दुसरा हवालदिल होत गद्‌गद्‌लेल्या स्वरात म्हणू लागला–"मित्रा,





तुला पुण्य लागेल! तेव्हां माझी अक्कल चरायला गेली होती. मी पैशाच्या हावरटपणामुळे पुढचा मागचा विचार न करीता तुझ्या अटीमान्य केल्या तू मला माझी दाढी परत देऊन टाक व तुझे पैसे परत घे.

परंतु पहिल्याने दुसऱ्याचे म्हणणे मानले नाही. तेव्हां दुसरा म्हणाला—"तू दिलेल्या अगाऊ पैशांच्या दुप्पट पैसे देतो." ते ऐकून ही पहिला गप्प बसला. दुसऱ्याने विचार केला की, कशाही प्रकारे ह्याची आपल्या पाठीमागची कटकट सोडवायलाच पाहिजे त्या विचाराने तो म्हणाला—"ठिक आहे, मी चार हजार देतो. पहिल्याची हांव वाढू लागली. त्यामुळे तो शांतपणे तसाच ते पहात उभा राहिला.

दुसऱ्याला काही सुचले नाही. असेच आणखीन काही दिवस निघून गेले. एके दिवशी रात्री पहिला दुसऱ्याचा घरी आला. दुसरा गाढ झोपेत होता. तरी त्याची पर्वा न करता पहिल्याने काही संकोच न करता दुसऱ्याची दाढी घट्ट पकडून ओढली आणि काय आश्चर्याची गोष्ट दाढी सरळ पहिल्याच्या हातात आली. मग काय पहिला माणूस झटक्यात उठला व धावत ओरडत न्यायाधिशाकडे जाऊन पोहोचला व त्याच्याकडे त्याने तक्रार सांगितली.

न्यायाधिश खुप समजुतदार होता. त्यानी दोन्ही मित्राच्या मनामधील गोष्ट समजून घेतली नंतर न्यायाधिशाने न्याय देण्यास सुरवात केली.

शेवटी असे सिद्ध झाले—पहिला माणुस अशा विश्वासाच्या जोरावर सतावू लागला ही दाढी मी विकत घेतली आहे. माझा अधिकार आहे! त्या त्रासाला कंटाळून त्याने दाढी खोटी लावली.

पहिल्या माणसाने अर्ध्या रात्री जाणुनबुजून दुसऱ्याच्या घरी जाऊन जबरदस्तीने दुसऱ्याची दाढी पकडून ओढली ती दाढी घेऊन त्याने पुन्हां परत तेथेच जावे व दुसऱ्या माणसास त्याने पूर्ण पैसे द्यावे म्हणजे दाढीच्या पूर्ण खर्चासहित त्याने त्याचे मुद्दल त्याला द्यावे. हा निर्णय ठरला.





# रागीट नवरा

कोण्या एका गावात बलभद्र नावाचा शेतकरी रहात होता. तो खूप कष्टाळू होता. व रागीट स्वभावाचा होता त्याला जर राग आला तर त्याचा स्वतःवर ताबा रहात नसे. परंतु त्याची पत्नी शांता खूप सहनशील होती.

पण सहनशिलतेची सुद्धा काही मर्यादा असते. जेव्हां एकदा तिला अजिबात सहन झाले नाही. तेव्हां ती नवऱ्याला चिडून बोलली—"मला कशाला त्रास देता हो! तुमच्या बाबतीत मी काय कमी केले? जर माझ्यावर चिडला असलात तर, मला घरा बाहेर काढून टाका. मी इथे जेवढे कष्ट करते ते कुठेही करून आयुष्य आनंदात घालवू शकते."

बायकोचे बोलणे ऐकून बलभद्राचा रागाचा पारा जास्तच चढला. तो तावातावाने म्हणाला—"जा ताबडतोब माझ्या घरातून निघून जा. आनंदाने कुठेही जग!"

नवऱ्याचे बोलणे ऐकताच शांताच्या डोळ्यातून घळघळ अश्रुधारा वाहू लागल्या. त्याक्षणीच ती नवऱ्याचे घर सोडून निघाली.

तो दिवसभर रागाने तडफडत होता. दुसऱ्या दिवशी त्यांचा राग थोडा शांत झाला. त्याने विचार केला की, बायको संध्याकाळपर्यंत कुणाच्यात तरी बसून घरी परत येईल. परंतु रात्र पडली तरी ती आली नाही. ते पाहून तो घाबरून गेला.

शांताला लहानपणापासून आई-वडिलांचे छत्र नव्हते. त्यामुळे ती आपल्या मामाच्या घरीच लहानाची मोठी झाली. परंतु घरी तिचा खूप छळ करीत. तिच्या लग्नानंतर ती मंडळी कोणीही शांताला भेटायला म्हणून आली नाहीत. शांता जेव्हां दुसऱ्या दिवशी सुद्धा घरी



परत आली नाही. तेव्हां बलभद्र तिचा शोध करण्याकरीता बाहेर पडला. प्रथम त्याने सर्व गाव पालथा घातला. परंतु ती कोठेही दिसली नाही. तेव्हां तो तिच्या मामाच्या गावी गेला. तेथे पण ती नव्हती. शांताच्या मामाने बलभद्रला सांगितले की, ती इथे आली.

जरी स्वभावाने बलभद्र रागीट असला तरी तो शांतावर मनापासून प्रेम करीत होता. त्याने मनांत निश्चय केला की, जोपर्यंत शांता सापडणार नाही तोपर्यंत मी घराचा उंबरठा ओलांडून आत जाणार नाही. त्याला कळेना तिला कोठे शोधावे शेवटी त्याने विचार केला की, परत गावी जाऊन. प्रत्येक घरात तिची चौकशी करावी.

बलभद्र आपल्या गांवी पोहोचला तेव्हां त्याला रघुपति नावाचा एक गाडीवान भेटला व त्याला पहात म्हणाला–"भाऊ साहेब, तुमची बायको आताच माझ्या गाडीत बसून आली. मी तिला वाटेत रामपुरला सोडून आलो.

रामपुर बलभद्रच्या गावापासून बरेच दूर होते. तरीही तो बायकोला आणण्याकरीता त्या गावी निघाला. तशी रामपुरला जाण्याची वाट चांगली होती. रस्ता डांबरी होता. परंतु एक जवळची पाय वाट सुद्धा होती. ती थोडी जंगलातून जाणारी होती. त्यामुळे सर्वजण तिथून जायला घाबरत असत व दुसऱ्या वाटेनेच जात असत.

बायकोला लवकर भेटण्याच्या इच्छेने बलभद्र त्या जवळच्या जंगलातून जाणाऱ्या पायवाटेने निघाला. थोड्या दूरवरपर्यंत चालत गेल्यावर त्याला जंगलातून जाणे भाग पडले. जाता जाता तो तेथे विश्राती घेण्याकरीता एका गुहेच्या आडोशाला बसला.

त्या पहाडाच्या गुहेमध्ये चोरांचा अड्डा होता. थोड्यावेळाने चोर तेथे आले व बलभद्रला पाहून म्हणाले–"तू इथे कशाला बसला आहेस?"

"रामपुरला जात असतांना थोडी विश्रांती घ्यावी ह्या हेतूने इथे थांबलो.

चोरांनी त्याच्याकडे शंकेखोर नजरेने पाहिले व दरडावून विचारले–"रामपुरला जायला इकडून कोणता रस्ता आहे?"

"तर मी रस्ता चुकलो. मला रस्ता दाखवा. मी निघून जातो." बलभद्र म्हणाला.

त्यातील एकाने विचारले "रामपुरला तुझे काय रे काम?"

"तिथे माझी पत्नी आहे" बलभद्र म्हणाला.

"अच्छा! ठिक आहे, मला रामपुरचे सर्वजण ठाऊक आहेत सांग! तुझ्या सासऱ्याचे नाव काय?" एका चोराने विचारले.

"माझे सासु-सासरे जिवत नाहीत" बलभद्र म्हणाला.

"वाऽऽमग हे सांग तुझी बायको कोणाच्या घरी उतरली आहे?" चोराने परत विचारले.

"तेच तर पहायला मी जात आहे. मी तर ह्याच विचाराने घाबरून गेलो आहे. माझी बायको तेथे आहे किंवा नाही. त्यावर तुम्ही मला नाही नाही ते प्रश्न विचारून त्रास देत आहांत" बलभद्र चिडून म्हणाला.

ते ऐकून सर्वजण आश्चर्य चकित झाले. त्यांना शंका येऊ लागली. त्यांना वाट



लागले. ह्याच्या मदती करीता इतर काही लोक लपून बसले असावेत.

चोरांनी त्याला विचारून त्याचा पिच्छा पुरवला. तेव्हां तो चिडून उठून निघून जाऊ लागला.

तेव्हां त्यातील एका चोराने सांगितले– "हा जे काही सांगतो. ते सर्व खोटे असावे. ह्याच्या एवढ्या हिमतीने वाटते हा कोणी-तरी राजाचा गुप्त वेषधारी हेर असावा. ह्याला जर संतुष्ट करून पाठवले नाही तर जिवाला धोका होण्याचा संभव आहे."

सर्वांनी त्याचे म्हणणे मान्य केले. मग काय! सर्वजण धावत त्याच्याजवळ गेले. व म्हणाले–"हे बघ बाबा, आम्ही कसे बरे



चोरी लुबाडी करून आमचा उदरनिर्वाह करतो. तू आमच्या ह्या टोळींच्या बाबतीत कुणासही काही सांगू नकोस. बक्षिस म्हणून आम्ही तुला काही ना काहीतरी देऊ.

बलभद्र आश्चर्यचकित नजरेने त्या डाकुंना पहात म्हणाला—"तुम्ही लोक समजलात तरी कोण ?"

"अशा पहाडावरच्या भीतीदायक ठिकाणी सुद्धा तुम्ही आमच्या वर चिडून बोलता आहात म्हणजे तुम्ही नक्कीच राजाचे शिपायी असाल. म्हणुनच तुम्ही आमच्या गुहे समोर बसून राहीलात व इतरांना लपून बसावयास सांगितले असेल. थांबा म्हणुन ते सर्व गुहेच्या आत निघून गेले व आतून एक थैली आणली व ती बलभद्रच्या हातात दिली त्यात चमचम् करणारे बरेच हिरे होते.

बलभद्र ते घेऊन गुपचुप बसला त्याला रामपुरच्या सरहद्दीपर्यंत सोबत करून चोर म्हणाले तू हे विसरून जा. तू आम्हांला कधी पाहिले आहेस. तू धनाच्या आशेने परत तिथे आलास तर तुला दिसणार नाहीत अशा दूर जागी निघून जाऊ.

बलभद्रने त्या गावांत जाऊन आजू-बाजुला चौकशी केली. तेव्हां त्याला समजले की काही दिवसापूर्वी अशा नावाची जी एक बाई ह्या गावात आली ती तेथील गंगानाथच्या घरी कामाला लागली आहे. बलभद्र ताबडतोब तेथें पोहोचला. तेव्हां शांता हातात झाडू घेऊन घर झाडत होती. बल-भद्रला पहाताच ती घरात आत निघून गेली.

गंगानाथ तेव्हांच शेतातून घरी परत येत होता. बलाभद्रला पहाताच त्याने विचारले—"तुम्ही कोण ? काय पाहिजे ?"

बलभद्रने आपली माहिती सांगितली व शांताच्या विषयी विचारले.

गंगानाथ म्हणाला—"शांता चांगली बाई आहे. ती सकाळी उठल्या पासून रात्री झोपेपर्यंत काहीतरी काम करतच असते. एक क्षणभर उसंत घेत नाही. अशी मोल-करीण मिळणे म्हणजे भाग्यच पाहिजे !"

"मला थोडं तिच्याशी बोलायचं होतं." बलभद्र म्हणाला.

गंगानाथने शांताला हांका मारले बलभद्रने एका बाजूला नेऊन विचारले—"काय ग, आपल्या घरी इतके काम होते. तू आपल्या घरात आरामाने राह्यचे सोडून इथे एका मोलकरणी सारखे आयुष्य कां घालवत आहेस ?

"मी इथे इतके काम करते आहे. तरी सुद्धा मला त्रास कशाचाही वाटत नाही. मी कितीही काम केले तरी ते पाहून प्रसन्न होणारे आनंदी होणारे व गोड बोलणारे लोक इथे आहेत. त्यामुळे ते श्रम वाटत नाहीत" शांता म्हणाली,

"मग तुला काय वाटते मी तुझ्या कामाचे कधीच कौतुक करीत नाही की काय ? तुला काय ठाऊक तुझ्यावर माझे किती प्रेम आहे ते ?" बलभद्र म्हणाला त्यानंतर त्याने शांताला सांगितले की, तिला शोधायला आपण कुठे कुठे हिंडलो भयंकर जंगलात कसे अडकलो तेथे काय घडले. व इथे कसे पोहोचलो.

आपल्या पतीचा चेहरा पाहून शांताला समजले की बलभद्र खोटे बोलत नव्हता व खरेच घडलेले सांगत होता. तेव्हां ती थोडी शांत होत म्हणाली—"तरमग तुम्ही इथेच येऊन रहा. तेथील शेतभात विकून



टाकून आपण इथेच जमिन विकत घेऊ. तुम्ही शेतीची कामे करा. मी ह्या घरची कामे करीत राहीन. ह्या घरातील लोक खूप चांगल्या स्वभावाचे आहेत. आपल्या दोघांच्या कमाईच्या पैशांनी आपण आरामात आयुष्य घालवू.

"आता तर तुला दुसऱ्याच्या घरात काम करण्याची अजिबात जरूरी नाही ! आपल्या हातात आयते खूप धन आलेले आहे. त्याने आपण शहरात एक घर विकत घेऊ व तेथे राहू." बलभद्र म्हणाला.

बलभद्रचे बोलणे ऐकून शांताला आश्चर्य वाटू लागले. ती म्हणाली—"हे सगळे खोटे आहे. मला आपल्या

बरोबर नेण्याकरीता ह्या बनावाबनवीच्या गोष्टी सांगता आहात!"

"तर मग, स्वतःच्या डोळ्यानेच पहा!" असे म्हणत बलभद्रने जवळची थैली उघडून शांतांला दाखविली.

शांताने चकित होत म्हटले-"हे हिरे तुम्हांला कोठून मिळाले?"

"तू माझ्या चिडण्याचा राग राग करीत होतीस, परंतु त्या चिडण्यामुळेच तर ही संपत्ती माझ्या हाती आली. माझा राग पाहून घाबरून जाऊन मला हे हिरे व दागीने मिळाले आहेत."

आपल्या पतीचे बोलणे ऐकताच शांता घाबरून जात म्हणाली-"मी आता तुमचे काहीही ऐकून घेणार नाही. मी तुमच्या राग व चिडण्याने कंटाळून घर सोडून गेले. मनांत विचार केला होता की, थोड्या दिवसाने तरी तुम्ही समजुतीने आपला राग थोडा शांत कराल. परंतु अजुन तुम्ही तुमच्या रागावर विश्वास ठेवून आहांत. तेव्हां तुम्हांला रागावण्यापासून केव्हांही मुक्ती मिळणार नाही. मग मी तुमच्या बरोबर घरी येण्याचा प्रश्नच कुठे निघतो."

ह्यावर बलभद्र दुःखाने म्हणाला-"शांता तू घाईगडबडीत येऊन असा निर्णय घेऊ नकोस. कारण माझ्या रागामुळे माझ्या आयुष्याचे नुकसानच होवू शकते तू जसे समजते आहेस की, माझा रागावर विश्वास आहे तसे नाही. त्या वेळी माझ्या रागानेच मला संपत्ती मिळाली परंतु तसा माझा विश्वास नाही. चल,

त्यावरून शांतांला उलगडा झाला की, आपण घर सोडून निघून आल्याने आपला नवरा नक्कीच रागावर ताबा ठेवू शकत आहे. नाहीतर आपण इकडे निघून येण्याने व त्याच्याबरोबर परत जाणार नाही सांगितल्याने त्याने आपल्यावरं दुप्पट राग दाखविला असता तसे न होता. तो आपल्याला केविलवाणे विनवित आहे.

असा विचार येताच शांता त्याचक्षणी आपल्या नवऱ्या बरोबर आपल्या गावी जायला निघाली.





# हुषार नोकर

धर्मपुरीचा जमिनदार सोमेश्वर ह्याला नको तेवढी झोपण्याची संवय होती. ते रात्री झोपायला अंथरुणावर गेले की, त्यानां सकाळी उठवावेच लागत असे. ते अतिशय झोपाळू होते. त्यामुळे त्या त्या वेळी ती कामे त्याच्याकडून होत नसत. शेवटी त्यांना त्यामुळे अनेक संकटाना तोंड द्यावे लागत असे.

जमिनदाराने असा विचार केला की, आपल्याला वेळेवर उठवण्याकरीता एका माणसाला नियुक्त करावयास पाहिजे. ही गोष्ट त्याने आपल्या दिवाणजीला सांगितली. त्याच गावांतील अनंत नावाच्या माणसास ही गोष्ट दिवाणजीकडून समजली व त्याने दिवाणजीला त्या जागी आपले नांव सुचविण्यास सांगितले. दिवाणजी अनंतला घेऊन जमिनदाराकडे आला.

जमिनदाराने अनंतला पहात म्हटले-"उद्या सकाळी चार वाजता उठून मला नरसिंहपुरला जायचे आहे."

दुसऱ्या दिवशी सकाळी बरोबर चार वाजता अनंताने जमिनदाराला झोपेतून उठविले.

जमिनदार संध्याकाळी नरसिंहपुरहून घरी परत आला व अनंतला बोलावून म्हणाला-"मी पहाटे लवकर उठून गेलो. म्हणून माझी सर्व कामे पूर्ण झाली. बघ," असे म्हणत त्याचे कौतुक केले व म्हणाले-"उद्या सकाळी मला जगन्नाथपुरला जायचे आहे, तेव्हां मला तू बरोबर पांच वाजता झोपेतून उठव."

जमिनदाराने सांगितल्या प्रमाणे अनतने बरोबर पाच वाजता त्यांना उठविले.

त्या दिवशी संध्याकाळी जमिनदार जगन्नाथपुरहून परत आले व अनतला

म्हणाले–"तुला कामाला लागून आज दोन दिवस पूर्ण झाले. आज हा महीना पूर्ण होत आहे. उद्यापासून दुसरा महिना सुरू होत आहे. त्यामुळे ह्या दोन दिवसाचे तुला चाररूपये देतो व पुढच्या महिन्यापासून तुला साठ रुपये पगार देईन" सांगत जमिनदाराने त्याच्या हातावर चार रुपये ठेवले.

त्यानंतर जमिनदार घरात निघून गेले. थोड्यावेळाने कपडे बदलून ते दाराच्या उंबरट्यावर येऊन उभे राहिले. तेव्हां त्यांनी अनंतला दुसऱ्या एका तरुणाला दोन रुपये देत असतांना पाहिले. त्यांनी आश्चर्य वाटून त्याला विचारले–"तो तरुण कोण? तू त्याला दोन रुपये कां देत होतास?"

अनंत ते ऐकून घाबरून गेला व भीतभीत म्हणाला–"साहेब! तसे काही नाही, तो....तो....तर...."

जमिनदार रागावले व चिडून म्हणाले–"खरे काय ते सांगायला घाबरतोस कां?

अनंतने थरथरंत कांपऱ्या आवाजात म्हटले–"मालक, आपण मला मागेच दोन दिवस बरोबर वेळी उठवायला सांगितले होतेत. त्या वेळे आधी ह्या तरुणाने मला उठविले. त्यामुळे मला त्याला दोन रुपये देणे भाग पडले.

ते उत्तर ऐकून जमिनदाराला समजले की, अनंत सुद्धा आपल्या सारखा झोपाळू आहे. परंतु त्याच्या अक्कल हुषारीचे त्यांना मनापासुन कौतुक वाटले ते हसत म्हणाले–"अरे अनंत, उद्या पासून तुला बागेचे काम देतो. तुझा पगार तोच राहिल." नंतर त्या नविन तरुणाकडे वळत म्हणाले–"अनंत दोन दिवसांपासून जे काम करतो ते तुला आवडले कां?"

नविन तरुणाने आनंदाने मान डोलावली. तेव्हां जमिनदाराने त्यांच्या चेहऱ्याकडे निरखून पहात म्हटले–"ह्यावेळी अनंत जवळून तू जे दोन रुपये घेतलेस. त्यात आणखी कोणाचा हिस्सा नाही नां?"

त्या नविन तरुणानी जमिनदाराची हुषारी ओळखली व म्हटले–"मालक, हे दोन रुपये पूर्णपणे माझेच आहेत."






सतीदेवी नंदीला घेऊन यज्ञशाळेजवळ पोचली. तेव्हां तिच्या आईने व भावांनी पुढे येऊन तिची विचारपुस केली आईने मुलीला एका बाजूला बोलावून नेऊन समजावून सांगितले, "मुली, तुझे वडील वृद्ध झाले आहेत. म्हणून तापटपणाने तुझ्या पतीची निंदा करतात पण तू तिकडे दुर्लक्ष कर."

मुलीला पहाताच दक्षाला शंकराची आठवण झाली. रागाने तो सतीला म्हणाला–"काय ग! तुझा नवरा स्मशानात राहतो. भूतपिशाच त्याचे अनुयायी, तो कपाल धारण करतो. म्हणून अपवित्र झाला आहे. यज्ञयागादि पवित्र कार्यास निमंत्रण करण्यालायक पण राहिला नाही. तू कशाला आलीस येथे, आमच्या या यज्ञशालेला अपवित्र करायला?"

ते ऐकून सती आपल्या वडिलांना म्हणाली–"तु यज्ञकर्ता असून शंकराला हविभाव दिल्याशिवाय यज्ञ करीत आहेस आणि उलट त्यांची निंदा करतो आहेस? अजून सांगते त्यांना आदर पूर्वक निमंत्रण पाठवून यज्ञभाग देऊन त्यांचा उचित सत्कार कर. नाहीतर तुझा यज्ञ अपूर्ण राहील व तुझा सर्वनाश होईल." सतीने पित्याला असा सल्ला दिल्यावर सभेत उपस्थित असलेल्या भृगु आदि मुनींनी दक्षाला तसे करण्यास सुचविले. परंतु दक्ष जास्तच संतापला आणि म्हणाला–"तु चालती हो येथून. तु आल्याने माझा



यज्ञ अपवित्र झाला तू स्वतः होऊन येथून निघून गेली नाहीस तर धक्के मारून तुला बाहेर काढावे लागेल."

आता मात्र सतीला राहवले नाही. तिला देखील भयंकर राग आला पतीने जाऊ नकोस असा सल्ला दिला असूनही ती यज्ञाला आली होती. अशा तऱ्हेने अपमानित होऊन परत पतिगृही जाणे तिला मुळीच आवडले नाही. पुढल्या जन्मी हाच पती लाभावा अशी प्रार्थना करून तिने योगबलाने आपल्या देहातच अग्निज्वाला निर्माण करून त्यात स्वतःचा बळी दिला.

ते दृश्य पाहून नंदी वगैरे हाहाकार करीत यज्ञशालेत शिरले. तेव्हां भृगु आदिकांनी अभिचार नावाचा यज्ञ करून त्यांना मंडपा बाहेर काढले.

नारदाकडून शंकराला सतीच्या आत्मबलिदानाची गोष्ट कळली त्याला भयंकर राग आला. त्याने क्रुद्ध होऊन आपल्या डोक्यातली एक जटा उपटली व ती पर्वतावर आपटली. त्या जटेतून वीरभद्र व भद्रकाली उत्पन्न झाले. वीरभद्रला सहस्त्र बाहु व लांब लांब दात होते. तो कोटी सूर्या एवढा तेजस्वी होता. अशा रौद्र रूपे त्याने शंकराला प्रणाम करून म्हटले– "प्रभो! आज्ञा करावी!"

"तुम्ही दोघे, तू व भद्रकाली आपल्या गणासह जाऊन दक्षाचा यज्ञ उध्वस्त करा व या यज्ञात भाग घेणाऱ्यांस उचित दंड द्या." शंकर म्हणाला.

वीरभद्र सिंह जुंपलेल्या रथात बसून नंदी, भैरव आदि गणांना बरोबर घेऊन निघाला. भद्रकाली सिंहावर बसून महाकाली, गौरी, कात्यायनी, चामुंडा इत्यादि गणांना बरोबर घेऊन निघाली.

दक्षयज्ञ ध्वंस करण्याची शंकराकडून आज्ञा मिळताच वीरभद्र व भद्रकाली आपल्या गणासह निघाले. त्याचवेळी दक्षाचा यज्ञ ज्या जागी होत होता त्याच्या जवळपासच्या प्रदेशात काही अघटित गोष्टी घडल्या विजा पडल्या, रक्ताची



वृष्टी झाली, आकाशातून साप, विंचू व निरनिराळे विषारी जंतु पडू लागले.

वीरभद्र व भद्रकाली तेथे येऊन पोहोचले तर सर्वांची पळापळ सुरू झाली. पळणाऱ्यांना अडवून दोघांनी पकडून ठार मारायला सुरवात केली. वीरभद्राने आपल्या मुख्य मुख्य अनुचरांसह यज्ञशालेत प्रवेश केला. आत बसलेल्या देवांना व ऋषींना त्याने मारहाण सुरू केली. दक्षाला पहाताच त्याला शंकराचा जो अपमान झाला होता तो आठवला. त्याने दक्षाचे डोके छाटून व ते होमकुंडात फेकून दिले.



त्यांनी होमकुंडात पाणी ओतले व यज्ञाची सर्व सामुग्री नष्ट भ्रष्ट करून टाकली. अशा तऱ्हेने शंकराच्या इच्छेप्रमाणे यज्ञाचा ध्वंस पूर्ण झाला. त्यानंतर वीरभद्र व भद्रकाली कैलास पर्वतावर परतले. तेव्हां शंकराचा क्रोध थोडा शांत झाला.

वीरभद्र वगैरेंनी ज्या ऋषीमुनींना व देवांना वडविले होते. ते ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्यांनी त्यांच्यावर जो अत्याचार झाला होता तो निवेदन केला. ब्रह्मदेव त्यांना घेऊन वैकुंठ लोकी विष्णूकडे गेला. आणि दक्षयज्ञ कसा ध्वंस झाला हे सांगितले नंतर सर्व मंडळी तेथून कैलास पर्वतावर गेली. त्यावेळी शंकर ध्यानमग्न होऊन बसला होता. वीरभद्र व त्याचे अनुचर गण शंकराच्या चारी बाजूला पहारा देत बसले होते. त्याची ध्यान धारणा संपताच त्याने पाहिले.

शंकराने समाधी समाप्त होताच ब्रह्मदेव विष्णु व इतर मंडळींना बसायला सांगितले.

विष्णूने हात जोडून शंकराजवळ विनंती केली–"हे सदाशिवा! आपला क्रोध व दुःख आता विसर! तुझ्याशी द्वेष करून दक्षाने तुझा अपमान केला व त्याची फळे त्याला भोगावी लागली. परंतु एक गोष्ट विसरून चालावयाचे नाही दक्षाने



आरंभिलेला यज्ञ पुरा झाला नाही तर वृष्टी होणार नाही. आणि दुष्काळ पडेल म्हणून तू स्वतः दक्षाला पुन्हां जिवंत करून तो यज्ञ त्याच्याकडून पुरा कर. एवढीच आमची तुला कळवळून विनंती आहे.

शंकराने विष्णूची ती विनंती मान्य केली. आणि म्हणाला–"आता आपण सर्व मिळून हा यज्ञ पुरा करण्याच्या कामाला लागू या. नंतर त्याने वीरभद्राला बोलावून शंकर म्हणाला–" उत्तरेकडे जा, आणि उत्तरेकडे जो कोणी डोके करून झोपला असेल त्याचे डोके कापून घेऊन ये."

वीरभद्र त्याप्रमाणे उत्तरेकडे गेला त्याला एका जागी एक बकरा उत्तरेकडे डोके करून झोपत असलेला दिसला. त्याने त्याचेच डोके कापून शंकराला आणून दिले.

शंकर व इतर देव यज्ञमंडपात गेले. शंकराने बकऱ्याचे डोके दक्षाच्या धडावर ठेवून त्याला जिवंत केले. त्याच्या करवी वैदिक रीतीने यज्ञ पुरा करण्यात आला. यावेळी दक्षाने शंकराला यज्ञभाग घेण्यास विनंती केली. त्यानंतर त्याला आपली चुक आठवली. शंकराची क्षमा मागून तो म्हणाला–"मी तुझे महत्व न ओळखून तुला यज्ञात भाग घेण्यासाठी निमंत्रण पाठविले नाही. त्याबद्दल क्षमा कर. मी तुझी निंदा केली. त्याचे फळ मला मिळाले तुझ्या कृपेने मी जिवंत झालो. व यज्ञ पुरा झाला."

शंकराने दक्षाला क्षमा केली व म्हणाला–"दक्षा! विनाकारण कोणतीही गोष्ट घडत नसते मी तुझ्या सर्व अपराधाबद्दल क्षमा केली आहे. आता तू पाहिजे तो वर मागून घे!"

तेव्हां दक्ष व त्याची पत्नी प्रसुती ह्या दोघांनी मिळून एक वर मागितला म्हणाले–जा जागी हा यज्ञ पूर्ण झाला त्या जागेला दक्ष वाटिका हे नाव मिळावे. त्या जागी शंकराचे एक देऊळ बांधण्यात यावे."

शंकराने होकार देऊन वीरभद्र व भद्रकाली दोघांना आज्ञा केली की, त्यांनी त्या प्रदेशाच्या दक्षिण दिशेला गौतमी नदीच्या कांठी आपल्या गणासह जाऊन निवास करावा. नंतर त्यांनी भद्रकाली सह वीरभद्राला गणाधिपति केले आणि सतीचा देह घेऊन ब्रह्मदेव आणि विष्णूबरोबर कैलासाला प्रस्थान केले. ब्रह्मदेव व विष्णूने आणि इतर देवांनी शंकराचा निरोप घेतला. आणि आपापल्या निवासस्थानी परत गेले. सतीचा देह बाजूला ठेवून शंकर तपश्चर्या करू लागला.

दक्षाच्या मुलींपैकी एकीचे नाव स्वधा असे होते. ती पितृदेवांची पत्नी झाली. मेनका, धन्या व कलावती नामक तिला तीन मुली झाल्या. तिघी मुली सुंदर होत्या. त्या तिन्ही लोकात विहार करीत स्वेच्छेने सर्वांची इच्छा पूर्ण करीत.

एकदा त्या तिघी विष्णु व लक्ष्मी यांच्या दर्शनास गेल्या. त्यांनी नृत्य व गान करून त्यांना प्रसन्न केले आणि विष्णु व लक्ष्मी बरोबर बोलत बसल्या असता ब्रह्मदेवाचे मानसपुत्र सनकसनंदन आदिक तेथे आले. त्यांना येत असलेले



पाहून विष्णुसहित सर्व त्यांच्या स्वागतार्थ उठून उभे राहले. सर्वांनी त्याना नमस्कार करून त्यांना बसण्याची विनंती केली. परंतु मेनका धन्या व कलावती उठून उभ्या राहल्या नाहीत.

ते पाहून सनत्कुमाराला राग आला आणि त्याने शाप दिला–"तुम्हाला स्वतःच्या सौंदर्याचा गर्व आहे तर जा, मृत्यु लोकात जाऊन भूलोकवासियांशी विवाहादी करून तेथेच निवास करा."

तेव्हां मेनका आदिकांना पश्चाताप झाला त्यांनी सनत्कुमारांचे पाय धरून त्यांची क्षमा मागितली व म्हणाल्या–"हे मुनीश्वर अज्ञानाने आमच्या हातून



ही चूक घडली म्हणून आम्हांला माफ करून शापमुक्त करावे."

ते ऐकून सनकसनंदनादिक म्हणाले– "गर्वाचे प्रायश्चित्त गर्वत्याग असते. आता शापमुक्तीची गोष्ट म्हणाल तर या शापाचा परिणाम जगत्कल्याणच आहे."

पुढे या तिघींचे विवाह अवतार पुरूषांशीच झाले. मेनकेची मुलगी पार्वती हिचा शंकराशी विवाह झाला. राजा व धन्वा यांची मुलगी सीता तिचा विवाह श्री रामचंद्राशी झाला. वृषभ व कलावतीची मुलगी राधा, हिचा विवाह श्रीकृष्णाशी झाला.

ते कळल्यावर तिचा बहिणींना आनंद झाला आणि तिघी विष्णूचा निरोप घेऊन निघून गेल्या.

हिमालय प्रदेशाचा राजा हिमवान हा फार सुंदर होता. तो हिमालय पर्वतावर तपश्चर्या करण्याऱ्या ऋषी मुनींच्या आश्रमात जाऊन नित्यनियमित पणे त्यांची विचारपुस करी. म्हणून त्यांनी त्याचा विवाह मेनकाशी करून दिला.

एकदा हिमराजाकडे ब्रह्मदेव व विष्णु आणि इंद्रादिक देव आले. हिमवानाने त्यांची सर्व प्रकारे स्वागत करून येण्याचे कारण विचारले.

सर्वदेवांनी हिमवानाला हात जोडून निवेदन केले–" तारकासुराचा अत्याचार दिवसेंदिवस किती वाढत चालला आहे. त्याचा वध करणे आवश्यक आहे. ते सामान्य स्त्रीच्या पोटी जन्मलेल्या मुलाकडून होणे शक्य नाही. आपणास हे देखिल माहीत आहे की, महाशक्तिने सतीरूपे दक्षाच्या पोटी जन्म घेतला होता. परंतु दक्षयज्ञाच्या वेळी सतीने देहत्याग केला. आता शंकर त्या दुःखामुळे विरक्त झाला आहे. महाशक्तीने पुन्हा जन्म घेऊन तिच्या पोटी त्याचा संहार करण्यासाठी पुत्र होई पर्यंत त्या राक्षसाचा वध होणे शक्य नाही. म्हणून आपण व

मेनका दोघानी विवाह् बद्ध होऊन तपश्चर्या करावी. म्हणजे महाशक्ती आपल्या पोटी जन्म घेईल."

त्यानंतर ब्रह्मा विष्णु, इन्द्र इत्यादिकांनी विन्ध्य पर्वतावर जाऊन तेथे तपश्चर्या करणाऱ्या महादेवीला भक्तिपूर्वक नमस्कार करीत तिचे स्तुतीगान सुरू केले.

सर्व पर्वत शिखरांचा मुकुट धारण केलेली हाजारो हात असून त्रिशुळ वगैरे आयुधे धारण केलेली अशा महादेवीने त्यांना प्रकट होऊन साक्षात दर्शन दिले. तेव्हां ब्रह्म वगैरे इतर देवानीं हात जोडत तिला निवेदन केले–"हे देवी तू दक्षाच्या मुलीच्या रूपाने जन्म घेतलास व सतीच्या नावाने शंकरा बरोबर विवाह् केलास व दक्षानी केलेल्या अपमानाच्या सुडासाठी स्वतः देहत्याग केलास. तेव्हां शंकर तुझ्या विरहामुळे विरक्त बनले आहेत त्यामुळे तारकासुरा सारख्याक्रुर राक्षसांच्या त्रासाला सर्वांना बळी पडावे लागत आहे. त्यामुळे तू आता मेनका व हिमवानाच्या पोटी पार्वती नावाने जन्म धारण करून शंकराबरोबर विवाह् करून तारकासुरा-पासून सर्वांचे रक्षण कर.

महादेवीने त्यांना तसे वचन दिले व ती अदृश्य झाली.

तेव्हां मेनका व हिमवान ह्यांनी ब्रह्म इत्यादीच्या सांगण्यानुसार तपश्चर्या करण्याचा निश्चय केला. चैत्र शुक्ल प्रथमे पासून तपश्चर्येला प्रारंभ झाला. तो सत्तावीस सप्ताहापर्यंत चालू होता. तेव्हां त्यांच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन देवीने त्यांना दर्शन दिले व वर मागण्यास सांगितले.

मेनका व हिमवानाने निवेदन करीत म्हटले–"हे देवीमाते, आम्हांला बलवान पराक्रमी गुणसंपन्न असे शंभर मुलगे दे. व आमच्या पोटी मुलीच्या रूपाने जन्म धारण करून जगाच्या कल्याणाकरीता शंकराबरोबर विवाह् करून आम्हांला शाश्वत रूपाने यक्षाचे भागीदार कर.

देवीनी त्यांची मनोकामना पूर्ण होण्याचा वर दिला. ती अंतर्धान पावली.





# ससाण्याची साक्ष

बगदाद शहराला लागून असलेल्या जंगलात एक डाकू रहात होता. तो तरूण शक्तिशाली होता. तो वेगाने पळत असे. विजेच्या गतीने तलवार चालवित असे.

त्याच्या जंगलातील घराजवळच्या रस्त्याने कोणीही जाऊ लागले. तर तो अचानक त्याच्यावर हल्ला करे व त्याच्या जवळील जी काही वस्तु असेल ती घेऊन त्यांना मारून टाके.

एके दिवशी संध्याकाळी एक म्हातारा वाटसरू त्या रस्त्याने जाऊ लागला. तो दुसऱ्या गावचा रहाणारा होता.

तो येत आहे पाहून डाकू झाडापाठीमागे लपून बसला. व तो समोर येताच उडी मारून त्याच्या समोर येऊन उभा राहिला. व आपली तलवार उगारीत त्याला दरडावत म्हणाला–"अरे म्हाताऱ्या आता तुझे मरण जवळ आले समज!"

भीतीने थरथर कांपत म्हातारा दिनवाणे त्याला म्हणाला–"अरे तरूण मुला, ह्या पिशवीत जे काही धन आहे ते मी माझे पूर्ण आयुष्यभर कष्ट करून मिळविलेले आहे. माझी बायको मरण पावली माझी एकुलती एक मुलगी ह्या जवळच्या शहरात रहाते. मी तर आता म्हातारा झालो आहे. जे काही माझे आयुष्य उरले आहे ते मुलीकडे जाऊन घालवावे म्हणतो. म्हणून तू ह्यातले अर्धे धन घे व अर्धे माझ्याकरीता ठेव."

म्हाताऱ्याचे बोलणे ऐकून डाकू भयंकर क्रुरचेहरा करीत अट्टाहासाने म्हणाला– "ही माझी पद्धत नाही. वाटसंरूजवळ जे काही असेल ते सारेच्या सारे लुटणे हा माझा रीवाज आहे."

म्हातारा या त्रासाला कंटाळून असहाय्य अवस्थेत कळवळून त्याला म्हणाला–"ठिक



आहे. मी असहाय्य आहे. तेव्हां तू माझे सर्व धन घे व मला माझ्या वाटेने जाऊं दे.''

त्या दरोडेखोराने त्याचे सर्व धन लुबाडले व भयंकर हास्यध्वनी करीत त्याला म्हणाला–''मी तुला जिवंत सोडून देऊं कां? हे या जन्मी शक्य नाही. मी तुला मारूनच टाकणार.''

''अरे बाळा, तू हे काय म्हणतो आहेस! मी तर माझे सारे धन तुला देऊन टाकले. तरी सुद्धा तू मला कां मारणार? म्हातारा आश्चर्यचकित होऊन विचारू लागला.''

''लुबाडल्यानंतर वाटसरूला ठार मारणे हीच माझी पद्धत आहे'' असे म्हणत त्याने आपली तलवार उगारली.

म्हातारा ते पाहून थरथर कांपू लागला. त्याला आजूबाजूला माणूस दिसला नाही.

त्यानंतर त्याने गुडघ्यात वाकून देवाची प्रार्थना केली व डोके वर उचलले. तेवढ्यात त्याला आकाशातून एक ससाणा उडत जात असलेला दिसला.

म्हाताऱ्याने कर्कश आवाजात ओरडून म्हटले–''हे ससाण्या, तूच ह्या अत्याचाराची साक्ष आहेस. हा दरोडेखोर निर्घृणतेने मला मारून टाकणार आहे. मी काहीही वाद न घालता ह्याला माझे सारे धन देऊन टाकले. तरी सुद्धा माझ्यावर दयाभाव न दाखविता हा मला मारून टाकतो आहे.''

म्हाताऱ्याचे बोलणे पूर्ण व्हायची वाट न पहाताच दरोडेखोराने म्हाताऱ्याचे डोके धडापासून वेगळे केले.

काही दिवस उलटले. तो लुटेरा वाटसरूचे धन लुटून लुटून श्रीमंत बनला. व त्याच्या मनात किर्ती यश मिळवायचा लोभ उत्पन्न झाला. म्हणून त्याने जंगलातले आपले वास्तव्य सोडले व तो शहरात येऊन राहू लागला. त्याने तेथे आपले घर बांधले. त्या नगरातील सुलतानाला बुद्धीबळ खेळण्याचा भयंकर नाद होता. त्यामुळे त्या डाकूची व सुलतानाची आपोआप ओळख झाली.



ती ओळख हळूहळू मैत्रीत बदलली. डाकू सतत सुलतानाकडे खेळायला येऊ लागला. व दोघे मिळून दारू व खाणेपीणे एकत्र करू लागले. अशावेळी तो दरोडेखोर सुलतानाला आपल्या पूर्वीच्या घटना नेहमी रंगवून सांगत असे.

डाकू आता एक श्रीमंत माणूस होता. त्यामुळे सुलतानाला त्या गोष्टी ऐकून सुद्धा गप्पच बसावे लागत असे.

एके दिवशी रात्री असेच ते दोघे बसून दारू पित असतांना डाकूनी नको तितकी दारू प्याली. त्याच वेळी सुलतानाच्या नोकरांनी त्याच्या समोर ससाण्याचे भाजलेले मांस एका थाळीत त्यानां खायला आणून ठेवले ते पहाताच डाकू खदखदून हसू लागला.

सुलतानाला ते विचित्र हसणे पाहून आश्चर्य वाटले व त्याने विचारले–''तू पोट धरधरून कां हसतो आहेस? शिजवण्यात काही कमी पडले कां? कां नोकरांनी आणून ठेवण्यात काही चूक केली.''

''हुजूर! तसले काही कारण नाही! तसे काही नाही....''

तो जिभ अडखळत बोलू लागला. मग असे हसण्याचे काय कारण? सुलतानाने परत विचारले.

डाकू क्षणभर गप्प बसला. नंतर त्या थाळीतील मांस पाहून म्हणाला–''हे ससाण्याचे मांस पाहून मला माझी पूर्वीची घडलेली गोष्ट आठवली. जंगलातील रस्त्याने एक म्हातारा वाटसरू जात



असतांना मी त्याला लुटले. लुटल्यानंतर त्याला वाटले मी त्याला जिवत सोडून देईन. परंतु मी तलवार उगारल्या बरोबर त्याला भीती बरोबर आश्चर्य सुद्धा वाटू लागले. तो इकडे तिकडे भिरभिरत्या नजरेने पाहू लागला. परंतु त्याच्या नजरेस कोणीही पडले नाही. त्याने मानवर करून आकाशाकडे पाहिले तेव्हां त्याला एक ससाणा उडत असलेला दिसला. त्याला ओरडत तो म्हणाला–"ह्या हत्येचा तुच एक साक्ष आहेस!" काय तुम्ही कधीतरी ऐकले आहात कां कोणताही मनुष्य पक्षाला साक्षी बनवतो." असे म्हणत डाकू खदखदून हसू लागला.

सुलतान विचारमग्न झाला नंतर त्याने चिमटीत ससाण्याचे मांस उचलून धरत म्हटले–"ओहो ससाण्या, तू त्या म्हाताऱ्याने साक्षी ठेवलेला ससाणा तर नाहीस नां! तोच जरी नसलास तरी त्याचा दूरचा नातालग तरी नक्कीच आहेस."

सुलतानाचे डोळे रागाने लालबुंद झाले. तो अत्यंत क्रोधाने ओरडत म्हणाला– "तुझे हसणे एकदम बंद कर."

"तू तुझे खाणे प्रथम पूर्ण कर तू निर्दयतेने ज्या म्हाताऱ्याला ठार मारले आहेस. त्याचीच साक्ष देण्याकरीता हा ससाणा आला आहे. मरण्याच्या वेळेस त्याच्या मनांत ह्या ससाण्या विषयी जो आत्म विश्वास होता. त्याला मी मानतो." सुलतान म्हणाला.

डाकू थरथरू लागला त्याने एक रोटीचा तुकडा हातात घेऊन तोंडात घातला. नंतर मरण्याच्या भीतीने तो काही खाऊ शकला नाही.

सुलतानाने आपल्या शिपायांना बोलावले व डाकूला दाखवत हुकूम सोडला–"ह्या क्रुर श्वापदाला घेऊन जाऊन त्याचा शिरच्छेद करा.

डाकूचा शिरच्छेद करण्यात आला. अशा तऱ्हेने म्हाताऱ्याने मरते समयी जी ससाण्याची साक्ष मागे ठेवली ती ऐन वेळी उपयोगाला आली.





# नष्ट होत जाणोर प्राणी

निसर्गाने अनेक विचित्र अशा पशु पक्ष्यांची सृष्टी केली आहे. त्याच प्राण्यांची जर मानवाने योग्य रक्षण काळजी व केली नाही तर काळामानाप्रमाणे ते पशुवपक्षी नाहीसे होऊ लागतील.

पूर्व शताब्दीच्या सुमारास मध्य भागातील उत्तरी अमेरीकामध्ये प्रत्येक भोजन-समारंभाच्या वेळेस एक विशेष प्रकारचे आकर्षण असे ते म्हणजे प्यांसेंजर पीजियन नावाचे एक प्रकारच्या कबुतराचे मांस. कबुतरे फांद्यांवर थव्यांच्या रूपाने रहात. मिचिगन् किंवा पेनसिलानिसा ह्या देशात एका वर्षांच्या आत दिड करोड कबुतरे खाद्याकरीता मारली गेली.

अशा तऱ्हेने कबुतरांच्या नष्ट होण्या सारखेच इतर अनेक पशु व पक्षांच्या जाती मारल्या जातात. आज मिती पर्यंत माणसांनी दोनशे जातीचे प्राणी व एकशे साठ प्रकारचे पक्षी ह्यांचा नायनाट केला आहे. सिनसिनारीच्या प्राणीसंग्रहालयात त्यापैकी एकच जातीचा पक्षी आज जिवत आहे. ते कबुतर सुद्धा १९२४ मध्ये मरण पावले. सध्याच्या स्थितीत दोन हजार जातींचे प्राणी व वीस हजार जातीची झाडे सुद्धा नष्ट होण्याच्या स्थितित आहेत. अशा प्रकारे नष्ट होणाऱ्या प्राण्यामध्ये तिमिंगलचा विशेष रूपाने उल्लेख केला जातो.

क्युबा किंवा दक्षिण अमेरिका येथे एका काळी रेशमी केस असलेली वानरे नाहीशी होऊ लागली आहेत. बोर्नियोच्या ओरंगटांग नावाच्या शेपटी नसलेल्या वानरांची व दक्षिण अमेरिकेच्या जागूर नावाच्या चित्यांची सुद्धा अशीच दयनिय अवस्था होऊ लागली आहे.

अरेबियन ओरिकस नावांच्या प्राण्यांच्या रक्षणाकरीता अरिजोनच्या पोनिकस नावाच्या प्राणिसंग्रहालायात योजना नाहीश्या होणाऱ्या हवायनीनी जातीच्या बदकांचा शोध लाऊन सरपीटर स्काट ने लिमाब्रीजच्या जवळ त्याच्या रक्षणाकरीता प्रबंध केला आहे.





# महानुभूति

चैतन्यनी आपले शिक्षण पूर्ण होताक्षणीच कोणतेही कष्ट न घेता शहरात एक चांगली नोकरी प्राप्त केली. तो एक भाड्याची गाडी करून ऑफिसमध्ये जा ये करू लागला.

म्हाताऱ्या कोताऱ्याबद्दल चैतन्यच्या मनात अत्यंत आत्मीयता होती. तो आपल्या भाड्याच्या गाडीच्या गाडीवान मंगलदासला दरमहा पंन्नास रुपये भाडे देई. गाडीतून ऑफिसमध्ये जायच्या वेळेस तो हटकून नेहमी मंगलदासला विचारीत असे–"मंगलदास तुमचे दोन्ही मोठे मुलगे थोडे फार कमावतात. अशा स्थितीत तुम्ही हे कष्ट कां करता? घरात बसल्या आराम कां करीत नाहीत ?"

मंगलदास हसून म्हणत असे–"दादा, मला माझ्या मुलांनी कमावलेला पैसा परका वाटतो. जो पर्यंत अंगात बळ आहे. तोपर्यंत स्वतःच्या कमाईवर जगणे ह्या सारखा आनंद कशात नाही.

चैतन्यच्या वडिलांनी त्याला स्वतः कष्ट मेहनत करून शहरात शिकावयास पाठविले होते. त्याची आठवण करून तो नेहमी दुःखीकष्टी होत असे. तेव्हां ते आपल्या मुलाला दिलासा देत म्हणत–"बाळा, तू ज्या दिवशी पैसा मिळवू लागशील नां! त्याच दिवशी मी माझे सारे काम सोडून देऊन आरामाने घरात बसू लागेन!"

परंतु चैतन्यने आपले शहरातील शिक्षण संपवून जेव्हां कामधंदा शोधण्यास सुरवात केली. तेव्हांच अचानक त्याचे वडिल आजारी पडले. व त्याला जेव्हां नोकरी मिळाली. तेव्हां एका आठवड्यात त्यांचा देहान्त झाला. त्यामुळे चैतन्य दुःखी होई की आपण आपल्या वडीलांना थोडे दिवस सुद्धा सुखात ठेवू शकलो नाही.



चैतन्य ज्या वाटेने नेहमी ऑफिसला जाई त्या रस्त्याच्या चौकाच्या कोपऱ्यात एक सत्तर वर्षाचा म्हातारा एका टोपलीत भजी वडे पकोडे घेऊन विकावयास बसत असे. संध्याकाळी घरी जातांना सुद्धा तो म्हातारा त्याला टोपलीच्या मागे आडवा झालेला दिसे. तो दिवसभर उन्हात बसे ती कल्पना करूनच चैतन्यला त्याची खूप दया आली.

परंतु पुढचे दहा दिवस ओळीने तो म्हातारा माणूस दिसला नाही. तेव्हां चैतन्यच्या मनांत आले की, तो बहुदा मेला असावा परंतु अकराव्या दिवशी तो माणूस त्याला भजी विकत असतांना दिसला. ते पाहून त्याच्या आनंदाला पारावार उरला नाही. चैतन्यने आपल्या गाडीवान मंगलदासला गाडी थांबवण्यास सांगितले. व त्या म्हाताऱ्यापाशी जात म्हणाला–"म्हातारे-बुवा, दहा दिवस झाले. परंतु तुम्ही दिसला नाहीत काय झाले ?"

एका अपरिचित माणसाच्या तोंडून आपुलकीचे बोलणे ऐकून त्या म्हाताऱ्याला अत्यंत आनंद झाला. तो डोके हलवत हलक्या आवाजात म्हणाला–"साहेब, मी दहा दिवस तापाने आजारी होतो. खर म्हणायचे तर मृत्युच्या दाढेतूनच कसाबसा वाचलो."

म्हाताऱ्याचे बोलणे ऐकून त्याने कळ वळून त्याला विचारले–"बुवा, ह्या सगळ्या वस्तू विकल्या गेल्या तर तुम्हांला रोज किती पैसे मिळतात ?"

"चार रुपये ! त्यातून मला एक रुपया फायदा होतो !" म्हातारा त्याला म्हणाला.

"तर मग, त्या सर्व वस्तू तू मला दे. मी तुला पांच रुपये देतो." चैतन्य म्हणाला.

म्हाताऱ्याला आश्चर्य वाटले तो त्याच्या कडे पहातच राहिला. चैतन्यनी सर्व वस्तू नेऊन गाडीत ठेवल्या. व म्हाताऱ्याला पांच रुपये दिले व गाडीत बसला.

मंगलदासने चैतन्यला विचारले–"साहेब, ह्या सर्व वस्तू घेऊन जाऊन तुम्ही काय करणार ?"

"तुझ्या शेजार पाजाऱ्यांच्या मुलांना वाटून टाकेन." चैतन्यने उत्तर देत म्हटले.

दुसऱ्या दिवशी जेव्हां गाडी चौकात आली चैतन्यने पुन्हां त्या म्हाताऱ्याला पांच रुपये देऊन त्याच्या सर्व वस्तु घेतल्या.

तिसऱ्या दिवशी सुद्धा तेच, तेव्हां मंगलदासने विचारले–"साहेब, तुम्ही किती दिवस पांच रुपये देऊन त्या वस्तू खरेदी करणार ?"

जो पर्यंत हा म्हातारा जिवंत आहे तोपर्यंत ? चैतन्यने उत्तर दिले.

परंतु चैतन्य जेव्हां म्हाताऱ्याजवळ गेला. तेव्हां म्हातारा हात जोडत त्याला म्हणाला–"साहेब, रोज माझ्या सर्व वस्तू विकत घेऊन मला संकटात पाडू नका. माझ्या सर्व वस्तू तुम्ही विकत घेता त्यामुळे मी घरी लवकर पोहोचतो. माझ्या मुलाला ते सहन होत नाही. मग तो दिवसभर माझ्याकडून काही नां काही तरी काम करून घेतो. काल दुपारी भर उन्हांत मला लाकडे फोडावी लागली.

म्हाताऱ्याचे बोलणे ऐकून चैतन्यला खूप आश्चर्य वाटू लागले. त्याच बरोबर अत्यंत दुःख झाले. कारण आपल्या मुला कडून सुखाची आशा करणारा आपला पिता अशी संधी येताच मरण पावला. तशी संधी आली तरी मंगलदास त्याचा फायदा घेत नव्हता. इथे तर अगदीच उलटी स्थिती होती. म्हाताऱ्याकडून त्याचा मुलगा कष्टांची अनेक कामे करून



घेत होता. त्यामुळे म्हाताऱ्याला दिवसभर उन्हांत बसून खाण्याच्या वस्तू विकण्यातच जास्त आनंद वाटत होता !"

चैतन्यनी निश्चय केला त्याच्या मुलाला चांगलाच धडा शिकविला पाहिजे. त्याने म्हाताऱ्याला विचारले—"बाबा, तुम्ही माझ्या घरी चला ?" तेथे तुम्हांला खाण्यापिण्याची अजिबात काळजी करण्याची जरूर नाही ?"

म्हातारा म्हणाला—"साहेब, माझ्या मुलाला ते खपणार नाही.

"त्याची तू अजिबात काळजी करू नको. चल, गाडीत बस !" असे म्हणत चैतन्यने म्हाताऱ्याला खांद्याला धरून गाडीत बसविले.

त्याचा मुलगा शोध काढत दुसऱ्या दिवशी चैतन्यच्या घरी येऊन पोहोचला.

चैतन्यने त्याच्या मुलाची चांगली कान उघाडणी केली—"अशा म्हातारपणाच्या काळात वडीलांना सुखी ठेवण्याच्या बदली तू आपल्या वडीलांच्या हातची कमाईची आशा करतोस.

म्हाताऱ्याचा मुलगा संकोचाने म्हणाला— "बाबा साहेब, मी असा अप्पलपोटी नाही. मी त्यांच्या कमाईतून त्यांच्याच खाण्याचा व कपड्याचा खर्च करतो."

"ओहो, असेच जर असेल तर त्यांच्या खाण्यापिण्या कपड्यालत्त्याचा खर्च मी करून त्यांना इथे ठेवून घेतो. तुझी तर काही हरकत नाही ना ?" चैतन्यनी विचारले.

म्हाताऱ्या बुवाचा मुलगा बापाचा चेहरा बघून शरमिंदा झाला व त्याने आपली मान खाली घातली. त्यावर चैतन्य म्हणाला—"अशा म्हातारपणी तुझे वडील तुझ्याच घरी रहाणे चांगले.

म्हाताऱ्याचा मुलगा डोळ्यात अश्रू आणित आपल्या वागण्या व करण्याचा पश्चाताप करीत चैतन्यला हात जोडीत आपल्या वडिलांना म्हणाला—"बाबा, चला आपण आपल्या घरी जाऊ. आपण माझे डोळे उघडलेत. असे म्हणत त्याने आपल्या वडीलांचा हात धरला व त्यांना घरी घेऊन गेला.






[ ५ ]

[ चंद्रवर्माने आपला सेनापती धीरमल्लला बरोबर घेऊन अनेक शत्रूसैनिकांचा संहार केला. परंतु तेवढ्यात सर्पकेतू नविन सैन्यानिशि तेथे येऊन पोहोचला. चंद्रवर्मा आपल्या सैनिकांना बरोबर घेऊन महालाच्या रक्षणाकरीता निघाला. शत्रूच्या सैनिकांनी किल्ल्याला गराडा घातला होता. तेवढ्यात चंद्रवर्मा क्षणात् त्यांना सामोरा गेला...नंतर—]

चंद्रवर्माच्या सैन्याचे व सर्पकेतूच्या सैन्यांचे किल्ल्याच्या दरवाजापाशी भीषण युद्ध झाले. सर्पकेतूचे सैनिक चंद्रवर्माच्या सैनिकांपेक्षां कित्येक पटीने जास्त होते. तरीसुद्धा चंद्रवर्माच्या सैनिकांसमोर त्यांचा टिकाव लागला नाही. परंतु जेव्हां त्यांना समजले की चंद्रवर्माचे सैनिक आपल्या सैन्यांपेक्षा कमी आहेत तेव्हां ते हिम्मत करून पुढे झाले व लढू लागले.

बराचवेळ दोन्ही सैन्यांत भयंकर युद्ध झाले. चंद्रवर्माने बराच प्रयत्न केला परंतु तरी सुद्धा तो किल्ल्याच्या दारापाशी जाऊन पोहोचला नाही. तो विचार करू लागला की, आता काय करावे. तेवढ्यात लांबवरून काही घोडेस्वार येत असण्याचा त्यांना कानोसा लागला. दुसऱ्याक्षणी सुबाहूने आपला घोडा चंद्रवर्माच्या दिशेकडे नेला. व त्याला म्हटले—"युवराज, आपण



मोठ्याच संकटात सांपडलो. पाठीमागून आपल्यावर हल्ला करण्याकरीता सर्पकेतूने नविन घोड्यांचे दल युद्धस्थळी पाठविले आहे वाटते.

चंद्रवर्माला अशा परिस्थितीत किल्ल्याच्या आत जाणे असंभव वाटले. दोन्ही सैनिकांच्यामधे सांपडण्यापेक्षा येथून निसटून जाणे चांगले असे त्याला वाटू लागले. सेनापती धीरमल्लला त्याच्या परिस्थितीचा अंदाज लागला. व सैनिकांच्या आरडाओरडचात तो मोठमोठ्याने ओरडून म्हणाला–"युवराज, आपल्याला येथून ताबडतोब निघून जावयास पाहिजे. मी आपल्याला माझ्या शिपायांच्या मदतीने येथून निसटून जाण्याचा कुठलातरी मार्ग शोधून सांगतो. तुम्ही ताबडतोब निघून जाण्यास तयार व्हा."

चंद्रवर्माला विचार करण्यास सुद्धा फुरसत नव्हती. पाठीमागून शत्रूसैनिक अगदी जवळ येऊ लागले होते. त्यामुळे चंद्रवर्मा किल्ल्याच्या द्वारापासून मागेवळत जोरजोरात ओरडू लागला–"सुबाहू ! त्याने आपली तलवार म्यानेतून बाहेर काढली व समोर येईल त्या सैनिकांचे डोके सपासप धडापासून अलग करू लागला. सुबाहू सुद्धा आपल्या मालकाचेचे अनुकरण करीत त्याच्या पाठोपाठ घोड्याला दौडू लागला.

चंद्रवर्मा व सुबाहू शत्रू सैनिकांना चुकवून बाहेर पडून पळू लागले. ते पाहून शत्रूचे सैनिक त्यांचा पाठलाग करू लागले. शत्रू सैनिकांना धीरमल्लने मध्येच अडवले व त्यांच्याशी तो लढू लागला. ती संधी मिळताच चंद्रवर्मा व सुबाहू त्यांच्यापासून दूर निघून जाण्याकरीता घोड्यांनाजोरात पळवू लागले.

ते दोघे थोड्या दूर असलेल्या राजमार्गापासून पुढ निघाले नंतर त्यांनी आपल्या घोड्यांना नगराच्या दक्षिणेकडच्या दरवाजाकडे वळविले. चंद्रवर्माने मनोमन जाणले की, येथून बाहेरच सटन जावयाचे असेल तर एक मात्र उपाय आहे. तो म्हणजे दक्षिणेकडेच दार. त्याला माहीत होते की, किल्ल्याची इतर द्वारे शत्रूच्या सैनिकांनी घेरली गेली आहेत. तेच एकमेव दार कोणास माहीत नाही.

चंद्रवर्मा व सुबाहू दक्षिणेच्या द्वाराजवळ येऊन पोहोचले व ते चाहूल घेऊ लागले की, तेथे कोणी शत्रूचे सैनिक तर नाहीत नां ! तेथे शत्रू सैन्यापैकी कोणीच नव्हते काही लोक त्या दारांनेच बाहेर जात येत होते. पांच-सहा शत्रूसैनिक एका बाजूला कोंडाळे करून गप्पा मारण्यात मश्गुल झाले होते. त्यांचे घोडे त्यांच्यापासून जरा लांब खुंटाना बांधून ठेवलेले होते.

"युवराज, आपल्या सेनापती धीरमल्लने अद्याप पावेतो शत्रू सैनिकांना रोखून धरलेले असावे. म्हणूनच ते आपला पाठलाग करून इथेपर्यंत आले नाहीत. तरी सुद्धां घोड्यांच्या सैनिकांना बरोबर ठेऊन तो जास्त काळ त्यांना रोखून धरू शकणार नाही. त्यामुळे जेवढे शक्य होईल तेवढे इथून लवकर नगरातून बाहेर पडावयास पाहिजे. आपण येथून एका पल्ल्यात द्वारपार करून निसटून जावयास पाहिजे." सुबाहूने आपला विचार चंद्रवर्मा समोर मांडला.



चंद्रवर्माने स्वीकृति सूचक मान हलविली व घोड्यांला चुचकारून जोरात पळविले. तितक्यात द्वारापाशी गप्पा मारीत उभ्या असलेल्या सैनिकांचे लक्ष त्याच्यांकडे गेले. ते आश्चर्यचकित होऊन पाहू लागले व आपली तलवार म्यानातून बाहेर काढून हेऽ हेऽ करीत धांवत घोड्यांपाशी जाऊ लागले.

"सुबाहू ! आपल्याला लवकर द्वार पार करून जायला पाहिजे. तू आपल्या घोड्यांला न थांबवता वाटेत येतील त्यांची कत्तल करीत मार्गक्रम कर असे म्हणत चंद्रवर्माने आपला घोडा दरवाज्याच्या दिशेने पिटाळला.



तेवढ्या अवधीत शत्रुसैनिकांपैकी तिघांनी घोड्यांपाशी जाऊन खुंटापासून घोड्यांना सोडविले होते. परंतु दोन सैनिक तेवढ्यात तलवारी म्यान्यातून बाहेर काढून किंचाळू लागले. "थांबा, नाहीतर तुमच्या जीवाला धोका आहे ! पळून जाल तर मरण नक्की."

"कोणाचा रे, जीव धोक्यात आहे ? असे म्हणत सुबाहूने वेगाने पुढे येत असलेल्या एका सैनिकांचे डोके निमिषार्धात छाटले. पाठीमागून दुसऱ्या येणाऱ्या एका सैनिकांचे डोके पण छाटले. त्याच्या पाठीमागून येणाऱ्या एका सैनिकांचे डोके चंद्रवर्माने छाटायचा प्रयत्न केला परंतु तेवढ्यात त्याने संकट ओळखले व तो जमिनीवर ओणवा पडला.

तेवढ्यात शत्रूसैनिकांनी घोड्यावर स्वार होऊन चंद्रवर्मा व सुबाहूचा पाठलाग केला. चंद्रवर्माने मागे वळून सुद्धा पाहिले नाही व तो आपल्या घोड्याला टांच मारून दाराच्या बाहेर शीघ्र गतीने पळाला. त्याच्या मागोमाग सुबाहू पण....

पुढे चंद्रवर्मा व त्याच्या पाठीमागे सुबाहू आपल्या घोड्याने वेगाने पळवित पुढे नेत होते. त्यांचा पाठलाग करीत शत्रू सैन्यांतील चार सैनिक कोलाहल करीत तलवारी हवेत उडवत येत होते.

"युवराज, थोडे थांबून शत्रूचा नायनाट करणे योग्य होईल. असे वाटते की, हे लोक आपला पाठलाग करणे थांबवणार नाहीत." सुबाहू म्हणाला.

"आपण थांबलो तर संकट ओढवून घेतल्या सारखे होईल. आत्ता पावेतो आपण नगरातून बाहेर निसटून गेल्याची बातमी सर्पकेतूला समजली असणार. तो आपली भारी सेना घेऊन आपल्याशी लढावयास नक्कीच येत असणार ह्या सैनिकांना अजून थोडे दूर पर्यंत आपला पाठलाग करूं दे. समोर दिसणाऱ्या पहाडात शिरून आपण तेथेच त्याचा खातमा करून टाकू." चंद्रवर्मा त्याला म्हणाला.





चंद्रवर्माचे बोलणे संपत नाही तोच एक बाण सूसू करीत त्याच्या डाव्या खांद्याला घसटून निघून गेला. व रस्त्याच्या कडेला जाऊन पडला "सुबाहू"! असे म्हणत चंद्रवर्मा जोरात किंचाळला व घोड्याच्या पाठीवर मान टाकून पडून राहीला.

"युवराज, मी अजून पर्यंत जिवंत आहे. असे म्हणत सुबाहूने घोड्याच्या आयाळी जवळ वांकून पाठीमागे पाहीले तेव्हां एक सैनिक बाणाने त्याच्यावर नेम धरीत होता त्याने घोड्यांचा लगाम आपल्या तोंडात घट्ट पकडला होता. ते पाहून सुबाहूला आश्चर्याबरोबर एक प्रकारची भीती सुद्धा वाटू लागली. ही गोष्ट सुबाहू चंद्रवर्माला सांगण्याकरीता पुढे जाऊ लागला. तोच त्या घोडेस्वाराच्या घोड्याचा पाय एका दगडाला लागून तो ठेचकाळला व रस्त्याच्या कडेला वांकला तेवढ्यात पाठीमागून वेगाने येणारा घोडेस्वार त्याच्यांवर आदळला आणि हातात धनुष्य-बाण घेतलेला सैनिक त्या धडकी मुळे चार-पांच फूट उंच हवेत उडाला व बाजूला जाऊन आदळला त्यांने मोठमोठ्यांने किंकाळ्या फोडल्या. त्याला चिरडून टाकत बाकीचे घोडेस्वार पुढे निघाले.

"मग काय, सुबाहूला ते पाहून अत्यानंद झाला तो घोड्यावर नीट बसत विचार करू लागला की बाकीचे सैनिक त्याला मदत करण्याकरीता नक्कीच थांबले असणार. परंतु परत जवळ येणाऱ्या घोड्यांच्या टापांच्या आवाजाने त्याची घोर निराशा झाली. शत्रू सैनिक आपल्या खाली पडलेल्या मित्राच्याकडे ढुंकूनही न पहाता वेगाने त्यांचा पाठलाग करीत येत होते. परंतु त्याच्यांत धनुष्यबाण घेतलेला कोणीही नव्हता. ते पाहून त्याला पुन्हां थोडी आशा वाटू लागली. कि आता आपली सुटका झाली.

तो म्हणू लागला—"युवराज, शत्रु सैनिकांच्यात जो धनुर्धारी होता. तो त्याच्याच लोकांच्या पायदळी ठार मारला



गेला. आता फक्त तिघेजणच आपला पाठलाग करीत आहेत. त्याच्याजवळ फक्त तलवारीच आहेत. काय आपण थोडे थांबून त्यांना यमलोकात पाठवून देऊ या का ?"

चंद्रवर्माने पाठीमागे वळून पाहीले. शत्रूचे तिघेच सैनिक येत असतांना दिसत होते. खरेतर त्यांना ठार मारणे अशक्य नव्हते परंतु तेवढ्यांत पाठीमागून कोणी सैनिक येऊन टपकले तर. असा विचार करीत त्याने आपल्या घोड्याचा वेग कमी केला व रस्त्याच्या एका बाजूला घोडा थांबवला. तेवढ्यात सुबाहू सुद्धा त्याच्याजवळ येऊन पोहोचला. त्याने सुद्धा आपल्या घोड्याला थांबवले. ते पाहून शत्रूच्या सैनिकांनी आपापल्यात काही तरी खुसखुसू केली. ते काय योजना आंखीत होते देव जाणे पण....

"युवराज, हे दुष्ट लोक आपल्याशी लढावयास बहुदा घाबरत असावेत. आपणच त्याच्याजवळ जाऊन त्यांना ठार मारून टाकू." सुबाहू म्हणाला.

चंद्रवर्माने शत्रू सैनिकांकडे दृष्टी टाकत म्हटले–"ठिक आहे सुबाहू ! आपल्याला तावडतोब ह्या लोकांना ठार करावयास पाहिजे. थोडाजरी वेळ फुकट घालविला तर पाठीमागून आणखीन सैनिक येण्याची शक्यता आहे. असे म्हणत त्याने आपल्या घोड्याला शत्रू सैनिक जेथे उभे होते तेथे पिटाळले.

चंद्रवर्मा व सुबाहूला आपल्या दिशेने येत असलेले पाहून शत्रू सैनिक अति वेगाने पाठीमागे वळून नगराच्या दिशेने पळू लागले. चंद्रवर्मा घोड्याला लाथ मारून तेज गतीने त्याच्याजवळ जाण्याकरीता घोड्याला पिटाळू लागला. ते पाहून दुप्पट वेगाने शत्रू सैनिक पाठीमागे वळून पळू लागले.

शत्रूचा पाठलाग करीत करीत एक मैलभर नगराच्या दिशेला सुबाहू व चंद्रवर्माने आपल्या घोड्यांना हाकीत





आणले. तेवढ्यात त्यांना अचानक त्याच्या विरुद्ध दिशेने अनेक शत्रू सैनिक येतांना दिसले. ते दिसताच चंद्रवर्माने आपला घोडा थांबवला. व पाठीमागे वळत सुबाहूला म्हणाला–"सुबाहू ! आता कळली नां त्या दुष्टांची चाल ! आता आपल्याला इथून पळून जाण्याशिवाय गत्यंतर नाही. जर आपण ह्या तिघांशी लढत बसलो तर तोपर्यंत ते पाठीमागचे सैनिक येऊन आपल्याला चारी बाजूने घेरतील" नंतर त्यांच्या स्वाधीन होण्याशिवाय दुसरा पर्याय नाही.

चंद्रवर्मा व सुबाहू परत वळून पळू लागले. तोच ते सैनिक सुद्धा त्याचा पाठलाग करीत त्यांच्या पाठीमागे येऊ लागले. हळूहळू दोघा सैनिकांतील अंतर कमीकमी होऊ लागले.

"युवराज ! आता खरोखरी आपण जाळ्यात सांपडलो आहोत. सुबाहू दम टाकत म्हणू लागला. त्यांला घोडावेगाने पळून नेऊन थकवा वाटत होता.

चंद्रवर्माने काहीही उत्तर दिले नाही. फक्त हातानेच इशारा कला की, आता एकदम गप्प राहून तो करेल तसे त्याने करावे.

त्याच्या पाठीमागून येणाऱ्या शत्रू सैनिकांना व घोडेस्वारांना अजिबात कल्पना नव्हती की, ते दोघे कोणत्या वाटेने जाणार आहेत. पहाता पहाता रस्त्याला मध्ये कापून ते जंगलात शिरले व पहाडाच्या दिशेने वेगाने जाऊ लागले. त्यांच्या पासून सुटक मिळविण्याचा हांच एक उपाय त्याच्या डोक्यात आला.

चंद्रवर्मा व सुबाहू घोड्याला हांकून खूप थकले होते. चंद्रवर्माने ताडले की, आता जास्त वेळ ह्या घोड्यांना आपल्या बरोबर नेता येणे शक्य नाही. त्याची दृष्टी पाठीमागच्या येणाऱ्या शत्रू सैनिकांकडे वळली. तेही वेग कमी न करता घोड्यांना पळवित मागे येत होते. त्याचे घोडे सुद्धा दम टाकत होते त्याच्यांही तोडातून

    

पांढरा फेस बाहेर पडत होता. तेवढ्यात त्याची नजर पहाडातील शिखराकडे गेली. आता फक्त दोन फर्लागाच्या अंतरावरच शत्रू सैनिक पाठीमागे राहिले होते.

"सुबाहू आता आपल्याला ह्या घोड्यावर विसंबून रहाता येणार नाही. हे घोडे कोणत्याही क्षणी आपला प्राण सोडतील. तेव्हां माझा विचार आहे की, आपण घोड्याना इथेच सोडून पायीच पहाडात चालत जावे. म्हणजे काही काळ लपून बसता येईल." असे म्हणत चंद्रवर्मा घोड्यावरून उडी टाकून खाली उतरला. त्याच बरोबर सुबाहू सुद्धा खाली उतरला.

शत्रू सैनिक सुद्धा जोर जोरात किंचाळत आपापल्या घोड्यावरून खाली उतरू लागले. व सुबाहू व चंद्रवर्मा जेथे उतरले तेथे पळत येऊ लागले.

चंद्रवर्माने चोहोबाजूला एकदा आपली दृष्टी फिरविली व बाजूलाच असलेल्या दगडांच्या कपारी मधल्या झाडाच्या फांद्यांना धरून खाली उतरू लागला. सुबाहूने सुद्धा त्याचेच अनुकरण केले. दोघे दरीत हळूहळू उतरू लागले. तेवढ्यात पाठीमागून काही सैनिक तसेच उतरून खाली येऊ लागले तेवढ्यात त्याच्यातील एकाने थांबवत दुसऱ्याला म्हटले–"ह्यांचेच अनुकरण करणे म्हणजे संकटात सांपडण्या सारखे आहे. जर पाय हात घसरला तर खाली वहात जाणाऱ्या नदीत बुडून मरू. त्यापेक्षां इथेच थांबून इथले दगड धोंडे खाली दरीत ढकलून देता येतील.

असे म्हणता म्हणता मोठ्या शिळा. दगड धोंड ते ढकलू लागले ते चंद्रवर्मा व सुबाहूच्या जवळपास येऊन पडू लागले.

तोपर्यंत सुबाहू व चंद्रवर्मा दरीच्या तळाशी जाऊन पोहोचले होते. चंद्रवर्माने मान उंचावून शत्रू सैनिकांकडे आपली नजर टाकली व म्हणाला–"सुबाहू! आता आपल्या समोर दुसरा कोणताही उपाय नाही. तुला पोहायला येते ना! असे म्हणत क्षणार्धात त्याने पाण्याच्या प्रवाहात उडी मारली. (क्रमशः)



# कवींची चढाओढ

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा, तू या मध्यरात्रीच्या वेळी प्रेत खांद्यावरून उचलून नेण्याचा निर्णय घेतलास त्याबद्दल तुला दोष देत नाही. परंतु राजाचा निर्णय नेहमी बरोबरच असतो असे मात्र नाही. संपत्ती किंवा यश ह्या दोन्ही गोष्टींची अभिलाषा करणारा माणूस मिळणे दुर्लभ.. विवेकशील व्यक्ति सुद्धा ह्या दोन्ही गोष्टी प्राप्त करण्याकरीता आपली सारी शक्ति खर्ची घालते. तरी केव्हां केव्हां समाजाकडून ती अवहेलनेस पात्र बनते. मी तुला दोन कवी पंडीताची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.











फार पूर्वीच्या काळी प्रसन्न नावाचा कवी आपल्या कविता वाचून दाखवून राजाश्रय मिळण्याच्या आशेने पाटलीपुत्र नावाच्या राज्यात आला. त्यावेळी महासार नावाचा राजा तेथे राज्य करीत होता. महासार राजा साहित्याचा फार मोठा भोक्ता होता. प्रसन्नने राजाचे दर्शन मिळविण्या करीता बरीच खटपट केली. परंतु राज्यातील शिपायामुळे त्याला भेटणे जमले नाही. व त्याचे सर्व प्रयत्न फुकट गेले. त्यामुळे त्याने ती व्यथा एका जवाहिऱ्याला बोलून दाखविली.

त्या व्यापाऱ्याने प्रसन्नचे बोलणे ऐकून घेत म्हटले–"कवी महाशय, मला फक्त हिऱ्यांचे मुल्य काय ते माहीत आहे कवितेचे नाही!

व्यापाऱ्याचे म्हणणे ऐकून कवीला उत्साह आला त्याने आशुरूपाने एक कविता त्याला ऐकविली. त्याचा अर्थ असा होता– राजभटांना लांच देणाऱ्या कवीच्या कविता ऐकणाऱ्या राजाने मी केलेल्या कविता न ऐकणेच जास्त श्रेयस्कर!

जव्हेऱ्याला त्याने सांगितलेला अर्थ तितकासा बरोबर समजला नाही. परंतु तेवढ्यात त्याच्या दुकानात पाय ठेवणाऱ्या देवदासला बरोबर समजला. तो महासार राजाचा दरबारी कवी होता. जनतेचे म्हणणे होते की, देवीदासच्या जिभेवर सरस्वती वास करते आहे. पंडीत व सामान्य जनतेला आनंद देणारा देवीदास आदरणीय आहे.

देवीदासला पहाताच जव्हेऱ्याने उठून त्याचे आदर पूर्वक स्वागत केले. देवीदासने जव्हेऱ्याला नजरेनेच इशारा केला की, त्याच्याकडे आलेल्या त्या अनोळखी माणसांस आपला परीचय त्याने करून देऊ नये. नतंर त्याने वळून प्रसन्नकडे पहात म्हटले–"आपण दिसावयास एका महापंडीतासारखे वाटता.त्यामुळे आपल्याला राजभटांचा नाही परंतु राजाचा आश्रय घ्यावयास पाहिजे!"

ह्यास तोडगा म्हणून की काय, प्रसन्नने अजून एक कविता त्याला ऐकविली. की प्रसन्नची ती कविता ऐकून राजाला हे समजेल पाहिजे, आजपर्यंत आपण ऐकलेल्या कविता निरसच ऐकल्या. आणि त्या भीतनेच की काय राजाच्या दरबारातील कवीनी प्रसन्नला राजाचे दर्शन करण्याची संधी दिली नाही. असा त्या कवीतेचा भावार्थ होता.

देवीदासने हळूहळू टाळ्या वाजवित म्हटले–"आपली कविता अत्यंत प्रशंसा करण्याजोगी आहे. मी स्वतः आपल्याला राजाचे दर्शन घडवून देईन." असे म्हणत देवीदासने प्रसन्नला आपला परिचय करून दिला.

देवीदास राजाच्या दरबारातील कवी आहे हे समजताच प्रसन्न घाबरून गेला व म्हणाला–" महानुभाव, आपली माहीती नसल्यामुळे मी तोंडाला येईल ते बरळून गेलो. पण खर सांगतो आपल्याला मी गुरु मानतो."

"अतिशयोक्ति सुद्धा कवितेचा एक अलंकारच असतो." देवीदास म्हणाला व त्याला बरोबर घेऊन तो राजा महासारच्या दरबारात गेला. त्याने राजाला प्रसन्नची आपल्या बरोबर कशा तऱ्हेने ओळख झाली हे सविस्तर सांगितले.



राजा महासारला अत्यंत आनंद झालातो म्हणाला–"कवीवर, जर आपण देवीदासच्या प्रशंसेला प्राप्त झाला असाल तर आपण नक्कीच महाकवी असाल." असे म्हणत राजाने त्याला दरबारात ठेवून घेतले.

प्रसन्नने राजदरबारात चांगल्या प्रकारे किर्ती संपादन केली व जनतेला पटवून दिले की, देवीदास नंतर राजदरबारात आपणच त्याच्या बरोबरीचे कवी आहोत.

एकदा राज्यात धार्मिक भांडणतंटे सुरू झाले. प्रजा वीर शैव वीर वैष्णव, जैन, असे धर्म समजून आपापसात हिंसाकांड करू लागली. राजाने जनते मधील त्याच्या विचार प्रणालीला बदलण्याचा पुष्कळ प्रयत्न केला

परंतु त्याचा काही फायदा झाला नाही. मंत्र्यांने आपला विचार राजाच्या पुढे मांडला तो म्हणाला–"महाराज, जनतेचे विचार बदलण्याकरीता उत्तम पुस्तके उपयोगी पडतात. वेदात तर असचे सांगितले जाते की परमात्मा हा एकच आहे. त्यामुळे वेदांचे सारतत्व जर लोकभाषेच्या शैलीत आपण जनतेपुढे मांडले तर नक्कीच प्रजेत बदल घडून येईल."

राजा महासारला मंत्र्याचे म्हणणे पसंत पडले. त्याला वाटू लागले. ह्या काम-करीता देवीदास ह्याच काय तो समर्थ आहे. परंतु मंत्री म्हणाला–"वेदांचे सारतत्व लोकभाषेच्या शैलीत समजणारा एकजण आहे हे सभंव नाही. मला असे समजले आहे की, प्रसन्न सुद्धा देवीदास सारखाच समर्थ कवी आहे. त्यामुळे आपण ह्याची जबाबदारी देवीदास बरोबर प्रसन्न वर सुद्धा सोपवावी.

ह्यावर राजाने दोन्ही कवींना बोलावून घेतले व मंत्र्याच्या योजनेनुसार दोघांवर ह्या कार्याची जबाबदारी टाकली.

राजाचा आदेश मिळताच प्रसन्न म्हणाला–"महाराज, वेदांचे सारतत्व जर साधारण प्रजेच्या समोर मांडावयास पाहिजे असेल तर ते प्रथम आम्हांला पूर्णतया समजणे जरूरी आहे. हे काम एक दोन कवीच्या कडून करून घेणे सक्य नाही. महापंडीताच्या बरोबर चर्चा करून त्यानंतर हे काव्य रूपाने मांडले पाहिजे.

परंतु ह्या उलट देवीदासने आपला विचार व्यक्त केला–"महाराज मला तर ह्या कामात कोणाचीही आवश्यकता नाही. मी एकटाच हे काम पूर्ण करू शकतो. मला दोन महिन्याचा अवधी द्या!"

ह्यावर राजाने हे काम दोन्ही कवींवर सोपवले व म्हटले "तुमच्या पैकी जो कोणी हे काम प्रथम पूर्ण करेल त्याला एक लाख रुपये बक्षीस दिले जाईल."

दोघां कवींनी आपल्या कामास सुरवात केली. देवीदास हे संस्कृत मधील महान पंडीत होते. त्यानां कोणतीही कठीण असलेली भाषां सोप्याने समजत असे. त्यामुळे त्यानी वेदांचे मनन करून लोक-भाषेत त्याची कार्यरचना करण्यास सुरवात केली. आपल्याला दिलेल्या वेळेनुसार दोन आठवडे आधीच त्याची काव्य रचना पूर्ण तयार झाली.

प्रसन्नला संस्कृत समजत होते. परंतु त्यात तो प्रविण नव्हता. त्यांने इतर कवींच्या वैदिक पंडीतांच्या तोंडून वेदांचे विश्लेषण ऐकले नंतर त्यांने लिहावयास सुरवात केली. त्यामुळे त्याला ते काम करण्यास तब्बल दोन महिने लागले.

देवीदास प्रसन्नच्या काव्यरचने संबंधी माहिती दुसऱ्यांकडून काढून घेत होते. त्यांनी प्रसन्नच्या आधी दोन आठवडे आपले कार्य पूर्ण केले तरी सुद्धा त्यांनी त्याला जास्त महत्व दिले नाही. त्यानां हेच लोकांना दर्शवून द्यावयाचे होते की,





      



आपल्यापेक्षां तो कुशलता पूर्वक काव्य-रचना करण्यास समर्थ नाही.

अशा विचारांने देवीदास प्रसन्नचे काव्य पूर्ण होण्याची वाट पहात राहिले. नंतर राजाला भेटून म्हणाले–"महाप्रभु! मी व प्रसन्नने जवळजवळ एकाच वेळे पर्यंत आपल्या काव्य-रचनेचे कार्य पूर्ण केले आहे. तेव्हां आपण आमच्या दोघांच्या काव्य-रचनेतील श्रेष्ठ काव्याला बक्षीस द्यावे."

पण कोणत्या काव्याला बक्षीस द्यावे हा निर्णय घेणे राजाला कठीण वाटू लागले. ह्याच्या आधी साधारण उत्तम रचनेची परिक्षा घेण्या करीता राजा देवीदासची मदत घेत असे. आता तर देवीदासचीच काव्य-रचना चढाओढीत आली तेव्हां ह्याचा निकाल कोण लावणार?

हेच चालू असतांना कर्मधर्मसंयोगाने चिरंजिवी नावाचा एक सर्वविद्याशास्त्रात पारंगत असलेला माणुस देशाटन करीत पाटलीपुत्रच्या राजदरबारात येऊन पोहचला राजाने त्याचा उचित आदरसत्कार केला व आपल्या समोर आलेली कठीण समस्या सोडवण्यास व त्याचा निकाल देण्याची त्यांस अनुमती दिली.

चिरंजिवीने दोन्ही काव्ये समोर मांडून त्याचे सखोल अध्ययन केले व म्हटले–"महाराज, ही दोन्हीही काव्ये उत्तम आहेत व दोन्ही बक्षीसास पात्र आहेत."

हा निर्णय ऐकून देवीदास म्हणाले–"माझे काव्य तर एकाच्याच कडून तयार केले गेले आहे. खरे पाहिले तर प्रसन्नच्या पूर्ण व्हायच्या आधी दोन आठवडे मी पूर्ण केले आहे. परंतु त्याला सुद्धा चढाओढीत-संधी मिळावी ह्या हेतूने मी दोन महिने वाट पाहिली. प्रसन्नने त्याची काव्य-रचना पूर्ण करण्या करीता अनेक वैदिक पंडीतां-बरोबर चर्चा करून मगच आपले कार्य पूर्ण केले आहे. त्यामुळे आपण बक्षीस देण्या आधी ह्या गोष्टीचा पूर्ण सरासार विचार करावा."

ह्यावर चिरंजिवीने आश्चर्य करीत विचारले–"काय तू एकट्याने सहा आठवड्याच्या आत वेदांचे सार काव्य रुपात उतरवलेस? ह्या गोष्टीवर तर विश्वास बसत नाही."

तेव्हां ह्याचे उत्तर देत देवीदास म्हणाला–"ह्याहूनही अनेक अद्भूत कामे मी केलेली आहेत मी एका वर्षाच्या आत 'महाभारत' आणि दोन वर्षाच्या आत 'अष्टादश पुराण' ह्याचा अनुवाद लिहीला आहे."

राजा महासार म्हणाला–"देवीदासने सांगितलेले सर्व खरे आहे!"

असे जर होते सहा आठवड्यात वेदांचे सार काव्य रुपात तुम्ही पूर्ण केलेत तर त्याचे बक्षीस ताबडतोब कां नाही घेतलेत? आता तर ह्याचा निर्णय देणे माझ्या हातात आहे. तेव्हां आपला काय विचार आहे?" चिरंजिवीने विचारले.

काव्यलक्षणांना खरोखरी समजून घेणाऱ्याला माझ्या काव्यात व प्रसन्नच्या काव्यातला फरक समजेल. मी असा विचार केला की, मला लवकर काव्या संपण्या करीता बक्षीस नको. तर अत्युतम् रचना केल्याच्या रुपात मला बक्षीस मिळाले पाहिजे.



"महानुभाव, देवीदास सारखा संस्कृत भाषेत मला जास्त मोठे पणा देऊ नका. मला त्याचे ज्ञान जास्त नाही. त्याच्या प्रती मी अगदी छोटा आहे. मी बक्षीस मिळविण्याच्या आशेने नाही तर जनते-समोर आपली काव्य-रचना उपयोगास पडावी ह्या हेतूने मी लिहीली जर आपल्या लोकांचा हाच विचार असेल की, माझे काव्य देवीदासच्या काव्या समान आहे तर हे ऐकून मला आश्चर्यच वाटते आहे. की मी देवीदासच्या बरोबरीचा कवी बनलो. देवीदास मला गुरू समान आहेत! प्रसन्नने विनयतेने उत्तर दिले.

चिरंजीवीने प्रसन्न बक्षिसास पात्र असल्याचे सांगितले त्यावर राजाने त्याचा निर्णय मान्य केला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, चिरंजिवीने निर्णय दिलेला राजा महासारने योग्य मानला. हे कारण पुढे ठेवले तर महापंडीत व महाकवी असलेला देवीदास ह्याच्यावर अन्यायच केला गेला नां? ह्यात चिरंजीवीने पक्षपात तर केला नाही. त्याने देवीदास पेक्षां कमी प्रतिभा असलेल्या प्रसन्नला कां बक्षीस देऊ केले? याचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस, तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

विक्रमादित्य म्हणाला–" ह्या गोष्टीची शंकाच नाही की, देवीदास हा एक उत्तम कवी होता. परंतु प्रसन्न सुद्धा चढाओढीत भाग घेऊन आपल्या काव्याची-रचना करुन त्याच्या बरोबरीने पुढे आला त्यामुळे आता दोघेही समान दर्जाचे कवी गणले जात होते. अशा परिस्थितीत बक्षीस कोणाला द्यावयाचे? दोन्ही कवीच्यांत जर निरक्षिण केले तर देवीदास स्वत: आपल्या प्रभेची स्तुती गाई तो अहंकारी स्वभावाचा होता. त्याला वाटत होते की, आपल्याहून श्रेष्ठ कवी दूसरा कोणीच असू शकणार नाही. हेच त्याच्या पतनास कारणीभूत ठरले. त्याची इतकी तळमळ होती की, आपल्यालाच बक्षिस मिळाले पाहिजे. त्यामुळे एक गोष्ट स्पष्ट होते की, त्याला स्वत:च्या यशाबरोबर पैशांचीपण हाव होती. असा माणुस जिवनात घसरल्या शिवाय वर चढू शकणार नाही. परंतु प्रसन्नच्या बाबतीत तो विनयशिल होता. त्यामुळेच तो श्रेष्ठ बनू शकला अशा स्थितीत समान असलेल्या दोन्ही कवीमंध्ये स्वभावने प्रसन्नलाचा बक्षिस देणे न्यायगत ठरते तेच काम चिरंजिवीने केले. त्याच्या मधे कुठल्याही प्रकारची पक्षपाताची भावना नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# सहनशक्तिमधे स्वार्थ

कोण्या एका गावात रामानंद व चंद्रकांत नावाचे दोन मित्र रहात होते. त्या दोघांच्यात इतकी गाढ मैत्री होती की, पहाणाऱ्याला शंका येई की, ते दोघे सख्ये भाऊ तर नाहीत नां! आणि त्यांच्या मैत्रीचा ते लोकद्वेष करीत. चंद्रकांत स्वभावाने भयंकर रागीट होता. तो लोकांवर उखडत असे. परंतु रामानंद शांत स्वभावचा होता, म्हणून तो आपल्या मित्राच्या भांडणामधे कधी पडत नसे.

एकदा चंद्रकांतच्या घरी काही कारणाने एक मेजवानी होती. त्याचे निमंत्रण घेऊन एक विश्वंभर नावाचा फुशारक्या मारणारा घमेंडी माणूस त्या मेजवानीला आला. विश्वंभर फुशारक्या मारण्यात एक नंबरचा पटाईत होता. तो लहान मोठ्याचा विचार न करताच समोर येणाऱ्या माणसांची टिंगल करीत असे. तो व्यवहाराच्या गप्पा करीत चंद्रकांतच्या जवळ जाऊन पोहोचला. रामानंदला माहीत होते की, हे दोघेजण एकापेक्षा एक मिजासखोर आहेत. त्यामुळे त्या दोघांना तो बराच वेळ एकत्र राहू देत नसे.

विश्वंभर गप्पा मारता मारता म्हणाला– "मित्रा, तू मोठी मेजवानी व करमणुकीचा कार्यक्रम ठेवला आहेस! काय, ह्या वर्षी शेतीत चांगली मिळकत झाली वाटते?"

"छे: तसे काही नाही, मी ह्या करीता हा कार्यक्रम ठेवला होता की, माझ्या मिळकतीला कोणाची दृष्ट लागू नये!"

हे ऐकताच विश्वंभरचा जळफळाट झाला. पण क्षणभर थांबत तो म्हणाला–" पण काही म्हण बाबा, एवढी मोठी मेजवानी व मनोरंजन ठेवलेस तरी, काही लोकांची दृष्टीच वाईट असते त्याचा चांगला परिणाम होत नाही. त्यामुळे ह्या वर्षी तर

प्रकाश गुणे











माझ्या शेतात चांगले पिक आलेच नाही."

"म्हणजे ह्याचा अर्थ माझी दृष्ट लागली असाच नां!" चंद्रकांतने रागा-रागाने विचारले.

"मी तसे काही म्हणालो नाही. तू तर माझी दुष्ट लागण्याची गोष्ट प्रथम काढलीस!" विश्वंभर आवेशात आला. दोघांच्यात भांडणे सुरू झाली. त्या मेजवानीला आलेली सर्वजण त्यांच्याकडे वळून पाहू लागले. रामानंद झटक्यात तेथे आला व सर्व गोष्ट ऐकून घेऊन म्हणाला—"चंद्रकांत, अरे! हे तुझे घर आहे. तुझ्या घरी समारंभाला आलेल्या लोकांचा आदर ठेवणे तुझे कर्तव्य आहे.

रामानंदने ज्या प्रकारे चंद्रकांतला समजावले तसेच मेजवानीला आलेल्या सर्वांनी त्याला सांगितले.

खरे तर, त्याच क्षणाला ते भांडण मिटले. परंतु त्या दिवसापासून चंद्रकांतने रामानंदशी बोलणे सोडून दिले. एकदा रामानंदनेच चंद्रकांत बरोबर बोलण्याचा प्रयत्न केला परंतु त्याने तोंड वळवले.

आपल्या मित्राचे न बोलण्याचे काय कारण हे रामानंदला समजेना तो तसाच एके दिवशी चंद्रकांतच्या घरी गेला व त्याच्या पत्नीला त्याने विचाले—"वहिनी, हा पहा माझा मित्र मला पहाताच तोंड फिरवतो. ह्याचे काय कारण?"

"तुमच्यावर रागावले आहेत. घरी आलेल्या सर्व पाहुण्यांच्या समोर तुम्ही त्यांना व्यवहाराच्या गोष्टी सांगून उपदेश केलात. त्यामुळे म्हणत होते की, हा झालेला अपमान मी जन्मभर विसरणार नाही" चंद्रकांतच्या बायकोने सांगितले.

"आम्ही दोघे कैक वर्षापासून भावाभावांसारखे वागत आलो. जर कां मी सांगितलेली गोष्ट त्यांला आवडली नाही तर तेथल्या तेथे मला कां सांगितले नाही. हेच कारण घेऊन तो एकदम मैत्री तोडण्यास कां प्रवृत्त झाला." रामानंदने आश्चर्य वाटून विचारले.

"तुम्हाला तर त्याचा स्वभाव माहीत आहे. त्यांना जर समजले तुम्ही मला भेटायला इथे आला होतात. तर ते माझ्यावर राग काढतील. तुम्ही त्यांच्या मनांत रूजणारा कांटा काढण्याचा काही तरी उपाय करा" चंद्रकांतची बायको म्हणाली.

ह्या गोष्टीनंतर काही दिवसांनी अचानक चंद्रकांतचा मुलगा कोणत्यातरी रोगाने आजारी पडला. अनेक वैद्यांनी येऊन औषधोपचार केले. परंतु कोणत्याही औषधाचा फायदा झाला नाही. रामानंदला थोडी फार औषधाविषयी माहीती होती. लोकांनी चंद्रकातला सल्ला दिला की तू रामानंदकडून काही औषधपाणी का करून घेत नाहीस. तरी त्याने तिकडे दुर्लक्ष केले.

ह्याच वेळी एकदा चंद्रकांतच्या घरी एक साधू आला. चंद्रकांतने त्या साधूचा आदर सत्कार केला व नमस्कार करून आपला मुलाच्या आजराविषयी सांगितले.

साधूने मुलाला निरखून पहात म्हटले—"तू अत्यंत मतलबी स्वार्थी आहेस! आपले हितचिंतक जास्त सुखी व आनंदी असलेले तुला पहावत नाही. तुझ्यात सहनशिलता नाही. भल्याकरीता सांगितलेल्या गोष्टी तुला खपत नाहीत. तुझ्या स्वभावात असलेले हे दुर्गुण तुझ्या साऱ्या कुटूंबाला



"साधू महाराज, कोणीतरी माझ्याबद्दल चुकीची कल्पना आपल्याला करून दिलेली आहे. खरे सांगू तर माझ्या मधे जी सहनशिलता आहे नां दुसऱ्या कोणाच्यात नाही. मी तर माझ्या मुलाकरीता काहीही करावयास तयार आहे! तुम्ही मला हुकूम करा!" चंद्रकांत म्हणाला.

"इथून दहा कोसांवर एक शंकराचे देवालय आहे. तू चालत जाऊन देवाचे दर्शन करून परत ये. मी तुझ्या हातात ज्या औषधांच्या पुड्या देईन त्या तू ईश्वराला दाखव. तेच औषध प्रसाद बनून ह्या मुलाचा रोग नष्ट करेल." साधूने सांगितले.



मान्य केली व म्हटले–स्वामी, मी तुम्ही सांगितलेल्या गोष्टीचे पालन करेन."

"दहा मैल दूर चालणे म्हणजे कष्टाचे काम आहे. पण एक गोष्ट लक्षात ठेव. चालतांना थोडी सुद्धा चिड त्रास मनात आणता कामा नये. रस्त्यात कुठेही थोडी-सुद्धा विश्रांती घेता कामा नये. परमेश्वराचे दर्शन घेऊन उलट पावली तुला घरी आले पाहीजे समजले!" साधू म्हणाला.

चंद्रकांतने साधूने सांगितलेले सर्व म्हणणे मान्य केले व तो त्या साधूने दिलेल्या औषधांच्या पुड्या घेऊन शंकरच्या देवळकडे निघाला व दर्शन घेऊन कुठेही विश्रांती न घेता रात्रीच्या आत तो घरी आला.

साधूनी मोठ्या आश्चर्याने त्याच्याकडे पाहिले व विचारले. "तू इतक्या लवकर कसा परत आलास?"

"मी मुलाला लवकर आराम पडावा ह्यामुळे घाईघाईने जाऊन परत आलो."

"तू कोणावर त्रागातर केला नाहीस नां?" साधूने विचारले.

"नाही, नाही! साधू महाराज! काय आता मी ह्या औषधाच्या पुड्या मुलाला देऊ कां?" चंद्रकांतने विचारले.

"नाही तू एक नंबरचा स्वार्थी आहेस. जोपर्यंत तू त्या स्वार्थीपणापासून मुक्त होणार नाहीस. तोपर्यंत तुझा मुलगा आजारातून बरा होणार नाही" साधू गंभीरतेने म्हणाले.

"महात्मन्, आपण हे काय म्हणता? मी माझ्या मुलाकरीता एक दिवसाच्या आत दहा कोस लांब चालत जाऊन आलो. अशा परिस्थितीत मी कसा स्वार्थी होऊ शकेन. स्वार्थी माणसाच्यात काय अशा प्रकारची सहनशिलता असू शकते." चंद्रकांतने साधूला विचारले.

"एक, परमेश्वर तर आपल्याला डोळ्यांना दिसत नाही देवळांत फक्त त्याची दगडी मुर्ती असते. तू आमच्या तिघांवर विश्वास ठेऊन इतकी सहनशिलता दाखविलीस हो नां?" साधूने विचारले.

साधू गंभीर होत म्हणाला–"तुझ्यात सहनशिलता भरलेली आहे. त्या सहनशिलतेचा उपयोग तू आपल्या मित्राच्या बरोबर कां नाही अधिकारा सारखा प्रदर्शित करत. ह्या क्षणाला तुझ्या मनामध्ये जी सहन शक्ति आली. अरे, ती केवळ तुझ्या स्वार्था करीता आली आहे. त्यामुळे तू दगडी पुतळ्यावर सुद्धा विश्वास दाखवाशील. कारण तुझी तसी सहनशिलता नाही. समोर असलेला मनुष्यावर तुझा विश्वास नाही असे कां?"

"महात्मन्, हे सर्व खोटे आहे. मी सर्वांच्यावर एकाच तऱ्हेची करुणा प्रकट करतो. जे संयमी नाहीत त्यानाच वाटते की माझ्यात सहनशक्ति नाही." चंद्रकांत काकूळतीने म्हणाला.

"हे जर म्हणणे खरे होते तर, तुला उगाचच इतके लांब चालून जाण्याचे मी कष्ट दिले." असे म्हणत साधूने आपली नकली दाढी व मिशा काढून टाकल्या. साधूच्या वेषात आलेला माणूस रामानंदच होता.

त्याला पाहून आश्चर्यचकित होत चंद्रकांत म्हणाला–"अरे तू?"

"वहिनींच्या सल्यानेच मी हे सोंग घेतले. खरे तर तुझा मुलगा अजिबात आजारी नाही. माझ्या हातून थोडी चुक झाली असे समजून तू तर आपली कित्येक वर्षांपासूनची मैत्री तोडून टाकली होतीस. तुझी मैत्री कायम रहावी आशा करीता मी हे एक नाटक रचले" रामानंद म्हणाला.

अशा तऱ्हेने चंद्रकांतला त्याची चुक उमगली तो म्हणाला–"तू आपली मैत्रि कायम टिकावी ह्या करीता हे नाटक केलेस. माझ्याकडून अशा तऱ्हेची चुक कधी होणार नाही. मी निस्वार्थी पणे संयम सहनशिलता ठेवून रहाण्याचा प्रयत्न करीत राहीन.

अशा तऱ्हेने ते दोघे मित्र पूर्वी पेक्षां अधिकच भावा-भावा प्रमाणे सख्य ठेऊन आत्मियतेने कैक वर्षे आपले आयुष्य आनंदात घालवू लागले.





# दारूचा परिणाम

ब्रह्मदत्त काशीच्या गादीवर असतां बोधिसत्वांनी पंडीत वंशातील एक प्रख्यात ब्राह्मण कुटुंबात जन्म घेतला. वयाच्या विसाव्या वर्षापर्यंत त्यांनी समस्त शास्त्रांचा अभ्यास करून महापंडीताच्या रूपाने सर्व विद्येत यश संपादन केलें.

त्यांच्या आईवडिलांनी त्यांचे लग्न करून देण्याचा विचार केला. परंतु त्यांना तो आवडला नाही. उलट त्यांनी संन्यास घेतला व ते घर सोडून हिमालयात गेले व तेथे एक सुंदर आश्रम तयार करून तेथे राहू लागले.

एकदा बोधिसत्वांनी वर्षाऋतुतील चार महिने श्रावस्ती गावांत काढले. नंतर आपल्या शिष्यांना घेऊन ते भद्रवती नावांच्या गावी पोहोचले. तेथून थोडया दूरवर एक नदी व अंबतीर्थ नावाचे एक प्रसिद्ध तिर्थक्षेत्र होते. ते आपल्या सर्व शिष्यगणांना घेऊन त्या तिर्थक्षेत्री निघाले. त्या तिर्थक्षेत्राच्या ठिकाणी एका मुनींचा आश्रम होता. व त्या आश्रमाच्या आत अंबक कीतिका नावाचा विषारी सांप होता. त्यामुळे गावातल्या लोकांनी बोधिसत्वाना तेथे जाण्यास रोकले की, आपण आश्रमाच्या आत जाऊ नये.

बोधिसत्वाच्या शिष्य गणात सागत स्थाविर नावाचा एक शिष्य होता. तो मंत्र तंत्रामध्ये प्रविण होता. व त्याच बरोबर पराक्रमी साहसी होता. तो बोधिसत्व व इतर शिष्यांपासून थोडा वेगळा होऊन त्या मुनिच्या आश्रमात गेला.

त्याच वेळी आश्रमात मुनी नव्हते. सागत स्थाविरने आश्रमात प्रवेश करून एका जागी आसन पसरून त्यावर बसला त्याच क्षणी एक भयंकर विषारी नाग फुत्तकार करीत बाहेर आला व त्यान आपला फणा काढला. परंतु सागत स्थाविर जराही डगमगला नाही. त्याने त्या सर्पाला विचारले–"कायरे, तुझेच नाव अंबक कीतिका आहे?"

ह्या प्रश्न ऐकताच सर्प फुत्काऊ लागला. त्याच्या तोंडून काळा काळा धूर बाहेर पडू लागला. स्थाविरच्या तोंडातूनही धूर बाहेर आला. काही वेळाने सर्पाच्या तोंडातून आगीच्या ज्वाला बाहेर पडू लागल्या.

अशा तऱ्हेने चार पांच मिनिटे स्थाविर व त्या विषारी सांपाने आपापल्या शक्ति सामर्थ्याचे प्रदर्शन एकमेकांना करवले.

"अंबक कीतिका मला माहीत आहेत की, ह्या तिर्थात स्नान करावयास येणाऱ्या अनेकांना तू डसले आहेस व ते लोक मरण पावले आहेत." असे म्हणत स्थाविरने सर्पाच्या तोंडातले विष काढून त्याला जिवंत सोडून दिले.

ह्या घटनेनंतर थोडया दिवसाने बोधिसत्व भद्रवतीहून निघून कौशाम्बी गावात पोहोचले. त्या विषारी सापाच्या शरिरातील विष स्थाविरने काढल्याचा समाचार वणव्या सारखा आजूबाजूच्या गावात पसरला. कौशाम्बीच्या नगरवासीयांनी बोधिसत्वाचे आगत्यपूर्व स्वागत केले व त्यांची गावातील एका मोठ्या उद्यानात रहाण्याची व्यवस्था केली.



दुसऱ्या दिवशी सकाळी गावातील काही लोकांनी बोधिसत्वाचे दर्शन घेतले. नंतर त्यांनी आपल्या काही सहाध्यायासह एका झाडाच्या खाली सावलीत बसलेल्या स्थाविरच्या जवळ जाऊन त्यांना विचारले–"तुम्ही तर फार दूरवर असलेल्या हिमालयात रहाणारे आहात. त्यामुळे तुम्हांला सर्व जरूरीच्या वस्तु मिळणे दुर्लभ होत असावे. तशीच जर काही वस्तु आपल्याला पाहिजे असेल तर, तावडतोब आज्ञा करावी म्हणजे ती आम्ही तुम्हांला लगेच आणून देऊ." पण स्थाविर गप्प राहिला.

त्यावर बोधिसत्वाचे दोन शिष्य म्हणाले–"अरे बाबानों, आम्हांला पारावत

मंदिराचे सेवन करावयाचे आहे. परंतु अद्याप पावेतो ती दारू आम्हांला मिळाली नाही. त्यामुळे ती दारू तयार करून आमच्याकडे पाठवून द्यावी.

त्या लोकांनी ती गोष्ट मान्य केली. व दुपारपर्यंत ती दारू तयार केली. व एका माणसाच्या घरांत लपवून ठेवली. व स्थाविरला आपल्या बरोबर घेऊन गेले.

स्थाविरने पारवत दारूचे प्राशन करण्यास सुरवात केली. हळूहळू दारूचा अंमल त्याला येऊ लागला. तो एकदम उठून उभा राहिला. आणि गावाच्या वेशीशी पळत जाऊन तेथे खाली कोलमडला. त्याच्या साथिदारानी त्याला आपल्या खांद्यावर उचलून आणून बोधिसत्वाच्या पाशी आणून त्याला अशा तऱ्हेने ठेवले की त्याचे डोके त्याच्या पाऊलांना स्पर्श करेल असे.

परंतु स्थाविर रागारागाने उठून बसला व बोधिसत्वाच्याकडे पाय करून परत झोपला. त्यावर बोधिसत्व हसू लागले व त्यांनी आपल्या शिष्यांना विचारले–

“अंबतिर्थातील मोठ्या विषारी सापाचा नायनाट करणारा कोण माणूस आहे?

शिष्यांनी उत्तर दिले–“स्थाविर!”

“काय मग ह्या अशा अवस्थेत साध्या पाणसापाला स्थाविर वश करू शकेल काय?” बोधिसत्वांनी विचारले.

“नाही, नाही, गुरुदेव!” शिष्य म्हणाले.

“तर मग, तुम्ही हे विसरू नका की, दारू प्यायल्याने फक्त माणसाला नशाच येत नाही. तर बरोबर त्याची बुद्धी पण भ्रष्ट होते. त्यामुळे मी आजपासून एक नियम घालतो की ह्या क्षणा पासून कोणीही दारूचे सेवन करावयाचे नाही.” बोधिसत्व गंभीर होत म्हणाले.

दारूची गुंगी उतरल्यावर स्थाविर बोधिसत्वाच्या पायाशी लोटांगण घालीत येऊन पडला व पश्चातापाने होरपळू लागला. त्यावर बोधिसत्वांनी त्याला दोन्ही हातांनी उठवत त्याला दारू पासूनचे होणारे दुष्परिणाम ऐकवले.





आपल्या नद्या :

## सरस्वती

गौतम ऋषिंना एकत, द्वित व त्रित नावांची तीन मुले होती. त्यांच्यातला धाकटा त्रित हा बालपणापासूनच एका उत्तम पंडीत रुपानीं प्रसिद्ध होता. तपोवनात रहाणारे सर्व ऋषि मुनी त्याची खूप वाखाणणी करीत असत.

गौतम ऋषिची ही मुले काही कालाने प्रौढ झाली. ती तिघे एकदा आश्रमातून बाहेर पडून इतर ठिकाणी रहाणाऱ्या आपल्या वडिलांच्या शिष्यगणांना पहावयास निघाली. गौतम ऋषिच्या शिष्यांनी त्या तिघांचे स्वागत करून त्यांचा चांगल्या तऱ्हेने आदर सत्कार केला. परंतु त्यातील त्रितने सर्वांवर आपला विशेष प्रभाव पाडला.





काही दिवसांनी ते तिन्ही ऋषिकुमार अनेक गाई सोने व आभुषणे भेटी घेऊन आपल्या आश्रमात परत निघाले. चांगला कांळ वेळ पाहून त्यांनी यज्ञ करण्याच्या विचार मनांत आणला













दोघे मोठे भाऊ त्रितचा द्वेष करत होते. त्यामुळे त्या दोघांनी मध्य-वाटेतच गुप्तरूपाने कट केला की, आपणां तिघांना जे काही भेटी रूपाने मिळाले आहे त्यातला त्रितला वाटा मिळू नये. ही गोष्ट त्रितला माहीत नव्हती. त्यामुळे तो आपल्या विचारांच्या नादातच आपल्या दोन्ही भावाच्या पुढे चालत निघून गेला.

त्याच क्षणी झाडांच्या पाठीमागे एक लांडगा आपले सावज पकडण्याकरीता लपून बसलेला त्या दोघांना दिसला. तो हळूहळू त्रितच्या जवळ जवळ जाऊ लागला. त्रितचे तिकडे लक्ष नव्हते. आणि त्रितच्या मोठ्या भावांनी सुद्धा त्याला काहीही सांगितले नाही व ते जवळच्या झाडावर चढून बसले.





तेवढ्यात समोरून येणाऱ्या लांडग्याला पाहून त्रित पळून जाऊ लागला परंतु जवळच असलेल्या खड्यात त्याचा पाय घसरला व तो आत पडला. तो लांडगा बराच वेळ त्या खड्याशी इकडून तिकडे फिरत राहिला. शेवटी कंटाळून निघून गेला. त्रितने आपल्याला वाचण्याकरीता भावांना

लांडगा निघून गेल्यानंतर एकत व द्वित दोघेही झाडावरून हळूहळू खाली उतरले व खड्याच्या शेजारी पडलेली त्रितच्या भेटीच्या वस्तुंची पिशवी घेतली व गाईंना हांकीत ते आपल्या वाटेने निघून जाऊ लागले. परंतु त्रितने त्यांना मारलेल्या हांकाकडे त्यांनी जाणून बुजून दुर्लक्ष केले.





यज्ञसमारंभाची शुभ वेळ जवळ आली. त्रित मनांतून अत्यंत व्याकुळ झाला. तितक्यात त्याच्या डोक्यात एक कल्पना आली. त्याने निश्चय केला की, आपल्या यथाशक्तिनुसार ह्या खड्यातच आपण यज्ञारंभ करावा. खड्यात पडलेल्या काटक्या एकत्र करून अग्नि समजून त्याने मंत्रोच्चारण करीत बाजूलाच असलेला पाण्याचा तूप समजून छिडकाव केला.

तिकडे त्रितच्या भावांनी आश्रमात पोहोचताच यज्ञाला लागणारे सर्व सामान सुमान एकत्र जमवून यज्ञ केला. परंतु यज्ञ करण्यास ज्या तऱ्हेची भक्ति व भावना श्रद्धा पाहिजे ती त्यांच्यात नव्हती. त्यामुळे त्यांना बरोबर उच्चाराने मंत्रांचा पाठ करता आला नाही.












तिकडे खड्यांत मनोभावाने वश केल्याने त्याच्या भक्ति व श्रद्धेवर प्रसन्न होऊन देवतांनी त्याला दृष्टांन्त दिला व त्याला वर मागण्यास सांगितले. तिने देवांना एकच प्रार्थना केली की, आपणाला खड्यातून बाहेर काढावे व खड्यात असलेले पाणी देवतांना समर्पित करण्या लायक पवित्र व्हावे.

देवतांनी तिला दोन्ही वर दिले. त्याचे फळच की काय ते पाणी फवाऱ्यासारखे उंच उडून वर आले त्याच बरोबर तिही खड्याच्या बाहेर आला व ते पाणी नदीचे रूप घेऊन वाहू लागली. देवतांनी तिच्या दोन्ही दुष्ट भावांना शाप दिला त्यामुळे ते दोघे डुक्कर बनले.





हीच नदी सरस्वती नावाने प्रसिद्ध पावली. त्या नदिचा महिमा वैदिक युगात ऋषींनी आपल्या मुक्तकंठाने गाईला आहे. सरस्वती नदी भुगर्भात विलीन झाली. अन्त-र्वाहिनीच्या रुपाने वहाणारी ही सरस्वती नदी अलाहाबादच्या जवळ प्रयाग येथे यमुना नदीच्या बरोबर



# दोष कुणाचा?

विष्णुपुरवर राजा मिहिरवर्मा राज्य करीत होता. एकदा निर्मला नंद नावाचे ऋषि त्यांच्या राजधानीत आले. काही दिवसातच सर्व राज्यभर त्यांच्या महिमेचा प्रचार झाला. त्यांना सर्व प्रजा भगवानरूप समजून त्यांची पुजा करू लागली.

राजा मिहिरवर्माला ही गोष्ट समजली व त्यांना त्यांचे दर्शन घेण्याची इच्छा उत्पन्न झाली. तितक्यात राज्यातील एका गुप्त-चराने राजाला एक समाचार दिला की, निर्मलानंद हा ऋषि सारखा वाटत नाही. राजाने त्या साधूवर कडक नजर ठेवण्यास सांगितले व थोड्या दिवसातच असे सिद्ध झाले की तो एक कपटी साधू संन्याशी आहे.

राजाने निर्मलानंद व त्याच्या शिष्य-वर्गाला दरबारात बोलावले. राजाने निर्मलानंदचे अपराध दरबारात उघड केले. तेव्हां ताबडतोब निर्मलानंदाना समजून चुकले की, आपल्या बदनामीचा शोध राजाला लागला आहे.

तरीही निर्भयतेने तो म्हणाला-''महाराज, तुम्ही माझ्या बाबतीत जे काही ऐकले ते सर्व खरे आहे. परंतु ह्यात माझा दोष नाही. खरे काय व खोटे काय हे ठरवणाऱ्या व विश्वास ठेवणाऱ्या सर्व प्रजेचा दोष आहे. महान पंडीत व प्रज्ञाशाली विद्वान सुद्धा माझ्या आश्रयाला येऊन रहातात. शेवटी ते कशाला? स्वतःच्या कामना सिद्धीस नेण्याकरीताच नां!''

''ह्याचा फायदा घेऊन तुम्ही सर्व प्रजेला धोका देत आहांत! राजा रागाने म्हणाला.

''महाराज, तुम्हीच सांगा ह्यात माझा काय दोष? ते सर्वजण आपल्या मनांतील गोष्टी सिद्धीस नेण्याकरीता देवाकडे न



जाता ते सरळ त्याची पूर्ती करण्याकरीता माझ्याकडे येतात. तेव्हां हा सगळा त्या स्वार्थी लोकांचा दोष आहे. आणि जर कां ते लोक मला महात्मा मानतात तर मी त्याच्या बाबतीत तसाच व्यवहार करतो. आणि आणखी दुसरी गोष्ट प्रजेने माझा आदर सत्कार केला तरी त्याचे कोणतेही नुकसान होत नाही. ते लोक मला थोडे तांदुळ व फळे अर्पण करतात त्याच्या इस्टेटीत काही घट होत नाही! निर्मलानंदनी राजाला सांगितले.

राजा मिहिरवर्माला निर्मलानंदच्या बोलण्यावर आश्चर्य वाटू लागले त्यांना काही समजेनासे झाले. त्यांनी आपल्या मंत्र्याकडे दृष्टीक्षेप केला. मंत्र्याला पण काही उत्तर सुचले नाही.

राजा व मंत्री दोघांना निर्णय घेणे सुचले नाही निर्मलानंदानी सांगितलेल्या गोष्टी खऱ्या आहेत कां नाहीत. त्याच्या मनातील चलबिचल पाहून त्याच्या शेजारी बसलेल्या राजगुरूंनी मंद हसत हसत निर्मलानंदाना विचारले–"निर्मलानंद तुम्ही सांगितलेल्या गोष्टी वरून मला एक कथा आठवते आहे. प्राचिन काळात एका मातेला चार मुलगे होते. त्यातील एक भोळा होता. त्याचा फायदा घेऊन बाकी तिघांनी त्याला त्रास देण्यास सुरवात केली. आईने विचारल्यावर ते असे उत्तर देत की, जर त्याने आमचे म्हणणे मानले तर आम्ही गप्प रहाणार नाही कां! शेवटी आईचा त्याच्या म्हणण्यावर विश्वास बसू लागला. त्यामुळे ती आपल्या भोळ्या मुलाला असे समजावू लागली की, आपल्या तिन्ही मोठ्या भावांच्या म्हणण्याला त्याने विरोध न करावा व सावधतेने रहावे. थोड्या दिवसांनी आई मरण पावली व नरक लोकात गेली.

तेथे यमाने तिला दोष देत म्हटले–ताई, पांची बोटे सारखी असत नाही. एक बोट दुसऱ्या बोटासारखे कधीही होत नाही. तुझ्या भोळ्या मुलाला जेव्हां मोठे भाऊ त्रास देत होते. तेव्हां तू त्यांचेच म्हणणे खरे ठरवलेस तेव्हां दोष तुझ्या इतर मुलांचा होता. तुझ्या भोळ्या मुलाचा नव्हता– "बळ हेच न्याय आहे, ही गोष्ट राक्षस-नितीचा बोध करते. परंतु न्याय नाही. एकाचा भोळेपणचा फायदा घेऊन त्यालाच शिकवणूक देणे मोठा गुन्हा आहे. भोळे लोक आपल्याला होणाऱ्या अत्याचारा विरूद्ध विद्रोह करू शकत नाहीत हि त्यांची दुर्बलता आहे."

त्यामुळे निर्मलानंद ह्या गोष्टीपासून तुम्हांला मी हे सांगू शकतो की सर्व मानव-जातीमध्ये एक प्रकारचे भ्रातुप्रेम आहे. मोठ मोठ्या आशा करणे व त्याच्या पूर्तीकरीता लालसी होणे ही त्या लोकांची दुर्बलता आहे त्याचा आधार बनवून तुम्ही सुखपूर्वक जिवन जगण्याची इच्छा करता त्यामुळे हा दोष तुझाच आहे.

परंतु तू सांगतोस की माझ्या आश्रयाला आल्यामुळे मानवजातीचे काहीही नुकसान होत नाही. तुला खायला घालण्याने आर्थिक रूपाने प्रजेचे काही नुकसान होत नाही. हि गोष्ट खरी असेल परंतु त्याच्या दुबळेपणाला तुम्ही जास्तच भडकवत आहात ह्यामुळे त्याची मानसिक दृष्टीने हानीच होत आहे. अशा परिस्थितीत तुम्हांला शिक्षा केली नाही तर त्या गोष्टीतल्या आईला नरकयातना भोगायला लागल्या तसेच ह्या देशावर राज्य करणाऱ्या राजाला पण भोगायला लागतील.

राजगुरूचे बोलणे ऐकून निर्मलानंदांनी शरमेने मान खाली घातली. राजा मिहिर-वर्मा आनंदीत झाला. त्यांनी राजगुरूंना निवेदन केले की, निर्मलानंदाना कोणता दंड द्यावा ह्यांचा निर्णय त्यांनीच घ्यावा.

त्यावर राजगुरू म्हणाले–"निर्मलानंद व त्याचे दोन्ही शिष्य शरिराने धडधाकट आहेत. परंतु आळशी रूपी दुर्गणानी त्याना वेगळ्याच वाटेने नेले आहे. त्यामुळे त्या तिघांना राजोद्यानातील बागेत माळ्याचे काम करण्यास सांगावे.

राजाने गुरूच्या सांगण्याप्रमाणे त्या तिघांना बागेत काम करण्याचा दंड दिला.














# मुर्खाचे दान

रामपुर गावातील सर्व गावकऱ्यांनी आपल्या गावात एक रामाचे देऊळ बांधण्याचा निर्णय घेतला. त्यामुळे सर्वांनी गावांत वर्गणी गोळा करण्याचे ठरविले.

काहींनी ही गोष्ट गावच्या पाटलाला जाऊन सांगितली. तेव्हां तो म्हणाला–"तुम्हांला माहीत आहे की, गावाच्या बाहेर पाण्याच्या शेताजवळ असलेली जी जमीन आहे ती माझी आहे. त्यांची किंमत कमीत कमी एक हजार रुपये तरी होईल. तुम्ही तो हजार रुपये माझ्या नावाने लिहून देऊन ती जमीन घ्या.

त्यावर ते सर्व गावकरी अत्यंत आनंदीत झाले. त्या लोकांनी विचार केला की, पाटलांनी दिलेल्या जमिनीवर रामाचे देऊळ बांधता तरी येईल. त्यानंतर बाकी लोक इकडे तिकडे हिंडून वर्गणी गोळा करु लागले.

अशा तऱ्हेने गावकऱ्यांनी गोळा केलेल्या वर्गणीत देऊळ बांधण्याच्या कामी पांचशे रुपये कमी पडू लागले. लोकांना समजेना त्यात भर कशातऱ्हेने करावी. त्याकरीता ते पाटलाचा सल्ला घेण्याकरीता त्याच्या घरी गेले. व त्याला त्यांनी सर्व परिस्थिती सांगितली.

पाटलांने त्यांचे म्हणणे ऐकले व हसत हसत म्हटले–"अरे, त्यांत काय मोठेसे मी जी देवळाकरीता जमिन दिली आहे नां! त्याची किंमत पंद्रहाशे रुपये करुन टाकतो. माझ्या नावाने वर्गणीत आणखीत पांचशे रुपये लिहून टाका. आता तर पांचशे रुपयांची भर पडली नां!"





# नाचणारी बकरी

गोपालपुर मध्ये व्यंकटेश नावचा एक सावकार रहात होता. तो खूप श्रीमंत होता. तरी तो आपल्या कर्जदारां-कडून मोठ्या निर्दय पणाने चक्रवाढ व्याज लावून ते वसूल करीत असे. ह्या कारणांमुळे त्याच्या कडून लाचरीने कर्जघेणारे बहुतेक लोक भिकारी बनले होते.

अशा तऱ्हेने व्यकंटेशवरचा लोकांच्या मनांत द्वेष वाढत गेला. हि गोष्ट जाणून व्यकंटेशने विचार केला की, आता जास्त दिवस ह्या गावात रहाणे ठिक होणार नाही. त्यामुळे त्याने शेजारच्या जमिनदारीच्या गावात जाऊन आपली सावकारी सुरु केली.

व्यकंटेशने गोपालपुर सोडण्यापूर्वी एक काम केले होते की; ज्या लोकांनी त्याचे कर्ज फेडले नव्हते. त्यांची घरे त्याने जप्त करुन त्याचा लिलाव केला होता. त्या लिलावाचे पैसे वसुल करण्याकरीता त्याने आपला मुलगा भूपति ह्याला गोपालपुरला पाठविले. भूपतिला खूप घमेंड होती की, आपण खूप हुषार व समजुतदार आहोत. तो नेहमी स्वतःच्या मित्रांसमोर व इतर लोकांसमोर स्वतःच्या गुणांची स्तुती करीत असे. परंतु व्यंकटेशचा स्वतःच्या मुलावर अजिबात विश्वास नव्हता.

भूपतिने गोपालपुरला एक आठवडा राहून सारे लिलावाचे पैसे वसुल केले. तो जेव्हां आपल्या गांवी परतु लागला. तेव्हां त्याला त्याच्या वडिलांचा निरोप मिळाला की, गोपालपुरला सर्वांत चांगल्या प्रतिच्या बकऱ्या विकतात त्यामुळे पैशाची काळजी न करिता चांगल्यात चांगली बकरी विकत घेऊन ये. भूपति गुरांच्या बाजारात गेला. सर्व साधारण एक बकरी पांच रूपयांना विकली जाई. भूपति एका व्यापाऱ्याकडे गेला व



त्याने तेथील एका बकरीकडे बोट दाखवून तिची किंमत विचारली. व्यापाऱ्याने दहा रुपये सांगितले.

"काय ही सर्वात चांगल्या प्रतीची बकरी आहे?" भूपतिने व्यापाऱ्याला विचारले.

व्यापाऱ्याने चेहरा कसानुसा करीत भूपतिकडे पहात म्हटले–"मी बाजारात जितक्या बकऱ्या आणतो सर्व उत्तम जातीच्या असतात. तरीही तुला ह्यापेक्षाही जास्त चांगली बकरी हवी असेल तर तो भिल्लांचा नेता गजसिंह आहे त्याच्याकडे जा!"

"गजसिंह कोण आहे? तो कुठे रहातो?" भूपतिने विचारले.

ह्या बाजाराला लागूनच एक तळे आहे त्याच्या बाजूला तो आपला तंबू टाकून बकऱ्यांचा व्यापार करतो. सर्व लोक त्याला मांत्रिक गजसिंह म्हणतात. त्याचा तो भिल्लाचा पोशाख बघून तू त्याला चटकन ओळखू शकशिल! व्यापारी म्हणाला.

भूपति त्या भिल्लाच्या शोधार्थ निघाला. त्याच्या तंबूपाशी पोहोचत त्याने त्याला येण्याचे कारण सांगितले.

गजसिंह भूपतिला म्हणाला–"माझ्याकडे खेळणारी एक बकरी आहे. जर तुला ती हवी असेल तर वीस रुपये द्यावे लागतील!"

भूपतिच्या मनांत ती खेळणारी बकरी पहाण्याची उत्सुकता निर्माण झाली. त्याने भिल्लाच्या हातात वीस रुपये देऊन ती खेळणारी बकरी पाहिली.

ती बकरी दोरीवरून चालत होती सरळ खांबावर चढत होती. अशा प्रकारे बकरीने अनेक डोंबाऱ्याचे खेळ करून दाखविले.

भूपतिला अत्यंत अश्चर्य वाटू लागले. त्याने भिल्ल सरदाराला विचारले–"तुम्ही ही बकरी विकता आहात कां?"

"जर कां मी ही विकावयास काढली तर, एक हजार रुपयांपेक्षा कमी किंमतीत विकणार नाही" भिल्ल म्हणाला. "मी तर अद्याप ऐकले सुद्धा नाही की, बकरीची किंमत एक हजार रूपये असते?"

"अहो साहेब, तुम्ही तर हजार रूपये म्हणताच आश्चर्य चकित झालात. तेव्हां माझ्यागाणाऱ्या बकरीची किंमत ऐकलीत तर बेशुद्धच पडाल" भिल्ला सरदार म्हणाला.

"गाणारी बकरी आहे काय? विस्मयाने भूपतिने विचारले.

"मी खरे सांगतो, गाणारी बकरी माझ्याकडे आहे जर तुला तिचे गाणे ऐकावयाचे असेल तर तुला शंभर रूपये द्यावे लागतील समजले!" भिल्ल सरदार म्हणाला.

भूपति शंभर रूपये देण्यास तयार झाला. त्या भिल्लाने तंबूत जाऊन एक बकरी आणली व तिला गाणे म्हणण्यास सांगितले.

बकरीने माणसासारखे मधुर आवाजात गाणे गाऊन दाखविले. गाईले ते पाहून भूपति आश्चर्यचकितच झाला.

त्याने सरदारला विचारले–"ह्या बक-रीची किंमत काय?"

"पांच हजार रूपये!" त्याने झटक्यात सांगितले.

"पांच हजार रूपये? अरे, माझ्याकडे तर बरोबर पांच हजार रूपयेच आहेत!" भूपति म्हणाला.

"काही हरकत नाही! ह्याहूनही तू कधी एकदा नाचणारी व गाणारी बकरी पाहिली आहेस काय? पण त्याची किंमत ह्याहूनही जास्त आहे. भील्ल सरदार म्हणाला.





"काय मी ती बकरी पाहू शकतो कां?" भूपतिने विचारले.

"कां नाही? परंतु ती पहाण्याकरीता तुला दोनशे रूपये द्यावे लागतील!" गजसिहने सांगितले.

भूपतिने ते मान्य केलें. गजसिह तंबूच्या आत गेला व एक बकरी पकडून घेऊन बाहेर आला. तिला रंगीबेरंगी कपडे होते. ती दोन पायावर उभी राहून नाचली व गोड गळयाने गाणे गाईली. भूपतिने मनात विचार केला की, ह्या पेक्षां अद्भुत दुसरे काही नाही!

"तुम्ही ही बकरी काय किमतीला विकू शकता? भूपतिने विचारले.

"दहा हजार रूपये! मी ह्याहून कमी किमतीला विकणार नाही. गजसिह म्हणाला.

"हि किमत तर खूप जास्त आहे! भूपति म्हणाला.

"तसे काही नाही. हिला जर दुसऱ्या लोकांसमारे नाचवले व गावले तर त्यापेक्षां दुप्पट पैसा वसुल करता येतोना! गजसिह म्हणाला.

भूपति विचारात पडला. त्याच्या मनात अनेक शंका येऊ लागल्या त्याला वाटू लागले की, बहुदा आपल्या वडीलांना ह्या नाचण्याऱ्या बकरीचा शोध लागला असावा म्हणूनच आपल्याला जास्त किमंत पडली तरी चालेल पण चांगली बकरी घेऊन येण्याबद्दल सांगितले असावे आणि तसे जर नसले तरी सुद्धा ही अद्भुत विचित्र बकरी पाहून त्यांना नक्कीच परमानंद होईल. हिला लोकांसमोर नाचवून नक्कीच चांगले धन संपादन करता येईल.

असा विचार करून भूपतिने सरदार भिल्लाच्या बरोबर किमतीत बरीच घासा-घासी केली. शेवटी आठ हजार रूपये देऊन ती बकरी विकत घेतली. आता त्याच्या जवळ एक पैसा सुद्धा उरला नाही. शेवटी त्याने एक भाड्याची गाडी



ठरवायचा प्रयत्न केला. परंतु त्याच्या-बरोबर बकरीला पाहून सर्व गाडीवानानी त्याला ठरलेल्या किमतीची अर्धी रक्कम आगाबू देण्यास विनविले.

शेवटी भूपतिला समजेनासे झाले की, आता काय करावे? त्याने गावातील काही लोकांकडे पैसे कर्ज घ्यावे म्हणून पाहिले परंतु गावातील सर्व लोकांना माहीत होते की. त्याच्याकडे पुष्कळ धन आहे. भूपति गावातील लोकांना हे सांगू शकला नसता की आपण इतके पैसे देऊन एक बकरी विकत घेतली.

शेवटी नाईलाजाने त्याने बकरीला एक दोरी बांधली व ती हातात धरून तो पायी चालू लागला. तो भूक तहानेने व्याकूळ होऊन कसाबसा आपल्या गावी पोहोचला व आपल्या वडिलांना म्हणाला—"बाबा, मी एक अशी गंमतीदार अद्भुत् बकरी आणली आहे की, सर्व जगात शोधले तरी मिळणार नाही.

"अरे वाऽ छान, छान! असे म्हणत व्यकंटेश बकरीला न्याहाळत म्हणाला—"उद्या मी इथल्या जमिनदाराला व दिवाणसाहेबांना मेजवानीचे निमंत्रण पाठविले आहे. ह्या बकरीचे मांस खाल्ले की, तिच्या अद्भुत पणाचा शोध नक्कीच लागेल जा!"



हे ऐकताच भूपति घाबरून जात म्हणाला—"काय म्हणालात? हिच्या मांसाचा स्वाद! वाहवाह हे फार छान! हिला मी खाण्याकरीता आणले नाही. हिला ठेवून आपण लाखो रूपये कमावू शकतो. उद्या पाहुणे येऊ दे मग पहा ती आपली अद्भूत कमाल दाखवून देईल. मग हि बातमी कानोकानी राजापर्यंत जाऊन पोहोचेल. मग ती खरेदी करण्याकरीता राजा आपल्या खजिन्यातील अर्धा भाग देण्याकरीता सुद्धा तयार होईल!"

आपल्या मुलाच्या तोंडचे उत्साहाने प्रेरीत होऊन बोललेले ऐकून व्यकंटेशने विचार केला की, ह्या बकरीत नक्कीच

काहीतरी खास आकर्षण असावे. मग काय, त्याने मेजवानीसाठी म्हणून गावातून आणखी एक बकरी मागवली.

दुसऱ्या दिवशी जमिनदार, दिवाण व गावातील काही प्रतिष्ठीत माणसे मेजवानीकरता हजर झाली. व्यकंटेशने सर्वांना उत्साहाने सांगितले की, भोजनाआधी एक मनोरंजनाचा कार्यक्रम होईल. तेव्हां भूपतिने त्या सर्वांसमोर त्या बकरीला आणून उभे केले व तिला म्हटले–"आता तू आपले गाणे व नाच सुरू कर."

एक-दोन मिनिटे निघून गेली. पाच मिनिटे झाली. भूपतिने बकरीसमोर टाळ्या वाजवून तिला गाणे म्हणण्याचा आदेश केला. पण बकरी जागची हालली सुद्धा नाही.

व्यकंटेशला अत्यंत अपमान वाटला व राग आला. त्याने मान खाली घातली. काही पाहुणे मंडळी ते पाहून जोरजोरात हंसू लागली. नंतर दिवाणाने भूपतिला विचारले–"काय रे बाबा, तू त्या भिल्ल मांत्रिक गर्जसिंहच्या हाती तर बळी पडला नाहीस नां! तो धोकेबाज आहे.

होय हो! त्याच्याकडूनच मी ही बकरी विकत घेतली." कांपऱ्या आवाजात भूपतिने सांगितले.

"तुला छानच फसवले. तो तर आपल्या मंत्रबळाने बकऱ्यांना नाचवतो व गाणे म्हणून घेतो. परंतु त्याच्याकडून ती बकरी निघाली की दुसऱ्या जागी ती साधारण बकरी सारखी होऊन जाते." दिवाणाने त्याला समजावत म्हटले.

आपल्याला फसवले हे समजताच भूपति बरोबर व्यंकटेशला पण आपण वेडे होत चाललो असे वाटू लागले. परंतु त्यानां आता हे सांगणे कठीण वाटू लागले की, ते पूर्वास्थितीत आले कां नाही. परंतु त्यातील काही पाहुणे आपापसात खुसखुसु लागले–"दुसऱ्याचे घर दार लुटून ज्याने पैसा कमावला त्याला त्या भिल्ल मांत्रिकाने चांगलाच धडा दिला."





# उलटा परिणाम

फार पूर्वीच्या काळी मिथिला राज्यावर मंदभाग्य नावाचा राजा राज्य करीत होता. तो खूप अहंकारी रागीट व मनात येईल तो विचार तत्क्षणी स्वतःच्या हुकुमांमुळे अंमलात आणित असे.

एक दिवस मंदभाग्य आपल्या महालातील गच्चीवर येऱ्याझाऱ्या घालीत होता. तेव्हां अचानक त्याची नजर राजमार्गावरील लोकांवर पडली. राजाने पाहिले की, ते विविध रंगबेरंगी पोशाख घालून हिंडत आहेत. झटक्यात राजाच्या मनात एक उपाय आला राजाने मंत्र्याला बोलावले.

"मंत्रीवर!" राजा म्हणाला.

"महाराज, काय हुकुम आहे?" मंत्री म्हणाला.

"राजमार्गावर पहा! मला असे वाटू लागले आहे की, हे सर्वजण लोक मन मानेल तसे वागू लागले आहेत. ही गोष्ट मी अजिबात सहन करू शकत नाही. माझ्या मते ह्या लोकांचे कपड्यांपासूनचे सर्व व्यवहार आचरण एका सारखे एक असावे. जसे जेवण, भाषा आराध्य देव सर्व सारखे असले पाहिजे! तुम्ही ताबडतोब राज्यात अशा तऱ्हेची दवंडी पिटवा की, राजाचा हा हुकूम आहे!"

मंत्र्याने राजाला निवेदन करीत म्हटले–"महाराज, वेषभुषा भाषा-बोलणे खाणे-पिणे ह्या साऱ्या गोष्टी एका सारख्या एक जनतेकडून करून घेणे म्हणजे खेळण्यातील बाहुल्यां सारखे होईल. परंतु राजाचा हुकूम हा मानलाच पाहिजे.

दोन-चार दिवस उलटले राजा मदभाग्यला ही गोष्ट जाणून घेण्याची इच्छा उत्पन्न झाली की; मंत्र्याने आपण सांगीतलेल्या गोष्टीची दवंडी राज्यात पिटविली कि नाही! व जनता त्यांची








योग्य तऱ्हेने अमल बजावणी करते आहे का नाही! त्याच्या मनात ह्या गोष्टीचा विश्वास होता की सर्व जनतेने एकाच तऱ्हेचे खाणे-पिणे कपडेलत्ते देवधर्म केला. तर जगात आपल्या राज्यासारखे शासन करणारे दुसरे पहावयास मिळणार नाही.

एक दिवस सकाळच्या प्रहरी राजा मंदभाग्य फिरण्यास बाहेर पडला. तो आपल्या राजोद्यानाच्या बाजूने निघाला. तिथे त्याने जे दृष्य पाहिले. ते पाहून त्याचे मन कासाविस होऊ लागले.

सर्व दास-दासी एकाच तऱ्हेचे कपडे घालून उभे होते. राजाला ते पाहून कठिण वाटू लागले की ह्यातिल बायका कोण व पुरुष कोण? नंतर तो अंतपुरात गेला. तेथे सुद्धा तिच परिस्थिती होती. तेथे राणी कोणती? व दासी कोणती? हेच राजाला समजेना? सर्वांनी एकाच तऱ्हेचे कपडे परिधान केलेले होते!

ह्यावर राजा मंदभाग्यला आपला मतिभ्रम होतो की काय असे वाटू लागले. त्याला मंत्र्याचा भयंकर राग आला. तो रागातच दरबारात आला तेथे पण तिच स्थिती! ह्यात मंत्री कोण? सेनापती कोण? व नोकर कोण? सर्वांनी एकासारखे कपडे धारण केले होते.

"मंत्री! राजाने ओरडत विचारले.

"मंत्री! ह्याचे उत्तर म्हणून मंत्रीपण जोरात तसाच ओरडला.

"अरे दुष्टा, मी काय मंत्री आहे? राजाने फटकारून विचारले. मंत्र्याने तिच वाक्ये परत पोपटपंची प्रमाणे राजाला उलट विचारली.

राजाला आपण केलेल्या मुर्खपणाचा पश्चाताप होवू लागला तो लाजेने मुकाट्याने आपल्या महालात परत निघून आला. दुसऱ्या दिवशी राज्यात परत दवंडी पिटविण्यात आली की, प्रत्येक माणसाने आपल्या इच्छेनुसार कपडे वापरावे व आपल्या आवडत्या देवाची आराधना करावी प्रत्येकांनी आपल्या इच्छेनुरूप रिती-रिवाज पाळावे.






मेनका व हिमवान आपल्या घरी परत आले व सुखपूर्वक आयुष्य कंठू लागले. काळाप्रमाणे मेनका गर्भवती झाली. व जेव्हां पांच ग्रह उच्चदशेमध्ये होते त्यावेळेस तिने मैनाक नावाच्या मुलाला जन्म दिला. ह्यानंतर क्रमाने तिने नव्याण्णव मुलांना जन्म दिला. त्यानंतर मेनका पुन्हां गरोदर राहिली. व नऊ महिने पंधरा दिवसांनी आरुद्रा नक्षत्र चैत्र शुक्ल नवमीच्या दिवशी तिने पार्वतीला जन्म दिला. त्यावेळेस सर्व दिशां प्रकाशमय झाल्या. देवदेवतांनी फुलांची वृष्टी केली. ब्रह्मदेव विष्णु इंद्र ह्यांनी देवीचे स्त्रोत्रगान केले.

पार्वतीचा रंग निलवर्ण होता. चार हात, कपाळ, डोळे अशा तऱ्हेने ती उग्र-कालीदेवीच्या रूपांत जन्मली. त्यामुळे घाबरून मेनकेने तिला प्रार्थना करीत म्हटले मग तिने एका साधारण बालकाचे रूप घेतले व ती रडू लागली.

मुलीच्या जन्माचा समाचार मिळताच हिमवान अत्यंत आनंदीत झाला. पुरोहित व अनेक ब्राह्मणांना घेऊन तो मेनकाने जेथे मुलीला जन्म दिला तेथे गेला. कापराचे दिवे लावले. कस्तुरीचे पाणी शिंपले व नाचगाण्याचा कार्यक्रम आखला व ब्राह्मणांकडून तिला आशिर्वाद देववला. मग त्या ब्राह्मणांना अनेक धन-धान्य आभुषणे व रेशमी वस्त्रे दान केली. ह्यानंतर ते सुखाने आपले दिवस घालवू लागले. हळूहळू पार्वती लहानाची मोठी होऊ लागली.



ती आपल्या मैत्रिणि बरोबर खेळे, मदमस्त सिंहावर बसून दरयाखोऱ्यातून हिंडे फिरे वाळूत गुहांमध्ये लपाछपी खेळे. ती आपल्या आईला व मैत्रिणींना लहान समजून त्यांना फळे वाटी. चेंडूशी खेळत ती तो चेंडू आपल्या मैत्रिणींना दाखवून म्हणत असे–"हे एक ब्रह्मांड आहे. ह्याला बघ मी अशी नाचवेन. खेळण्यांशी खेळतांना त्यांना ती ब्रह्मा, विष्णु, महेश अशी नावे देऊन त्यांना खेळवत नाचवत असे. भातुकली खेळात ती घर बांधत स्वत:ला ब्रह्मदेव समजे त्याचे रक्षण करणारा विष्णु म्हणवून घेई व त्याला पाडून स्वत:ला महेश म्हणवी. अशा विचित्र तऱ्हेचे खेळ खेळी.

अशा प्रकाराने तिने आपले बालपण सुरु केले. विद्याभ्यास सुरू करून तिने सर्व विद्या शिकल्या. ती नेहमी परमेश्वराचे ध्यान करी व त्याचे गुणगान करीत नेहमी आनंदी रहात असे. अशा वेळेस तिच्या सख्यांनी तीला 'पार्वती' म्हणून हांक मारले तर ती तिकडे दुर्लक्ष करी. 'शिवानी' म्हणून हांका मारले तर लगेच उत्तर देई. ती नेहमी सिंहावर बसून हिंडत असे. अशी फिरत असतांना ती आपल्या हातात धनुष्य-बाण व त्रिशूळ नेहमी धारण करत असे. ती कधीही दुसऱ्या वहानावर बसत नसे किंवा वेगळे अस्त्र धारण करीत नसे. केव्हां केव्हां वीणा वाजवून आनंदाने तन्मय होत असे. विद्याधरांच्या वरचढ गाणे गाई व नाचे. शिवाचे रूप साकार करून आपल्या मैत्रिणींना दाखवित असे.

त्याच वेळेस एकदा नारद हिमवानाला भेटावयास आला. हिमवानाने पुढे येऊन त्यांचा आदर सत्कार केला. व त्यांना एका आसनावर बसावयास सांगून पार्वतीला बोलवणे धाडले. ती आल्यावर तिला नमस्कार करण्यास सांगून त्यांनी तीला आपल्या मांडीवर बसवले व नारदाला विचारले–"महामुनी, सांगा ह्या माझ्या मुलीचा पती कोण होणार आहे?" तुम्हीच सांगू शकता!

नारदाने पार्वतीचा हात पाहून त्या-वरील गज, मत्स्य, अंकुश व रथ ह्यांच्या रेखा पाहून म्हटले–"हिमवान आपल्या मुलीच्या हातावर तर देवीची लक्षणे दिसत आहेत. हिच्यामुळे आपले यश वाढेल लक्ष्मी सरस्वतीच्या बरोबरीने हिची सुद्धा सर्वजण पुजा करतील. हिच्या योग्य पती शंकर आहे. ह्यामुळे कोणत्याही प्रकारची चिंता काळजी केल्या शिवाय हिचा विवाह शंकराबरोबर लावून द्यावा. ह्यात कोणताही पुढचा मागचा विचार करू नका.

नारद निघून गेल्यानंतर हिमवान मेनकेला म्हणाला–"आपण परदेवीला प्रार्थना करून शंकराच्या पत्नीच्या जागी असलेली योग्य मुलगी मागितली. आपल्या प्रार्थनेच्या रूपाने आता नारद महर्षिच्या तोंडून तशीच गोष्ट आपण ऐकली.

ह्यावर मेनकेने प्रसन्न होत म्हटले–"आपली पार्वती आता विवाह्य योग्य बनली आहे. त्यामुळे उशीर न करता तिचा विवाह लवकर करून टाकण्याची खटपट करावी.

शंकर सतीच्या भस्म होऊन जाण्याने तिचे शरिर खांद्यावर घेऊन सर्व विश्वाचे भ्रमण करीत गंगा समुद्रच्या संगमाच्या जवळ काळीघाटावर येऊन नाचु लागला.



त्याचवेळेस विष्णुने आपल्या मायेने सतीला कालीचे रूप देववून शंकराला ज्ञानाचा उपदेश देववला होता. तेव्हां शंकर विरागी बनून ध्यानस्थ बसून तपश्चर्या करून त्यात मग्न झाले. ते भक्त वत्सल होते. त्यामुळे त्यांच्या तपश्चर्येत कोणीही भक्त आला तरी ते त्याला दर्शन देत. ह्यामुळे त्या-दोघांनी पार्वती कडून त्यांची सेवा करून घेण्याची इच्छा प्रकट केली. हिमवानाने ही गोष्ट पार्वतीस सांगितली.

अशा विचाराने हिमवान व मेनकेने पार्वतीला मोठ्या तन्मयतेने व भावनेने शंकराची आराधना करण्यास प्रवृत्त केले. ह्यानंतर मेनका व हिमवान आपली



मुलगी पार्वती हिला बरोबर घेऊन शंकराची तपोभूमी कैलास इथे येऊन पोहोचले. त्याचे चतुर्दिक गणाधिपती हातात शस्त्रास्त्र घेऊन उभे होते. काही लोक शंकराची सेवा करण्यात मग्न होते. हिमवानाला शंकराच्या जवळ जाण्याची संमती त्याच्या रुद्रगणांनी त्याला दिली.

हिमवानाने सपत्नीक शंकराकडे जाऊन त्याला साष्टांग प्रणिपात केला. आणि चंदन पुष्पादिकांनी त्याची पूजा करून हात जोडून समोर उभा राहिला. शंकराने एकदां डोळे उघडून पाहिले आणि म्हणाला—"हिमवाना! तू एक थोर पुरुष आहेस म्हणून तुझ्या या कैलास शिखरावर बसून मी निर्विघ्नपणे तपश्चर्या करीत आहे.

"हे महादेवा! तू येथे येऊन तपश्चर्या करीत आहेस हे आमचे भाग्य." हिमवान म्हणाला.

शंकर संतुष्ट होऊन म्हणाला—"हे हिमवाना! तू काही तरी वर मागून घे."

"माझी ही मुलगी पार्वती, हिला आपल्या सेवेला येथे राहू देण्याची परवानगी द्यावी प्रभो!" हिमवान म्हणाला.

जे तप करतात त्यांच्या सेवेला कोणी स्त्रीने राहणे उचित नाही. पाहिजे तर तू मधून मधून येऊन काय हवे नको ते पाहून जात जा." शंकर म्हणाला.

माझी ही मुलगी कन्या आहे. महादेवीच्या कृपेने माझ्या पोटी जन्मली आहे. तिच्या हातून आपल्या सारख्यांच्या तपश्चर्येत विघ्न कसे काय येईल? म्हणून माझी एवढी विनंती मान्य करून माझ्या या मुलीला आपल्या सेवेस ठेऊन घेण्याची कृपा करावी!" हिमवान म्हणाला.

शंकराने होकारार्थी मान हलविली.

सतीच्या मृत्यूनंतर शंकर कैलास पर्वतावर परत येऊन तपश्चर्या करू लागला होता. तपश्चर्येच्या तापाने त्याच्या कपाळाला घाम सुटला. एक स्वेद बिंदु पृथ्वीवर पडला. त्याचा एक पुत्र झाला



त्याचे नाव आजानुबाहु असे पडले. त्याच्या देहाची कांती लाल होती. शरीर भव्य होते. भूदेवीने त्याला उचलून शंकराला दाखविले.

शंकराने भूदेवीला पाहून म्हटले—"तू धन्य आहेस! माझ्या देहाच्या स्वेद बिंदुने जन्मलेला हा मुलगा भौम नावाने तुझी किर्ती वाढवील."

भौम मोठा झाल्यावर काशीला गेला आणि तेथे त्याने शंकराचे स्मरण करून घोर तपश्चर्या केली. शंकराने संतुष्ट होऊन त्याला ग्रहमंडळात स्थान दिले. त्याच भौमाला पुढे मंगळ, अंगारक नावे पडली.

शंकर तपश्चर्या करीत असतांच पृथ्वीवर गंगावतरण झाले. जेव्हां ऋषी व पितृ देवांनी ब्रह्मदेवाजवळ प्रार्थना केली की, भूलोकात पाण्याचा दुष्काळ आहे तेव्हां ब्रह्मदेवाने आपल्या कमंडलूतून पाण्याचा एकच थेंब खाली सोडला. त्याची अजस्त्र धारा होऊन पृथ्वीकडे वाहू लागली. शंकराने विचार केला ही धारा अशीच वहात राहीली तर पृथ्वीचे फार नुकसान होईल. म्हणून शंकराने आपल्या डोक्यावर गंगेची धार घेतली. शंकराच्या जटेतून गंगेचे पाणी मानससरोवरात पडले व तेथून गंगा मंदगतीने वाहू लागली.



त्यानंतर शंकर पुन्हां आपल्या तपश्चर्येत लीन झाला. अशा प्रकारे शंकराच्या जटेतून तिने वहाणे सुरू केले.

दक्षाला दिती नावाची एक मुलगी होती. ती कश्यप मुनींची दुसरी बायको तिच्या पोटी हिरण्यकश्यपु व हिरण्याक्ष जन्मले. ते क्रूर राक्षस निघाले व त्यांच्या तापाने त्रिलोक त्रस्त झाला. तेव्हां विष्णूने नरसिंह व वराह अवतार घेऊन त्यांचा संहार केला. पुत्रशोकाने दुःखी झालेली दिती कश्यपाच्या कृपेने पुन्हां गरोदर झाली. ती गोष्ट इंद्राला कळली. इंद्राने तिच्या पोटी आपला आणखी एक शत्रु जन्मणार अशा भीतीने, आपले



वज्रायुध दितीच्या गर्भपिंडावरच सोडले त्या पिंडापासून मरूत आदिक जन्मले व इंद्राची सेवा करू लागले.

आता दिति फारच निराश झाली. तिने कश्यपाची कृपा संपादन करण्याचा पुन्हां प्रयत्न केला. त्यांची आराधना मनोपूर्वक करू लागली. तेव्हां कश्यप मुनीने ब्रह्मदेवाचे स्मरण करून तपश्चर्या करण्यास तिला सल्ला दिला. दितीने त्या प्रमाणे तपश्चर्या केली. व कश्यपाच्या कृपेने तिला एक वज्रकाय मुलगा झाला. त्याचे नावं वज्रांग ठेवण्यात आले.

वज्रांगाच्या जन्म समयी अग्निवृष्टी, भूकंप व तुफान सर्व संकटे आली म्हणून सर्व देव घाबरले. दितीने मोठ्या प्रेमाने वज्रांगाला लहानाचा मोठा केला. ती त्याला म्हणाली–"बाळा! मला देवानी फार दु:खी केले आहे. त्यांनी तुझे बंधु हिराण्याक्ष व हिरण्यकश्यपु यांचा विष्णु-कडून क्रुरतेने वध करविला मरूत्, आदिक, माझ्या पोटात असताना इंद्राने वज्रायुध सोडून गर्भपिंडाचे तुकडे तुकडे करून टाकले म्हणून तू इंद्रादिक देवांचे पारिपत्य कर." माझी अशी तुला आज्ञा आहे.

आईच्या म्हणण्याप्रमाणे वज्रांगने राक्षसांचे सैन्य जमविले. रणभेरी वाजवून त्याने स्वर्गाला गराडा घातला. त्याने देवांना त्राहि त्राहि करून सोडले व इंद्राला कैद करून स्वर्गावर अधिकार मिळविला तेव्हां दितीच्या मनाचे समाधान झाले. की, मुलाने तरी आपली आज्ञा पाळली.

देवांनी ब्रह्मदेवाकडे जाऊन आपल्या पराभवाचे वृत्त सांगितले. ब्रह्मदेवाने शांतपणे सर्व ऐकून घेतले आणि कश्यप मुनींना बरोबर घेऊन वज्रांगकडे आला. त्याची समजूत घालून त्याने इंद्राला सोडविला आणि इंद्राचे राज्य त्याला परत देवविले.

वज्रांग म्हणाला–"हे ब्रह्मदेवा! मी धनवैभव मिळविण्याकरीता स्वर्गावर स्वारी केली नव्हती. हा इंद्र दुष्ट आहे त्याने

माझ्या आईला दुःखी केले होते. याचे अपराध अगणित आहेत. ह्या क्षमा करण्यालायक देव नाही. तरी मी आपल्या म्हणण्या बाहेर नाही. त्याला मी मुक्त करतो. त्याने माझ्या आईला दुःखी कष्टी केले नसते तर आज त्याची ही गती झाली नसती." मी माझ्या आईची आज्ञा आज पाळली. म्हणून माझी आई आज धन्य झाली.

ब्रह्मदेवाने ते ऐकून वज्रांगाला वर मागून घेण्यास सांगितले.

"मला परब्रह्मस्वरूप व प्राण्यांवर दया, या शिवाय आणखी काही नको. हे दोन वर द्यावेत." अशी वज्रांगाने प्रार्थना केली.

ब्रह्मदेवाला ते ऐकून फारच आनंद झाला. त्याने वरांगीनांवाच्या एका सुंदर कन्येशी त्याचा विवाह करून दिला. त्यानंतर ब्रह्मदेव कश्यप मुनींबरोबर निघून गेला.

वज्रांग शिवभक्त होऊन आपल्या गांवी परतला आणि शिवचरणी लीन होऊन त्याच्या भक्तीत त्याने पुढील आयुष्य घालविले.

काही काळ लोटल्यावर वज्रांग आपल्या बायकोच्या सेवेने संतुष्ट होऊन तिला म्हणाला–"वरांगे! मी तुझ्या सेवेने फार संतुष्ट झालो आहे. तू तुला पाहिजे तो वर मागून घे!"

महाशक्तिशाली इंद्र आदिक देवांना जिंकण्याची शक्ति असलेला आणि जगात ज्याची किर्ती अजरामर राहील असा पुत्र व्हावा अशी माझी इच्छा आहे." वरांगीने तो वर मागितला.

बायकोच्या तोंडून तो वर ऐकून वज्रांगाला फार वाईट वाटले. वरांगीने स्त्रीसुलभ स्वभावाने देवांचा विरोध करणारा पुत्र मागून घ्यावा याचे त्याला फार दुःख झाले. कारण अशा पुत्राला विष्णु फारकाळ जिवंत राहू देणार नाही. तरी वरांगीला दिलेले वचन मोडण्याची इच्छा नव्हती. म्हणून त्याने ब्रह्मदेवाचे स्मरण करून घोर तपश्चर्या केली.





# गुलामाचे रहस्य

बस्रा नगरात लागोपाठ दोन वर्षे पाऊस पडला नाही म्हणून तेथील रहाणांऱ्या लोकांना दुष्काळाचा खूप त्रास सहन करावा लागला. तिसऱ्या वर्षी सुद्धा तेच पावसाची वेळ टळून गेली पण पावसाचा एक थेंब सुद्धा पडला नाही.

त्या परिस्थितीत एक दिवस रात्री काही भक्त मशीदीत जाऊन गुढगे टेकून आकाशाकडे पहात प्रार्थना करू लागले–"हे देवा, आमच्यावर दया कर. पावसाचे अभावी दुष्काळ पडल्याने आमच्या शेतातील पिके नष्ट होऊ लागली आहेत व पिण्याच्या पाण्याकरीता सुद्धा सर्वंजण तडफडत आहेत. तेव्हां पाऊस पाडण्याची कृपा कर.

अशा प्रकारे अर्ध्यारात्री पर्यंत त्या भक्तांनी देवाची आराधना केली. परंतु आकाशात ढगाचा एक तुकडा देखील दिसत नव्हता. थोड्या वेळाने ते सर्व लोक तेथेच थकून झोपी गेले.

पण त्यांच्यातील भक्तांपैकी एक माणूस मात्र रात्रभर जागत राहीला. तेव्हां सावळ्या रंगाचा एक तरुण जवळच्याच टेकडीवर चढत असलेला त्याने पाहिला. त्या माणसाला अत्यंत आश्चर्यवाटून तो त्याच्याकडेच निरखून पहात राहिला. नंतर तो तरुण काय करायला चालला आहे ते पाहू या तरी म्हणून पाहू लागला.

तो तरुण काही मिनिटे गुढगे टेकून गप्प बसून राहिला. नंतर डोके वर उचलून आकाशाकडे पहात म्हणाला–"हे अल्ला, संकटात सांपडलेल्या ह्या भक्त लोकांची विनवणी तू कां ऐकत नाहीस? मला माहीत आहे की, तुझे माझ्यावर प्रेम आहे. म्हणून तुझ्याकडे मी भीक मागतो की, तू लवकरात लवकर पाऊस पाड!"



प्रार्थना संपवून तो तरुण त्या टेकडी-वरून खाली उतरून यावयास लागला. तेव्हां भक्ताने त्याच्याजवळ जात म्हटले–"तू कोण आहेस ?"

"मी एक गुलाम आहे! त्या मशि-दीच्या पाठीमागे जे घर आहे. त्यात रहाणाऱ्या गुलामांपैकी मी एक आहे. आम्हां गुलामांचा जो मालक आहे तो आम्हांला सर्वांना विकून टाकायला जाणार आहे!" त्या तरुणांनी उत्तर देत म्हटले.

त्या तरुणांच्या तोंडून ह्या गोष्टी ऐकून भक्त नाराजीने म्हणाला–"अरे, तू तर असा मूर्ख आहेस! तुला तरी माहीत आहे कां. की देवाचे प्रेम काय असते ते ?"

हे ऐकताच तो क्षणभर गप्प राहिला व म्हणाला–"जर कां माझ्यावर देवाचे प्रेम नसते तर मला कसे समजले असते की, देव हा शाश्वत आहे व दयाळू सुद्धा आहे. माझा दृढ विश्वास आहे? असे म्हणत त्याने चार पांच पाऊले पुढे टाकली. नंतर डोके वर करून न पहाताच म्हणाला–"महाराज, आकाशात एकदा तरी निरखून पहा. तुम्हांला स्वतःलाच समजून येईल की, देवाचे माझ्यावर प्रेम आहे कां नाही ?" असे म्हणत तो पुढे निघून गेला. त्या भक्ताने आकाशाकडे मान वर करून पाहीले. तोपर्यंत तरी सारे आकाश स्वच्छ होते. परंतु तेवढ्यात काही काळे ढग जमू लागले. त्याने मान खाली करावयाच्या आधीच मुसळधार पाऊस पडू लागला.

त्या भक्ताने त्या तरूणाचा शोध केला. परंतु तो कोठेही दिसला नाही. पाऊस पडू लागलेला पाहून झोपलेले सर्व भक्त जागे झाले व मशिदीच्या आत निघून गेले.

ह्यानंतर पहाटे पर्यंत पाऊस कोसळतच राहीला. सुकलेले तलाव व खड्डे पाण्याने भरून वाहू लागले. शहरातील लोकांचा आनंद गगनात मावेनासा झाला.

त्या दिवशी मशिदीत गेलेल्या सर्व भक्त लोकांनी मिळून त्या गुलाम तरुणाचा शोध लावायचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु



कोठेही त्याचा थांगपत्ता लागला नाही. शेवटी सर्वांनी जाऊन त्या गुलामाच्या व्यापाऱ्याकडे जाऊन चौकशी केली–"काय, इथे कोणी गुलाम तरूण विकावयास आहे कां?

"एकच नाही अनेक आहेत! असे म्हणत गुलामांचा व्यापारी त्यांना जेथे गुलाम होते. तेथे घेऊन गेला.

व्यापाऱ्याकडे एकूण वीस गुलाम होते. त्यातील बरेच जण तरुण होते. त्या भक्तांनी त्यात त्या तरुणाचा शोध केला. परंतु तो त्यांना दिसला नाही. तेव्हां ती माणसे निराश होऊन परत जाऊ लागली. तेवढ्यात बाजूच्या कोपऱ्यातील एका टोकाला तो तरुण बसलेला दिसला. त्या भक्ताने त्याला ओळखले.

जेव्हां तो भक्त गुलाम तरुणाच्या जवळ जाऊन पोहोचला. तेव्हां व्यापाऱ्याने त्याला उभे रहाण्याची विनंती केली.

"आम्ही ह्या तरुणाला विकत घेऊ इच्छितो!" भक्तांनी आपली इच्छा प्रकट केली.

व्यापाऱ्यांनी त्यांच्याकडे आश्चर्य चकित होऊन पहात म्हटले–"मी एक ईमानदार व्यापारी आहे! तुम्ही ज्या तरुणाला खरेदी करू इच्छिता तो एक वेडपट मुलगा आहे. जर कां आपल्याला एक हुषार मुलगा पाहिजे असेल तर मी ह्यातील एक चांगला निवडून देईन!"

"आम्हांला हाच गुलाम तरुण पाहीजे आहे." भक्त म्हणाले.












गुलामांच्या व्यापाऱ्यांनी त्या तरुणाला कमी किमतीत विकून टाकले. भक्त लोक त्याला घेऊन रस्त्यावर आले. तो गुलाम तरुण खाली डोके झुकवून हात जोडत म्हणाला–"मालक, हुकूम द्या. मी तुमची काय सेवा करू ?"

"तुच तर आम्हांला आज्ञा कर! तू आमचा मालक आहेस! तू तर देवाचा अत्यंत प्रिय असा आहेस. ही गोष्ट आम्हांला सर्वांना चांगल्या परिचयाची आहे." भक्त त्याला म्हणाले.

त्या गुलाम नोकराने त्यांच्याकडे मोठ्या जिज्ञासाने पाहिले. रात्रीच्या वेळी ज्या भक्ताने त्याला पाहिले होते तो पुढे येत त्याला म्हणाला–"काय रे, तू मला ओळखले नाहीस कां ? पाऊस पडायच्या पूर्वी तू जेव्हां प्रार्थना करीत होतास, त्याच वेळेला मी तुझ्याशी बोललो होतो नां ?

"अच्छा, असे आहे काय! असे म्हणत त्या गुलाम तरुणाने तिथे उभे असलेल्या सर्वजणांकडे पाहिले व म्हटले–"रात्रभर तर मी बेशुद्ध होतो. त्यामुळे कृपा करून मला मशिदित जाऊन देवांची प्रार्थना करण्याची परवानगी द्या.

"जरूर! जरूर! कां नाही! ह्या क्षणी आम्ही तर तुझे सेवक आहोत! ते एकसाथ म्हणाले.

तो गुलाम तरुण मशिदीच्या आत गेला एका ठिकाणी जाऊन नमस्कार करीत म्हणाला–"हे परमेश्वरा तुझे जे प्रेम होते. त्याचे रहस्य तर आता उघडे पडले आहे. आता तर ही सर्वजण मला चारी बाजूनी घेरून माझा आदर सत्कार करतील. एकटेपणात जो आनंद मला मिळत होता तो ह्या पुढे मला प्राप्त होऊ शकणार नाही. त्यामुळे तू कृपा करून मला आपल्याजवळ घेऊन जा!"

ह्या नंतर तो बराच वेळ निश्चल बसून राहिला. ते भक्त लोक थोडावेळ बाहेर वाट पहात राहिले नंतर आत जाऊन त्यांनी त्याला हात लावला. तो त्या तरुणाचे शरिर थंड पडले होते.





# आयुष्याचे प्रमाण

अठराव्या शतकात साहसी नावाड्याच्या रूपात प्रसिद्ध झालेल्या जेम्स कुक याने १७७३ मध्ये दक्षिण प्रशान्त महासागराचे बेट टोंगा शोधून काढले. त्याने आपल्या मैत्रिचे चिन्ह म्हणून त्या बेटाच्या राजाला एक कासव भेट म्हणून दिले. त्या बेटावर रहाणाऱ्या रहिवाश्यांनी त्या कासवाचे टूई मलेला असे नामकरण केले. ते कासव १९६६ मध्ये मरण पावले. त्यावेळी त्याचे वय २०० वर्षांचे होते.

मनुष्याची आयुर्मर्यादा ११० वर्षांपर्यंत आहे. तरी हे सरासरी प्रमाण ७० वर्षांपर्यंत समजले जाते. माणसाच्या वयापर्यंत जगणारे प्राणी सुद्धा आहेत. काही प्रकारची कासवे १५२ वर्षांपर्यंत जगतात परंतु १२० वयापर्यंत जगणारी कासवे अद्याप पावेतो आपल्याला माहीत आहेत.

पक्षांची आयुर्मर्यादा प्राण्यांच्या पेक्षां खूप कमी असते. तरी सुद्धा काकोट नावाचे आस्ट्रेलियातील पोपट ५७ वर्षे व ७६ वर्षे जगल्याचे प्रमाण आपल्याला मिळाले आहे. शुतुर कोंबडा ६२ वर्षे जगल्याचे रेकार्ड आहे. सारुव प्रकारचा बहिरी ससाणा ७२ वर्षांपर्यंत, समुद्रकावळध्याच्या जातीचा पक्षी ३६ वर्षांपर्यंत, चातक २१ वर्षांपर्यंत व १९ वर्षांपर्यंत, विल्लोवार व्लार नावाचा नीलकंठ मोर ५ वर्षे जिवंत राहीले आहेत. काही तऱ्हेचे मासे १५० वर्षा पर्यंत जगले आहेत.



ह्याच्या बरोबर तुलना केली तर स्तन्य प्राण्यांच्या आयुष्याची कालमर्यादा मात्र कमी. घोडे ९२ वर्षांपर्यंत हत्ती ५० वर्षे ह्यापेक्षां जास्त जगत नाहीत. तरी असे सिद्ध केले की काही हत्ती ऐंशीं वर्षा पर्यंत जिवंत राहील आहेत.



## चांदोबातील नवलाई



### इंदिरा गांधींची प्रतिमा

अमेरिकेत स्थापन झालेल्या लिबर्टीच्या पुतळ्या प्रमाणे मुंबईच्या जवळ समुद्रात इंदिरा गांधींचा पुतळा बांधण्याचा एक मोठा प्रयत्न चालू आहे. काही उद्योगपतींनी ह्या योजनेचा शुभारम्भ केला आहे.

### पन्नास वर्षं आयुष्याचा तरुण म्हातारा

उत्तर केन्यातील मात्रिया किटोकसटा नावाचा पन्नास वर्षांचा एक म्हातारा रानात जनावरे चारत होता. तेव्हां एक अतिशय भयंकर रानटी म्हैस त्याच्यावर हल्ला करून आली. तेव्हां तो म्हातारा जरा देखिल घाबरला नाही. उलट जवळ येताच तिची शिंगे त्याने घट्ट पकडून ठेवून एक तास तिच्या बरोबर लढत राहिला. शेवटी ती म्हैस कसाबसा स्वतःचा जीव वाचवून जंगलात पळून गेली.





### अंर्तराष्ट्रीय बौद्ध प्रदर्शनशाळा

गौतम बुद्धांच्या जीवनाचा व उपदेशांचा परिचय करून देणाऱ्या एका महान प्रदर्शन शाळेची स्थापना बुद्धाचे जन्मस्थान 'लाम्बनी' येथे करण्यात येणार आहे. भारत व नेपाळच्या सरहद्दीवर स्थापन होणाऱ्या ह्या प्रदर्शन शाळेच्या निर्मितीच्या हेतूने भारत तीन कोटी रुपये खर्च करणार आहे.

## तुम्हांला माहीत आहे का?

१. चंद्रगुप्त मौर्याच्या दरबारातील शोभा मिळणारा ग्रीक राजदुत कोण होता?
२. प्लासीचे युद्ध केव्हां आणि कोणा मध्ये झाले?
३. 'गेट वे ऑफ इंडिया' कोणाच्या सन्मानार्थ स्थापन झाले?
४. महाराणा प्रतापच्या घोड्याचे नाव काय होते?
५. विश्वाचे अति प्राचिन प्रजातंत्र राष्ट्र कोणते?

[ उत्तरे पान ६४ वर पहावीत ]



## गुरु आणि शिष्य

आनंदला अभ्यासाचा भयंकर कंटाळा होता. तो नेहमी अभ्यासापासून दूर पळायचा प्रयत्न करीत असे. त्यामुळे त्याच्या वडिलांना नेहमी त्याची काळजी वाटे. एकदा त्या गावात एक नविन शिक्षक आला. तेव्हां आनंदच्या वडीलांनी आनंदला बरोबर घेतले व ते त्या शिक्षकांच्या-कडे आले व शिक्षकांना म्हणाले—"गुरूजी, ह्या मुलाला लिहायवाचायला शिकवून एक योग्य माणूस करा!"

"माझ्या जवळ राहून जो एक वर्ष सेवा करेल. तो नक्की शिक्षणात यश प्राप्त करेल. ह्याला माझ्या घरी सोडून काळजी न करता निघून जा." गुरूजी म्हणाले.

आनंदला त्याच्या वडीलांनी गुरुजींच्या घरी सोडले. व ते घरी परत आले.

पहिल्या दिवशी गुरूजींनी आनंद कडून घरातील सर्व कामे करवून घेतली. गुरुजींच्या घरी चार दुभत्या म्हशी होत्या. त्यांना घेऊन जाऊन त्याने चारा चारून आणले. गोठा घुतला शेणाच्या गोवऱ्या लावल्या. गुरुजींची स्वयंपाकाची भांडी घासली.

आनंदनी गुरुजींची ही सर्व कामे मना-पासून केली. पहिला दिवस संपताच गुरुजींनी आनंदला विचारले—"तू आज दिवसभर कामात अगदी मग्न होतास. सांग बरं तुला ह्यातील कोणते काम जास्त आवडले. त्या कामाच्या वेळेला मी तुला शिकवेन.

शिक्षणात जास्त कष्ट करण्याची जरूरी नाही. गुपचुप एका कोपऱ्यात बसून गुरु-जींनी सांगितलेले फक्त ऐकायचे. त्यामुळे गुरुंनी विचार केला की, आनंदच्या दृष्टीने असे शिक्षणच त्याला देणे योग्य होईल परंतु आनंदने स्पष्ट सांगितले—"गुरुजी, मला



शिक्षणापेक्षा कामच केलेले जास्त आवडते. शिक्षणात मला जास्त रस वाटत नाही.

अकराव्या दिवशी गुरुंनी आनंदला आपल्या जवळ बसवत म्हटले–"ऐक मुला, म्हशी जे गवत खातात त्याचा दुधात बदल होतो. त्यामुळे म्हशीच्या शरिरात तशीच घडण घडण्याची खुबी आहे. अशा प्रकारे मनुष्याला जितके अनुभवाचे ज्ञान होते तेच त्याच्या शिक्षणाच्या रूपाने बदलतात. म्हणून मी ह्या साऱ्या गोष्टी तुला सांगेन. काय तू ऐकशील ?

"गुरुजी, ऐकणे ह्या प्रकाराची मला चीड येते आनंदने झटक्यात सांगितले.

ह्यानंतर आणखीन चार दिवस उलटले नंतर पाचव्याच्या दिवशी गुरुजींनी आनंदला बोलावले व म्हटले–"आनंद बाळा, तू उडू शकशिल. पाण्यावर चालू शकशिल तसले मंत्र मी तुला सांगेन. परंतु ह्याच्या आधी तुला अक्षर ओळख करून घेतली पाहिजे.

आनंदने गुरुजींनें सांगितलेले मान्य केले. गुरुनी त्याला अक्षराभ्यास शिकविण्यास सुरवात केली. परंतु शिकण्याच्या वेळी त्याचे सारे लक्ष घरातील कामांकडेच जात असे. म्हणून बराच वेळ लिहून सुद्धा त्याला एकही अक्षर शिकता आले नाही.

त्याच वेळी गुरु एका पांच वर्षाच्या मुलाला घेऊन आनंद जवळ आले व म्हणाले–"बघ हा मुलगा पाच वर्षाचा आहे व तू दहा वर्षाचा आहेस. मी ह्याला आता अक्षरे शिकवतो. तू पहा हा किती वेळात शिकतो.

तो मुलगा थोड्या वेळातच बरीच अक्षरे शिकला. तेव्हां त्या मुलाकडे निरखून पहात आनंद म्हणाला–"अरे शिकावयास वयाचा काही संबंध येत नाही. तू कितीही मोठा माणूस घेऊन ये. मी त्याला अक्षर-ज्ञान देतो."

आनंद आपल्या घरी गेला व आपल्या नोकराला बरोबर घेऊन आला. तेव्हां थोड्यावेळातच तो अक्षरे शिकला.





"पाहिलेस नां ? शिकावयास मनापासून आवड असली पाहिजे. वयाचा त्याच्याशी काही संबंध येत नाही." गुरुजी म्हणाले.

"हा नोकर वीस वर्षाचा आहे. म्हणून त्याला शिकावयास जमले. मी जेव्हां वीस वर्षाचा होईन. तेव्हा शिकेन.

"तर मग, तू कोणत्यातरी दहा वर्षाच्या मुलाला घेऊन ये. त्याला मी शिकवतो बघ." गुरुजी म्हणाले.

आनंदने सर्व गावात शोधले. परंतु त्याला दहा वर्षाचा बिन शिकलेला मुलगा काही मिळाला नाही. दहा वर्षाची सर्व मुले शिकावयास जात होती.

"इतक्या साऱ्या मुलांमध्ये जर समजले की, तू शिकलेला नाहीस तर अपमानाचीच गोष्ट होईल. म्हणून मन लावून अभ्यास करावयास शिक." गुरुजी म्हणाले.

मी कोणत्याही गोष्टी करता अपमान झालेल्याचा अनुभव केला नाही. एकेकाच्या नशिबाची गोष्ट आहे. सर्व लोक असे म्हणत आपली चेष्टा मस्करी करीत असतात की, आपण खूप बुटके आहांत मग काय ह्या गोष्टीचा अपमान समजून आपल्याला काय तसा अनुभव येईल कां ? कारण तुम्ही तर कधी उंच होऊ शकत नाहीत व मी कधी शिक शकत नाही. बस हीच एक गोष्ट आहे !" आनंद म्हणाला. ह्यावर गुरुजी रागानेच म्हणाला–"आणि जर तू शिकावयास तयार नसलास तर तुला दररोज दहा फटके खावे लागतील."

आनंद घाबरून गेला तो रोज खूप वेळेपर्यंत अभ्यास करू लागला. तरी सुद्धा तो एक सुद्धा अक्षर आत्मसात करु शकला नाही.

एकदा गुरुजी रागाच्या भरात त्याला म्हणाले–"रोज तुला दहा अक्षरे तरी शिकली पाहिजेत. कमी शिकशील तेवढे तुला रोज फटके मिळतील."

"हा तर सारासार अन्याय आहे !" आनंद म्हणाला.

"कसा ? गुरुजींनी संतापाने विचारले.

"शिकणें ही माझी जबाबदारी आहे. तसेच शिकवणे ही तुमची जबाबदारी आहे. जर मी काहीच शिकू शकत नाही. तर याचा अर्थ असा होतो की, तुम्ही मला नीट प्रकारे शिकवू शकत नाही. त्यामुळे हा दोष तुमचा आहे. तर तुम्ही मला शिक्षा देण्याची धमकी देता. मग तुमच्या दोषाला तुम्हांला कोण शिक्षा करणार." आनंदने गुरुजीना उलट प्रश्न करीत विचारले.

"बाळा, तू माझे डोळे उघडलेस. तू जर स्वत:च्या उणीवा समजू शकला नाहीस तर तुला शिक्षण प्राप्त होणे शक्य नाही. पण याद राख, मला जर माझा कमीपणा समजून आला तर तो मी नक्की सुधारण्याचा प्रयत्न करेन. मी तुला शिकवू शकत नाही. तू आनंदाने घरी निघून जा." गुरुजींनी समजावून सांगत म्हटले.

"माझ्या वडीलांनी तर मला एक वर्षापर्यंत घरी परत न येण्याचा हुकूम दिला आहे." आनंदनें संकोचाने गुरुजींना म्हटले. तू आपल्या वडीलांना सांग की, मी गुरुजींना त्यांच्या कमतरतेची कल्पना दिली गुरुजींनी थोडेसे चिडीनेच त्याला सांगितले.

आनंद आपल्या घरी निघून गेला. तेव्हां आनंदचे वडील घाबरून जात गुरुजींच्याकडे आले. तेव्हां गुरुजी म्हणाले–"तुमचा मुलगा शिक्षण सोडून बाकी कोणतेही काम शिकवले तरी ते तो शिकेल." असे म्हणत गुरुजींनी त्यांना परत पाठवून दिले.

आनंद शिक्षणात अगदीच कच्चा निघाला. परंतु शेती भातीच्या कामात त्याला शिक्षण नसल्याची कमतरता भासली. तेव्हां तो गुरुजींच्याकडे आला. गुरुजी घाबरून गेले. परंतु तो तेव्हां लगेच लिहिण्यास वाचावयास शिकला.

"पाहीलेत मी सांगितलेली गोष्ट खरी ठरली. एक तर पांचव्या वर्षी तरी शिक्षण प्राप्त झाले असते. नाहीतर विसाव्या वर्षी." आनंद गर्वाने फुलून जाऊन म्हणाला.

"बर, बर असे आहे काय! तर मग हे सिद्ध झाले की, तू न शिकण्याचा दोष माझा नाही!" गुरुजी संतुष्ट होत म्हणाले.



# कांशाचा किल्ला



## [ ६ ]

[सर्पकेतु आपल्या काही मोजक्या सैन्यानिशी नगरात घुसला. त्यामुळे चंद्रवर्माचे व्यूह अस्ताव्यस्त झाले. तेव्हां चंद्रवर्मा सुबाहुच्याबरोबर घोड्यावर बसून नगरातून बाहेर पडून पहाडांच्या बाजूला पळू लागला. पहाडावर शत्रू सैनिकांनी त्यांना घेरले. त्यामुळे चंद्रवर्मा व सुबाहू दोघांनी खाली वहात जाणाऱ्या नदीत उड्या ठोकल्या. ह्यानंतर–]

चंद्रवर्माने वहाणाऱ्या नदीत पोहायचा प्रयत्न केला. परंतु त्या नदिच्या वेगामुळे त्याला तरंगण्या वाचून मार्गच उरला नाही. पहाडाच्या कठड्यावरून त्याला शत्रू सैनिकांची आरडाओरड व बोलणे स्पष्ट ऐकू येत होते. परंतु त्याला ह्या गोष्टीचा उलगडा होईना की, सुबाहूने आपल्याबरोबर नदीत उडी मारली. का? तो शत्रु सैनिकांच्या हाती सांपडला?"

हा सर्व विचार करता करता तो वेगाने नदीच्या प्रवाहाबरोबर वाहात जात होता. त्याने पोहायचा खूप प्रयत्न केला. तो असफल झाला व काही वेळाने तो थकून गेला. शेवटी मरण जवळ आले असे समजून त्याने निराशेने आपले डोळे घट्ट मिटून घेतले.

चंद्रवर्माने जेव्हां डोळे उघडले तेव्हां काय? सूर्य डोक्यावर आला होता. चोहो-




बाजूला कांटेकुटे असलेले रान माजले होते ते दृष्य भयंकर होते. त्याने जाणले की आपण कोणत्यातरी पाण्याच्या बाजूला येऊन पडलो आहोत. त्याला समजले की दैवयोगानेंच प्रवाहावरोबर ह्या किनाऱ्याला येऊन पडलो. दुसऱ्याक्षणी त्याला सुबाहुची आठवण झाली. तो उठून बसला. त्याने आशेने चोहीकडे नजर टाकून पाहिली पण त्याचा काही मागमुस सुद्धा लागला नाही.

अतिश्रमाने त्याला सटकून भुक लागली. तो शेजारच्या झुडपांचा आधार घेत हळूहळू चालू लागला. तेथील काही झाडे फळांनी लगडलेली होती. आधीच भुकेला हाती येतील तितकी फळे तोडून त्याने आधाशा सारखी खाल्ली. तेव्हां त्याला स्मरणही राहीले नाही की हे भयंकर जंगल कोणाचे आहे.

भूक भागल्यावर चंद्रवर्मा येणाऱ्या आपत्तीचा विचार करू लागला. हि तर नशिबाचीच गोष्ट झाली की, शत्रूच्या तावडीतून तरी सुटका झाली. परंतु ह्या भयंकर जंगलात येऊन पडलो. हा कोणता प्रदेश आहे? इथे मानववस्ती आहे का नाही? हा भाग भुतप्रेत व जंगली श्वापदांचा तर नाही नां! असा मनांत विचार करीत करीत चंद्रवर्मा जंगलात शिरला. तो त्या झाडां खालून दूरपर्यंत गेला. तेवढ्यात भयंकर वादळ आल्याप्रमाणे झाडे हालू लागली व त्यामधून अंगावर कांटा येईल अशा कर्णभेदी कर्कश किंकाळ्यानी आसमंत हादरून गेले.

तो आवाज ऐकताच चंद्रवर्मा निश्चल उभा राहिला. झाडाच्या फांद्या त्याच्या बाजुला झुकून मोठ्या मोठ्याने आवाज करू लागल्या. तो ज्या बाजूला जाई त्या बाजूने त्या फांद्या वाकून कर्कश आवाज करीत त्याचा मार्ग अडवू लागल्या. ते पहाताच त्याला समजले की, हा भाग कोणत्यातरी जादूगाराचा असावा. आता इथून कसे बाहेर पडावयाचे. हाच प्रश्न त्याला भेडसावू लागला. त्याने रागारागाने म्यान्येतून तलवार बाहेर काढली व समोर येणाऱ्या फांद्याचे शेंडे संतापाने कापून काढले. त्याच क्षणी कर्कश किंकाळी त्याच्या कानावर पडली. नंतर तावडतोब अत्यंत तापलेल्या विस्तवा सारखा तो भाग तापू लागला. त्या भागात जोर जोरात सर्पांचा फुत्कार ऐकू येऊ लागला.

चंद्रवर्मा उभा हादरून गेला. परंतु तरीही त्याने थोडे साहस दाखविण्याचा व्यर्थ प्रयत्न केला. त्याने तलवार हाताच्या मुठीत घट्ट पकडून धरली. व सापांच्या फुत्काराच्या बाजूला आपला हात वळविला. जेथून गरम हवा येत होती तिकडे तो वळला. त्याने पाहिले तो एका झाडाच्या मुळातून एक तिन डोकी असलेला भयंकर साप सरपटत त्याच्या बाजूनेच येत होता. तो आपल्या जिभा बाहेर काढून फुत्कारत पुढे पुढे येत होता. चंद्रवर्माने मनात विचार करीत तलवार उगारली की प्रत्येक वारा गणित त्याचे तुकडे तुकडे व्हावेत. तेवढ्यात जंगलातून एक भयंकर विकृत हास्यध्वनीच्या बरोबर एक गोड आवाज त्याला ऐकू आला.

"बाळा, काळसर्पा! तू ह्या मानवाचा संहार करू नकोस. हा बिचारा येथ येऊन पडला आहे. म्हणून तू ह्याला मोठ्या अगत्याने माझ्यापाशी घेऊन ये."

हे शब्द ऐकताच तो तिन डोकी असलेला काळसर्प थोड्या दूरवरच थांबला. जंगलातील सर्व झाडे न हालता उभी राहीली.





हवा सुद्धा थांबली. चंद्रवर्माने आश्चर्ययुक्त नजरेने सर्पाकडे पाहिले.

काळसर्पाने आपल्या तिन्हीं डोक्यांनी चंद्रवर्माला असा संकेत केला. मी करतो त्याप्रमाणे तू माझे अनुकरण कर. ह्यानंतर तो जंगलात निघाला. चंद्रवर्माला दूसरा कोणताच उपाय सुचला नाही. हा प्रदेश कोणी मांत्रीकाने आपल्या मुठीत ठेवला आहे. त्यामुळे त्याला त्या सर्पाचे अनुकरण करण्या-शिवाय दूसरा मार्गच उरला नाही. जर कां आपण येथून पळून जाण्याची संधी घेतली तरमरण हे नक्कीच असा त्याने विचार केला.

चंद्रवर्मा असा विचार करीत करीत एका हातात तलवार घट्ट पकडून ठेवत त्या काळसर्पाच्या पाठोपाठ जाऊ लागला. थोड्या दूरवर गेल्यावर एका प्रचंड वृक्षाच्या खाली त्याला एक ससाण्याचे डोके पंख व सिंहाचे शरिर असलेला एक विचित्र प्राणी दिसला. सर्प त्याच्या समोर जाऊन उभा राहिला व आपल्या तिन्हीं डोक्यांनी खाली वांकून फुत्कार करू लागला. दुसऱ्या क्षणी तो विकृत प्राणी मधोमध दुभंगला गेला व त्याचे दोन तुकडे होऊन बाजूला जाऊन पडले आणि त्याला तेथे एक पडक्यां अवस्थेतील घर दिसू लागले व घराच्या चौकटीत एक जख्खड म्हातारी बाई पांढऱ्या केसांची व कमरेत वांकलेली त्याच्या नजरेस पडली.

ते पाहून चंद्रवर्माच्या तोंडून एकही शब्द बाहेर पडला नाही. त्या बाईला पहाताक्षणीच चंद्रवर्माच्या मनांत एक शंका आली की, ही बाई खरच मनुष्य आहे कां पिशाचीण आहे? तेवढयात त्या बाईने आपल्या हातातील काठी तिनदा जमिनीवर हापटली व त्याला प्रेमाने म्हणू लागली–"काळसर्पा, आता तू जाऊ शकतोस!" असे म्हणून ती चंद्रवर्माकडे वळत म्हणाली–"मुला, घराच्या आत ये! मी किती दिवसांपासून तुझी वाट पहाते आहे!"



चंद्रवर्माने आश्चर्याने थक्क होऊन विचारले–"काय? माझी वाट पहात होतीस!"

"होय रे मुला! तुझीच वाट पहात होते. तुला माझी खूप मदत करावयाची आहे. म्हणून मी सुद्धा तुला मदत करणार आहे." ती बाई म्हणाली.

त्या गोष्टी ऐकून चंद्रवर्माला समजले की, ही म्हातारी माणूसच आहे व जादु-गारीण आहे.

"तुला कसे माहीत की मी कोण आहे? तुझे नाव काय आहे." असे म्हणत चंद्रवर्मा त्या म्हातारीच्या जवळ जाऊ लागला.

माझे नाव कापालिनी आहे. मी तुला कोणत्याही प्रकारे त्रास देणार नाही. त्यामुळे तू तुझी तलवार म्यानात ठेवलीस तरी चालेल. आणि जरी कां मला तुला त्रास द्यावा असा विचार आला तरी तुझ्या त्या तलवारीचा काहीही उपयोग होणार नाही. तुला जंगलात प्रवेश करता क्षणीच ह्याचा अनुभव आलाच असेल नां! माझ्या शक्ति सामर्थ्याने मी तोंड व जिभ नसलेल्या झाडांकडून बोलून घेतलेले पाहिलेस नां! त्याच झाडांनी तुझा रस्ता अडवला होता." कपालिनी म्हणाली.

चंद्रवर्माला समजले की, आता आपण असहाय्य ठरलो. त्याने नाईलाजाने आपली तलवार म्यानात ठेवली व तिला म्हटले–"कापालिनी, मी एक असा अभागी आहे की, राज्य व मित्र ह्यांना घालवून देऊन मी













येऊन पडलो. मी केव्हांही तुला त्रास देणार नाही. ह्या अशा प्रदेशात मी सुद्धा तुझ्याकडून अशीच आशा करू कां?"

"काय मी तुला त्रास देईन तरी कां? कापालिनी, चंद्रवर्माकडे पहात म्हणाली—"चंद्रवर्मा, मला जेवढे शक्य आहे तेवढी यथाशक्ति मी तुला मदतच करेन. परंतु माझ्याकडून मदत घेण्यापूर्वी तुला माझी एक मदत करणे जरूर आहे?"

कापालिनीने चंद्रवर्माचे नाव घेऊन जेव्हां हांक मारले तेव्हां चंद्रवर्माचा मनापासून विश्वास बसला की, मंत्र सामर्थ्य तिच्या जवळ खूपच जास्त आहे. त्यामुळे आपल्या बाबतीतली सारी माहिती तिला आधी पासूनच माहीत असावी. आता ती हे सुद्धा सांगू शकेल की, ह्या क्षणी वीरपुर मधे काय चालले असेल. व आपला सेनापती धीरमल्ल व सुबाहु ह्याक्षणी कोणत्या स्थितीत असतील!

ह्या सर्व गोष्टी मनांत योजून विचारपूर्वक चंद्रवर्मा निर्भयपणे कापालिनीच्या जवळ गेला. तेव्हां तिने मोठ्या आदराने त्याला घराच्या आत नेले. घरांच्या भितींवर अनेक जनावरांची व माणसांची मुंडकी लटकलेली दिसली. भितींवर एका ठिकाणी एक मोठे मगदाड होते. तेथे एका विचित्र तऱ्हेने तैयार केलेला एका कांचेचा गोळा चमकत होता.

कापालिनीने चंद्रवर्माला तो कांचेचा गोळा जिथे ठेवलेला होता. त्याच्या शेजारच्या बैठकीकडे बोट करून बसण्यास सांगितले व म्हटले—"चंद्रवर्मा, तू तेथे बैस. तू नदीत न बुडता मृत्युच्या दाढेतून वांचून इथपर्यंत आलास ही भाग्याची गोष्ट आहे. मी जे कार्य साधावे असे म्हणते ते तुझ्याकडूनच करून घेणे शक्य आहे. दुसऱ्या कोणाकडून नाही.

चंद्रवर्मा त्या कांचेच्या गोळ्या शेजारच्या आसनावर बसत म्हणाला—"कापालिनी, हा गोळा विचित्र वाटतो आहे. ह्या गोळ्या विषयी मी पूर्वीच काही. गोष्टी ऐकल्या आहेत. काय ह्या गोळ्यात आपल्याला भूत-भविष्य व वर्तमान काळच्या गोष्टी दिसू शकतात नां?"



चंद्रवर्माचे बोलणे ऐकून कापालिनी श्वास घेत म्हणाली—"मुला, चंद्रवर्मा! तुला जसे माहित आहे. तसेच ह्या गोळ्यात आपल्याला झालेल्या गोष्टी व होऊन गेलेल्या गोष्टी पहावयास मिळतात. परंतु होणाऱ्या पहावयास मिळाल्या असत्या तर मला निराश होऊन जाण्याचे कारणच नव्हते. त्यामुळेच मला एका कठिण अशा कामा करीता व ते साध्य करून घेण्याकरीता तुझी मदत पाहिजे आहे."

"काय ते काम इतके कठीण आहे कां?" चंद्रवर्माने तिला विचारले.

"हो, हो कठीण असेच आहे. पण असाध्य नाही. येथून सुमारे शंभर योजने लांब एक शंखू नावाचा मांत्रिक रहातो. तू त्याच्या घरात जाऊन मी सांगेन ती एक गोष्ट चोरून आणली पाहीजेस. त्या वस्तुमुळे मी एक हजार वर्षापर्यंत तारूण्य व स्वास्थ मिळवून आयुष्य जगू शकेन नाहीतर...!"

कापालिनी आपली वाक्ये पूर्व करण्यापूर्वीच उमळून उमळून रडू लागली. व आपले ओघळणारे अश्रू पुसु लागली. तेव्हां त्या म्हातारी बद्दल चंद्रवर्माला अपार कणव उत्पन्न झाला. प्रथम चंद्रवर्माला शंका आली की, ही जादूगारीण त्याला धोका देऊन त्याला ठार मारेल पण तिने तिचे सांगितलेले दुःख पाहून ती शंका दूर झाली.

"कापालिनी, मी माझी शक्ति पणाला लावून तुला मदत करेन! परंतु ह्यापूर्वी तू माझे एक छोटे काम केले पाहीजेस. काय तू ह्या कांचेच्या गोळ्यात पाहून सांगू शकतेस कां? की ह्या क्षणी माझे वीरपुर नगर कोणत्या स्थितीत आहे? आणि माझा सेनापती धीरमल्ल व माझा नोकर सुबाहु जिवंत आहेत कां नाहीत?"

कापालिनी खदखदून हसत उठून उभी राहीली व भितीवर टांगून ठेवलेले एक मानवाचे लांब हाडूक काढून तिने हातात

घेतले व त्या चमकत्या गोल कांचेच्या गोळ्या जवळ येऊन उभी राहिली व डोळे मिटून तोंडाने कोणता तरी मंत्र पुटपुटू लागली. व त्या हाडकाने तीने गोळ्याला स्पर्श केला व म्हणाली–"हे बघ तुझे वीरपुर नगर!"

आगीच्या ज्वाळा चारी बाजूला धडाधड पेटून आकाशाला भिडू पहात होत्या. सर्वत्र धुर पसरला होता. नगराच्या सर्व रस्त्यावर लोक हाहाकार करीत भयग्रस्त स्थितीत अवास्तव पळत होते. ते दृष्य पाहून चंद्रवर्मा अत्यंत व्याकुळ झाला व जोर जोरात ओरडत त्याने आपले डोळे बंद करून घेत म्हटले–"कापालिनी, बस बंद कर. मी डोळयांने ते दृष्य पाहू शकत नाही." तेव्हां कापालिनीने पुन्हां ते हाडूक त्या गोळ्याला टेकवले आणि काय आश्चर्य ते दृष्य क्षणभरात अदृश्य झाले. पुन्हां तिने ती जादूची कांडी त्या गोळ्याला लावली व मंत्र म्हणत म्हटले–"आता पहा, हा तुझा सेनापती धीरमल्ल!"

चंद्रवर्माने मोठ्या आशेने डोळे उघडले व उत्सुकतेने त्या कांचेच्या गोल गोळ्याकडे पाहू लागला. तेव्हां त्या कांचेच्या गोळ्यात त्याला भयंकर पहाड दऱ्याखोऱ्या व नदी नाले दिसले. आपल्या काही सैन्यासह सेनापती धीरमल्ल वेगाने दौडत त्या रस्त्याने जात होता. त्याला चारी बाजूनी वेढा देत सर्पकेतुचे सैनिक त्याच्या जवळ जवळ येत होते. धीरमल्लाने आपला घोडा थांबविला. व आपल्या साथीदारांना आदेश दिला. नंतर आपली तलवार खेचून काढून तो शत्रू सैन्याला तोंड देण्याकरीता वीजेच्या गतीने पुन्हां पळू लागला.

"हि गोष्ट आज सकाळी घडली आहे. ह्यानंतर त्याचे काय झाले हे पहाणें चांगले नाही!" असे म्हणत कापलिनीने ती जादूची कांडी परत त्या गोलावर टेकविली तत्क्षण ते दृष्य अदृष्य झाले.

चंद्रवर्मा आश्चर्यचकित होऊन त्या अद्भुत कांचेच्या गोळ्याकडे पहातच राहिला! (क्रमशः)



# समजुतदारपणा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन-पणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तू कोणती इच्छा मनात धरून ह्या अर्ध्यारात्री हे कष्ट सहन करीत आहेस. परंतु ह्या होणाऱ्या गोष्टींचा काही भरोसा नाही की, ती गोष्ट साध्य होताच तू खरोखरी संतुष्ट होशील. ह्याचे उदाहरण म्हणून मी तुला शान्तनवर्मा नावाच्या राजाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कुंतल देशाचा राजा शान्तन वर्मा खूप दयाळू व धर्मात्मा होता. त्यामुळे त्याच्या राज्यातील प्रजेला चोर दरोडेखोरांचे भय नव्हते. परंतु निसर्गतः होणाऱ्या प्रकोपाचा सामना त्यांना करावा लागे. त्यामुळे









प्रजेला संकटे सोसावी लागत. कधी जास्त पावसामुळे पिके नष्ट होत, तर कधी पाण्याच्या दुर्भिक्षामुळे दुष्काळ पडे. त्यामुळे वेळोवेळी राजा सर्व राज्यातील गावातून फिरून लोकांना पाहीजे ती मदत करे.

एकदा वर्षा ऋतुत कुंतल देशातून वहाणारी नदी बलभद्र हिला पुर आला. त्यामुळे कित्येक गावे पाणीमय होऊन गेली. लोकांचे बरेच नुकसान झाले. तेव्हां राजा शान्तन वर्मा ह्याने काही नोकर व अधिकाऱ्यांना बरोबर घेतले व तो जेथे लोकांना पुराचा त्रास झाला व जे बेघर झाले तेथे गेला व त्यांना पाहीजे ती मदत केली.

राजा परत जेव्हां राजधानीला येत होता तेव्हां वाटेतील जंगलात त्यांना एक आश्रम दिसला. चौकशी केल्यानंतर त्यांना समजले की तो आश्रम ज्ञानश्रय नावाच्या एका मुनींचा आहे व ते योग विद्येत विद्वान तपोबलवान शक्तिशाली आहेत.

नंतर शान्तन वर्मा राजाने मुनींचे दर्शन घेतले. तेव्हां मुनींने त्यांचे आदराने स्वागत केले व म्हटले–"राजन् मी असे ऐकले की, आपण दानशूर धर्मात्मा आहात व जनतेच्या सुखादुःखा शिवाय आपल्याला काही सुचत नाही. तुम्हीं त्यांचीच नेहमी चिंता करता. असा राजा पहावयासही मिळत नाही. तुम्ही मला भेटायला आला आहात तेव्हां जर कां आपल्या मनांत काही इच्छा असेल तर मला सांगा."

राजा विनयतेने म्हणाला–"महात्मा, मी जनतेच्या कल्याणाकरीता अनेक योजना आंखल्या आहेत व त्या तेवढ्या लवकर संपत नाहीत. पुर, वादळ पाऊस ह्या नैसर्गिक प्रकोपांपासून तर ते थांबवता येत नाही. तरीही त्यामुळे नागरीकांचे अपार नुकसान होते. ते आम्हांला कुठल्याही प्रकारे थांबवता येत नाही. तरी कृपया तुम्ही मला काही तरी योग्य मार्ग सांगा.

ह्यावर ज्ञानाश्रय मुनी मंदहास्य करीत म्हणाले–"आपली इच्छा तर प्रशंसनीय आहे. परंतु कोणतेही काम मनांत आणले तर त्याचा मोठा खोल विचार करावयास हवा. तेव्हांच ते कार्य सफल होते. काय आपल्या जवळ पाहिजे तितके कुशल अधिकारी आहेत कां?"

"मुनिवर, माझ्या राज्यातील अधिकाऱ्यांची दक्षता व शक्ति सामर्थ्य ह्याबद्दल मला जरा देखील शंका नाही. ते राज्यकारभारात मला कोणत्याही कार्यात चांगला सल्ला देऊन सर्वप्रकाराने मला योग्य तेवढी मदत करतात. परंतु आत्ता माझा एवढाच हेतू आहे की, मी जनतेकरीतां करीत असलेले कार्य लवकरात लवकर पूर्ण व्हावे.

मुनी क्षणभर गप्प राहीले व म्हणाले–"राजा, तर तुला मी एक अपुर्व शक्ति असलेले यंत्र भेट म्हणून देतो. ते यंत्र डोक्यांवर ठेवून जो संकल्प मनात करशिल.







ते काम तावडतोब होते. व ते करण्याविषयी योग्य तो सल्ला सुद्धा आपल्याला तावड-तोब मिळेल. असे म्हणत मुनीने एक हस्तीदंती पेटी राजाच्या हातात दिली.

राजाने श्रद्धापूर्वक ती हातात घेतली. नंतर मुनीने त्याला त्याबद्दल सांगत म्हटले–"राजा ह्या यंत्राच्या बाबतीत एक खास गोष्ट मी तुला सांगणार आहे. मी माझी थोडी शक्ति, तपस्या ह्याचा त्याग करून हे यंत्र बनविलेले आहे. त्यामुळे ह्याचा महिमा मी जो पर्यंत जिवंत आहे. तो पर्यंतच रहाणार ह्या क्षणी माझे आयुष्य ऐंशी वर्षाच्याही पुढे आहे. मी योग साधना केली आहे. त्यामुळे जास्तीत जास्त मी अजून पंद्रहा वर्षे तरी जगू शकेन तो पर्यंत तुम्ही निश्चितपणे ह्या यंत्राचा उपयोग करू शकता. मी मेल्या-नंतर मात्र ही पेटी म्हणजे एक केवळ लाकडी पेटीच म्हणून राहील.

शान्तन वर्मा थोडा वेळ विचार करीत राहीला. नंतर त्यांनी ते यंत्र परत करीत. म्हटले–"मुनिवर, मी ह्या यंत्राचा स्विकार करू शकत नाही. कृपा करून माझ्यावर असंतुष्ट होऊ नका.

मुनीने विस्मयाने पहात विचारले– "राजा, तू हे कोणत्या कारणामुळे परत करीत आहेस. तुला हे कमीत कमी पंद्रहा वर्षे तरी वापरता येईल. ह्याच्या मुळे तुला जनतेच्या कल्याणाच्या अनेक गोष्टी संपन्न करून घेता येतील नां!

"महात्मन्, मला क्षमा करा. ह्या यंत्रा पासुन सद्य स्थितीत जरी मला लाभ करून घेता येत असला तरी भविष्यकाळातील होणाऱ्या गोष्टीं करीता मलाच विचार करावयास हवा नां! म्हणून मी ह्याचा स्विकार करीत नाही." राजाने म्हटले.

मुनीने मंदहास्य करीत राजाला आशि-र्वाद दिला व जाण्याची परवानगी दिली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, शान्तनवर्मा खूप लोभी लालची तर नाहीच पण भोळाभाळाच वाटत आहे. त्याची मनोकामना ऐकून मुनीने आपल्या तपोबलाने तयार केलेले एक यंत्र त्याला भेट रूपे म्हणून देऊ केले. परंतु त्यावरही राजा संतुष्ट झाला नाही. व त्याने ते मुनींना परत करून टाकले. उलट भविष्य काळात उत्पन्न होणाऱ्या समस्यांचा उल्लेख करीत त्याने आपल्या भोळ्या स्वभावाचा प्रत्यय दिला. व जनतेच्या करीता करून देणाऱ्या कल्याणकार्याला वंचीत राहिला. ह्याचे कारण त्याची लोभीवृत्ती व भोळेपणाच आहे नां?" ह्या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला– "शान्तन वर्मा राजाने मुनींच्या कडून मिळणारे यंत्र त्यांना परत करून आपला विवेक जाणीव ह्यांचा प्रत्यय घडवून दिला. ह्या क्षणी ते स्वतः विचार करून आपल्या अधिकाऱ्यांबरोबर सल्लामसलत करून काळजीपूर्वक राज्याचा राज्यकारभार करीतच आहेत अशा वेळेस जर मुनींन कडून मिळालेल्या मंत्राच्या सहाय्याने राजा जर राज्यकारभार करू लागेल तर राज्यातील अधिकाऱ्यांना काही विचार करण्यास संधीच मिळणार नाही पंद्रहा वर्षात ते आपली सर्व विचार शक्ति घालवून बसतील पंद्रहा वर्षानंतर यंत्राचा महिमा संपुष्टात आला की, परत त्या सर्वांना विचारशक्ति व क्षमता वाढविणे शिकावयास पाहिजे. विचार प्रगल्भताच मनुष्य प्राण्यांची एक महान शक्ति समजली जाते. तेव्हां अशा स्थितीत जर यंत्राच्या लोभाला बळी पडून ती त्याग केली तर सद्य स्थितीत त्याचा विचार करणाऱ्या राजाला लोभी व लालसी भोळे म्हणता येणार नाही. ते माझ्या दृष्टीने तरी अत्यंत विवेकशिल व समजुतदार आहेत."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतावरोबर अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)














# मुर्ख आणि भक्त

एका जंगला जवळच्या गावात एक गरीब ब्राह्मण रहात होता. त्याच्या घराला लागूनच्या घरात एक गरीब लाकुडतोडया रहात होता.

अचानक लाकुडतोडयाच्या परिस्थितीत खूप मोठा बदल झाला. त्याने आपली झोपडी बदलून त्याच्या शेजारीच एक मोठे घर बांधले. व त्याच बरोबर त्याच्या घरातील मुलेबाळे व त्याची बायको चांगले कपडे वापरू लागली.

लाकुडतोडयाच्या ह्या बदलेल्या परिस्थितीमुळे गरीब ब्राह्मणाला अत्यंत आश्चर्य वाटू लागले. ब्राह्मणांच्या बायकोने नवऱ्याला म्हटले—"ह्या लाकुडतोडयांच्या जीवनात जो एकदम बदल घडला आहे त्याची माहीती काढून मी तुम्हांला सांगते."

थोडया दिवसाने त्या ब्राह्मणीने पतीला म्हटले—"अहो, हा लाकूडतोडया रोजच्या रोज थोडा थोडा श्रीमंतच बनत चालला आहे. मी ह्याचा शोध काढला आहे. त्या लाकुडतोडयाच्या बायकोने ती गोष्ट मला सांगितली.

काही दिवसापूर्वी एक दिवस रात्रंदिवस पाऊस पडत होता. त्यामुळे लाकुडतोडया लाकडे तोडायला जंगलात जाऊ शकला नाही. त्यामुळे त्याच्याकडे जे काही शिल्लक उरले होते. ते सर्व खर्च होऊन गेले. त्यानंतर त्यांना पुढे दोन-तीन दिवस उपाशीच रहावे लागले.

एक दिवस रात्री अचानक लाकडतोडयाच्या मनात एक युक्ति आली. गावाजवळून वहाणाऱ्या नदीच्या कांठावर एक जुने पुराणे देऊळ आहे. लाकुडतोडया रात्री अंधारात कुऱ्हाड घेऊन त्या देवळात घुसला त्याच्या मनांत विचार आला की, ती लाकडाची देवाची मुर्ती तोडून तरी थोडे पैसे मिळवता येतील. पण जशी त्याने कुऱ्हाड उगारली तशी त्या लाकडाच्या मुर्तीमधून आवाज बाहेर पडला—"अरे थोडा थांब."

लतिका खरे

लाकुडतोडया आपली कुऱ्हाड तशीच हवेत उगारून उभा राहीला. त्याच क्षणी त्या लाकडाच्या मुर्ती मधून शब्द बाहेर पडले—"तुला फक्त धनच पाहिजे आहे नां? तर तू दर सोमवारी सूर्योदया पूर्वी ह्या नदीत एक बुडी मार तुला तुझ्या हातात एक सोन्याचे नाणे दिसेल."

त्या दिवसानंतर दर सोमवारी तो सोन्याचे एक नाणे मिळवू लागला. व श्रीमंत बनला.

ब्राह्मणीने असा सर्व समाचार आपल्या पतीला सांगितला व म्हटले—"आपल्याला सुद्धा श्रीमंत व्हायला हाच एक सोपा उपाय आहे. तुम्ही सुद्धा एक कुऱ्हाड घेऊन जाऊन देवाच्या मुर्तीवर उगारा म्हणजे मग काय आपल्याला सुद्धा दर सोमवारी एक सोन्याचे नाणे मिळत जाईल."

परंतु त्या ब्राह्मणाला तिने दिलेला सल्ला पसंत पडला नाही. त्याने विचार केला की, धनाच्या लोभाने लाकडाच्या देवाच्या मुर्तीवर कुऱ्हाड उगारणे म्हणजे पाप समानच आहे. परंतु त्याने त्यावर खूप गाढ विचार केला. तेव्हां त्याला



स्वतःच्या गरीबीवर तोच काय तो एक उपाय बरोबर वाटला.

त्याच दिवशी रात्री तो ब्राह्मण एक कुऱ्हाड घेऊन त्या देवळात जाऊन पोहोचला. व आपण करीत असलेल्या पापाचा संकोच करीत त्याने देवावर कुऱ्हाड उगारली. परंतु मुर्ती मधून कोणतेही शब्द बाहेर पडले नाहीत. त्यामुळे ब्राह्मणाला अत्यंत आश्चर्य वाटू लागले. ह्यावेळी त्याने कुऱ्हाड आपल्या हातात जोरात घट्ट पकडून ठेवली व मुर्तीकडे रागीट नजरेने पहात त्याने ती उगारली.

त्याच क्षणी एक दिव्याचा उजेड मुर्तीच्या चेहऱ्यावर पडला त्यामुळे त्याला त्या मुर्तीचा चेहरा स्पष्ट दिसू लागला.


Restore

127





दुसऱ्या क्षणी तो भीतीने थरथर कांपू लागला व बेशुद्ध होत खाली कोसळला.

त्याच वेळेस पडता पडता त्या ब्राह्मणाला त्या मुर्तीतून काही शब्द ऐकू आले–"मुला तू देवावर भक्ति व विश्वास ठेवणारा आहेस. ते सोडून तू तुझ्या शेजारी रहाणाऱ्या मूर्ख लाकूडतोड्या सारखा व्यवहार करू पहातोस. तो मुर्खपणाने माझ्यावर कुऱ्हाड चालवेल ह्यात मला जरा देखील शंका नव्हती. कारण त्याच्या दृष्टीला तर मी केवळ एक लाकूडच आहे नां! परंतु तू ब्राह्मण असा मूर्खासारखा व्यवहार कसा करू पहातोस? तुला असे कसे वाटले की, तुझ्या ठिकाणी जी भक्ति आहे! तशीच त्या लाकुडतोड्याजवळ असेल. आणि त्यातून तू जर आज कुऱ्हाड चालव-लीच असतीस तर नक्कीच तुला पापाचा भागिदार व्हावे लागले असते. काय तुला माहीत आहे कां? की देवाची मुर्ती म्हणजे काय असते? लाकुडतोड्यांची गोष्ट ह्या बाबतीत सर्वदा भिन्न आहे. तो तुझ्या सारखा ज्ञानी व विवेकशिल असत नाही."

ब्राह्मण हळूहळू शुद्धीवर येत असताना त्याला हे ऐकू आले.

त्यानंतर तो ब्राह्मण उठून उभा राहीला. व त्या मुर्तीला हात जोडून नमस्कार करून तो परत घरी आला. त्याच्या बायकोने त्याला दारातच विचारले–"सांग, शेवटी काय झाले? कारण आपला पती कुऱ्हाड घेऊन देवळात गेल्यानंतर तिने सुचविलेल्या सल्ल्याबद्दल मनांतून तिला भयंकर पश्चाताप झाला.

ब्राह्मण म्हणाला–"मी अत्यंत भाग्यवान आहे. कारण देवाच्या तोंडूनच त्याचे बोलणे ऐकले. आपण आपल्या गरिबीवर दुःखी होणे बरोबर नाही. कारण त्याला तो देवाचा निर्णय समजून आपल्याला जेवढे काय प्राप्त होते. त्यावरच समाधान मानून राहिले पाहीजे तशीच सवय आपण आपल्याला लावली पाहिजे.

त्याच्या पत्नीने तेच योग्य मानून मान हलविली व मनोमन संतुष्ट झाली.





# चुकीची समजूत

छिन्दवाडा नावाच्या गावात सोमशेखर नावाचा एक माणूस रहात होता. त्याला जनार्दन नावाचा एकुलता एक मुलगा होता. सोमशेखर शिघ्रकोपी होता. तो कोणत्या ना कोणत्या गोष्टी करीता आपल्या मुलाला रागवत व शिव्या देतअसे. परंतु जनार्दन न बोलता वडीलांना उलट उत्तरे न देता मुकाट्याने ऐकून घेत असे.

जनार्दन लग्नायोग्य झाला. परंतु कोणीही मनुष्य त्याला आपली मुलगी द्यावयास तयार नव्हता. शेजार गावी दण्डपाणि नावाचा जनार्दनचा एक नातेवाईक रहात होता. त्याची मुलगी मिनाक्षी लग्नायोग्य झाली. तरी सुद्धा त्यांनी मुली करीता जनार्दनचे स्थळ निवडले नाही.

जनार्दनच्या बद्दल दण्डपाणिच्या मनातच नाही तर इतर अनेक लोकांच्यात विषेश प्रकारचा तर्क होता. तो असा की, जनार्दन भोळा-भाबडा नाही परंतु एक नंबरचा भेकड आहे. त्यामुळे वडिलांनी कितीही रागावले शिव्या घातल्या तरी तो ते मुकाट्याने ऐकून घेऊन गप्प बसून रहातो.

एकदा सोमशेखरने आपल्या मुलाला जनार्दनला ताम्रपुरी नावाच्या शेजारच्या गांवी आंबे विकत आणण्या करीता पाठवले. जाण्यापूर्वी वडिलांनी त्याला बजावून सांगितले की, आंबे स्वस्त असतील तरच घेऊन ये नाहीतर नको.

त्या दिवशी रात्री जनार्दन पन्नास आंब्यानी भरलेली टोपली घेऊन घरी आला. सोमशेखरला जेव्हां समजले की, जनार्दन पन्नास आंब्याना पन्नास रुपये देऊन घेऊन आला. तेव्हां त्याला अतिशय संताप आला तो रागारागाने त्याला म्हणाला–"अरे मुर्खा तुझे डोके तर फिरले बिरले नाही नां! मी तुला सांगितले की आंबे



स्वस्त असतिल तरच घेऊन ये नाहीतर रिकाम्या हाताने परत ये. तू तर पन्नास आंब्याला पन्नास रुपये दिलेस. आणि वर स्वत:चा मुर्खपणा दाखविलास नां! म्हणूनच कोणत्याही मुलीचा बाप तुझ्या बरोबर मुलीचे लग्न करून देण्यास तयार नाही.

जनार्दन प्रथमच एवढा लांबचा प्रवास करून थकला होता. तरीही तो शांतपणे वडीलाना म्हणाला—"बाबूजी, कोणत्याही गोष्टीची किमत आपल्या गावांत कमी व दुसऱ्या गावात जास्त असली तरच ती वस्तु स्वस्त आहे म्हणतात नां! तर आपल्या गावात बिलकूल आंबेच नाहीत. तिथे ताम्रपुरीला पन्नास आंब्याची किमत पंच्याहत्तर रुपये होती. मी घासाघीस घालून पन्नास रुपयांना खरेदी केले. वाट-खर्च पांच रुपये झाला....ह्यानंतर पुढे जनार्दन काही सांगणार होता."

पण सोमशेखर आपल्या मुलाचे बोलणे थांबवत चिडून म्हणाला—"अरे, तुला ह्या सर्व गोष्टी कोणी विचारल्या होत्या.

"पण तुम्ही विचारलेत किंवा नाही तरी मला सांगितलेच पाहिजे नां! पुन्हां तिथे मला रामनाथ सहाय्यक भेटले म्हणत होते की, त्यानी पूर्वी आपल्या कडून काही कर्ज घेतले होते. आपल्या कर्जातील व्याज चारशे रुपये त्यांनी माझ्या हातात दिले. असे म्हणून जनार्दनने ते पैसे वडिलांच्या हातात ठेवले. व म्हटले—"बाबूजी, एक गोष्ट लक्षात ठेवा! तुम्ही तोंडाने मला रोज ज्या शिव्या घालता रागवता त्याच कारणाने मला कोणी आपली मुलगी द्यावयास तयार नाही."

त्याच वेळेला त्यांचा नातेवाईक दंडपाणि घराच्या आतून बाहेर आला. त्याला पहाताच जनार्दन आश्चर्यचकित झाला व म्हणाला—"मामा, तुम्ही केव्हां आलात?"

"आता थोड्या वेळा पूर्वी! तुझ्या बाबूजींनी सांगितले तू काही कामाकरीता ताम्रपुरीला गेला आहेस.

दण्डपाणिच्या बोलण्यावरून जनार्दनला समजले की, आपले वडीलांच्या बरोबर झालेले संभाषण त्याला माहीत नसावे. म्हणून निर्धास्त होत जनार्दन म्हणाला—"आता आताच येतो आहे. मामा! तुम्ही अचानक आलात! काय विशेष आहे?"

"मी तुम्हा लोकांच्या कानावर माझ्या मुलीचे लग्न ठरल्याची गोष्ट सांगण्याच्या हेतूने आलो होतो." दण्डपाणि खुदुखुदु म्हणाला.

"अरे, कुणाच्या बरोबर काय?" तुझ्याच बरोबर!" दण्डपाणि म्हणाला.

हे उत्तर एकून सोमशेखर म्हणाला—"पण, तुला तर येऊन इथे बराच वेळ होऊन गेला परंतु जनार्दन येईपर्यंत तू ही गोष्ट आम्हांला नाही सांगितलिस. हे काही बरोबर नाही हां!"

त्या दिवशी रात्री सर्वजणांनी आनंदाने गप्पागोष्टी करीत जेवण केले. दण्डपाणिने आपल्या गावात पोहोचताच आपल्या घरी जाऊन बायकोला सांगितले की, मिनाक्षीचा विवाह त्याने जनार्दनच्या बरोबर निश्चित केला आहे. त्यावर दण्डपाणिची बायको आश्चर्यचकित होत म्हणाली-"काय हो, तुम्ही घरातून निघतांना एका शब्दानेही माझ्याशी बोलला नाहीत की लग्न पक्के ठरवायला जात आहे. आणि लग्न ठरवलेत तेही एका नंदीबैलाशी नां? तुम्हांला माहीत आहे की, जनार्दनला व्यवहार ज्ञान बिलकूल नाही.

तेव्हां दंण्डपाणिने बायकोला सर्व सांगत समजावत म्हटले—"जेव्हां जनादन आंबे खरेदी करून घरी परत आला. तेव्हां त्याला माहित नव्हते की, मी आतल्या खोलीत बसलो आहे. आणि त्याला जेव्हां समजले की, त्याचे वडीलांशी झालेले सर्व संभाषण मी ऐकले त्यामुळे त्याने एकदम सारवा-सारव करण्याचा प्रयत्न केला. तो खूप सम-जुतदार आहे. तो पाहिजे त्यापेक्षा जास्तच वडिलांचा आदर करतो. परंतु आज मला समजले की, जरूरत पडेल तर तो आपल्या वडिलांन बरोबर विरोध पण करू शकतो.

हे ऐकल्यावर दण्डपाणिच्या बायकोचा विश्वास बसला की, आपल्या मुलींकरीता याहून चांगले स्थळ कोणते मिळणार.





# ऋषिंचा शाप

ब्रह्मदत्त काशीच्या गादीवर असता.

बोधिसत्वानी एका ब्राह्मण परिवार-मध्ये जन्म घेतला. त्याचे वडिल मौल्यवान हिरे, माणीक इ. रत्नांचा व्यापार करीत होते. त्यानी बोधिसत्वाना वयाच्या सोळाव्या वर्षापर्यंत गुरुकुलात ठेवून शिक्षण देवविले.

गुरुंच्या पाठशाळेतून घरी आल्यावर बोधिसत्वांच्या वडिलांनी त्याला सांगितले—"बाळा, मी आता वृद्ध होत चाललो आहे. तू माझा एकुलता एक मुलगा आहेस. त्यामुळे आजपर्यंत मी जो व्यापार करीत आलो होतो. त्यातील काही महत्वाच्या खुबी तुला सांगणार आहे?"

बोधिसत्वानी आपल्या पित्याचे म्हणणे मान्य केले. नंतर एक दिवस ते बाप-लेक काही किमती रत्ने घेऊन व्यापाराला निघाले.

अशा प्रकारे दोघे अनेक गावे शहरे हिंडून फिरून आपला रत्नांचा व्यापार करीत अखेर वाराणासी येथे येऊन पोहोचले. ते जेव्हां पोहोचले तेव्हां नुकताच काळोख पडू लागला होता व सर्व दिशा अंधारल्या होत्या.

बोधिसत्वाच्या वडीलांनी नगराच्या द्वारपालाकडे जाऊन आत जाण्याची परवानगी मागितली.

"महाशय, आपण तर दिसायला श्रीमंत व्यापारी वाटता परंतु मला राजाचा हुकूम तोडता येणार नाही. त्यांचा आदेश आहे की सुर्यास्ता पासून सूर्योदयापर्यंत नगराचे दार कोणाकरताही उघडता येणार नाही" द्वारपालने त्याना सांगितले.

आता बापलेकांना एकच विवंचना पडली की ह्या स्थितीत कुठे जाऊन रहायचे? बोधिसत्वाच्या वडिलांनी म्हटले—"बाळा, आज रात्री आपल्या भोजन कुठे मिळेल? जर शहरात जावयास मिळाले असते तर कोणत्यातरी खानावळीत जेवता आले असेत."

ते ऐकून द्वारपालला त्याच्यावर दया आली तो म्हणाला—"हे पहा, जर आपल्या-पाशी स्वयंपाकाचा शिधा असेल तर ह्या तटाच्या बाजूलाच माझी झोपडी आहे. तेथे तुम्ही अन्न शिजवू शकता."

त्यामुळे ते दोघे बाप-लेक त्या झोपडी-पाशी गेले व त्यांनी एका तासाच्या आंत स्वयंपाक तयार केला व जेवण करून घेतले. परंतु त्या झोपडीत दोघांच्या करीता झोपण्याची व्यवस्था नव्हती.



बोधिसत्वाने द्वारपालला उपकार झालेल्या कृतज्ञतेने विचारले—"दादा, आजच्या रात्रीपुरती कुठे झोपण्यास जागा मिळू शकेल कां?

"इथून थोड्या दूरवर एक पर्णशाळा आहे. परंतु सर्वजण असे सांगतात की, तेथे भूते-खेते निवास करतात. तरी सुद्धा तुम्हांला जर धैर्य असेल तर रात्री तुम्हांला तेथे जाऊन झोपता येईल." द्वारपाल म्हणाला.

भूता-खेताच्या गोष्टी निघताच बोधि-सत्वाच्या वडिलांना खूप काळजी वाटू लागली. परंतु मुलांनी वडिलांना धीर देत म्हटले—"बाबा, तुम्हांला काळजी वाटण्याचे कारण नाही! मी दहा वर्षे कष्ट झेलून गुरूकुलात जी विद्या प्राप्त केली आहे त्या पासून तुम्ही तर नेहमीच अपरिचीत राहीलात."

मुलाचे ते बोलणे ऐकून वडिलांना खूपच धीर आला. तेव्हां ते दोघे शहराच्या सिमे पासच्या पर्णशाळेत येऊन पोहोचले. त्यावेळी तेथे कोणीही नव्हते. ते दोघे आत गेले व भींतीला टेकून ठेवलेल्या लाकडाच्या फळयांवर झोपले.

त्या पर्णशाळेच्या आत एक नरमांस खाणारा यक्ष रहात होता. त्याला बरेच दिवसांपासून काहीहि खावयाला मिळाले



नव्हते त्यामुळे तो भुकेने अर्धमेला होऊन गेला होता. परंतु त्याला ते दोघे बाप-लेक दिसताच अत्यानंद झाला व मनांत म्हणू लागला की, आज छान मेजवानी मिळणार.

परंतु त्या यक्षाला एका ऋषिचा शाप होता तो असा की, जर कोणी शिंकेल व त्याच्या पाठीमागचा "चिरंजीव" म्हणेल तर तो त्याला खाऊ शकत नसे. शिंकल्यावर जर 'चिरंजीव' म्हणणार नाही तर तो त्या माणसास खाईल.

त्यामुळे यक्षाने खूप वेळ कोणीतरी शिंकण्याच्या आशेने वाट पाहिली. परंतु बापलेकांपैकी कुणीच शिंकले नाही. शेवटी कंटाळून यक्षाने वरच्या माळ्यावरून एक उग्रवासाची भुकटी बोधिसत्वांच्या समोर उधळली तो वास नाकपुड्यांच्या आत जाताच बोधिसत्वाचे वडील जोरात शिंकले परंतु बोधिसत्वाच्या तोंडून 'चिरंजीव' हा शब्द बाहेर पडला नाही ते पहाताच बोधिसत्वानी जाणले व त्यांनी वडीलांच्या पाठीवर थापटत 'चिरंजीव' म्हटले.

यक्ष निराश होऊन परत जावयास निघाला परंतु बोधिसत्वानां त्याला चिडवावे असे वाटले. म्हणून त्यांनी कपड्याची सुरनळी करून नाकात घातली व जोरात शिंकले.

यक्षाच्या मनात पुन्हां आशा निर्माण झाली की, त्याच्या जवळाचा कोणी चिरंजीव म्हणला नाही की, बोधिसत्वाचा आहार करावयास मिळेल असे समजून तो बोधिसत्वाच्या जवळ जाऊ लागला.

तेवढ्यात बोधिसत्वाच्या वडिलांनी 'चिरंजीव' म्हणत त्याच्या डोक्यावर थापटले. ते पाहून यक्ष रागाने लाल लाल झाला. त्याला वाटू लागेल की, आपल्या तोंडचा घास कोणी ओढून घेत आहे. पुन्हां लाचार होऊन तो माळ्यावर चढू लागला ते पाहून बोधिसत्वानी त्याला हांक मारले "यक्षा इकडे ये!"

यक्षाने वळून पाहिले, तेव्हां बोधिसत्वांच्या मुखमंडला भोवती तेजोमय प्रकाश





त्याला दिसला तो पाहून यक्ष भीतीने कांपू लागला व हात जोडत त्याच्या समोर येऊन उभा राहिला.

बोधिसत्वनी त्याच्याकडे तिक्ष्ण नजरेने पहात म्हटले–"यक्ष मला माहीत आहे की तू नरमांस भक्षण करणारा आहेस. त्यामुळे आमच्या दोघांपैकी एकाला खाऊन तू तुझी भुक भागवू शकतोस? मग तसे न करता तू असा गुपचूप निघून कां जात आहेस?"

यक्षाने त्यांना वांकून नमस्कार करीत म्हटले–"हे महातेजस्वी! मला एका ऋषींनी शाप दिला आहे. त्यामुळे मी तुम्हांला खाण्यास असमर्थ झालो.

"ऋषीचा काय शाप आहे? ऋषींनी शाप दिला आहे कां?" बोधिसत्वांनी विचारले.

मी आजपासून पन्नास वर्षांपूर्वी जगतातून स्वच्छंदीपणे विहार करीत होतो. जो मनुष्य माझ्या दृष्टीला पडेल. त्याला मी खात होतो. एकदा संध्याकाळी रात्रीच्या जेवणा करीता भक्ष शोधण्या साठी मी नदिच्या किनारी फिरत गेलो. त्याच वेळेला एका वृक्षाच्या खालून एक माणूस नदीच्या बाजूला जात असलेला मला दृष्टीस पडला. मी ते पाहून इतका आनंदीत झालो की रात्रीच्या भोजना करीता आहार मिळाला. एका ढांगते मी त्या माणसाजवळ जाऊन पोहोचलो आणि त्याची मानगुट हातात पकडून दाबली. बस् दुसऱ्याक्षणी विजेचा आघात झाल्या प्रमाणे मी जमीनीवर धाडकन खाली कोसळलो.

ह्यावर बोधिसत्व मंदहास्य करीत म्हणाले–"ह्याचा अर्थ असा की, तू कोणी महातपस्व्याचा गळा हातात पकडलास व त्याला आपला आहार करणार होतास.

"महानुभाव! खरोखरी तसेच घडणार होते. खाली पडल्या नंतर थोड्यावेळाने शुद्धीवर आल्यावर मी उठून बसू लागलो. तेव्हां एक काठी व कमण्डलू हातात घेतलेल्या ऋषिने पायाने मला परत

लाथाडले. व रागाने मला शाप देत म्हंटले–"अरे दुष्ट पापी! ह्या प्रदेशांत माणसांना ठार मारून खाणारा तू आहेस ना? तू जे इतके अपराध केले आहेस. त्याची शिक्षा म्हणून तुला मी भुके करीता तडफडत ठेवतोय! तशी माणसे खूप कमी शिकतात. त्यातुन जर कोणी शिकला व त्यांचा शेजारचा "चिरंजिव" म्हणाला नाही तर अशालाच तू खाऊ शकशिल. ह्यापेक्षां दुसरा कोणी जरी तुझ्या दृष्टीस आला व तू त्याला खायल्चा प्रयत्न केलास तर तू जळून भस्म होऊन जाशील." अशा प्रकारे शाप देऊन ते ऋषि निघून गेले.

यक्षाची कहाणी ऐकून बोधिसत्वांना त्याची खूप दया आली? त्यांनी यक्षाला समजावले की कोण्याही प्राणीमांत्राची हिंसा करणे महान पाप आहे. नंतर दुसऱ्या दिवशी सकाळी बोधिसत्व आपल्या वडिलांना व यक्षाला बरोबर घेऊन राजाचे दर्शन करण्याकरीता निघाले.

राजानी सर्व वृत्तान्त ऐकून बोधिसत्वाना प्रणाम केला व विनंती केली. "महानुभाव, तुम्ही अत्यंत शाक्तिशाली आहात. आपल्या-मुळे माझ्या राज्यातील प्रजा एका नरमांस-भक्ष्याच्या जाचातून वांचली. मी आपल्याला विनंती करतो की तुम्ही. आमच्या सेना-पतीचे पद ग्रहण करा.

बोधिसत्वांनी राजाचे म्हणणे मान्य केले. राजाला अत्यंत आनंद झाला. त्यांनी बोधिसत्वाच्या वडिलांचा उचित स्वरूपांनी सत्कार केला. नतंर यक्षाकरीता काय करावे हे बोधिसत्वाना विचारले.

बोधिसत्व म्हणाले–"महाराज, हा यक्ष ह्याक्षणी सात्वीक आहे. ह्याच्यापासून भविष्यात कोणतीही हानी होऊ शकणार नाही. त्यामुळे ह्याला आपल्या अश्वशाळेचा किंवा गजशाळेचा अधिपती म्हणून नियुक्त करावे.

राजाने बोधिसत्वाच्या सांगण्यानुसार यक्षाला अश्व व गजशाळेचा अधिकारी म्हणून निवडले.





आपल्या नद्या :

## कावेरी

प्राचिनकाळी चोलमण्डल राज्यावर राजा तोण्डमान राज्य करीत होता. त्याकाळी एकदा भयंकर दुष्काळ पडला. पावसाळयाच्या ऋतुत पाण्याचा एक थेंबही पडला नाही. सर्व नद्या व तळी सुकून गेली. प्रजा नाना प्रकारचे कष्ट झेलू लागली.

जनतेला होणारे दुःख व कष्ट पाहून राजाची मनस्थिती बेचैन झाली. राजा स्वतःच्या भोग विलासाच्या गोष्टी विसरून रात्रंदिवस दुष्काळाची काळजी करू लागला. राजाने दुष्काळ कसा घालवावा ह्याकरीता पूर्ण विचार केला.





तो एका साधारण माणसाचा वेष धारण करून आपल्या राज्यात भ्रमण करीत राहीला तरी सुद्धा त्याला कोणताही चांगला उपाय सुचला नाही. परंतु इकडे तिकडे हिंडत असताना प्रजेचे जे हाल पाहिले त्याने त्याचे मन जास्तच व्याकुळ झाले.











त्याचवेळेस महामुनी अगस्त्यनी सह्याद्रि पर्वतावर थोडे दिवस तपश्चर्या केली. त्यानंतर आपली तपश्चर्या पूर्ण करून जनतेच्या कल्याणाच्या काही गोष्टी करण्याकरीता ते डोंगर दऱ्याखोऱ्यातून बाहेर आले.

चोल किंवा कोडगु राज्याची सीमा पार करून राजा तोण्डमानने ऋषीमुनी अगस्त्य ह्यांचे दर्शन केले. अगस्त्यनी राजाच्या मनामध्ये जनते विषयी वाटणाऱ्या कळकळीची समस्या सोड-विण्याचा मनोमन निश्चय केला.





त्यावेळेस कोडगु राज्यावर राजा कावेर राज्य करीत होता. महामुनी अगस्त्य राजा तोंडमानला राजा कावेरच्या दरबारात बोलावून घेऊन गेले. आणि सांगितले सह्याद्रि पर्वतावरून एका नदिचा उगम होणार आहे.

नविन रूपाने जन्म घेऊन वहाणाऱ्या नदिच्या प्रवाहाला चोल राज्याकडे वाहून नेण्याकरीता अगस्त्यने संकल्प केला. त्यांच्या ह्या विचाराला राजा कावेरने संमती दिली. मुनिवर्यांच्या आदेशाने राजाने अनेक मजुरांना सह्याद्रि पर्वताच्या कडे जाण्यास सांगितले.





त्यानंतर महर्षि अगस्त्य ध्यान लावून बसले. त्यांनी प्रार्थना केली की, नदिचे रूप धारण करणारी स्त्रवंती लवकरात लवकर उफाळून बाहेर यावी.

त्याच वेळी त्याच्या आदेशानुसार मजुरांनी नदिच्या प्रवाहाला चोल राज्याकडे वाहून नेण्याकरीता मोठा बांध बांधला. व ती वाहून जायला रस्ता तयार केला.













ते सर्वजण नदीच्या उगमाची मोठ्या उत्सुकतेने वाट पाहू लागले. तो पाण्याचा प्रवाह मोठ्या वेगाने उफाळून वर आला व वेगाने पहाड दऱ्या-खोऱ्या मधून वहात चोल राज्याच्या दिशेने वहात जाऊ लागला. ते पाहून राजा तोण्डमानचा आनंद गगनात मावेनासा झाला.

राजा कावेरेला कावेरी नावाची सुंदर कन्या होती. अगस्त्य ऋषिनी लावण्य रुपाने वहणाऱ्या ह्या नदीला त्या कन्येचे नांव दिले. तेव्हांपासून ही नदी कावेरी नावाचे प्रसिद्ध झाली.





अशा प्रकारे कावेरी नदी भारताच्या दोन प्राचीन राज्यांचे चिन्ह बनून राहीली. कावेरी आपल्या देशातील प्राचीन नदीपैकी एक आहे. आणि ती नदी दक्षिण गंगा नावाचे संबोधली जाते.



# मोठी विद्या कोणती

पूर्वकालीन गोष्ट आहे. एकदा एका गावातील तीन लहान मुले एका गुरूंकडे शिक्षण प्राप्त करून घेण्याकरीता निघाली. ते गुरू सर्व विद्याशास्त्रातील महापंडीत होते. ज्या मुलाला जी विद्या पाहिजे होती. ती ते शिकवत. त्यामुळे तीन मुलांपैकी एकाने वैद्यक शास्त्राचा अभ्यास करण्यास सुरवात केली. दुसऱ्याने ज्योतिषशास्त्र व तिसऱ्याने तर्क शास्त्राचा अभ्यास करण्यास सुरवात केली. त्याचा पाठ्यक्रम पूर्ण झाला. शेवटी गुरूंनी परिक्षा घेण्याचेच बाकी राहिले.

एके दिवशी गावातील एक प्रतिष्ठीत माणुस जन्मकुंडली घेऊन गुरूंपाशी आला. त्याने त्या गुरूंना सांगितले की, ही जन्म-कुंडली असलेल्या मुलाबरोबर मी माझ्या मुलीचे लग्न लावून देण्याच्या विचारात आहे. पुढे त्यांनी म्हटले–"गुरुवर्य, बाकी साऱ्या गोष्टी आम्हास पसंत आहेत म्हणुन ही जन्मपत्रिका पाहुन ह्या मुलाला शुभ आहे किंवा नाही हे आम्हांस सांगावें. तरच मी माझ्या मुलीचा विवाह ह्यांच्या बरोबर लावून देईन.

गुरूंनी जन्मपत्रिका उघडून पाहिली व ती पहात सांगितले–"ह्या मुलाच्या जन्म-पत्रिकेत विवाह योगाच्या बरोबर इतर दुष्टग्रहांचा पण समावेश आहे. त्यामुळे लग्नानंतर काही दिवसांतच हा तरुण आजारी होईल." तो माणुस काळजीत पडला.

त्यावर गुरूंनी विचारले–"तुम्ही ह्या गृहस्थाला कोणता चांगला सल्ला द्याल ?"

तर्कशास्त्र जाणणारा मुलगा म्हणाला–"प्रत्येक जन्मपत्रिकेत कोणत्या नां कोणत्या-तरी दुष्ट ग्रहांचा योग येतोच. तेव्हां इतर सर्व लग्नाचा गोष्टी नाते जोडण्या करिता अनुकुल असतील तर हा विवाह करून देण्यात काहीच वावगे नाही.



वैद्यशास्त्री मुलगा म्हणाला—"जर मुलगा आजारी पडणार असेल तरी असा कोणता माणुस आहे की, तो आजारी होत नाही. तेव्हां तश्या परिस्थितीत उत्तम वैद्याला बोलावून त्यावर इलाज करता येतो."

ज्योतिषशास्त्र शिकलेल्या मुलाने सांगितले—"हिच एक गोष्ट घेऊन डोके पिकविण्याची काय जरूर आपल्याला माहीत आहे की, ह्याला कोणता ग्रह अनुकूलनाही. तेव्हां लग्नाच्या वेळी त्या ग्रहाची शांती केली की झाले. आजार होणारच नाही.

त्यानंतर काही दिवस उलटले एकदा गुरूवर्य काही कामाकरीता गांवी गेले होते. तेव्हां त्यांचा मुलगा तापाने फणफणला तेव्हां गुरूच्या पत्नीने आपल्या मुलाला हात लावीत ह्या शिष्यांना म्हटले—"अरे, पहा मुलाचे अंग पहा कसे तव्यासारखे तापले आहे. सांगा आता काय करावे?"

"गारपाणी अंगावर ओता म्हणजे तापलेले शरीर गार होईल." असे म्हणत तर्कशास्त्र शिकलेला घडा घेऊन तळयावर निघाला.

ज्योतिषशास्त्र शिकलेला पंचाग उघडून त्यातील तिथी, वार, नक्षत्र आणि ग्रहांची वेगमर्यांवर ह्यांची आकडेमोड करीत बसला.

वैद्यशास्त्र शिकलेल्याने मुलाची नाडी परिक्षा केली तापाचे निदान करून त्याने आवश्यक वस्तु आपल्या पेटीतून बाहेर काढल्या आणि त्या कुटून त्याची पावडर तयार केली व ती मुलाच्या तोंडांत घातली.

त्या दिवशी जेव्हां संध्याकाळी गुरूजी गावाहून परत आले. तेव्हां मुलाची तब्येत खणखणीत बरी झालेली होती.

गुरूजींच्या पत्नीने हा सारा वृत्तांत आपल्या पतीस सांगितला आणि म्हटले—"अहो, मी ज्योतीष शास्त्र व वैद्यक शास्त्र ह्यामुळे होणारे फायदे पाहिले परंतु तर्कशास्त्र काय कामाचे?" आपल्या जवळ ज्यांनी तर्कशास्त्राचा अभ्यास केला आहे नां! तो एक महामूर्ख आहे. त्याने तापाने फणफणलेल्या मुलाला थंड पाण्याने अंघोळ घालण्यास सांगितली.

ज्योतिष शास्त्र व वैद्यशास्त्र काही विशिष्ट कारणां करीताच उपयोगास येतात परंतु तर्कशास्त्र नेहमी उपयोगी पडते. मी उद्याच त्याची परीक्षा घेतो. असे म्हणून त्याने तिला सांगितले की, आपण कशा तऱ्हेची आपल्या शिष्यवर्गाची परीक्षा घेणार आहोत व तिने त्या वेळेस आपल्याला कशी मदत करावयाची.

दुसऱ्या दिवशी दुपारी जेव्हां सर्वजण एकत्र जेवावयास बसले. तेव्हां खाता खाता गुरूजी एकदम ओरडून म्हणाले—"अरे, मुलांनो चुकून मी उसळी बरोबर एक विषारी किडा गिळून टाकला रे!" असे म्हणत त्यांनी बेशुद्ध पडण्याचे सोंग केले.

तेव्हां ज्योतिष व वैद्यशास्त्र जाणणारे उठून उभे राहिले. त्यांनी जेवण बंद केले व आपले हात धुऊन वैद्याने गुरूंच्या नाडीची परीक्षा करण्यास सुरवात केली. ज्योतिषाने आपले पंचाग उघडले व तर्कशास्त्रीने एक क्षणभर गुरूंच्याकडे निरखून पाहिले व पुन्हां आपले जेवण सुरू केले.

त्यावर गुरूजींच्या पत्नीने रागावत विचारले—"तू तरी कसा शिष्य आहेस! गुरूजींनी विषारी किडा गिळला व ते बेशुद्ध पडले आहेत. तू त्यांची काळजी करण्याचे सोडून निश्चितपणे जेवण करण्यास सुरवात केलीस.

"ताई, गुरूजींनी तो विषारी किडा गिळलेला नाही. गुरूजी कायविषारी किडा गिळायला वेडे आहेत कां? तो विषारी आहे असे समजले असतांना तो ते कसे गिळतील. त्यातूनही जर चुकून असा किडा तोंडांत आला तरी तो किडा ते थुंकून टाकतील परंतु गिळणार नाहीत." तर्कशास्त्री म्हणाला.

ह्यावर गुरूजी डोळे उघडत उठून बसले आणि आपल्या पत्नीला म्हणाले—"अग, बघते आहेस नां! तर्कशास्त्राचा कसा उपयोग होतो ते?"

ह्यानंतर गुरूजींनी तिन्ही शिष्यांना त्यांचे शिक्षण पूर्ण झाल्याचे सांगितले व आपल्या आश्रमातून त्यांना घरी पाठविले.












# कोणा बरोबर मैत्री करावी ?

अवन्ती राज्यांच्या महामंत्र्याचा अचानक देहांन्त झाला. राजाने त्याच्या पदावरएक हुशार मंत्र्याची नेमणूक करण्याचा विचार केला. त्यांनी त्या पदा करीता युक्त अशा रामशर्मा, कृष्णशर्मा व अनन्तशर्मा अशा तिन व्यक्तिना बोलावले.

सर्वात प्रथम राजाने रामशर्माला बोलावले–"आपल्या शेजारच्या देशाचा राजा वीरसेन आणि शक्तिसेन ह्या दोघांमध्ये अनेक वर्षांपासून शत्रुत्व चालू आहे. अशा त्या दोघांनीही माझ्याशी मैत्री सांधाण्याकरिता दुतांना माझ्याकडे पाठविले आहे. त्यातील वीरसेन शक्तिशाली आहे व शक्तिसेन दुर्बल आहे. तेव्हां माझे कर्तव्य काय असावे ?"

आपण शक्तिशाली वीरसेनच्याबरोबर मैत्री करावी" रामशर्माने त्यांना सल्ला दिला.

नंतर कृष्णशर्माला बोलावले व आपल्या समोरचा प्रश्न त्याला विचारला तो म्हणाला–"महाराज, आपण दुर्बल असलेल्या शक्तिसेन राजाबरोबर मैत्री करावी, शक्तिशाली राजाबरोबर मैत्री करणे म्हणजे सश्यांनी लांडग्याबरोबर मैत्री करण्यासारखे आहे. राजाने अनंतशर्माला बोलावले व त्याच्या समोरही दोघांना विचारलेला प्रश्न विचारला. त्यावर अनंतशर्माने आपल्या विचार सांगत राजाला म्हटले–"महाराज, आपण अशा दोघान् बरोबरही मैत्री करणे बरोबर नाही. दुर्बल शक्तिसेन आपली सहाय्यता घेऊन शक्तिशाली वीरसेनला मारण्याकरीता षडयंत्र करेल. त्यामुळे वीरसेन आपला शत्रू बनण्याची दाट शक्यता आहे."

"तरमग मी त्या दोघांकडे कसा निरोप पाठवू की, त्याने ती दोघे माझ्यावर असंतुष्ट होणार नाहीत." राजाने विचारले.

"महाराज, ती तर साधी गोष्ट आहे, आपण वीरसेन राजाच्या दूताला कळवा की, जर तो शक्तिसेनच्या राजाबरोबर मैत्री संपादन करेल. तर आपण राजा वीरसेन बरोबर मैत्री स्थापन करण्यास तयार आहोत. अशाच प्रकारे वीरसेन राजाच्या दुतांबरोबर आपण निरोप पाठवावा की, त्याने शक्तिसेनच्या राजाबरोबर मैत्री संपादन केली तर आपण वीरसेन राजाबरोबर मैत्री करण्यास तयार आहोत बस कोणत्याही राजाचे आपल्या बरोबर वितुष्ट होणे शक्य नाही. ह्या प्रकारे राजाने अनंतशर्माला आपला मंत्री नियुक्त केले.





# जादुगाराची दरी

चंद्रगिरी आणि मित्रपुर एकमेंकाना लागून असलेले देश चंद्रगिरी पेक्षा मित्रपुर कितीतरी पटने शक्तिशाली होता. चंद्र-गिरीचा राजा रुद्रसेन ह्याची बायको मित्र-पुरच्या राजाची बहिण होती. त्याचमुळे रूद्रसेनला मित्रपुरच्या राजाकडून सर्वथव मदत मिळत असे.

रूद्रसेन राजाला एक मुलगा व मुलगी अशी दोन अपत्ये होती. मुलीचे नाव सुर्वणा होते व मुलाचे सुरेश होते. सुवर्णा सोळा वर्षाची व सुरेश चौदा वर्षाचा होता. ते दोघेही दिसावयास सुंदर होते.

चंद्रगिरी देशाच्या दक्षिण बाजूला पूर्ण समुद्र होता. चंद्रगिरी व समुद्रांच्या मध्य-भागी एक पर्वतांची रांग पसरलेली होती. त्यात बऱ्याच दऱ्याखोऱ्यां होत्या. त्यातील एका दरीत कोणत्यातरी पूर्वीच्या जमान्यात एक भैरवशर्मा नावाचा मांत्रिक तेथे रहात असे. त्याच्या बद्दल असे समजले होते की, तो आपल्याजवळ अनेक अद्भुत शक्ति ठेवत की, त्यामुळे तो कोणालाही कोणत्याही रूपात बदलवत असे. माणसांना झाडांत झाडांना प्राण्यांत, प्राण्यांना पक्षात, त्यामुळे त्या घाटाकडे कोणीही मनुष्यप्राणी जाण्यास धजत नसे व कोणाचे धैर्य होत नसे.

भैरवशर्माच्या मृत्यु नंतर त्याचा शिष्य विकटशर्मा ह्यांने त्या दरीत आता स्वतःचे वास्तव्य केले होते. व तो नेहमी घाटातील वसलेल्या गांवामधून ये. जा करीत होता. तो केव्हां केव्हां राजमहालात राजाला भेटावयास सुद्धा जात असे. राजाला त्याच्या मंत्र-तंत्राबद्दल अत्यंत आदर होता. त्याला वाटे की, विकटला दुसऱ्याची हानी करणारी मंत्रतंत्र शक्ति माहित आहे. त्यांच्या बरोबर उगाच शत्रुत्व करणे बरोबर नाही.



काही विशिष्ट समारंभा प्रसंगी राजाची दोन्ही मुले सुवर्णा व सुरेश नेहमी आपल्या मामाच्या घरी जात असत. तशीच ह्या-खेपेस ती दोघे मामाच्या घरी मित्रपुरला जाण्यास निघाली.

राजा रुद्रसेनानी मुलांना रथातून जाण्यास सांगितले परंतु सुवर्णा व सुरेश दोघांनी घोड्यावरून जाण्यासाठी हट्ट धरला. त्या दोघांना त्या घाटातील सर्व रस्त्यांची माहीती होती. व त्यांना तसे साहस शौर्य करण्यांची भयंकर आवड होती.

सुरेश व सुवर्णा बरोबर चार घोडेस्वार राजाने अंगरक्षक म्हणून दिले. ते सर्वजण सीमापार पडे पर्यंत हळूहळू जात होते. वेशी बाहेर पडताच त्या दोघांनी घोड्यांना वेगाने पळण्याचा इशारा केला. त्यामुळे ते अंगरक्षक खूपच पाठीमागे राहिले.

सुरेश व सुवर्णा दोघेही त्या पर्वतमय भागात आले. नंतर त्यांनी घोड्यांना थांबवले व वळून अंगरक्षक येतात कां नाही हे पाहिले. परंतु बराच वेळ झाला तरी ते चौघे घोडेस्वार आले नाही. ते दोघे जिथे थांबले होते तो भाग निर्जन होता. तेथे पहाडाचे मोठे मोठे सुळके बाहेर आले होते तेथे मोठी झाडे सुद्धा होती. ते थोडे पुढे गेले तो त्यांना एक वळण दृष्टीस पडले. तिथे गेल्यानतर दोन रस्ते फुटत होते. एक उजव्या बाजूला जाणारा होता व दुसरा डाव्या बाजूला. उजवा मित्रपुरला जाणारा होता. डावा खूप अरूंद व निमुळता होता तो मांत्रिक विकटशर्माच्या दरीच्या बाजूने जाणारा होता.

सुरेश व सुवर्णाने आपापले घोडे पळवले तेवढ्यात त्यांना एका मोठ्या शिळे पाठी-मागून आवाज ऐकू आला–"थांबा थोडे."

ते बहीणभाऊ आश्चर्य करू लागले. त्यांनी आवाज आलेल्या दिशेकडे वळून पाहिले, तेव्हां तो विकटशर्मा त्याच्या समोर येऊन उभा राहिला. सुरेश व सुवर्णाला तो माणूस माहीत होता. राजाला भेटावयास येतांना त्यानी त्याला अनेकदा पाहीले होते. परंतु त्या दोघांना ठाऊक नव्हते तो एक जादुगार आहे.

"घोड्यावरून उतरून तुम्ही दोघे हा प्रसाद घेऊन जा. तुमचे कल्याण होईल." विकट शर्मा त्यांना म्हणाला.

युवराज व युवरानी दोघेही घोड्यांवरून खाली उतरले. प्रसाद खाण्या आधी दोघांनी आपले हाततोंड धुवा." असे म्हणत विकट-शर्माने आपल्या जवळील एका लाल कमंडलूतून पाणी काढून त्यांना दिले. दोघांनी त्या पाण्याने आपले तोंड व हात धुतले. नंतर त्या मांत्रिकाने त्या दोघांना मधात बुडवले-ल्या केळ्याचे तुकडे दिले. दोघांनी ते तुकडे खाल्ले. आता तुम्ही जा. आपण परत भेटू." असे विकट शर्मा त्यांना म्हणाला.

त्यानंतर ते दोघे घोड्यावर बसले व त्यांनी घोड्याचा लगाम हाती घेतला व दोघे वेगाने त्या घोड्यांना पळवून नेऊ लागले. अर्धा तास गेला सुरेशने घोड्यांचा लगाम खेचत त्याला थांबवले व सुवर्णाला म्हणाला ताई आपण आपला रस्ता चुकलो तर नाही नां?"

"मी पण तुला तेच विचारणार होते रे." सुवर्णा चोहोकडे आपली दृष्टी टाकत म्हणाली.

सुवर्णाला रस्त्याच्या एका टोकाला एक जुने घर दिसले. तिने सुरेशला ते घर दाखवत म्हटले–"सुरेश, आपण त्या घराच्या मालकाला विचारूया की मित्र-पुरला जाणारा बरोबर रस्ता कोणता.



      



दोघेजण त्या घराजवळ गेले व तेथील जवळच्या एका झाडाला त्यांनी आपले घोडे बांधले. नंतर घराच्या दरवाजापाशी जाऊन त्यांनी दारावर टक्टक् केले. परंतु आवाज आला नाही व दार आपोआप उघडले गेले त्यांनी आत प्रवेश केला नाही तोच पाठीमागचे दार धाड्कन् बंद झाले. त्याच बरोबर त्यांना मंदहास्य करीत हळूहळू पुढे येत असलेला विकट शर्मा दिसला.

सुरेश व सुवर्णाला आश्चर्याचा धक्काच बसला. परंतु त्यांनी तो चेहऱ्यावर न न दर्शविण्याचा प्रयत्न केला. सुवर्णा त्या जादुगाराला म्हणाली–"आम्ही दोघे मित्रपुरला जावयास निघालो होतो वाटेत रस्ता चुकलो."

ह्याचे उत्तर देण्याकरीता तो मांत्रिक हसत म्हणाला–"राजकुमारी, तू रस्ता चुकून इथे आली नाहीस परंतु खरे तर चंद्रगिरीची भावी राणी बनण्याच्या रस्त्याने चालत आली आहेस."

"तुम्ही चुकता आहात चंद्रगिरीच्या सिंहासनावर बसण्यास माझा भाऊ सुरेश वारस आहे व त्याची होणारी बायको राणी बनेल." सुवर्णा म्हणाली.

दुसरा कोणी चंद्रगिरीचा राजा बनला व त्याने तुझ्या बरोबर विवाह केला. तर तूच राणी बनशिल नां!" विकट शर्मा म्हणाला.

"ह्यात माझ्या इच्छेचा काही संबंधच येत नाही?" सुवर्णा संतापाने म्हणाली.

"तुझ्या इच्छा अनिच्छेचा इथे काही उपयोग नाही समजलीस!" असे म्हणत तो मांत्रिक दाराच्या बाजूला गेला.

"थांब, सांग आम्ही आत येताच ते दार कोणी बंद केले?" सुरेशने विचारले.

त्याचा तुझ्याशी काय संबंध? आता येथून तुम्हांला दोघांना बाहेर जाता येणार नाही! असे म्हणत तो जादूगार बाहेर गेला व त्याने दरवाजा बंद केला.

"आपण दोघेजण त्या दुष्टाचे कैदी बनलो." सुरेश म्हणाला. सुवर्णाने रागाने दांत ओठ चावले. त्या खोलीच्या पाठीमागचा दरवाजा उघडला गेला. बाहेर मोठे आवार होते त्याच्या मध्यभागी एका क्षुद्रदेवीची भयंकर मुर्ती होती. ती पाहून दोघे क्षणभर भ्याले व थरथर कांपू लागले.

मूर्तीच्या थोड्या दूरवर एक खिडकी दिसत होती. ते दोघे धांवत त्या खिडकी पाशी गेले व त्यांनी खिडकीतून डोकावून बाहेर पाहीले. बाहेर एक विचित्र आकाराचा बुटका माणूस उभा असलेला दिसला.

"दार उघड! तुला जे काय बक्षिस हवे ते आम्ही तुला देऊ." सुरेशने त्याला लोभ दाखविला.

तो बुटका अट्टाहासाने म्हणाला–"ह्याची चावी माझ्या मालकाच्या जवळ आहे. पण एक काम कर. मला खूप तहान लागली आहे त्या देवीच्या मुर्तीच्या पाठी-मागे एक पाण्याची झारी ठेवली आहे ती तेवढी आणून दे."

सुरेशने ती पाण्याची झारी नेऊन त्या बुटक्याच्या हातात दिली त्याने आपली तहान भागवली व म्हटले–"आता मला तुझे डोके कापून टाकावयाचे आहे!"

सुवर्णाने चकित होत त्याला विचारले– "काय डोके कापायचेय? कशाकरीता?"

मालक देवीला संतुष्ट करु पहात आहेत. ह्यानंतर ते तुमच्या बरोबर विवाह करतील. तू महाराणी बनशिल. त्यावेळी मात्र मला विसरून जाऊ नको. माझ्या मालकाने मला चंद्रगिरीचा सेनापती करण्याचे वचन दिले आहे." त्या बुटक्याने सांगितले.



"अच्छा, तर तू माझे डोके कापणार आहेस काय? असे म्हणत सुरेशचे डोळे लाल भडक होऊ लागले.

"होय हो, मीच कापणार, ह्या करीता मी एकशे वीस बकऱ्यांची डोकी कापून चांगला अनुभव प्राप्त केला आहे." तो बुटका म्हणाला.

"अरेरे बिचारा! तू तर पुष्कळच कष्ट घेतलेस. आम्ही ह्या दरीत आलो नसतो



"तर तू त्या श्रमापासून मुक्त तरी झाला असतास." सुरेश म्हणाला.

बुटका विकट हास्य करीत म्हणाला— "तुम्ही दोघे इथे आल्याशिवाय कसे राहीला असतात? माझ्या मालकाच्या हातातील लाल कमंडलूतील पाण्यानेच नां! तुम्ही हात तोंड धुतलेत? त्या पाण्यामध्ये मंत्रशक्ति भरलेली आहे. तो पाण्याचा स्पर्श जर कोणाच्या डोळ्याला लागला तर कोणतीही वस्तु उलटी म्हणजे डावी बाजू उजवी व डावी बाजू दिसू लागते म्हणूनच तुमचा मार्ग चुकला."

"युवराज, ह्या द्राक्षांचा रस पिऊन माझी तहान जास्तच वाढ लागली आहे. परत ती झारी तेथेच ठेऊन मला पिण्याकरीता स्वच्छ पाणी आणून द्या?"

त्या बुटक्याच्या बोलण्यामुळे त्या तांत्रिकाचे सर्व रहस्य सुरेशला माहित झाले. तो त्या क्षुद्रदेवीच्या जवळ पोहोचला. त्याने त्या देवीच्या दुसऱ्या बाजूला ठेवलेले पाण्याचे भांडे नेऊन त्या बुटक्याच्या हातात दिले.

बुटक्याने त्यातील थोडे पाणी प्याले नंतर परत ते सुरेशच्या हातात देत म्हटले ह्यातील सर्वपाणी आताच प्याले नाही पाहिजे. तुझे डोके कापायच्या आधी उरलेल्या पाण्याने हात तोंड धुतले पाहिजे!"

सुरेश जेव्हां ती झारी त्या मुर्तीच्या जवळ ठेवण्यास गेला तेव्हां त्याला दाराला खेटून ठेवलेले मांत्रिकाचे लाल कमंडलू दृष्टीस पडले त्याने झटक्यात त्या झारीतील पाणी फेकून दिले व कमंडलूतील पाणी झारीत ओतले व होती तशी झारी पूर्ववत ठेऊन दिली.

ह्यानंतर सुरेश सुवर्णाच्या जवळ येऊ लागला. तोच दरवाजा धाडकन उघडून विकट शर्मा आत आला. व त्याने त्या दोघांवर कसलेतरी भस्म उडवले. दुसऱ्याक्षणी ते दोघे जण बेशुद्ध होऊन खाली जमिनीवर पडले. मांत्रिकाने सुरेशला उचलले व त्या क्षुद्रदेवीच्या डाव्या बाजूला नेऊन ठेवले आणि तो स्वतः उजव्या बाजूला जाऊन बसला.

बुटका चमकती तलवार घेऊन तेथे आला. त्याने सर्वात प्रथम आपल्या मालकाला प्रणाम केला. नंतर सुरेशने ज्या पाण्याने झारी भरली होती त्यातील पाणी घेऊन बुटक्याने आपले हात तोंड धुतले.

ह्यानंतर त्याने तलवार उगारली व एका घावात एक डोके छाटून टाकले व जोर-जोरात ओरडू लागला—"वाऽ वाऽ छान झाले की, मी आधी एकशे वीस बकऱ्याचे डोके कापून चांगला अनुभव मिळवला होता. मालक आता मला चंद्रगिरीचा सेनापती करून घ्यायला विसरू नका! सुरेशलाच नमस्कार करत तो बुटका म्हणत होता.

लाल कमंडलूतील पाणी डोळ्याला लागल्यामुळे जसे उलट सुलट दिसते तसे त्याने ते पाणी डोळ्याला लागताच आपल्या मालकचे विकट शर्माचेच डोके कापून काढले होते. मांत्रिकाच्या मृत्यु मुळे त्याने सुरेश व सुवर्णावर जे भस्म उडवले होते त्याचा प्रभाव निघून गेला. परंतु सुरेशने शुद्धीवर येता क्षणीच त्या बुटक्याच्या डोक्यावर वेगाने प्रहार केला. तो किंचाळून खाली पडला व तडफडू लागला.

सुरेश व सुवर्णा त्या मांत्रिकाच्या घरातून धावत बाहेर आले व झाडाखाली बांधलेले आपापले घोडे सोडून घेऊन त्यावर स्वार झाले. त्यांनी मित्रपुरला आपल्या मामाच्या गांवी जायचे रद्द करून ते आपली राजधानी चंद्रगिरीकडे निघून आले.

त्याच वेळेस मित्रपुरहून परत येणारे त्या दोघांचे अंग रक्षक परत येऊन राजा रुद्रसेनला सांगत होते—"महाराज, युवराज व राजकन्या मित्रपुरला गेलीच नव्हती."

त्यामुळे आपल्या मुलांना पाहून राजाला अत्यंत आनंद झाला. त्यांना आलिंगन करत त्यांने ते मित्रपुरला न जाण्याचे काय कारण ते विचारले.

"महाराज, आम्ही एका दुष्ट मांत्रिकाचा शेवट केला आहे. पण सर्व हकिकत आम्ही थोड्या वेळाने सांगू आम्हांला प्रथम खूप तहान लागली आहे प्यायला पाणी पाहिजे." असे दोघांनी एका तालासुरात म्हटले.












# बक्षीस

विजयपुर राज्यावर राजा विजयवर्मा राज्य करीत होता. त्याचा अत्यंत गाढ विश्वास होता की, तो कोणी केलेली प्रशंसा ऐकून घेत नसे. त्यामुळे त्यांनी ही गोष्ट मोठ्या उत्साहाने सर्वा समोर घोषणा करून सांगितली की, जी व्यक्ति आपली प्रशंसा करून आपल्याला संतुष्ट करेल. त्याला एक लाख रुपये बक्षिस दिले जाईल.

अनेक कवी व पंडितांनी राजाची स्तुती करून प्रशंसा केली परंतु सर्व प्रयत्न फुकट गेले.

एक दिवस एक गरिब ब्राह्मण राजाच्या दरबारात आला व म्हणाला–"महाराज, मी अनेक राजा महाराजांचे दर्शन घेतले परंतु त्यात मला असा एकही राजा सांपडला नाही की, आपल्या सारखा तो स्वतःची स्तुती ऐकावयास उत्सुक आहे."

ही गोष्ट ऐकून राजा खुष झाला. व त्याने त्या गरिब ब्राह्मणाला शंभर रुपये बक्षिस दिले ब्राह्मणाने ते धन घेत हसून राजाला म्हटले–"महाराज, एक लाख रुपयातून हे शंभर रुपये वजा करून बाकीचे देण्याची व्यवस्था करावी."

ब्राह्मणाच्या तोंडचे ते उत्तर ऐकून राजाला अत्यंत राग आला व त्याने विचारले– "एक लाख रुपये कसले ?"

आपणच गावात दवंडी पिटवली होती राजाला जो कोणी खुष करेल त्याला एक लाख रुपये इनाम देणार म्हणून, तुम्ही मी केलेली प्रशंसा ऐकून खुश झालात व मला शंभर रुपयेच बक्षिस दिलेत. राजाला समजले की. तो पण आपली प्रशंसा ऐकून खुष झाला आहे. त्यामुळे राजाने ब्राह्मणाला परत एक लाख रुपये बक्षिस देवबले.






वरांगीने स्त्रीसुलभ स्वभावाने देवांचा विरोध करणारा पुत्र मागून घ्यावा याचे त्याला फार दुःख झाले. कारण अशा पुत्राला विष्णु फार काळ जिवत राहू देणार नाही. तरी वज्रांगाला दिलेले वचन मोडण्याची त्याला इच्छा नव्हती. म्हणून त्याने ब्रह्मदेवाचे स्मरण करून घोर तपश्चर्या केली.

ब्रह्मदेवाने दर्शन देऊन वज्रांगाला स्मरण करण्याचे कारण विचारले व म्हणाला– "मी तुझ्या तपश्चर्येवर संतुष्ट झालो आहे. माग, तुला वाटेल तो वर मागून घे."

वज्रांग म्हणाला–"देवा! माझ्या पत्नीला देवांना जिंकू शकेल असा पुत्र हवा आहे. तिला तसा पुत्र मिळावा ही माझी इच्छा आहे."

ब्रह्मदेवाने तो वर दिला आणि अंतर्धान पावला. वज्रांगाने घरी परत आल्यावर बायकोला तिची इच्छा पूर्ण होईल हे सांगितले. त्यानंतर त्याची पत्नी वरांगी गरोदर झाली व नऊ महिने लोटल्यावर तिच्या पोटी एक मुलगा जन्मला. त्याबरोबर सर्व पृथ्वी हादरली. चहूं दिशाना वणवा पेटल्याचे दृश्य दिसू लागले. वादळे आली आणि झाडे पाळामुळां सकट निखळून पडू लागली. हि सर्व प्रलय काळाची चिन्हे समजून त्रिलोक घाबरून गेला.

वज्रांग व वरांगीने आपल्या मुलाचे नाव तारक ठेवले आणि त्याचे सर्व कोड कौतुक पुरवू लागली. तारक दिवसें दिवस वाढत गेला आणि त्याला थोड्याच दिवसात










पर्वताकार देह लाभला. वरांगी एक दिवस आपल्या लाडक्या मुलाला आणि म्हणाली–"बाळतारका! तू ब्रह्मदेवाकडून त्रिलोक जिंकण्यासाठी वरप्राप्त करून घे."

तारक ब्रह्मदेवाचे स्मरण करू लागला. त्याच्या घोर तपश्चर्येमुळे त्याच्या अंगातून ज्वाळा येऊ लागल्या आणि असे वाटू लागले की तो अग्नी त्रिलोकांत पसरणार. तो सर्व भयंकर प्रकार पाहून सर्व देव व ऋषी मुनी ब्रह्मदेवाकडे धावले व म्हणाले–"देवाधिदेवा! आपण तारकाची तपश्चर्या बंद करून त्रिलोकाचे रक्षण करावे."

ब्रह्मदेव सरस्वतीसह तारकाला दर्शन देऊन म्हणाला–"तारका! मी तुझ्या तपश्चर्येवर प्रसन्न आहे. पाहिजे तो वर मागून घे."

तारक ब्रह्मदेवाला प्रणाम करून म्हणाला–"देवा! मला त्रिलोक जिंकण्यात यश येईल असा वर देण्याची कृपा करावी शंकराच्या पोटी जन्मलेल्या मुलाशिवाय दुसऱ्या कोणाच्याही हाती मरण येणार नाही असा दुसरा एक वर द्यावा."

ब्रह्मदेवाने दोन्ही वर दिले आणि ब्रह्मलोकी प्रस्थान केले.

तारक आपली राजधानी शोणित नगर येथे येऊन पोहोचला आणि ब्रह्मदेवाकडून दोन्ही वर मिळाल्याचे मातेला व गुरुवर्य शुक्राचार्य यांना सांगून म्हणाला–"गुरुवर्य! आता त्रिलोक जिंकण्यास प्रारंभ करण्यासाठी एक सुमुहूर्त सुचवा!"

शुक्राचार्यांनी सुचविलेल्या मुहूर्तावर तारक चतुरंग सेना घेऊन दिग्विजयाला निघाला. त्याने सरळ स्वर्गावर चाल केली आणि देवलोक जिंकला. त्यानंतर वरुणाला जिंकून त्याचा रथ व घोडे मागून घेतले आणि यमलोकावर स्वारी केली. अशा तऱ्हेने अष्ट दिग्गजांना जिंकले आणि त्यांच्याकडून अपार खंडणी वसूल करून आपल्या राजधानीला परत आला.

एक दिवशी नारद त्याच्या दर्शनाला आला. तारकाने त्याचे सर्व प्रकारे स्वागत केले आणि हात जोडून समोर उभा राहून म्हणाला–"हे देवर्षे! मी आपल्या आशिर्वादाने दिग्विजय केला आहे. पुढे काय करावे आज्ञा करावी!"

नारद म्हणाला–"हे तारका! तू ब्रह्मदेवाकडून वर मिळवून दिग्विजय करू शकलास यात मोठेसे काय आहे? तुझा पराभव करण्याची शक्ति देखील कोणाच्या अंगात नाही, ही देखील त्या ब्रह्मदेवाची कृपा आहे. फक्त शंकराच्या पोटी जन्मलेला मुलगाच तुझा वध करू शकेल असा वर तू स्वतःच मागून घेतला आहेस. तेव्हां कैलास सोडून तू वैकुंठावर स्वारी करावीस असे मला वाटते."

कळीच्या नारदाने तो सल्ला देताच तारक वैकुंठावर चालून गेला. ब्रह्मदेवाचा वर त्याला मिळाला असल्याचे विष्णूला माहीत होते. त्याचा वध करणे आपल्याला शक्य नाही हे ओळखून त्याने सामोपचाराने गोड बोलून तारकाला परतवले.

तिकडे हिमवान, शंकराने पार्वतीला सेवेस ठेवून घेण्यास कबूल झाल्यामुळे खुष झाला. म्हणून तो पार्वतीला व तिच्या सखींनाबरोबर घेऊन शंकर तपश्चर्या करीत होता. तेथे आला व शंकराला म्हणाला–"प्रभो! माझ्या या अबोध मुलीकडून सेवेत काही अंतर झाले तर



क्षमा करावी." त्यानंतर पार्वतीला शंकराची सेवा कशी करावयाची हे मेनकेने समजावून सांगितले आणि ती पतीबरोबर घरी परतली.

त्या दिवसापासून पार्वती दररोज सकाळी उठून दुपारपर्यंत शंकराच्या सेवेला हजर राहू लागली. त्याला लागणारी फुले, फळे व पाणि आणून ठेवीं आणि घरी परत येऊन तिने काय केले ते आईवडिलांना सांगू लागली.

शोणितपूरला परत आल्यावर तारकासुर पुन्हां एकदा स्वर्गावर चालून गेला. आणि इंद्राच्या सिंहासनावर बसून देवांकडून आपली सेवा करवू लागला. तो दिग्पालकांना



फार त्रास देऊ लागला आणि ऋषि मुनींच्या यज्ञात विघ्न आणू लागला.

तेव्हां इंद्राला पुढे करून देव व ऋषी ब्रह्मदेवाकडे गेले व म्हणाले–"देवाधिदेवा! आपण तारकाला वरदान दिले आणि त्याने त्रिलोकाला 'त्राहि त्राहि' करून सोडले आहे." तेव्हां ब्रह्मदेवाने तारकाकडे जाऊन त्याला समजावून सांगितले की, त्रिलोक जिंकण्याचे काम पुरे झाले आहे. पण इंद्रपद मिळविण्याचा वर तू मागितला नव्हतास. तेव्हां तू शोणितपूरला राहून आपल्या सर्व साम्राज्याचा चक्रवर्ति म्हणून राहण्यातच तुझे व तुझ्या साम्राज्याचे हित आहे. इंद्राला व इतर दिक्पालकांना त्यांच्या त्यांच्या राज्यात राज्य करू दे. ते तुझे मांडलीक आहेत त्यांच्याशी वैर कां?

तारकाने ब्रह्मदेवाच्या सूचनेप्रमाणे राज्य इंद्राला परत केले. आणि शोणितपूरला येऊन तेथूनच त्रिलोकावर राज्य करू लागला. तो दररोज शंकराची आराधना करू लागला.

इंद्राला स्वर्गाचे राज्य अशा तऱ्हेने पुन्हां परत मिळाले. पण हे तारकासुराच्या कृपेने मिळाले हे दुःख त्याच्या मनात सलत होते. म्हणून त्याने एक दिवशी आपले गुरु बृहस्पती यांना बोलावून त्यांचा सल्ला घेतला म्हणाला–"गुरुवर्य! मी त्रिलोकाचा अधिपती असून ही माझ्या डोक्यावर सतत तारकासुराचा अंकुश आहे. हे मला असह्य वाटत आहे. हा अपमान गिळून मी किती दिवस रहावयाचे? त्यापेक्षा मरण आलेले बरे. आपल्याला माहित नाही. असे काय आहे. तरी तारकासुराच्या वधाचा काही तरी उपाय सुचविण्याची कृपा करावी."

बृहस्पति म्हणाला–"माझ्यामते या बाबतीत ब्रह्मदेवाचा सल्ला घेणे बरोबर होईल. कारण त्याच्याच कृपेने तारकासुर जन्मला व त्याच्याकडून मिळालेल्या वर प्राप्तीमुळेच तो अखंड त्रिलोक जिंकू शकला."

बृहस्पतीच्या सल्ल्या प्रमाणे सर्व ब्रह्मदेवाकडे गेले व तारकाचा वध कसा होईल या विषयी त्यांचा सल्ला घेतला.

ब्रह्मदेव म्हणाला–"बाबा रे, शंकराच्या पोटी जन्मलेल्या व्यक्ति खेरीज कोणाच्याही हाती त्याला मरण नाही. मीच त्याला तसा वर दिला आहे. सती मरण पावल्यावर शंकराला वैराग्य आले. तो तपश्चर्या करू लागला. सतीनेच हिमवानाच्या पोटी जन्म घेतला. आणि शंकरालाच आपला पती मानून सेवा करीत आहे. तुम्ही शंकराचे मन पार्वतीकडे आकृष्ट होईल असे काही तरी करू शकल्यास आणि त्या दोघांचा विवाह होऊ शकल्यास शिवपार्वतीच्या पोटी जन्मलेला मुलगा तारकासुराचा वध करू शकेल." असा सल्ला देऊन ब्रह्मदेवाने इंद्रदिकांना निरोप दिला.

ब्रह्मदेवाच्या तोंडून तारकाच्या मरणाचे रहस्य कळल्यामुळे देव व देवता खूप आनंदित झाल्या. त्यानंतर ते स्वर्गलोकात परतले. व त्यांनी कामदेवाला बोलावणे पाठवले. कामदेव येताच इन्द्राने त्याचा योग्य रूपाने आदर सत्कार केला व त्याला सिंहासनावर बसण्यास सांगितले व म्हटले–"मन्मथा, तारकाने ब्रह्मदेवाकडून वर प्राप्त करून त्याने तिन्ही लोकांवर विजय मिळवला आहे आणि आता गर्वाने



फुलून जाऊन तो देव व ऋषिंना त्रास देऊन त्यांच्या यज्ञात व तपश्चर्येत विघ्न आणत आहे मी तिन्ही लोकावर राज्य करत आहे परंतु तो माझ्यावरही अधिकार गाजवत आहे. त्याचे मरण केवळ ईश्वराच्या अंशापासून झालेल्या व्यक्तिच्या द्वारा शक्य आहे. शंकर कैलासावर तपश्चर्या करीत आहेत व पार्वती त्यांची सेवा करीत आहे. पार्वती जेव्हां शंकराची सेवा करीत असेल तेव्हां तुम्ही शंकराच्या मनांत तिच्याबद्दल मोह उत्पन्न करवा.

इंद्राचे म्हणणे ऐकून मन्मथ भयभीत झाला व विकल अवस्थेत म्हणाला–"शंकराच्या मनांत पार्वतीबद्दल मोह उत्पन्न













करणे मला शक्य तरी आहे कां? शंकर महान तपस्वी व क्रोधी आहे. जर कां त्याने त्याचा तिसरा डोळा उघडला तर तिन्हीं लोक भस्म होतील.

मन्मथाचे उत्तर ऐकून सर्वांनी त्याला म्हटले–"हे तू काय म्हणतो आहेस? ह्या तिन्ही लोकांत असा कोण आहे की, तो तुला वश न होईल असा. तुझ्यामुळेच तर मनुष्य प्राणी मोहमय होतात. त्यामुळेच तर सृष्टीचा हा क्रम चालू आहे. तुझ्या फुलांच्या बाणानें कोणाचीही तपश्चर्या भंग होते आणि हे काम तर देवतांचे आहे. तुझ्यामुळे तर जगाचे रक्षण होते. तुझ्या मदतीला मलय मारुत, वसंत व शुक पिक ह्याला आपल्या बरोबर घेऊन जा. आम्ही पण बरोबर येऊन तुला मदत करू. तू आपल्या मोहमयी बाण चालवून शंकराला वशीभूत करून घे."

देवतांचे बोलणे ऐकून कामदेवाचा आनंद गगनात मावेनासा झाला. त्याने शंकरावर आपले मोहपाश घालून पार्वतीवर त्याने आकृष्ट व्हावे असा निश्चय केला. ह्यानंतर त्याने आपले पांच फुलांचे बाण व व वसंतला बरोबर घेऊन शुकाच्या वहानावर बसून निघाला. शंकर बेलाच्या वनात तपश्चर्या करीत होते. कामदेव तेथे जाऊन एका गुप्त जागेत लपून बसला. व पार्वतीच्या येण्याची वाट पाहू लागला.

कामदेव तेथे प्रवेश करताक्षणीच बेलवृक्षांनी भरलेला वन प्रदेश फुलाफलांनी भरून शोभायमान झाला. झाडांवर कोकीळ व पोपट मैना बसून आनंद कुजन करू लागले. थोड्यावेळाने पार्वती आपल्या सखींच्या बरोबर तेथे पोहचली. तिने येतांना आपल्या बरोबर फळफुले सुगंधी द्रव्ये आणली होती. त्या वनातली शोभा पहाताच ती आश्चर्य चकित झाली. व नंतर शंकराजवळ आली.

शंकराने डोळे उघडून पार्वतीकडे पाहिले. पार्वती त्याला आज वेगळीच भासू लागली. परंतु शंकराने त्याचे काय कारण असावे









ह्याचा विचार केला नाही व तो परत तपश्चर्येत मग्न झाला.

पार्वतीने षोडशोपचाराने पुजा केली व नमस्कार करीत ध्यान करीत त्याच्या समोर उभी राहीली. तेव्हां शंकराने परत पार्वतीकडे पाहिले व तिच्याकडे एकटक मोहित होऊन पाहू लागला.

ह्यानंतर पार्वती तेथून जावयास निघाली. तेव्हां काय देवाने एक-एक करीत पुष्पबाण सोडले. ते त्याच्या हृदयाला लागून पडले. मन्मथाच्या चारी बाणांचा त्याच्यावर उपयोग झाला नाही. तेव्हां कामदेवाने आपला पांचवा निछोत्पल बाण शंकरावर नेम करून मारली. तो शंकराचे हृदय जमखी करू शकला. त्याने शंकर विचलीत झाला. तो रागाने उठून किंचाळू लागला—"कोण-त्या दुष्टाने माझ्यावर फुलांच्या बाणाचा नेम केला." असे म्हणत क्रोधाने उठून उभा राहिला व त्याने आपला तीसरा डोळा उघडला. त्यातून भयंकर अग्नी ज्वाळा बाहेर पडू लागल्या व त्याने सारे वन जळून खाक झाले. त्याच बरोबर कामदेवसुद्धा जळून राख झाला.

ह्यानंतर इंद्र व देवांनी शंकराच्याकडे जाऊन त्याला प्रसन्न करून घेत त्याचे गुणगान केले. तेव्हां शंकराने आपला तिसरा डोळा बंद केला व सर्व अग्नीला परत आपल्यात सामावले. त्यावेळी मन्मथची बायको रतीदेवी हिने शंकराला प्रार्थना करीत म्हटले—"हे सदाशिवा, ह्या कामाच्या बाबतीत माझ्या पतीची काहीही चुक नाही. माझ्या पतीला ह्या इंद्र व इतर देवतांनी प्रेरणा दिली की, जर आपल्या पासून पार्वतीला गर्भ राहून मुलगा झाला तर तो तारकाचा संहार करेल. त्यामुळे इंद्र व इतर देवांनी पार्वतीकडे आपण आकृष्ट व्हावे ह्याकरीता माझ्या पतीला आपल्या मनामध्ये मोह उत्पन्न करण्यास प्रवृत्त केले. त्यामुळे माझ्या अपराधांना क्षमा करून मला पतीची भिक्षा घाला. व आपण पार्वती बरोबर विवाह करून ह्या जगाचे रक्षण करावे?"





# गर्वाचा परिणाम

बगदाद शहराजवळच्या एका छोट्या गावात इस्माईल नावाचा एक खाटीक रहात होता. त्याच्या खाटीक खान्याच्या जवळपास दुसरे खाटीकाचे कोणतेही दुकान नव्हते. त्यामुळे त्यांचा खूप चांगला तेजीत धंदा चालला होता.

एक दिवस इस्माईलच्या दुकानात एक म्हातारा माणूस आला म्हाताऱ्याने इस्माईलला विचारले—"हे बघ बाबा, मला एक शेर कोवळे मांस पाहिजे आहे."

"कोवळ्या मांसा करीता म्हातारे बुवा तुम्हांला चांदीचा एक रुपया द्यावा लागेल!" इस्माईल म्हणाला.

म्हाताऱ्याने आश्चर्याने लटपटत विचारले—"काय म्हणालास? एक शेर मांसाला चांदीचा एक रुपया पडेल?" "आमच्या देशात तर चांदीच्या एका रुपयाला एक बकरी सुद्धा आम्ही खरेदी करू शकतो!"

ते ऐकून इस्माईल नाराजीनेच म्हणाला—"तुम्हांला जर तेवढी किंमत देणेशक्य नसेल तर तुम्ही माझ्या दुकानातून बाहेर जावे हेच बरे."

तेव्हां तो म्हातारा गालातल्या गालात हसत एक चांदीचा रुपया देऊन एक शेर मांस घेऊन निघून गेला.

दुसऱ्या दिवशी परत तो परदेशी म्हातारा आला व भाव न विचारताच एक शेर मांस घेऊन चांगला चमकणारा चांदीचा एक रुपया देऊन जाऊ लागला.

तेव्हां इस्माइलने त्याला तो रुपया परत करीत म्हटले—"बाबा, आज मांसाची किंमत वाढली आहे. आज एक शेर मांसाला तुम्हांला दोन रुपये पडतील!"

म्हातारा आज सुद्धा मंद हसला व इस्माईलच्या हातात दोन रुपये देत एक शेर मांस घेऊन निघून गेला.



परंतु म्हाताऱ्याने जे चांदीचे तीन रुपये दिले होते. ते त्या दिवशी रात्री तीन लाकडाच्या तुकड्यात बदलून गेले.

तिसऱ्या दिवशी जेव्हां तो म्हातारा इस्माईलच्या दुकानात आला. तेव्हां इस्माईलने त्यांची मुंडी पकडली व विचारले–"अरे, म्हाताऱ्या तुझी ही हिम्मत! मलाही बनवायचा प्रयत्न करतोत कां?"

परंतु म्हातारा थोडाहां विचलीत झाला नाही. उलट त्याला धमकावत म्हणाला–"मी बनवायचा प्रयत्न केला नाही तूच केलास."

ते ऐकताच इस्माईल दांतओठ खात त्या म्हाताऱ्याला बडवू लागला. तेव्हां म्हातारा जोरजोरात किंचाळून म्हणाला–"लोकहो कोणीतरी मला वांचवा, मला वांचवा."

म्हाताऱ्याचे किंचाळून बोलणे ऐकताच रस्त्यावर जाणारे सर्वजण तेथे गोळा झाले.

"हा धूर्त माणूस दोन दिवस मला खोटी नाणी देऊन माझ्याकडून मांस घेऊन जात होता." इस्माईलने त्या लोकांना सांगितले.

"सज्जन लोकहो, ऐका हा मला जे घाणेरडे मांस देत होता. त्या करीता मी चांदीची नाणी देणारा काही मूर्ख नाही. मला समजले होते की, हा बकरीचे मांस सांगून कुत्र्याचे मांस विकत होता. ही गोष्ट मी तुम्हांला सर्वांना सांगेन म्हणून हा मला धूर्त म्हणत होता" म्हाताऱ्याने सांगितले.

तेवढ्यात गर्दीतल्या एकाने त्याची परिक्षा घेण्याचे ठरवले व विचारले–"काय तू हे सिद्ध करून दाखवू शकतोस कां?"

"माझा पूर्ण विश्वास आहे की, मी हे सिद्ध करू शकतो!" असे म्हणत तो म्हातारा त्या सर्वांना त्या इस्माईलच्या दुकानाच्या पाठीमागे घेऊन गेला. तेथील दृश्य पहाताच सर्वजण आश्चर्याने तोंडात बोटे घालू लागली.

इस्माईलने आपल्या पाठीमागच्या आवारात जेथे बकऱ्या बांधून ठेवल्या होत्या त्या सर्व कुत्र्याच्यात बदलून गेल्या. ते पाहून इस्माईलचे डोकेच चक्रावले. थोड्या वेळाने स्वतःला सांभाळून तो लोकांना सांगू लागला की हा म्हातारा कोणी जादुटोणा करणारा मांत्रिक आहे. परंतु जमावातील लोकांनी त्याला बदडून काढले. तेव्हां त्याला सर्वांनी नेऊन शहरातील शासन अमीरकडे आणले.

अमीरने सर्व गोष्ट ऐकून घेतली व संतापाने त्याला ओरडत म्हटले–"अरे दुष्टा, मला वाटलेच होते माझा स्वयंपाकी सुद्धा कित्येक दिवसांपासून तुझ्या दुकानातून मांस विकत घेत होता. मी तुझे तुकडे तुकडे करून टाकेन." असे म्हणत त्याने आपल्या समोर असलेल्या पोथीची पाने उलट सुलट करून पाहिली व एक दिर्घ श्वास घेत म्हणाला–"तुझे नशीब जोरदार आहे. तू जो अपराध केला आहेस. त्या करीता मी तुला फाशीची शिक्षा देणार होतो. परंतु ह्या शिक्षा पत्राप्रमाणे ते त्याच्या विरूद्ध आहे. असे म्हणत त्याने आपल्या शिपायांना बोलावले व हुकूम दिला–"तुम्ही ह्या दुष्टाला घेऊन जाऊन शंभर फटके द्या." नंतर ह्याचा डावा डोळा फोडा आणि नंतर ह्याला आपल्या शहरातील सीमेपार फेंकून द्या." तुझे घर व दुकान सुद्धा आजपासून सुलतानाच्या अधीन होणार आहे."



शिपायांनी अमीरच्या आदेशानुसार इस्माईलला फटके दिले. नंतर त्याचा डावा डोळा फोडला व त्याला घेऊन जाऊन देशच्या सीमेपार फेकून दिले.

इस्माईल असा विचार करीत दुःखी झाला की अहंकार व धनाचा लोभ ह्या मुळेच आपली अशी अवस्था झाली. नंतर तो ते शहर सोडून दुसऱ्या शहरात पोहोंचला व तेथे भीक मागून आपले दिवस घालवू लागला. एक दिवस त्याच्या भिकारी मित्रांनी गप्पा मारीत असतांना त्याला समजावंत म्हटले–"अरे बाबा, ह्या शहराचा

सुलतान शकुनांवर खूप विश्वास ठेवतो. कोणी जर काणा असेल तर तो अपशकुन मानून त्याला फटक्याची शिक्षा देतो. त्यातून जर त्याचा डावा डोळा आंधळा असेल तर त्याला फांशीची शिक्षा नक्कीच. तर तू त्याच्या नजरेस न पडशिल ह्याची काळजी घे व त्यातून स्वतःला वांचव."

ह्यानंतर एक दिवस इस्माईल भीक मागण्या करीता राजमार्गावरून जात होता.

तेव्हां अचानक गडबड गोंधळ ऐकू येऊ लागला. काही घोडेस्वार रस्त्यावरील गर्दीला हटवत पुढे पुढे येत होते. चौकशी करीताच इस्माईलला समजले की, त्या रस्त्याने सुलतान जाणार आहे. तेव्हां त्याला इतर भिकाऱ्यांनी सांगितलेली गोष्ट आठवली. त्यामुळे तो झटक्यात समोर दिसणाऱ्या दारातून आत घुसला.

दुसऱ्या क्षणी तीन गुंडे त्याच्यावर हल्ला करू ओरडू लागले—"अरे, बदमाश आता आमच्या तावडीतून कसा सुटशील! इकडे तीन दिवसांपासून तू आमच्या गैरहजेरीत आमच्या स्वयंपाक घरातून सर्व चीज वस्तू पळवून नेत होतास नां!" असे म्हणत त्या तिघांनी त्याला खूप बडवून काढले व गल्लीतून बाहेर फेंकून दिले.

थोडया वेळाने इस्माईल शुद्धीवर आला व त्याच्या मनात विचार आला की, आता ह्या शहरात रहाणे सोयिस्कर होणारे नाही असा विचार करून तो दुसऱ्या शहरात पोहोचला. तेवढयात मध्ये इस्माईलच्या छोटया भावाला आपल्या थोरल्या भावाची झालेली, दुर्धर अवस्था समजली.

इस्माईलने आपली सर्व कहाणी व अनुभव आपल्या छोटया भावाला सांगितली व सल्ला दिला—"अरे, मी माझ्या लोभामुळेच अशा संकटाना बळी पडलो. तू सुद्धा माझ्याच प्रमाणे मांस विकून पैसा कमावला आहेस. परंतु एक गोष्ट लक्षात ठेव. तू कधीही आपल्या मधे गर्व व अहंकार इत्यादी दुर्गुणांना जागा देऊ नको. दुसऱ्याना धोका देण्याचा प्रयत्न कधीही करू नकोस.





# रानटी म्हशी

शंभर वर्षापूर्वी पूर्व अमेरिकामध्ये पूर्व व पश्चिमेला जोडणारा एक लांब रेल्वेमार्ग ह्यांच्या निर्मीतीचे काम केले गेले. पूर्व व पश्चिम समुद्र किनाऱ्यांना वहातुकीच्या दृष्टीनी ह्याचा चांगला उपयोग झाला. परंतु ह्या रेल्वेमार्ग तयार करणाऱ्या मजुरांच्या खाण्या करीता तेथे विशेष प्रसिद्ध असलेल्या रानटी म्हशी असंख्य मारल्या गेल्या. हा रेल्वेमार्ग तयार करण्याचे काम अठरा महिने चालू होते. त्यामध्ये बफलो बिल नावाच्या प्रमुख शिकारीने दररोज सत्तर म्हशीच्या हिशोबान चार हजार जंगली म्हशींना ठार मारून टाकले.

नंतर परत रानटी म्हशींच्या विरुद्ध संरक्षणाच्या हेतुने न्यायालयात ही गोष्ट नेण्यात आली. म्हणून अमेरिकेत तीस हजार रानटी म्हशी आणि कॅनडात २० हजार रानटी आता स्वेच्छेने संचार करीत आहेत.

भारत देशात भैसन नावाने संबोधली जाणारी रानटी म्हशीचे कातडे अत्यंत प्राचीन काळी पहाडात रहाणाऱ्या लोकांचे तंबू व पोशाखा करीता वापरली जात. ते मांस खात.

अत्यंत वणकट डोकी असलेल्या ह्या म्हशी प्राचीन काळात चारा शोधण्या करीता दऱ्याखोऱ्यात नदी नाल्यातून हिंडत पोहत पुढे पुढे जात रहातात. ह्याचा कळपात पुढे नर म्हैस त्याच्या पाठीमागून मादी म्हैस नंतर त्यांची बछडी जातात. जर मार्गात कोणते संकट आले तर सर्वात प्रथम नर त्यांना लढा देतात. कोणत्याही कालखंदात युरोप एशिया व उत्तर अमेरिका ह्या राष्ट्रात इकडून तिकडून रानटी म्हशी संचार करीत होत्या. त्यावेळी ह्या तिन्ही राष्ट्राना जोडणार भू-भाग होता. नंतर काही कालक्रमाने जलमग्न होऊन गेला. त्यामुळे सर्व तिन्ही भाग वेगवेगळे झाले व रानटी म्हशीचे जाणे येणे बंद होऊन त्या त्या राष्ट्रापुरतेच राहिले.



# चांदोबातील नवलाई



## उंच हत्ती

"भारत वन्य प्राणि संशोधन" यांची बातमी आहे की, खाटमंड पासून पाच किलो मिटर लांब दक्षिण-पश्चिम दिशेला एका शुक्लापांचच्या प्राणि संग्रहालयात जगातील सर्वात उंच हत्ती ठेवला आहे.

## बोलणाऱ्या मासळ्या

स्वीडन येथे संशोधन करणाऱ्या एका व्यक्तिने माशांच्या बाबतीत दहा वर्षे खूप अभ्यास केला व असा शोध लावला की, मासे सुद्धा एक प्रकारचे लहान लहान आवाज काढून एकमेकांशी गप्पा गोष्टी करतात.



## वृद्धांची भूमि



सोव्हिएट रशच्या अजर बैजानमध्ये शंभर वर्षे वयापेक्षा जास्त वय असणारे एकंदर १५०० लोक आहेत. त्यात श्रीमती अल्साखिया रीवा नावाच्या म्हातारीचे वय १५२ वर्षे आहे. ह्या वयात सुद्धा ती घरातील सर्व कामे करते त्याच बरोबर चादरी विणण्याचे सुद्धा. तिची मुलगी १०४ वर्षांची आहे तिचे आरोग्य सुद्धा चांगले आहे.

## तुम्हांला माहीत आहे का?

१. पदार्थविज्ञान शास्त्रांत दोन वेळा नोबेल पुरस्कार प्राप्त करणारी व्यक्ति कोण?
२. रसायन शास्त्रांत दोन वेळा नोबेल पुरस्कार प्राप्त करणारी व्यक्ति कोण?
३. सोव्हिएट रुस कडून प्रथम नोबेल पुरस्कार मिळविणारी व्यक्ति कोण?
४. 'मॉलिक्युल' नावाचा शब्द शोधून काढणारा वैज्ञानिक कोण होता?
५. माईकेल फेरडे जेव्हां "रॉयल सोसायटीचा' सदस्य निवडला गेला तेव्हां त्याचा विरोधी व्यक्ति कोण?

[ उत्तरे पान ६४ वर पहावीत ]



# सन्मानाची योग्यता

प्रताप कोणत्याही कलेत निपुण नव्हता. तरीही तो अनेक कलाकारांना बोलावून त्यांच्या कलांचे प्रदर्शन करवीत असे. त्यापासून जो पैसा मिळे. त्यातून आपला वाटा काढून घेत असे.

एकदा प्रताप एका गायकाला बरोबर घेऊन चंदनपुरला गेला. तेथे त्याच्या गाण्याच्या कार्यक्रमामध्ये त्यांना बराच पैसा मिळाळा. त्यांचा समारोह संपताच त्या गावचा शीतला प्रसाद नावाच्या माणसाने त्यांना बोलावणे धाडले. शीतला प्रसादनी गायकाला व प्रतापला सुवर्णपदक दिले. आणि असे अद्भुत व सुंदर गाणे ऐकवले की, असे सुंदर गाणे म्हणणाऱ्याची ओळख करून दिल्या बद्दल प्रतापचे आभार मानले व म्हणाला–"मी तुमची हीच सेवा करू शकतो."

प्रतापने आश्चर्याने विचारले–"आम्ही दोघे केवळ आपले पोट भरण्याकरीता हे काम करीत आहोत. ह्यात आमचे अभिनंदन करण्यासारखे काय आहे?"

फक्त पोट भरण्याकरीताच तुम्ही कलेचे प्रदर्शन करता तेव्हां कलेचे महत्व तर कमी होत नाही. परंतु अशा कलाकाराचा सन्मान करण्याचे सौभाग्य तर मला प्राप्त होते नां!

ह्यानंतर प्रताप कोणत्याही कलाकाराचे कलेचे प्रदर्शन करण्या करीता त्याला चंदनपुरला घेऊन जाऊ लागला. अशा प्रकारे शिल्पकार चित्रकार कवी व मल्लयोद्धा ह्यांनी चंदनपुरला आपल्या विद्याचे प्रदर्शन करून सुवर्णपदक प्राप्त केले.

प्रतापच्या मनात शीतला प्रसादच्या ह्या व्यवहारा बाबत शंका उत्पन्न झाली. तो अनेक गांवी गेला. परंतु शीतला प्रसाद सारखा कलाकारांचा सन्मान करणारा त्याला कोणीही दिसला नाही.



प्रतापनी शीतलाप्रसादची ओळख करून घेण्याचे ठरविले. त्याने विचार केला व ह्याबाबतीत चंदनपुरच्या पाटलांची मदत व भेट घेतली.

"तुम्ही शीतला प्रसादला एवढे महत्व कां देता? तो एक नंबरचा घमेंडी आहे. त्यामुळे आम्ही त्याला तुमच्यापासून दूर ठेवण्याचा नेहमी प्रयत्न करीत होतो! पाटील त्याला म्हणाला.

पाटलाच्या बोलण्यांवर प्रतापचा विश्वास बसला नाही. कोणत्याही कलाकाराच्या कलेचा सन्मान करणारी व्यक्ति घमेंडी व अहंकारी कशी होऊ शकेल? प्रतापने विचार केला की, बहुदा पाटील शीतला प्रसाद विषयी असंतुष्ट असेल. त्यामुळे त्याचे त्याच्या विषयी तसे मत पडले असावे. म्हणून त्यांने गावातील इतर प्रतिष्ठीत लोकांकडे चौकशी केली तेव्हां सर्वजणांनी पाटलाचे म्हणणेच बरोबर आहे असे सांगितले.

काहीही झाले तरी कोणी व्यक्ति जर श्रेष्ठ ठरवला गेला तर इतर जण त्याची नेहमी ईर्ष्याच करू लागतात. असा विचार करून एकदा स्वत: प्रतापच शीतला प्रसादला भेटावयास गेला. शीतला प्रसादने त्याचे स्वागत करीत त्याचे येण्याचे कारण विचारले.

प्रतापने विनम्रतापूर्वक म्हटले—"मी आजपर्यंत तुमच्या सारखी आदरणीय व उदार व्यक्ति पाहीली नाही माझ्यामनामध्ये एक शंका येते की, इतक्या कलांमध्ये अभिरुची असलेले तुम्ही कोणत्याही कलांचा अभ्यास कां केला नाहीत?"

शीतला प्रसादनीं शांतपणे विचारले—"तुम्हांला कोणी सांगितले की, मी कोणत्याही कलांचा अभ्यास केला नाही म्हणून?" प्रताप म्हणाला—"कोणताही उत्तम कलाकार आपल्या कलेचे प्रदर्शन केल्या शिवाय राहूच शकत नाही.

कलांविषयी अभिरुची असण्याकरीता कोमल रसभरीत मन असावे लागते. परंतु





आजकाल अशा लोकांची संख्या असतच नाही. तेव्हां चला माझ्या कलेच्या निपुणते विषयी आपणच खात्री करून घ्या. असे म्हणत शीतला प्रसादने त्याला एका खोलीत नेले.

तेथे शितला प्रसादने स्वत:ने तयार केलेले शिल्पीकाम व इतर कामांचे चित्राचे नमुने ठेवलेले होते ते पाहून प्रताप क्षणभर आवाक होऊन गेला.

जेव्हां दोघे खोलीतून बाहेर पडले तेव्हां शीतलाप्रसादने प्रतापला म्हटले—"माझ्या मनात् गाणे गायची इच्छा उत्पन्न झाली आहे." असे म्हणून त्याने एक गाणे म्हटले.

त्याच्या त्या विलक्षणू अद्भूत संगीत लहरी ऐकून प्रताप तन्मय होऊन डोलू लागला. थोड्यावेळाने जेव्हां शीतलाप्रसादने आपले गाणे थांबवले तेव्हां प्रताप म्हणाला—"महानुभाव, मी अत्यंत भाग्यवान आहे. कारण तुमच्या सारख्याचे मधुर गाणे ऐकण्याची संधी मला लाभली.

ह्यावर शितलाप्रसाद हसत म्हणाले—"मी माझ्या सोळाव्या वर्षापर्यंत ह्या सर्व कलांचा अभ्यास पूर्ण केला. आमच्या घराच्या पाठीमागे एक मोठी बाग आहे. तेथील निसर्गच माझे श्रोता व प्रेक्षक आहेत. तेथेच मी माझ्या कलेचे प्रदर्शन करतो. मी कविता लिहीतो. मला युद्धकलेची पूर्ण माहीती आहे. खरे सांगावयाचे तर मी चौसष्ट कलेंचा पूर्ण अभ्यास केला आहे." शीतला प्रसादने सांगितले.

"आपण अत्यंत महान आहात! आपल्या मोठेपणाची किर्ती सर्वत्र दुमदुमली पाहीजे. मी तुम्हांला राजधानीच्या गांवी घेऊन जातो. तेथे राजा समोर आपल्या कलेचे प्रदेशत करवितो. तेव्हां राजा स्वत: आपल्या कलेचा सन्मान करतील" प्रतापने सांगितले.

"मी अन्य माणसांसमोर माझ्या कलेचे प्रदेशन करीत नाही. माझा सन्मान करणारी योग्य व्यक्ति अजुन ह्या जगात जन्मली नाही. तो पर्यंत मी कोणाचाही सन्मानाचा स्विकार करणार नाही." शीतला प्रसाद म्हणाला.

ह्या गोष्टी ऐकून प्रताप आश्चर्यचकित झाला व म्हणू लागला–"तुम्ही तर अनेक कलाकांराचा सन्मान केलात. तेव्हां त्या कलाकारांपैकी कोणी तरी आपली योग्यता जाण्याचा प्रयत्न केला कां? अशा प्रकारे जर कां कोणी आपला सन्मान करू इच्छित असला तर त्याची योग्यता ठरवणे हे अन्यायाला धरून नाही कां!

शीतलाप्रसाद मंदहास्य करीत म्हणाला– "मी सर्वप्रकारच्या कलाकारांचा सन्मान करण्याची योग्यता राखतो. परंतु माझा सन्मान करण्याची योग्यता कोणी करीत नाहीत. "येथेच शेजार गांवी एक वामनमूर्ति नावाचे वीणा पंडीत आलेले आहेत. मी त्याचे स्वागत करून सन्मान करणार आहे. तुम्ही सुद्धा माझ्याबरोबर चलणार असलात तर चला."

शीतलाप्रसादच्या बरोबर प्रताप सुद्धा त्या वीणा पंडीताला भेटावयास गेला, तेथे शीतला प्रसादचे बोलणें ऐकून त्याने त्याला नखशिखांत पाहिले व विस्मयाने म्हटले– "वाह्, काय आपण माझा सन्मान करणार? ही तर आश्चर्याचीच गोष्ट आहे संगीत कलांमध्ये...? त्यातून वीणवादना विषयी आपल्याला काय माहीत आहे. आणि माझा सन्मान करण्याची आपली योग्यता तरी आहे कां?"

शीतलाप्रसाद क्षणभर दिगमुढ झाला व तेथून मान खाली घालून जावू लागला. प्रतापने सुद्धा त्याचेच अनुकरण केले. रस्त्याने जाताना प्रताप शीतलाप्रसादनां म्हणाला–मी असे सांगू शकत नाही की, आपल्या सारख्या एका व्यक्तिचे दर्शन होणे माझ्यासारख्याला सौभाग्यच आहे कां दुर्भाग्य, परंतु एक गोष्ट स्पष्ट आहे. की आपण कितीका असाधारण प्रतिभा राखणारे असलात तरी आपल्या घमेंडीमुळे व अहंकारी स्वभावाने आपण दुसऱ्यांचा सन्मान मनापासून ठेवत नाहीत. अशा तऱ्हेने तुमचा सन्मान कोणी करावा हे मानणे म्हणजे मुर्खपणा आहे! असे म्हणून तो तेथून निघून गेला.






[ ७ ]

[चंद्रवर्मा नदीच्या प्रवाहात वहात कोणत्यातरी किनाऱ्याला येऊन पडला. थोड्यावेळाने त्याला शुद्धी आली व तो उठून चालू लागला. त्याला तेथील झाडांच्या फांद्या हाका मारीत असल्याचा भास झाला. त्यानंतर तो कापालिनी नावाच्या चेटकीणीच्या घरात पोहोचला. तेथे त्याला जादूने वीरपुरची स्थिती व सेनापती धीरमल्ल दृष्टीस पडले...]

कापालिनीने चंद्रवर्माच्या खांद्यावर थोपटत धीर देत म्हटले–"बाळ, चंद्रवर्मा घाबरून जाऊ नकोस. संकटेही नेहमीच येत नाहीत. तु पुन्हां तुझे राज्य जिंकू शकतोस पण तू जर दिलेल्या वचनाला जागलास व मला मदत केलीस तरच मी पण तुला सर्वप्रकाराने सहाय्य करण्यास तयार होईन."

कापालिनीच्या बोलण्याने चंद्रवर्माला मनांतून कोणतीच उत्साहाची प्रेरणा मिळाली नाही, कारण शंभर मैल अंतरावर रहात असलेल्या शंखु नावाच्या मांत्रिकाच्या घरात प्रवेश करून त्याला कापालिनी करीता कोणती तरी अनमोल वस्तु आणावयाची होती. त्या सर्व प्रयत्नात आपण परत जिवत परत आलो तरच कापालिनी आपल्या कामात

[redacted]



आपल्याला मदत करणार आणि ह्या कामी आपल्याला मरण आले तर मग....

चंद्रवर्माच्या मनांतील विचार जाणून कापालिनीने दिर्घ श्वास घेतला आणि परत हसत त्याला म्हणाली—"बाळा, चंद्रवर्मा तुझ्या मनांतली गोष्ट मी जाणली. तुला ह्याक्षणाला जरी तुझ्या नगरात जावयाचे असले तरी तू निर्धास्तपणे जाऊ शकतोस. मी तुला कोणत्याही प्रकाराने अडवणार नाही. मी तुला आश्वासन देत की ह्या जंगलातील कालनाग व झाडे-मुळे तुला कोणताही त्रास देणार नाहीत मग तर ठीक आहे नां!"

हे ऐकून तो कापालिनीच्या येथून निर्धास्त पणे जाऊ शकत होता परंतु चंद्र-वर्मा परत काळजीने ग्रासून गेला. की, जरी ह्िच्या तावडीतून सुटका झाली तरी जाणार कुठे. ह्या स्थितित जंगल-पहाडात एकटे भटकण्याशिवाय दूसरे काय करणे शक्य आहे. त्याच्या वडिलांचा तर स्वर्गवास झाला होता. आणि दुसरे त्याचे राज्य शत्रूसैन्याच्या ताब्यात होते. विश्वास-पात्र सुबाहुचा तर ठाव-ठिकाणा लागत नव्हता त्याचा नाईलाज झाला.

"कापालिनी, मी माझी सारी शक्ति खर्ची घालून तुझ्या मदतीकरीता प्रयत्न करीन! सांग, शंखू नावाच्या मांत्रिकाच्या घरातून मला कोणती वस्तू आणावयाची आहे ?" चंद्रवर्मा थोडया उत्साहाने तिला म्हणाला.

चंद्रवर्माचा ह्या निर्णय ऐकताच कापालि-नीचा चेहरा आनंदाने उजळला. ती ताडकन् पलंगावरून उठली व एक जादूची कांडी हातात घेऊन तिने दरवाजापाशी उभ्या असलेल्या लाकडी बाहुलीवर जोरात प्रहार करून म्हणाली—"भैरवा! माझ्या घरी पाहुणा आला आहे. तू ताबडतोब जेवण तयार कर."

दुसऱ्याक्षणात 'हुंम् हुंम्' असा आवाज करीत एक प्रचंड आकाराचा विशालकाय












माणूस समोर उभा राहीला आणि दोन्ही हातात सोन्याच्या थाळचांमधून मिष्टान्न फळफळावळे वगैरे घेऊन येत म्हणाला हे घ्या तुमचे जेवण असे म्हणत त्याने त्या थाळचा चंद्रवर्माच्या समोर ठेवल्या.

चंद्रवर्मा भुकेने कासाविसच झाला होता तो त्या खाण्यावर तुटून पडला ते पाहून एका बाजूला भैरव व दुसऱ्या बाजूला कापालिनी संतोषाने त्याच्याकडे पहात उभे होते. काही वेळाने चंद्रवर्माने सर्व खाऊन पोटावरून हात फिरवला व दोन्ही थाळया बाजूला सारल्या त्या-बरोबर भैरवाने त्याला हात धुण्याकरीता पाणी आणले.

चंद्रवर्मा मनांतून घाबरला व विचार करू लागला की, कापालिनी नागसर्प व भैरव अशा भयंकर शक्तिशाली लोकांना आपल्या अधीन ठेऊ शकते तर ती शंखू नावाच्या मांत्रिकाकडून तिला हवी असलेली वस्तू कां मागून घेत नाही! ह्याहूनही त्या मांत्रिकापाशी अशी कोणती महान शक्ति असावी? ह्यांत काही गुप्त रहस्य तर नाही नां!"

"मुला, आता मी तुला ते काय रहस्य हे सांगणार आहे. त्यावर आपण सल्ला-मसलत करू. शंखूच्या वस्तूमध्ये अपूर्व शक्ति असलेला एक शंख आहे. एका विशिष्ट तऱ्हेच्या औषधी वनस्पतीचा उकळून केलेला काढा त्यात घालून प्याल्याने म्हातारपण जाऊन तारुण्य प्राप्त होते. नंतर एक हजार वर्षापर्यंत ते तारुण्य तसेच टिकून रहाते. आज पासून एक हजार पन्नास वर्षापूर्वी मी त्या काढयाचे सेवन केले होते. त्या वेळी शंखू माझा शत्रू होता. त्यानंतर तो माझा कट्टर शत्रू बनला." असे म्हणत ती वळून भैरवकडे डोळे पाखडीत त्याला म्हणाली—अरे दुष्टा, तू तुझा दुष्टपणा अजून सोडला नाहीस. असे म्हणत तीने चट्दिशी जादूची कांडी त्याच्या डोक्यावर मारली क्षणात् भैरव जोरात किंचाळत धाडकन् भिंतीवर कोसळून खाली पडला.

"हा तुझा सेवक आहे नां? मग तू त्याला अशा प्रकारे कां मारलेस?" चंद्रवर्माने तिला विचारले.

ह्यावर कापालिनी विकट हास्य करीत दुष्टपणाने म्हणाली—"हे तर खरेच आहे की तो माझा नोकर आहे. पण जर कां संधी मिळाली तर हा माझे गुपीत जाणून माझाच वध करेल व त्या शंखूच्याकडे परत जाण्याचा प्रयत्न करेल. असा हा एक नंबरचा दुष्ट आहे. तसे म्हटले तर ह्या क्षुद्र भूतांची करणीच तशीच असते. ते ज्या मांत्रिकाची सेवा चाकरी करतात. त्याच्यापेक्षां हेच बलवान दिसतात. त्यामुळे त्याच्या आश्रयाला जावयास हे कधी चुकत नाहीत. म्हणून मी ह्याचे लाकडाच्या ठोकळचात रुपांतर केले आहे. जादुगार शंखूने माझ्या रहस्यांचा शोध काढण्याकरीता कित्येक जणांना माझ्याकडे पाठविले. त्यांची कशी दुर्गति झाली ते तर तू आता स्वतःच्या डोळयानेंच पहा. असे म्हणत कापालिनीने दारावर लटकव-लेल्या मुंडक्याचे तोरण त्याला दाखविले. तोपर्यंत चंद्रवर्माचे तिकडे लक्ष गेले नव्हते. तो थरथर कांपू लागला. शंखूने पाठविलेले गुप्तचर कापालिनीकडे अशा प्रकारे दाराचे लोलक बनले गेले होते. तशाच प्रकारे



कापालिनी कडून गेलेल्या हेरांना शंखूने गळयातील हार बनवले असावेत.

असा विचार येताच चंद्रवर्मा शंका व्याकुळ होत म्हणाला—"कांपालिनी! मग तू पाठविलेल्या हेरांच्या मुंडक्याची माळ त्याच्या गळयात असेल नां!

कापालिनीने अस्विकार सुचक मान हलविली व म्हटले—"मी आजपर्यंत त्याच्याकडे कोणालाच पाठविलेले नाही. ती अपूर्व शक्ति असलेला शंख हडप करावयाला कोणता माणूस योग्य आहे हे मी पूर्वीच जाणून ठेवले होते."

"ती समर्थ व्यक्ति मी आहे. असाच तुला विश्वास वाटतो नां?"













"हो, हो, चंद्रवर्मा! कापालिनी उत्साहाने म्हणाली. तू तरुण आहेस व क्षत्रिय आहेस. तुझे राज्य मित्र बांधव ह्यांच्यापासूनवंचीत झाले आहे. तसे असतांना तुझ्यापेक्षां शुर व साहसी कोण मिळू शकणार. ह्या प्रयत्नात तू जर यश प्राप्त केलेस तर तू फक्त राजाच नाही तर सर्व राज्यांचा चक्रवर्ती बनशिल! ह्याचा उपाय काय हे मी तुझ्याकडून शंख माझ्या हातात आल्या नंतरच सांगेन." कापलिनीने स्पष्ट सांगितले.

कापालिनीच्या बोलण्याने चंद्रवर्माच्या अंगात उत्साहाचे वारे शिरले परंतु त्याच बरोबर त्याला थोडी शंका सुद्धा येत होती की, शंखाच्या लोभाकरीता ती आपल्याला प्रलोभने दाखवित तर नसावी.

"ठिक आहे! सांग तर, त्या मांत्रिकाच्यापाशी पोहचण्याचा कोणता मार्ग आहे. मी तर आताच निघतो." चंद्रवर्मा म्हणाला त्याच्या मनामध्ये असाधारण त्याग उत्पन्न झाला.

कापालिनी घरातून बाहेर आली. तिच्या पाठोपाठ चंद्रवर्मा सुद्धा बाहेर आला. सूर्य अस्तास जाण्याची वेळ होत आली होती. कापालिनी उत्तरेकडे तोंड करीत आपल्या हाताने संकेत करत म्हणाली—" ह्या दिशेला शंभर योजने दूर शंखू मांत्रिकाचा पर्वत आहे व त्या पर्वतावर त्याचे मंत्रवलेले घर आहे. त्याच्या घरातील पुजेच्या खोलीत तो शंख एका नागाच्या गळयात अडकवलेला आहे. तो नाग त्या खोलीतील खुंटीला अडकवलेला आहे. तुला शंखूबरोबर प्रथम मैत्रि संपादन करावयास हवी किंवा दगाफटका करून त्याला ठार मारावयास हवे तेव्हांच तो शंख तुला हस्तगत करता येईल.

"अशा नामी मांत्रिकाचा वध करणे काय संभव आहे?" चंद्रवर्मा शंका व्यक्त करीत म्हणाला.

"कां नाही? कितीका मोठा महान मांत्रिक असू दे त्याला एक ना एक दिवस मरण तर येणारच ना! शंखू तर ह्याला अपवाद नाही. तेव्हां त्याला कसे ठार मारायचे हे तुझे तू ठरव! याचा उपाय तुला तुझा स्वतःनेच शोधायला पाहिजे." कापालिनी म्हणाली.

"ठिक आहे! तर मग मी निघतो!" असे म्हणत चंद्रवर्माने एकदा आपल्या अंगरख्याच्या आत ठेवलेल्या म्यानेत तलवार आहे की नाही ते चांचपून पाहिले व मग तो चालू लागला.



चंद्रवर्मा दोन तीन पावले पुढे चालून गेला नसेल तोच कापालिनी धावत त्याच्या समोर आली व त्याचे खांदे पकडीत त्याला म्हणाली—"बाळा चंद्रवर्मा, मी एक खास गोष्ट सांगण्यास विसरूनच गेले बघ. शंखूच्या जवळ एक विचित्र पक्षी आहे. त्याच्या शक्तिची व गतिची कशाशीच तुलना करता येणे शक्य नाही. त्याचे नाव "अग्नीपक्षी" आहे. तो रोज सूर्यास्ताच्या सुमारास आपले भक्ष शोधण्याकरीता बाहेर पडतो व अर्ध्यारात्री नंतर परत मांत्रिकाच्या घरी परत येतो. आकाशात उडत असतांना तो ज्वाळे सारखा भडकतांना दिसतो त्याच्या प्रकाशाच्या अनुरोधाने तुला मांत्रिकाच्या घरात जाणे सोपे होईल. तुझा मार्ग जाऊन येऊन एकंदर दोनशे मैल आहे. तेव्हां तू किती वेळात तुझे काम सफल करून परत येशिल ते सांग?"

कापालिनीचा हा प्रश्न त्याला जरा विचित्रच वाटला. डोंगर दऱ्या खोऱ्यातून त्याला पायी शंभर मैल चालत जावयाचे होते. त्यानंतर त्या शंखू मांत्रिकाच्या घरात जाऊन त्याला तो शंख मिळवायचा होता व परत शंभर मैल पायी रस्ता तुडवत यायचे होते. त्यातून मार्गात कोणती किती संकटे येतील व त्यांना कसे तोंड द्यावे लागले हे माहित नव्हते. फक्त परमेश्वरच जाणत होता तेव्हां अशा परिस्थितीत कसे सांगणे शक्य आहे की, किती वेळात आपण परत येऊ ते!" चंद्रवर्माच्या मनातील . गोष्ट जाणून

कापालिनी घाबरून जात त्याला म्हणाली— "हो रे बाळा, मी हे जे साहस करावयास जात आहे ते मला पूर्णपणे माहीत आहे. परंतु आजपासून एका वर्षाच्या आत तू तो शंख मला आणून दिलास तरच माझे काम मला पूर्ण करता येईल व मी आजन्म तारुण्य प्राप्त करून शकेन. त्यानंतर जरी एक दिवस जरी पुढे ढकलला गेला तरी तो शंख बिन कामाचा होईल. हे एक झाले त्यातून तू कोणत्याही कारणास्तव जर एका वर्षाच्या आत येऊ शकला नाहीस तर ह्या ठिकाणी मी असू शकणार नाही. पण मी तुला मदत करण्याचे आश्वासन दिले आहे. ते मी विसरणार नाही. त्या जादूच्या कांचेच्या गोळ्याच्या टेबलावर मी एक ताडपत्र ठेवून जाईन त्यात ह्या शंखाचा कसा उपयोग करावयाचा त्याचे वर्णन लिहीलेले असेल. त्याप्रमाणे तू तो वापरून मला प्राप्त करू शकशिल.

कापालिनीच्यां त्या आश्वासनानी चंद्रवर्माचा विश्वास बसला. त्याला आता खरे वाटू लागले की, कापालिनी आपल्याला धोका देत नाही. त्यामुळे त्याने आदरपूर्वक तिचे दोन्ही हात पकडले व दृढ स्वरात म्हणाला—"मी एका वर्षाच्या आत शंखासहित परत येईन. असे म्हणत तो तेथून निघाला.

त्याच क्षणी कापालिनीने जोरात हांक मारले—"कालसर्पा! तेव्हां कालनाग फुत्कार करीत तिच्या समोर येऊन उभा राहिला. तेव्हां तिने सर्पाला चंद्रवर्माला दाखवित आज्ञा केली चंद्रवर्माचे हे जंगल पार करे पर्यंत रक्षण कर."

कालसर्प निमिषार्धात चंद्रवर्माच्या पुढे गेला व त्याला रस्ता दाखवू लागला. चंद्रवर्माने थोडे जंगल पार केल्यानंतर पाठीमागे वळून पाहिले तेव्हां त्याला कापालिनी दिसली नाही. तर तिच्या जागी ससाण्याचे डोके व पंख व सिंहाचा रूप असलेली एक विकृत आकृति दिसली. तशी त्याने पूर्वीच पाहीली होती तो क्षणभर संभ्रमात पडला. (क्रमशः)



# दयाळू दयानिधि

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तुझ्या मनात जी काय दयेची भावना आहे. त्याला प्रेरीत होऊनच तू अमुक एक कार्य करण्याचे वचन दिले आहेस. आणि नंतर पुन्हा ते वचन मोडू नये ह्या भीतीनेच तू स्मशानात नाना प्रकारचे कष्ट सहन करीत आहेस. मला असे वाटू लागले आहे की, मानवामध्ये जे अनेक प्रकारचे उत्तम गुण आहेत. त्यात दयेची भावना हाच एक सर्वोत्तम गुण आहे. विवेकपणाने जर कां ह्याचा उपयोग केला नाही. तर तोच गुण अनर्थाचे कारण बनू शकतो. ह्याचे उदाहरण म्हणून मी तुला एका दयानिधि नावाच्या श्रीमंताची गोष्ट सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.



कोण्या एका गावांत दयानिधि नावाचा एक श्रीमंत माणूस रहात होता. तो त्याच्या नावाप्रमाणेच अत्यंत दयाळू होता. तो आपले वाईट चिंतणाऱ्यांना क्षमाच करीत असे. तेच सोडा पण जर कोणी गुन्हा केला असला तर त्याचा तो सखोल विचार करीत असे व नंतर त्याला समजावून सांगत असे की असा गुन्हां पुन्हां करू नकोस!

दयानिधिच्या घरात रामू नावाचा एक नोकर होता. तो लहानपणापासूनच त्यांच्याकडे लहानाचा मोठा झाला. त्यामुळे इतर नोकरांपेक्षा रामूवर दयानिधिचे जास्त प्रेम होते. काही वर्षानंतर रामूने लग्न केले. तो लग्नानंतर स्वतःच्या बायकोला नेहमी दयानिधि बद्दल त्याच्या दयाळू स्वभाव विषयी गोष्टी सांगत असे. त्याच्यावर जे जे उपकार केले ते ही सांगत असे.

रामूची बायको अत्यंत लोभी हावरट होती. एक दिवस तिने आपल्या नवऱ्याला म्हटले—"काय हो, रोज आपल्या मालकाच्या उदारतेचे पोवाडे गाताना तुम्ही थकत नाहीत. पण त्यांच्या घरी तर ढिगांनी रेशमी साड्या आहेत. पण माझ्याजवळ एका सुद्धा नाही. त्यांच्या पत्नी व मुलीजवळ कित्येक मौल्यवान दागिने आहेत. तुम्हांला तर माहीत आहे माझ्या अंगावर सोन्याचा एक फुटका मणी सुद्धा नाही.

रामूला त्याच्या बायकोने सांगितलेल्या गोष्टींत काहीतरी तथ्य आहे असे वाटू लागले. परंतु त्याने कोणत्याही गोष्टी करीता आपल्या मालकासमोर हात पसरला नाही. कारण स्वतः दयानिधि त्याच्या गरजा पाहून त्या सर्व गरजेच्या गोष्टी त्याला न मागता देत असे.

एकदा रामूने आपल्या बायकोनी सांगितलेली गोष्ट इतर नोकरांजवळ बोलून दाखविली. त्या सर्वजणांनी त्याला समजावत म्हटले—"अरे, प्रत्येक व्यक्तिची मिळकत त्याच्या बुद्धी चातुर्यावर अवलंबून असते आपल्या मालकासारखे लोक जर धनवान राहातील तरच आपले आयुष्य आनंदाने जाईल नां! त्यातून मालक तर तुझ्यावर जास्तच सहानभुति दाखवतात.

रामूला त्यांचे म्हणणे सुद्धा बरोबर वाटले. त्याने जाऊन ती गोष्ट आपल्या बायकोस सांगितली.

"म्हणजे ह्याचा अर्थ तुम्ही जितके दिवस काम कराल तेवढे दिवस असेच हाल भोगायचे हाच नां! तुम्ही सुद्धा तुमच्या मालका सारखा स्वताचा काही धंदा कां करून पैसे मिळवत नाहीत?" रामूच्या बायकोने त्याला सल्ला देत म्हटले.

"मी तशा बुद्धीचा नाही" रामू म्हणाला.

"मग चोरी करा! रामूच्या बायकोने त्याला चिडवत म्हटले.

चोरीचे नाव काढताच रामू घाबरला. त्याला समजेना की, चोरी कसली करायची? कुठे करायची.

तुम्ही तुमच्या मालकाच्या घरीच चोरी करा. त्याचा तर तुमच्यावर गाढ विश्वास आहे नां! दुसरी गोष्ट त्यांच्याकडे चोरी करणे सुद्धा अतिशय सोपे आहे. कोणाला काही एक पत्ता सुद्धा लागणार नाही. कोणती तरी किमती वस्तु तुम्ही चोरून आणा मग ती घेऊन आपण हा गांव सोडून लांब निघून जाऊ व काही दुसरा धंदा व्यवसाय करून आपण खूप पैसा मिळवु मग माझ्या अंगाखांद्यावर दागदागिने व



रेशमी कपडे.......रामूची बायको म्हणाली.

रामूने प्रथम तिचे म्हणणे मान्य केले नाही. परंतु बायको बरोबर बरेच भांडणकेल्यानंतर त्याने हो ला हो केले.

एक दिवस रामूने आपल्या मालकाचे सारे घर धुंडाळून काढले. त्याने पाहिले एका खोलीत तिजोरी उघडीच पडली आहे. त्याला कुलूपही घातलेले नाही. तेव्हां त्याने इकडे तिकडे पाहिले व कोणी नाही असे पाहून त्यातील एक थैली उचलली व नेऊन बायकोच्या हातात दिली.

रामूच्या बायकोने सर्व नाणी मोजली व अत्यंत आनंदाने किंचाळली—"अरे वा, ह्यात तर खूप धन आहे!"

दुसऱ्या दिवशीच दयानिधिला आपल्या घरी झालेल्या चोरीचा पत्ता लागला. तेव्हां त्याने उदास होत म्हटले–"हे काम कोणत्या चोर दरोडेखोराचे नाही. असा विचार करीत त्याने सर्व नोकरांना बोलावून घेतले आणि विचारले–"तुमच्या पैकी कोणी पैसे चोरले आहेत कां? आज पर्यंत तुम्ही सर्वांनी ईमानदारीने काम केलेत अशा परिस्थितीत कोण चोरी करण्यास प्रवृत्त झाला. म्हणजे हा दोष माझाच आहे. असे म्हणून त्याचे डोळे दु:खाने भरुन आले.

चोरी झालेली समजून सुद्धा क्रोध येण्या ऐवजी आपल्या मालकाला झालेले दु:ख पाहूनच सर्व नोकरवर्गाला भीती बरोबर त्याची सहानुभूती वाटू लागली.

त्यामुळे त्यातील दोन नोकरांना अजिबात रहावले नाही. ते म्हणाले मालक आम्ही सर्व नोकरांच्या घराची झडती घेतो. तोपर्यंत सर्व नोकरांना येथेच थांबवून ठेवा.

सर्व नोकरांच्या घराची झडती घेतल्या-नंतर सर्व धन आपल्या घरातच सापडेल हा विचार करताच रामूचा थरकांप उडाला की, आता अपाली कशी दुर्गति होणार.

रामूने दयानिधिचे पाय पकडले तेव्हां दयनिधिने त्याच्या चुकीना क्षमा करून म्हणाला–"यापुढे तू असे काम कधी करू नकोस."

ह्यानंतर रामूने चुकूनही आपल्या मालकाच्या घरात चोरी केली नाही. परंतु उलट त्याला आयुष्य जगणे कठीण होऊन गेले. एका बाजूने त्याची बायको जास्त पैसा मिळवा म्हणून सतावू लागली. तर दुसऱ्या बाजूने सर्व नोकरवर्ग त्याला हिणवू लागले.

एकदा मालक निवांत बसलेले पाहून रामू त्यांना म्हणाला–"बाबूजी, सर्वजण मला 'चोर' म्हणून माझा अपमान करीत आहेत. तेव्हां मी कुठे तरी दूर निघून जावे. म्हणतो मला निरोप द्यावा.

दयानिधिने त्याला समजावत सांगितले की, मी त्या सर्वांना असे म्हणून नका म्हणून सांगेन व तुझ्या बायको करीता एक रेशमी साडी घेऊन देईन अशा प्रकारे त्याला बराच प्रयत्न व समजावून सांगितले शेवटी म्हटले–"मला तर अशी भीती आहे. की तू कुठे जाशील तर तुला अनेक कष्टच झेलावे लागतील. लहानपणापासून तू माझ्या घरी राहिलास. म्हणून मला तुझ्याबद्दल खूप प्रेम वाटते आणि तू तर माझ्या घरातून निघून जाण्याच्या गोष्टी काढतोस. त्यामुळे मला शंका वाटते की, माझ्या घरांत तुला कशाची कमी आहे. तू येथून निघून जाणार हे ऐकूनच मला खूप दु:ख होते.

पण रामूने जाण्याचीच री ओढली. शेवटी दयानिधिने त्याला थोडा पैसा दिला व म्हणाला–"माझी मनोकामना आहे की, तू जिथे रहाशिल तिथे सुखी रहा."

त्यानंतर रामू तेथून निघून गेला.







दयानिधिच्या बायकोने सारी हकिकत ऐकून म्हटले–"चोरी झालेली जेव्हां समजली तेव्हांच तुम्ही त्याला पैसा द्यावयास पाहीजे होता. म्हणजे तशा स्थितीत त्याची तुमच्याबद्दलची आदर भावना अजून जास्त वाढली असती.

"पण असे केले तर, नोकरांची चोरी करण्याची प्रवृत्ती जास्तच वाढली असती. रोज कोणत्यातरी नोकराने आपल्या घरी चोरी केली असती शिवाय चोरीचीच वस्तू चोराला भेट म्हणून देणे चांगले नाही" दयानिधि म्हणाला.

ह्या गोष्टीला पुष्कळ वर्षे उलटली. दयानिधि आता म्हातारा झाला. त्याचा मुलगा व्यापाराची सर्व कामे सांभाळत होता.

एक दिवस रात्री दयानिधिच्या घरी एक वीस वर्षाचा मुलगा चोरी करताना पकडला गेला. तो दयानिधिच्या पाया पडत म्हणाला–"मालक, मला क्षमा करा व सोडून द्या. एका काळी जो रामू नावाचा नोकर आपल्या घरी कामःला होता त्याचा मी मुलगा आहे."

दयानिधि आश्चर्याने म्हणाला–"आता रामू काय करतो? कुठे आहे तो?"

"सरकार, तुम्ही माझ्या वडिलांना जो पैसा दिला होतात त्याने माझ्या वडिलांनी भाजीपाल्याचा धंदा सुरू केला. त्याने जो काही फायदा होत होता. तो आमच्या खाण्यात कपड्यालत्त्यातच खर्च होऊन जात होता. त्यामुळे माझ्या आईने मला चोरी करावयास भाग पाडले.

मग तू चोरी करावयास माझ्याच घरात कां घुसलास? दयानिधिने विचारले परंतु त्याच्या मनांत एक गोष्ट सलत राहिली. की, इतक्या वर्षानंतर सुद्धा त्याच्या मनांत बदला घेण्याची इच्छा राहीली आहे.

"साहेब, माझ्या वडिलांनी चोरी करण्याकरीता आपले घरच जास्त पसंत केले कारण जर चोरी करतांना पकडलो गेलो तर आपण क्षमा करून सोडूनच द्याल नां! रामूच्या मुलाने स्पष्ट सांगितले.

हे उत्तर ऐकून दयानिधि आश्चर्यचकित झाला. नंतर त्याला बाहुपाशात घेत म्हणाला–"ऐक बाळ, तू परत कधीही चोरी करु नकोस व्यापारात तुला मी भागिदार करून घेतो. तू माझ्याच जवळ रहा.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने राजाला म्हटले–" राजन, चोरी करताना पकडला जाऊन सुद्धा दयानिधीने त्याला शिक्षा केली नाही. उलट व्यापारामध्ये त्याला बरोबरीने हिस्सा देण्याचे आश्वासन दिले. विवेकपणा नसतांना सुद्धा ते दयाळूपणा दाखवितात. त्यामुळे इतर लोकांना सुद्धा चोर बन-विण्याचा धोकाच होतो नां! खरे म्हटले तर दयानिधिची ही प्रवृत्ती आतून दयेची आहे कां भोळे पणाची आहे? ह्या गोष्टीचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला त्याचा परिणाम माहीत आहेच, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"समाजात दया-निधि सारखे स्वभाव असणारे लोक विरळच. रामूने जेव्हां चोरी केली. तेव्हां दयानिधिने त्याला क्षमा केली. परंतु त्याने त्याच्या दयाळू स्वभावाचा विश्वास केला नाही व त्याच्या घरातून निघून गेला. ही एक शंका त्याच्या मनामध्ये होती. आपल्या मुलाला त्याच्या घरी चोरी करण्यास धाडून त्याच्या दयाळूपणाची प्रशंसाच केली. तेव्हां त्याची शंका दूर झाली. त्यामुळे त्याने इतका प्रबल विश्वास ठेऊन त्याच्या घरच्या कुटुंबाचा उद्धार केला. हा त्याचा भोळेपणा नाही. उत्तम चरित्र असणारा दुसऱ्यांच्या प्रशंसेची अपेक्षा करीत नाही. परंतु त्यांची उदारबुद्धी व उत्तम गुण जेव्हां दुसऱ्यांना आपोआप समजतात. तेव्हां ते आपोआप प्रसन्न होतात. दयानिधिचे वास्तविक कारण हेच असू शकेल."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतावरोबर अदृष्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)











# वेळेचे महत्व

श्रीपुरच्या जमिनदाराने आपल्या आंब्याच्या बागते एक निवास स्थान बांधले. त्याला रंग लावण्याकरीता मजुराची जरूर होती. जमिनदाराच्या स्वभावामुळे ते काम करण्यास कोणी राजी नव्हते कारण कितीही चांगले कामकेले तरी जमिनदार संतुष्ट होत नसे.

एकदा सोमनाथ त्या गावी आला. त्याने जमिनदाराला भेटून म्हटले–"मालक, मला एक आठवडाभर तरी आपल्या गावात रहायला लागणार आहे. तेव्हां आपल्या घराचे रंग लावण्याचे काम मला द्या!"

"मी जो रंग लावायला सांगेन तोच लावला पाहिजेस नाहीतर मी एक दमडा सुद्धा देणार नाही. आणि मी तुझ्या कामावर संतुष्ट झालो तर मी तुला तुझ्या श्रमाची किमत नक्की देईन." जमिनदाराने अट घातली.

सोमनाथने त्यांची अट कबुल केली. जमिनदाराने एक लाकडाची पेटी आणून सोमनाथच्या हाती देत म्हटले. हे बघ, घराच्या आतील भितीला बरोबर ह्या लाकडी पेटीला आहे तसाच रंग द्यावयाचा" सोमनाथने एका आठवड्याच्या आत रंगकाम पूर्ण केले. तेव्हां जमिनदाराने ती लाकडी पेटी प्रत्येक भिंती जवळ नेऊन पहात रंग बरोबर आहे कि नाही ते पाहिले व संतोषाने सोमनाथला पैसे दिले. जमिनदार बायकोला म्हणाला–"सोमनाथ कुशल रंगारी आहे. मी जी रंगीत लाकडी पेटी दिली होती. त्या रंगाच्याच भिंती रंगवून काढल्या आहेत. त्याला काही काम दिले तर इथेच राहील.

परंतु जमिनदाराच्या बायकोच्या मनात एक शंका आली. तिने आपल्या नखाने त्या लाकडी पेटीचा थोडा रंग खरवडून काढला. तेव्हां त्या पेटीला जो नविन रंग लावला होला. तो निघून आतील रंग दिसू लागला. तेव्हां त्याने भितीचा रंगच पेटीला लावला असल्याचे रहस्य उघडकीस पडले. तेव्हां ती जोरजोरात हसत म्हणाली–"अहो महाराज, त्या रंगाऱ्याने तुम्ही सांगितलेल्या हुकुमानुसार भितीचा रंग बदलला नाही पण ह्या पेटीला मात्र भितीचा रंग लावला आहे.

जमिनदाराला सोमनाथच्या करण्याचा खुप राग आला परंतु त्याच्या चातुर्याचे हसू आल्याशिवाय पण रहावले नाही.





# राजकन्येची चिंता

स्वर्णपुरीची राजकन्या कुसुमलताला लहानपणापासूनच चित्रकलेची अत्यंत आवड होती. तिची आवड पाहून राजाला अत्यंत आनंद झाला. मनोहर सिंहराजाने प्रसिद्ध चित्रकार द्योतकला बोलावणे धाडले व आपल्या मुलीला चित्रकलेत प्रविण बनवायला सांगितले.

काही दिवस लोटले. एक दिवस द्योतकने राजाचे दर्शन घेत निवेदन करीत म्हटले–"प्रभू! मी राजकन्येला पूर्ण शिक्षण दिले आहे. आता तिला शिकविण्यासारखे काही राहिले नाही. मला तर असे वाटू लागले आहे की, माझ्यापेक्षाही कितीतरी पटीने तिने जास्तच ज्ञान प्राप्त केले आहे.

महाराज ते बोलणे ऐकून अतिशय प्रसन्न झाले व त्यांनी त्याला बक्षिसी देऊन पाठवणी केली. ह्यानंतर काही दिवसांनी कुसुमलतेने एक चित्र रेखाटले. त्यात एक सुंदर तरुण पांढऱ्या शुभ्र घोड्यावर बसलेला आहे व त्याच्या एका हातात लगाम व दुसऱ्या हातात तलवार धरलेली आहे. असे ते चित्र पूर्ण होता क्षणी दुसऱ्या दिवसापासून कुसुमलतेच्या वागण्यामध्ये विचित्र बदल दिसून येऊ लागला. त्या चित्राकडे जेव्हां केव्हां राजकुमारीची दृष्टी पडे तेव्हां तिच्या डोळ्यातून अश्रु येऊ लागत असत. महाराज व महाराणीने खूप समजावून विचारून पाहिले परंतु ती काही न बोलता गप्प बसून राहली. हळूहळू तिची तब्बेत सुद्धा बिघडू लागली.

एक दिवस मंत्री अजयशर्मा याने राजाला सुचविले–"महाराज, मला एक शंका वाटते. राजकुमारीने काढलेल्या चित्रात काहीतरी कमी असावे. एकदा चित्रकार द्योतकला बोलावून चित्राचे परिक्षण करण्यास सांगावे म्हणजे राज-



कुमारीच्या चिंतेच कारण तरी समजेल. महाराजाने द्योतकला बोलावून चित्राची परिक्षा करण्याची आज्ञा केली. चित्रकारने सर्व दिवस ते चित्र पाहून राजाला म्हटले– "महाराज इतके सुंदर चित्र रेखाटणे दुसऱ्या कोणालाही शक्य नाही. चित्रात कोणत्याही बाबतीत कमतरता नाही. ही गोष्ट मी राजकुमारीला सुद्धा समजावून सांगितली. परंतु त्याचा काहीही फायदा झाला नाही.

द्योतक गेल्यानंतर एक दिवस राजकुमारीची मैत्रिण इन्दुलेखा राजाला एकटे बसलेले पहात म्हणाली–"प्रभू! आपण क्षमा करत असाल तर एक गोष्ट सांगावी म्हणते. त्या चित्रात रेखाटलेला तरुण राजकुमारीने कुठेतरी पाहिलेला असावा. एखादे वेळेस त्याच्याबरोबर लग्न करण्याची तिची इच्छा असेल. आणि ती गोष्ट आपल्या जवळ बोलून दाखविण्यास तिला संकोच वाटत असेल."

राजाच्या मनात सुद्धा तशीच शंका येऊ लागली की, इंदुलेखाचे म्हणणे खरे असावे. म्हणून राजाने राणीला बरोबर घेतले व तो कुसुमलताच्या महालात आला व तिला पहात राजाने विचारले–"बाळे, तू तुझ्या चित्रात ज्या तरुणाला रेखाटले आहेस काय त्याला तू पाहिले आहेस कां? आणि तुला त्याच्याशी लग्न करावयाचे असेल तर सांग त्याला बोलावून घेऊन तुझे लग्न त्याच्याशी आम्ही लावू."

ते ऐकताच कुसुमलता अतिशय रागाने म्हणाली–"पिताजी, असे बोलणे चांगले नाही. असे म्हणत उशीत तोंड खुपसून रडू लागली.

राजाला समजेना की, आता काय करावे? त्याच दिवशी राजाने संध्याकाळी मंत्र्याला बागेत बोलावून घेतले व मुलीने सांगितलेली गोष्ट सांगितली.

मंत्र्याने थोडा विचार केला व म्हणाला– "महाराज, आपण एक काम करावयास हवे. ते असे की, आपण असे जाहिर







करावे. की, राजकुमारीची काळजी जो कोणी दूर करेल त्याला काही जमिन बक्षीस दिली जाईल. ताने तरी काही कारण समजू शकेल.

महाराजाने मंत्र्याने सुचविलेल्या सल्ल्या प्रमाणे राज्यभर दवंडी पिटविली. ती ऐकून अनेक चित्रकार व प्रतिष्टीत माणसे तेथे आली. सर्वजण राजकुमारीच्या चिंतेचे कारण समजावयास असमर्थ ठरली.

राजाला अत्यंत चिंता वाटू लागली. एक दिवस सुकेतू नावाचा एक तरुण राजाचे दर्शन घेत म्हणाला–"महाराज, राजकुमारीने रेखाटलेले चित्र पहाण्याची मला संधी दिलीत तर तिच्या चिंतेचे कारण काय त्याचा शोध लावायचा मी प्रयत्न करीन.

त्यावर राजा चिडून त्याला म्हणाला– "चित्रकारांच्या गुरूने सुद्धा सांगितले की, त्या चित्रात कोणताही दोष नाही. तेव्हां तुला काय त्यात दोष आहे अशी खात्री वाटते आहे कां?"

सुकेतू म्हणाला–"महाराज, क्षमा करा आपल्या सांगण्यावरून हे तर स्पष्ट होते की, ह्या पूर्वी अनेक लोकांनी संशोधन करून आंपली काळजीच वाढविली. त्यामुळे माझ्या योग्यतेचा इथे काही संबंध येत नाही. संबंध येतो तो व्यवहार कुशलतेचा तसे म्हटले तर, मी सुद्धा अनेक राजदरबारात नाटचशिक्षक, चित्र, व संगीत, कला इ. अनेक विद्याचे प्रशिक्षकाचे काम केले आहे!"

"महाराज, ह्यांला सुद्धा एकवेळ संधी देऊन पाहू या?" मंत्री म्हणाला.

महाराजांची परवानगी मिळता क्षणीच सुकेतूने राजकुमारीने काढलेल्या चित्राचे परिक्षण केले व राजकुमारीला म्हटले– "राजकुमारी, ह्या जन्मी आपण असेच आणखीन एक चित्र काढू शकणार नाहीत हिच एक काळजी आपल्याला लागून राहिलेली आहे. परंतु जी गोष्ट असंभव आहे. त्याच्या बाबतीत काळजी करून फायदा काय?"

      

कुसुमलताने सुकेतूकडे पाहिले तेवढ्यात राजा अति रागाने सुकेतूला म्हणाला—"मी तुला सांगितले होते राजकुमारीच्या काळजीचे कारण शोध तुला तिच्या कलेचे मुल्यांकन करण्याचे कारणच काय?"

"महाराज, राजकुमारीच्या चिंतेचे खरे कारण आता हेच आहे. जेव्हां कोणीही मनुष्य असे समजतो की आपण ज्याची आशा करतो ते मिळवणे शक्य नाही. तेव्हां तो काळजीची शिकार बनतो. राजकुमारीच्या मनात पण तसेच झाले आहे. राजकुमारीला अनेक ललितकलांमध्ये अतिशय अभिरुची आहे. माझा तेव्हां विचार तर असा आहे तिने तिचे मन संगीत व नृत्य कलेचा अभ्यास करून घालवावा म्हणजे ती काळजी करण्याचे विसरून जाईल" सुकेतूने सांगितले.

सुकेतूचा सल्ला ऐकून राजाने राजकुमारीकडे पाहिले. तेव्हां ती हसत हसत म्हणाली—"पिताजी, ह्यांचे बोलणे खरे आहे. घोडेस्वारांचे हे चित्र काढण्याकरीता मी माझी सर्व कलापूर्ण उपयोगात आणली. त्यामुळे ह्यासारखेच पूर्ण चित्र मी पुन्हां रेखाटू शकणार नाही. हेच माझे चिंतेचे कारण होते. ह्यांनी तर मला उपदेश केला की, जिवनात आणखीन कोणत्या गोष्टी साध्य करून घेता येतात आणि की, भविष्य कालात माझे काय कर्तव्य आहे. माझे एकच कर्तव्य आहे की, मी नृत्य व संगीतचा आता अभ्यास करणार ह्या कलांची साधना करण्याकरीता हेच माझे गुरु होऊ शकतात." असे म्हणत राजकुमारीने सुकेतूला नमस्कार केला.

राजाने प्रसन्न होऊन सुकेतूला म्हटले—आचार्य तुम्हीच माझ्या मुलीचे गुरु आहात! मी म्हटल्याप्रमाणे आपल्याला एक गांव बक्षिस देतो.

सुकेतू हसत म्हणाला—"महाराज, मी कलेचा एक भोक्त आहे. मला राज्य नको परंतु आपल्या दरबारातच राहून मी आपल्या कन्येला नृत्य व संगित कलेचे ज्ञान देऊ शकतो."





# देव-धर्म

**फार** पूर्वीच्या काळची गोष्ट आहे. काशी राजाला दोन मुलगे होते एकाचे नाव महिसास आणि दुसऱ्याचे नांव चंद्रकुमार बोधिसत्वानीच महिसासच्या रूपाने जन्म घेतला. चंद्रकुमार जेव्हां छोटा होता तेव्हां त्यांच्या पट्टराणीचा देहान्त झाला. ह्यानंतर राजाने पुन्हां एका तरुणी बरोबर लग्न केले व तिला पट्टराणी केले. ही नविन राणी सुद्धा राजाची अत्यंत लाडकी होती, काही काळाने तिनेही एका मुलाला जन्म दिला. त्याचे नांव सूर्यकुमार ठेवले. राजा आपल्या मुलाला पाहून अत्यंत आनंदित झाला व त्याने पट्टराणीला विचारले—"तुला आपल्या मुला करीता काही वर हवा असला तर मांग!

"आता ह्या क्षणी नाही. जेव्हां माझ्या मनात इच्छा होईल तेव्हां मी मागेन." पट्टराणीने उत्तर दिले.

काही वर्षांने सूर्यकुमार वयात आला. तेव्हां राणीने राजाला आठवण करून दिली—"तुम्ही माझ्या मुलाच्या जन्माच्या वेळी मला वर देणार होतात. तेव्हां आता तुम्ही तुमच्या वचनाला जागुन मला वर द्या. व माझ्या मुलाच्या राज्याचाभिषेक करून त्याला गादीवर बसावा.

"अत्यंत शुर दैदिप्यमान असे दोन मोठे मुलगे असताना तुझ्या मुलाचा राज्याभिषेक करणे असंभव आहे. राजा म्हणाला.

परंतु राजाच्या मनांत एक शंका आली की, राणी आपल्या मोठ्या मुलांचा द्वेष करीत आहे. तेव्हां त्याने आपल्या दोन्ही मोठ्या मुलांना बोलावून घेतले व महिसास व चंद्रकुमारला समजावून सांगत म्हटले—"मुलांनो, मी तुमच्या सावत्र आईला सूर्यकुमार जन्मल्याबरोबर एक वर मागण्यास सांगितला होता. तीला राज्य



हवे आहे. मी कुठल्याही परिस्थितीत तिला राज्य देऊ इच्छित नाही. पण म्हणतात नां! स्त्री बुद्धी दुष्ट असते. ती तुमची हानी करू शकते. त्यामुळे तुम्ही दोघे ह्याक्षणी जंगलात निघून जा व मी मेल्यानंतर राज्यकारभार करा.

ही गोष्ट सूर्यकुमारला माहीत नव्हती. त्याने पाहीले की, आपले दोघ मोठे भाऊ कुठेतरी जाण्याची तयारी करीत आहेत. त्याच्या बरोबर जाण्याची इच्छा ह्याच्या-सुद्धा मनात आली. मग काय, तो सुद्धा त्याच्या बरोबर निघाला.

ते तिघे भाऊ हिमालयात पोहोचले. महिसास थोड्या दूर गेल्यावर तेथील एका मोठ्या वटवृक्षाच्या सावलीत बसला व सूर्यकुमाराला म्हणाला–"हे पहा, रे तू समोरच्या तळ्यात जाऊन स्नान कर. पाणी पिऊन आपली तहान भागाव व येतानां माझ्या करीता एका कमळाच्या पानात पाणी भरून घेऊन ये."

ते तळे एका जलराक्षसाचे होते. कुबेराने ते तळे त्या राक्षसाला देत सांगितले होते. "ह्या तळ्यात उतरणाऱ्यांना जर देव-धर्मा बद्दल माहीती असली तर, त्यांना तू सोडून दे. परंतु त्यांना त्याची माहीती नसेल त्या लोकांना तू खाऊन टाक. पण लक्षात ठेव. जे लोक तळ्यात उतरत नाहीत त्यांना मात्र कोणताही त्रास देऊ नकोस."

त्या दिवसा पासून जो कोणी मनुष्य त्या तळ्यात उत्तरे त्याला तो प्रश्न विचारी–"देव-धर्म म्हणजे काय? जो कोणी त्याचे उत्तर देत नसे त्याला तो स्वताचे भक्ष बनवित असे. तेव्हां जेव्हां सूर्यकुमार त्या तळ्यात उतरला तेव्हां यक्षाने त्याला प्रश्न केला–"काय तुला देव-धर्माबद्दल काही माहीती आहे?"

"हो, हो, माहीत आहे. देव-धर्म यांचा अर्थ सूर्यचंद्र आहे." सूर्यकुमारने उत्तर दिले.

तुला देव-धर्मा विषयी काही माहीत नाही! असे म्हणत यक्षाने सूर्यकुमारला आपल्या घराच्या आत नेले.





सूर्यकुमार बराच वेळ झाला तरी आला नाही हे पाहून महिसासने चंद्रकुमारला तळ्याच्या कांठी पाहून येण्यास पाठविले. यक्षाने त्यालाही तोच प्रश्न केला. चंद्र-कुमारने उत्तर दिले–"देव-धर्म ह्याचा अर्थ चार दिशां. तुला सुद्धा बरोबर माहीत नाही" असे म्हणून त्याने त्यालाही पकडून घराच्या आत नेऊन ठेवले.

चंद्रकुमार सुद्धा बराच वेळ झाला तरीही आला नाही पाहून महिसासना शंका आली की, आपले दोघे भाऊ कोणत्या-तरी संकटात सांपडले असावेत. म्हणून ते स्वत: तळ्याकडे निघाले. जवळ गेले तेव्हां दोघे तळ्यात उतरल्याचे चिन्ह त्यानां दिसले. परंतु बाहेर आल्याची काहीही खूण दिसली नाही. त्यामुळे महिसासने विचार केला. की, बहुदा या तळ्यामध्ये कोणी राक्षस रहात असावा!

बोधिसत्व पाण्यात उतरले नाहीत. तेव्हां तो जलराक्षस यक्ष एका जंगली माणासाचे रूप घेऊन त्यांच्या समोर येऊन उभा राहिला व त्याला म्हणाला–"काय रे, तू पाण्यात उतरला नाहीस. स्नान केले नाहीस.

बोधिसत्वांना शंका आली की, हा माणूसच बहुदा जलराक्षस असावा असे. वाटून त्यांनी त्याला विचारले–"काय हो, तुम्ही माझ्या दोन छोट्या भावांना पकडून घेऊन गेलात नां?"

"होय, हो मीच त्याना पकडून घेऊन गेलो!" यक्ष म्हणाला.

"असे का केलेत." बोधिसत्वानीं त्याला विचारले.

"ह्या तळात जो कोण उतरेल तो माझ्या आधीन होतो" यक्ष म्हणाला.

"तळ्यात जो कोणी उतरेल त्याला तुमच्याच आधीन व्हावे लागते कां?" बोधिसत्वानी परत विचारले.

"ज्या लोकांना देव-धर्म म्हणजे काय हे माहीत नसते. त्यांना माझ्या अधीनच व्हावे लागते" यक्षाने उत्तर दिले.

"तुला पाहिजे तर मी तुला सांगू शकतो देव-धर्म म्हणजे काय ते!"

"प्रेम, निंदेचे भय असणारा. शुभ काम करणारा आणि शांत चित्त असलेल्या उत्तम पुरुषाचा धर्मच देव-धर्म आहे!" बोधिसत्वानी सांगितले.

बोधिसत्वांचे उत्तर ऐकून यक्ष संतुष्ट झाला. त्याचा सत्कार करीत त्याने विचारले "तुझ्यावर माझा अनुग्रह झाला आहे. तेव्हां तुझ्या दोन्हीं लहान भावांपैकी एकाला मी तुला परत करतो सांग कोणाला आणू?"

"माझ्या छोटया भावाला आणा" बोधिसत्व म्हणाले. त्यावर यक्ष म्हणाला– "हे पंडित तुम्ही देव-धर्म तर जाणता परंतु त्याचा अंमल करणे जाणत नाहीत!"

"ते कसे?" बोधिसत्वाने विचारले.

"तुम्ही आपल्या छोटया भावांमध्ये मोठयाला सोडून लहानाची मागणी केली. तेव्हां मोठयाचा आदर विसरलात."

"यक्षा, मी देव-धर्माचे पालनच करतो. मला माझ्या छोटया भावा मुळेचे जगंलात येणे भाग पडले त्याच्या आईने माझ्या वडिलांकडे राज्य मागितले. आमची हित कामना करणाऱ्या वडिलांनी आम्हांला जंगलात पाठविले. अशा परिस्थितीत मी छोटया भावाशिवाय राज्यात परत जाऊन काय सांगू की, राक्षसाने त्याला गिळून टाकले म्हणून? कोणी विश्वास तरी ठेवेल कां?" बोधिसत्व म्हणाले.

"शाबास! तूला फक्त देवधर्मच नाही तर व्यावहारिक ज्ञानाचा अनुभव सुद्धा आहे. असे म्हणत यक्षाने बोधिसत्वांची प्रशंसा केली. " व चंद्रकुमार सुर्यकुमारला आणून बोधिसत्वाच्या ताब्यात दिले.

काही वर्षांने त्यांना बातमी लागली. वृद्ध राजाचा मृत्यु झाला. तेव्हां बोधिसत्व आपल्या दोन्ही भावांना बरोबर घेऊन आपल्या राज्यात परत आले व राज्याभिषेक करून आपल्या दोन्ही भावांना चंद्रकुमार व सुर्यकुमारला सेनापतीच्या पदावर नेमले व शांतीपूर्वक राज्य कारभार करू लागले.



जी माणसे आगी पासून वाचली. ती दूरदूरच्या प्रदेशांत पळून गेली. पहाता पहाता दण्डक राज्यात राखेचे ढिग दिसू लागले. अशा प्रकारे तो भाग निर्जन होऊन गेला. एखादा पक्षी सोडला तरी त्याच्या बाजूला कोणी जाऊ शकले नाही.






काही दिवसानंतर तेथे मुसळधार पाउस पडला. व ते तळे झऱ्याच्या रुपाने वाहू लागले व त्यानी नदीचे रूप घेतले. नंतर ती नदी अनेक देशांतून वाहू लागली. पक्ष्यांनी जी फळे खाऊन बर्षी खाली टाकली त्याला पुन्हां अंकुर फुटू लागले. त्या झांडानी अनेक पक्षांना आपल्याकडे आकृष्ट केले.

कालान्तराने नदीच्या दोन्ही बाजूने दाट जंगल पसरले गेले. म्हणून तो भाग दण्डकारण्य नावाने प्रसिद्ध झाला. त्यानंतर ऋषिमुनींनी त्या नदीचे नांव तमसा असे ठेवले.





मोठ्या कष्टाने तिने त्याच्यापासून सुटका मिळविली व ती आश्रमाच्या बाजूला धावत सुटली. व आश्रमात येऊन राजाची वर्तणूक सांगून रडू लागली. मुनींना त्या राजाच्या वागणुकीचा भयंकर राग आला.

मुनीने शाप देत म्हटले–"हे राज्य पापाने भरलेले आहे. असहाय्य लोकांची मदत करण्यापेक्षा राजा स्वतः त्यांना त्रास देतो आहे. त्यामुळे राज्यातील धर्मात्मा व साधू लोकांना सोडून इतर सर्वांचा नाश होवो.





मुनींच्या शापाने अचानक अग्निज्वाला सर्व राज्यात पसरू लागल्या. मुनी वन सोडून निघून गेले. परंतु अरजा अग्निज्वाला शांत होई पर्यंत तेथेच तळ्यात बसून राहिली. सर्व तळीपाळी नदी नाले सुकून गेले. परंतु अरजा ज्या तळ्यात बसली होती ते तळे

जी माणसे आगी पासून वाचली. ती दूरदूरच्या प्रदेशांत पळून गेली. पहाता पहाता दण्डक राज्यात राखेचे ढिग दिसू लागले. अशा प्रकारे तो भाग निर्जन होऊन गेला. एखादा पक्षी सोडला तरी त्याच्या बाजूला कोणी जाऊ शकणे नाही.





काही दिवसानंतर तेथे मुसळधार पाऊस पडला. व ते तळे झऱ्याच्या रुपाने वाहू लागले व त्यानी नदीचे रूप घेतले. नंतर ती नदी अनेक देशांतून वाहू लागली. पक्ष्यांनी जी फळे खाऊन बी खाली टाकली त्याला पुन्हा अंकुर फुटू लागले. त्या झाडांनी अनेक पक्षांना आपल्याकडे आकृष्ट केले.

कालान्तराने नदीच्या दोन्ही बाजूने दाट जंगल पसरले गेले. म्हणून तो भाग दण्डकारण्य नावाने प्रसिद्ध झाला. त्यानंतर ऋषिमुनींनी त्या नदीचे नांव तमसा असे ठेवले.





ह्यानंतर भारतात दण्डकारण्य अतिशय प्रसिद्ध झाला. सीता, राम आणि लक्ष्मण ह्यांनी आपला वनवास ह्याच अरण्यात घालवला. काही कालाने हाच दण्डकारण्य एका बाजूने राक्षस पिशाच्य ह्यांनी व दुसऱ्या बाजूने साधू संत ऋषिमुनी ह्यांचे निवास स्थान बनला.

काही वर्षांनी कवि वाल्मीकीने आपला आश्रम ह्याच नदीच्या काठांवर बांधला. ह्याच नदीच्या किनारी वाल्मीकीने आपले काव्य रामायण ह्याची रचना केली.





तमसा नदीच्या कांठीच सीताने आपली मुले लव व कुश ह्यांना लहानाचे मोठे केले. महर्षि वाल्मिकींनी त्यांना रामायण 'काव्याचे गाणे गायला शिकविले. आज सुद्धा तमसा नदी दण्डकारण्यातूनच वहात जाते.

# मौल्यवान भेट

मणिमेखला राज्याचा राजा गोकर्ण हा दरवर्षी आपला जन्मदिवस मोठ्या थाटाने साजरा करे. त्या दिवशी राजाला अनेक भेटवस्तु जनतेकडून मिळत. परंतु जो राजाला अत्यंत मौल्यवान वस्तु भेट म्हणून देत असे त्याला भोजनाच्या वेळी राजा आपल्या शेजारी बसवून घेई. आदराची गोष्ट आहे असे समजून श्रीमंत लोक आपापल्यात भेट देण्याची चढाओढ लावीत.

परंतु एका संन्याशाला हे राजाचे वागणे आवडले नाही. त्याने राजाकडे एक शिळया भाकरीचा तुकडा व एक पत्र पाठवून दिले त्यात असे लिहिले होते–"महाराज, मी आपल्याला मौल्यवान भेट देण्याच्या स्थितीत नाही. तरी सुद्धा माझ्या मनांत आपल्या बद्दल अपार श्रद्धा व भक्ति आहे. तिला मी प्रेमाने आपल्याकडे पाठवित आहे. केवळ ती कोरडी भाकरी आहे म्हणून तिचा अस्विकार करु नका. हे माझे एकवेळचे जेवण आहे.

पत्र वाचून राजाला आपली चूक समजली. त्याला समजून आले की मनांपासून प्रेमाने दिलेली कोणतीही वस्तु मौल्यवानच समजली जाते. त्या दिवसापासून राजाने आपल्या प्रत्येक जन्मदिवशी त्या संन्याशाला आपल्या शेजारी बसविण्यास सुरवात केली.





# सोंगाड्या

सिंहपुरी राज्यात मल्लवर्मा नावांचा सोंगाडी रहात होता. तो नाना तऱ्हेचे वेष धारण करून अनेक नकला व हाव-भाव करून पंडीत विद्वानांची प्रशंसा करे.

एकदा दसऱ्याच्या सुमारास गांवात तरुण मंडळीच्यात कुस्तीच्या चढाओढी लागल्या. त्याच वेळेस मल्लवर्मा त्या देशाच्या सेनापतीच्या वेषात तेथे जाऊन पोहोचला.

गावांतील प्रतिष्ठित लोकांना तो खरो-खराच सेनापती आला आहे असे वाटले. त्यामुळे त्यांनी त्याला आदराने नेऊन तेथील एका उंच आसनावर बसविले.

त्या चढाओढी समाप्त झाल्या. तेव्हां त्या प्रतिष्ठीत लोकांनी सेनापतीच्या हाती त्यातील विजय प्राप्त करणाऱ्याला बक्षिस देववले. त्याने मोठ्या सेनापतीचा हाव भाव करून बक्षिस दिले. व तेथे उपस्थित असलेल्या जनतेला संबोधून म्हटले—

"आपण सर्व, प्रतिष्ठीत व छोटे मोठ्या सर्व लोकांनी मला कृपया क्षमा करावी. ही आपल्या दृष्टीनी अत्यंत दुर्भाग्याची गोष्ट आहे की, आता आपल्या देशातील सेनापती इथे उपस्थित नाही. आणि खरोखच जर सेनापतीने आपल्या बळाचे प्रदर्शन पाहिले असते तर नक्कीच त्यानी तुम्हांला सैन्यांत चांगल्या पदावर नेमले असते.

ते ऐकताच सर्व लोक आश्चर्यचकित होऊन त्याच्याकडे पाहू लागले. त्याच वेळेस उदयभट्ट नावाचा गावातील प्रसिद्ध पंडित मल्लवर्माच्या जवळ जात म्हणाला— "तुझे हे सोंग खरोखरी प्रशंसनिय आहे सांग तुझे नांव काय ?"

मल्लवर्मने आपला परिचय देत निवेदन केले—"हे महाशयो, माझ्या कडून काही चुकले-माकले असेल तर कृपा करून मला क्षमा करा. ह्या उत्सवाच्या दिवशी आपल्या

दिपा साठे

सर्वांचे मनोरंजन करावे. ह्या हेतूने मी हा वेष धारण करून आलो होतो." असे. म्हणत त्याने सर्व ग्रामवासीया समोर हात जोडत नमस्कार केला.

परंतु नमस्कार करण्यापूर्वी त्याने आपला वेष काढून टाकला.

त्यावर उदयभट्टाने त्याची मोठी प्रशंसा केली आणि म्हटले—"हि गोष्ट ठिक आहे! असा चांगुलपणा व्यवहार ज्ञान असून सुद्धां तू आपल्या देशाचा राजा वीरसेनच्या दरबारात कां नाही गेलास ?"

"वाह ! तुम्ही कशी गोष्ट काढलीत मी हा सोंगाड्याचा खेळ आपल्या राजासमोर करू ? ही तर थट्टा होईल." मल्लवर्माने आश्चर्य प्रगट केले.

"हो, आपला राजा तर मोठा कलेचा प्रेमी आहे. ते उत्तम कलाकारांचा अपूर्व सन्मान करतात. तू माझे म्हणणे ऐकून एकदा राजाचे दर्शन घे." उदयभट्टने मल्लवर्माला सांगितले'

अशा महान पंडिताकडून प्रोत्साहन मिळाल्यामुळे मल्लवर्मा अतिशय आनंदित झाला. तो मोठ्या साहसाने राजधानीत गेला. व महाराजाचे दर्शन घेऊन त्यांना निवेदन करीत म्हणाला मी दोन वेष धारण करून आपल्याला दाखवायचे म्हणतो म्हणून आपण कृपा करून मला परवानगी द्या. राजाने त्याची गोष्ट मान्य केली.

पहिल्या दिवशी मल्लवर्माने दरबारात प्रवेश करून संन्याशाच्या वेषाने तत्वो-पदेश केला. आपल्या भाषणात त्याने



अनेक ठिकाणी संस्कृतच्या श्लोकांची उदाहरणे दिली. ह्यावर राजाबरोबर दरबारातील इतरांनी सुद्धा त्याला मोठ्या हर्षाने हसून दाद दिली.

राजाने त्याला शंभर सोन्याची नाणी बक्षिस देऊ केली तेव्हां मल्लवर्माने ती नाकारून गंभीर चेहरा करीत म्हटले– "महाराज, जीवनाच्या बाबतीत विरह झालेल्या माझ्या सारख्या संन्याशाला ह्या सुवर्णाच्या नाण्यांचा काय उपयोग?" असे म्हणून तो दरबारातून निघून गेला.

दुसऱ्या दिवशी मल्लवर्मा एका नर्तकीचा वेष धारण करून राजदरबारात आला. आपल्या अद्‌भूत नृत्यकलेचे प्रदर्शन करून त्याने दरबारातील सर्वांना मंत्रमुग्ध करून टाकले. सर्वांनी नृत्य संपल्यावर बराच वेळ टाळ्याचा कडकडाट केला. तेव्हां राजाने आज सुद्धा शंभर सोन्याची नाणी भेट देण्याकरीता पुढे येऊ लागला.

परंतु मल्लवर्मा विनयतेने राजाला प्रणाम करीत म्हणाला–"महाराज, मी असे ऐकले आहे की, आपण एक अत्यंत कलाप्रेमी आहात! त्यामुळे मी आपली सेवा करण्याच्या आशेने आलो होतो. परंतु ही शंभर सोन्याची नाणी आपल्या कलाप्रेमीच्या तुलनेनी अत्यंत तुच्छ आहेत. माझ्या विद्येच्या मानाने मला पुरस्कार द्यावा. मल्लवर्माचे बोलणे ऐकून राजा चकित होऊन म्हणाला– "काल मी तुला शंभर सोन्यांची नाणी देऊ लागलो. तेव्हां तू स्पष्ट नकार दिलास. हे वागणे मला गमतीचे वातेते आहे.

"महाराज, काल माझा वेष एका संन्याशाचा होता. त्यामुळे मी वैराग्य भावनेच्या प्रभावाचे प्रदर्शन आपल्याला घडवले. आज माझा वेष एका नर्तकीचा आहे. त्यामुळे ह्या वेळात माझ्या मनांमध्ये सहजच संसाराप्रती व धनाप्रती अतृप्त इच्छा रहाते त्यामुळे वेषाच्या अनुरूप वागणेही आवश्यक आहे नां?"

राजा मल्लवर्माचा तर्क ऐकून अत्यंत आनंदित झाला. त्याने त्याला पांचशे सुवर्ण मुद्रा भेट देऊन त्याची पाठवणी केली.





# दगडी मुर्ती

वसुगुप्त नावाच्या कोटयाधीश व्यापाऱ्याच्या दोन बायका होत्या. पहिल्या बायकोच्या मुलीचे नांव वासंती होते. व दुसऱ्या बायकोच्या मुलीचे नांव पद्मावती होते. दोघीही जवळजवळ एकाच वयाच्या होत्या पण त्यांचे स्वभाव अगदी उलट होते. वासंती कठोर दुष्ट होती. तिला दुसऱ्यांनी सुखीसंपन्न राहीलेले आवडत नसे. त्यामुळे ती आपल्या नोकरा चाकरांना त्रास देऊन गंमत लुटत असे.

परंतु पद्मावतीला दुसरे लोक सुखी असलेले पाहून आनंद होत असे. ती आपल्या नोकराचाकरांशी सहानुभूतिने वागे. त्यामुळे पद्मावती बरोबर सर्वजण चांगले प्रेमाने वागत. परंतु त्यांच्यांत एक खास गोष्ट होती की, त्या दोघी दिसा-वयास एकसारख्या दिसत त्यामुळे बऱ्याच-वेळा लोकांना भ्रम पडे व त्याचा स्वभाव पारखूनच त्यांना ओळखत. त्या दोघींच्या वयात काही दिवसांचेच अंतर होते. वासंती थोडया दिवसाने मोठी होती ती स्वत:ला खूप शहाणी समजे. तिला वाटे लोकांशी असेच वागले म्हणजेच आपल्या बद्दल लोकांच्यात सहानुभूति आदर निर्माण होईल. परंतु तिला एक शंका होती की असे वागले तरी आपल्याला ह्यात यश कां येत नाही! तेव्हां ह्याचे एकच कारण असू शकेल ते म्हणजे पद्मावती!" तिला वाईट ठरविण्याकरीता पद्मावती चांगली कामे करते व दुसऱ्यांच्या बरोबर नमून वागते त्यामुळे वासंती काही ना काही कारणे काढून पद्मावतीशी भांडण काढी.

परंतु पद्मावती तिला म्हणे–"ताई, तू रोजच्या रोज काहीबाही कारणे काढून माझ्याशी कां भांडण उकरून काढतेस?



आपण जर ऐकमेकींशी प्रेमाने राहीलो तरच लोक आपला आदर ठेवतिल."

"तू सगळयांच्या आदराच्या गोष्टी सोड प्रथम माझा आदर करायला शिक. माझ्या सारखी तू पण दुसऱ्याशी वाग." वांसती चिडून म्हणे.

वासंती सारखे वागणे पद्मावतीला जन्मतः शक्य नव्हते आणि पद्मावती सारखा स्वभाव बदलणे वांसतीला कदापी शक्य नव्हते. त्यामुळे दिवसेंदिवस वासंतीच्या मनांत पद्मावती विषयी द्वेषभावना वाढू लागली.

त्या सुमारास एक चंद्रकात नावाच-शिल्पकार त्यांच्या घरी आला. वज्रगुप्ताला आपल्या घराच्या अंगणात एक कलामंदिर बांधून त्यात सुंदर सुंदर दगडी मुर्ती स्थापन करण्याचा विचार होता.

चंद्रकांत तरुण होता. तरी त्या वयात त्याने ती कला आत्मसात करुन काही सर्वश्रेष्ठ कलाकारांच्या श्रेणीतच मान मिळवला होता. तो आपले कोणतेही काम निष्ठापूर्वक करीत असे. म्हणून कला-मंदिराचे काम सुद्धा त्याच्यावरच सोपवले गेले. त्यामुळे रोजच्या रोज वासंती व पद्मावती त्याची कारागिरी पहाण्याकरीता तेथे जाऊ लागल्या. त्याला शिल्पकले-विषयीची माहीती विचारु लागल्या. त्याला विचारण्याच्या पद्धती सुद्धा दोघीच्यां वेगळया होत्या. पद्मावती चंद्रकातला विनम्रतापूर्वक प्रश्न विचारी तर वांसती मालकीणीच्या आवेशाने विचारे परंतु चंद्रकांत त्या प्रकाराकडे दुर्लक्ष करे.

चंद्रकांतचे तसे वागणे पाहून वासंतीला थोडे अजबच वाटू लागले कारण पद्मावतीच्या बरोबर जे लोक स्नेह व आदराने बोलत तेच लोक वासंती बरोबर बोलायला घाबरत भीत असत त्यामुळे वासंती कधी कधी हे जाणण्याकरीता चंद्रकांतकडे एकटीच येत असे.

एकदा चंद्रकांतने वांसतीला चकित करावे अशा अर्थानें म्हटले–"तुम्हां दोघी बहिणीमध्ये मला तूच जास्त आवडतेस."





ती म्हणाली–"तुम्ही खोटे बोलता?"

"मला खोटे बोलण्याची काय गरज" चंद्रकांत झटवयात म्हणाला. वासंती म्हणाली–"तू आमच्या इथे रोजगारी मिळविण्याकरीता आलेला माणूस आहेस. आम्ही तुझे मालक आहोत! तू एक नोकर आहेस तुझ्या बरोबर माझे बोलणे चालणे त्याच प्रकारचे आहे. परंतु पद्मावती बरोबरचे तुझे बोलणे चालणे पाहून असे वाटते की, तू मालक आहेस व ती तुझी नोकर आहे. नोकरवर्गाला काही दृष्टीने असे वागणे सुद्धा चांगलेच दिसते.

चंद्रकांत काकुळतीने म्हणाला–"ही गोष्ट खरी नाही! तू सुंदर आहेस! तुझ्या अंहकारी स्वभावाने तर तू जास्तच सुंदर दिसतेस म्हणून तुझ्या सौंदर्याचा मी गुलाम झालो आहे. तेव्हां तू जे काय म्हणशिल ते मला चांगलेच वाटेल." ती म्हणाली मी माझ्या प्रतिष्ठे प्रमाणेच योग्य माणसा बरोबर प्रेम करेन तुझ्या सारख्या भणंग भिकाऱ्या बरोबर नाही.

"मी ही गोष्ट चांगल्या तऱ्हेने जाणतो परंतु तू माझे प्रेम नाही जाणत" चंद्रकात म्हणाला.

परंतु खरे तर मनांतल्या मनात वासंती हे समजून आनंदीत झाली की इतक्या दिवसांनी आपल्या बहिणीची उपेक्षा करून आपल्यावर प्रेम करणारी एक तर व्यक्ति आहे. ते समजल्यावर ती रोजच्या रोज त्याच्याकडे जाऊ लागली.

श्रीमंताची प्रशंसा जशी गरीब लोक करतात, तसेच श्रीमंत लोक गरीबाची अवहेलना व उपेक्षा करून त्याना अवमानीत करतात हे स्वाभाविकच आहे. असे म्हणून वासंतीने त्याला हिणवत म्हटले–"तू पाहीजे तर माझ्यावर प्रेम करेनास कां, परंतु माझ्या बरोबर लग्न करण्याची स्वप्ने मात्र पाहू नकोस!"

एकदा पद्मावती आपल्या काही नाते-वाईकांना भेटायला रामापुर गावी गेली. तेथे दोन वर्षे पाऊस न पडल्याने पाण्याच्या



दुष्काळाने त्रस्त झालेले लोक दिसले. ती गोष्ट समजताच तिने आपल्या नातेवाईकांना सुचविले तुम्ही लोक गावात काही विहिरी खोदवा त्यामुळे थोडे पाणी तरी हाती लागेल

"आम्ही सर्व प्रयत्न केले परंतु कुठूनही पाण्याचा एक थेंब देखिल लागला नाही." नातेवाईक म्हणाले.

त्याच वेळेस एक अद्भूत घटना घडली. पद्मावतीला अकस्मात जमिनी खाली गाडलेले सोने व पाणी दिसू लागले. तिने सर्व गांव धुंडाळून सर्व गावकऱ्यांना सांगितले की, कुठे कुठे सोने आहे व कुठे खणले तर पाणी लागेल. प्रथम पद्मावतीच्या बोलण्यावर त्यांचा विश्वास बसला नाही परंतु काही त्यांनी खणून पाहिले तेव्हां त्यांना पाणी लागले व गावाची पाण्याची दुर्भिक्षा कमी झाली त्याच बरोबर थोडे सोने पण गावकऱ्यांना मिळाले. त्यामुळे गावकऱ्यांच्या आनंदाला उधाण आले. तेव्हां त्या संर्वांनी गावसभा बोलावली एक निर्णय ठरवला की–"पद्मावती मानवी अवतार नाही तर एक देवी आहे. तेव्हां गावांच्या मध्यभागी जर पद्मावतीची दगडी प्रतिमा आपण स्थापन केली तर आपल्या गावाला पाण्याचे दुर्भिक्ष कधीही येणार नाही.

ह्यानंतर त्या गावच्या पाटलाने वज्रगुप्ताला भेटून त्याचाजवळ लोकांची इच्छा प्रकट केली.

वज्रगुप्त प्रसन्न होत म्हणाला–"वर्तमान काळात दगडी मुर्तींची प्रतिस्थापना होणे म्हणजे विरळच त्याने ते काम चंद्रकांतकडे सोपविले.

ही गोष्ट समजताच वासंतीच्या मनांतमध्ये आपल्या धाकट्या बहिणीबद्दल असूया व द्वेष निर्माण झाला. तीने काही गुंड लोकांना एकत्र करविले. दोन महिन्यानंतर रामापुरला पद्मावतीची दगडी मुर्ती स्थापन झाल्या बरोबर तिने गुंडा करवी गावांत चोऱ्यामाऱ्या, लुटालूट भांडण असे सुरू केले. त्यातील एका गुंडाने बैराग्याचा वेष धारण केला व तो गावात असा प्रचार करीत हिंडू लागला की, ह्या दगडीमुर्तीची स्थापना झाल्यामुळेच हे अरिष्ट गावकऱ्यांवर आले आहे. ते समजताच गावांत गोंधळ उडाला.

ते ऐकून वज्रगुप्तला खूप वाईट वाटले. त्यांनी चंद्रकांतचे गुरू शिल्पाचार्य यांच्याकडे जात सांगितले–"महानुभाव, आपण चंद्रकांतला माझ्याकडे पाठविलेत. त्यामुळे त्याच्या प्रतिभेवर विश्वास ठेऊन मी माझ्या कलामंदीरातील मुर्तीचे काम त्याच्यावर सोपविले परंतु आता मला समजले की, त्याच्या कले मध्ये कोणती तरी कमी आहे त्याच्या शिल्पामुळे अरिष्ट निर्माण होते. कारण माझी मुलगी पद्मावती गुणवान आहे. तिची प्रतिमा तयार करण्याने जर अनर्थ घडला तर तो दोष शिल्पकाराचा ठरवला जातो.

वज्रगुप्तचा विचार ऐकून शिल्पाचार्य आश्चर्यचकित होत म्हणाले–"चंद्रकांत तर माझा सर्वात उत्तम शिष्य आहे, आणि प्रतिभावान सुद्धा त्याचे शिल्पकाम कधीही दोषयुक्त होणारच नाही. असे म्हणून ते पद्मावतीला घेऊन रामापुरला पोहोचले व ती प्रतिमा पहात म्हणाले–"वज्रगुप्त! तुमचे म्हणणे रास्तच आहे. ह्या मुर्तीमध्ये काहीतरी कमी आहे. पद्मावतीच्या रूपात व ठेवणीपेक्षा ह्या मुर्ती मध्ये बरेच काही वेगळे वाटते.



त्याच क्षणी त्यांनी चंद्रकांतला बोलावणे धाडले शिल्पाचार्यांनी चंद्रकांतकडे रोखून पहात दरडावून म्हटले–"मी कल्पनाही केली नव्हती. तू अशा चुका करशिल."

चंद्रकांतने विनयतेने गुरूंना नमस्कार केला व निवेदन करीत म्हटले–"गुरूदेव कमीपणा माझ्या शिल्पविद्येचा नाही. माझा आहे. मी जी ही प्रतिमा कोरली आहे ती पद्मावतीची नाही. परंतु वासंतीची आहे!"

असे तू कां केलेस? आचार्यांने क्रुद्ध होत विचारले.

वासंती आपल्या छोटया बहिणीची प्रतिमा स्थापन झालेली पाहून इर्ष्या व व दु:खाने ग्रासलेली आहे. मी तिच्यावर प्रेम करतो. त्या दोघींच्या देखणेपणात जास्त फरक नाही. हा विचार करून मी तिची प्रतिमा बनविली. थोडासा फरक कोणाच्या लक्षातही येणार नाही. ही गोष्ट मी वासंतीला सुद्धा सांगितलेली नाही. परंतु मी असा कधीही विचारही केला नव्हता की इर्ष्या करणाऱ्या लोकांची मुर्ती स्थापन केली तर पुर्ण गावाला अनर्थदायी होईल. मला क्षमा करा." असे म्हणत चंद्रकांत गुरूंच्या पाया पडला.

वांसतीला जेव्हां समजले तेव्हां तिने ही गोष्ट ताडली की. आपल्या इर्ष्येच्या कारणामुळेच आपण गावातील लोकांचात बदनामी वाईटपणा प्राप्त करून घेतो. ती पद्मावतीच्या जवळ जात म्हणाली–"हे बघ, माझ्या मनांत आता अशी भीती वाटत आहे की, मी जर इर्ष्या व द्वेष सोडून सन्मार्गाने गेले नाही तर माझे वागणे सर्व देशाला अनर्थकारी म्हणून सिद्ध होईल. आजपासून मी तुझी प्रत्येक गोष्ट ऐकेन मला चांगल्या मार्गाने घेऊन चल."

आपल्या मुलीमध्ये झालेला बदल पाहून वज्रगुप्त अत्यंत आनंदीत झाला. त्याने चंद्रकांतला क्षमा केली. त्याच बरोबर असा विचार करून त्याने वासंतीचे लग्न त्याच्याशी लावून दिले की, इतक्या कठोर हृदय असलेल्या वांसतींवर तो प्रेम करीत होता.

चंद्रकांतच्या बरोबर लग्न झाल्यानंतर वांसतीने स्वत: बरोबरीने आपल्या पतीच्या हाताने एक दगडी मुर्तीची स्थापना रामापुर गावी करविली.

गावकऱ्यांना समजले की, वांसतीमध्ये जे उत्तम परिवर्तन झाले आहे त्याचे कारण चंद्रकांतच आहे. तेव्हां पासून लोक म्हणू लागले चंद्रकांत फक्त मनुष्याच्या दगडी प्रतिमानाच रूप देत नाही. तर प्रत्यक्ष प्रतिमानांच मनुष्य रूपाने परिवर्तीत करू शकतो.





# मीठाचा काढा

एका गावात एक गृहस्थ रहात होता. त्याला एक मुलगा व एक मुलगी होती. काही वर्षानंतर त्याच्या मुलाचे लग्न झाले व त्याच्या घरात सुन आली आता त्यांच्या कुटूंबात तिन बायका वावरू लागल्या.

तीन बायका एकत्र राहू लागल्या की, त्याच्यांत वाद-विवाद भांडणे हे सुरु होणारच प्रथम त्या घरात दोन बायका होत्या मायलेकी. पण सुन दुसऱ्या घरची तीची रहाणी पण वेगळी. तिचे काम धाम पण वेगळ्या तऱ्हेचे त्यामुळे त्या मायलेकी सुनेला आपल्या घरातील वळण लावण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असत. सुनेला एकदा सांगून समजणार नाही ह्या हेतूने एक गोष्ट दोन दोनदा सांगत असत.

एक दिवस त्या गृहस्थाचा मेहुणा आला बायकोने इतकी सावधगिरी राखली की, काही गडबड तर होणार नाही नां व सुनेंचे वागणे सर्व समजले तर आपला भाऊ काय म्हणेल. ती कमरेवर कळशी घेऊन पाणी भरण्याकरीता विहीरीवर जाता जातासुनेला म्हणाली– "अग, ऐकलेस कां चुलीवर डाळ शिजते आहे. थोडया वेळानेमुठभर मीठ घाल, विसरू नकोस."

दोन दिवसापूर्वी सुनबाई डाळीत मीठ घालण्यास विसरून गेल्या होत्या. त्यामुळे ती गोष्ट आठवणीत रहावी म्हणून सासूने पुन्हा पुन्हां तिला सांगितले होते.

त्याच वेळेस सुन दुसऱ्या काही कामात मग्न होती. ते संपताच तीने डाळीत मीठ घातले व ती दुसरे आणखी एक काम करू लागली.

थोड्या वेळाने त्यांची मुलगी गोवऱ्या थापून हात पाय धुवून घरात आली व चुलीवर डाळ शिजत असलेली पाहिली व तिने विचार केला की, आपली वहिनी डाळीत मीठ घालायचे विसरून गेली असणार. त्यातून आज मामा पण आला आहे. असा विचार करून तीने एक मुठभर मीठ घेतले व डाळीत घातले व ती गुरांना चारा घालण्या करीता निघून गेली.

तेवढ्यात सासू बाहेरून पाण्याची कळशी विहीरीवरून भरून घेऊन आली व चुलीवर डाळ अजून शिजत असलेली पाहून विचार करू लागली–"ह्या विसराळूला सांगून काही उपयोग नाही. त्यापेक्षां स्वतःनेंच काम केलेले बरे, असे म्हणत तिने मीठ घेतले व ते डाळीत घातले.

दुपारी तो गृहस्थ व त्याचा मेहुणा जेवावयास बसले त्यांनी एक घांस तोंडांत घातला व म्हणाला हे काय? डाळीत आज मीठ घालावयास विसरलात काय?

त्या गृहस्थाच्या बायकोला आश्चर्याचा धक्काच बसला ती म्हणाली–"दादा हे काय म्हणतो आहेस! मी माझ्या हाताने डाळीत मीठ घातले आहे.

"आई ग, मी सुद्धा एक मुठभर मीठ घातले होते ना! मुलगी झटक्यात म्हणाली.

"सासुबाई, तुम्ही सांगितलेत की, मीठ घालायला विसरू नकोस म्हणून मी प्रथमच मीठ घातले होते." सुन म्हणाली.

"छान म्हणजे असे सांगा, की ही मेजवानी म्हणजे मीठाचा काढाच बनली. मेहुण्याने थट्टेने म्हटले.

आपल्या कुटूंबातील ह्या बायकांची असली एकी पाहून त्या गृहस्थाला अत्यंत संताप आला. त्याने रागाने सांगितले–"आजपासून आपापले काम तुम्ही स्वतः करा एकाचे काम दुसऱ्याने करायचे नाही.

त्या दिवसानंतर अशा तऱ्हेची गडबड परत कधीही झाली नाही.





# शिव पुराण

रतीदेवीने केलेली प्रार्थना ऐकून शंकर म्हणाले–"मन्मथ हा ब्रह्मदेवाच्या शापाने भस्मीभूत होऊन गेला. त्याने अशा तऱ्हेने ब्रह्मदेवावर फुलांच्या बाणांचा प्रहार केलात की, त्याच्यामनामध्ये मुली करीता मोह उत्पन्न झाला व त्याच्या परिणाम स्वरूप त्याला शाप मिळाला. परंतु मी तुझे पातिव्रत्य भंग करणार नाही. मन्मथ जगाच्या दृष्टीने मोठा न का होईनां परंतु तुला तो तुझ्या शरिराबरोबर नेहमी दिसेल. मी त्याला ह्या क्षणी पुन्हां जिवंत करतो. अशा तऱ्हेने रतीदेवीने केलेली प्रार्थना शंकराने एकून त्याला जिवदान दिले.

ह्यानंतर शंकर भगवानानी आपली तपश्चर्या सोडून देऊन कैलासाला आपल्या रुद्रगणांना बरोबर घेऊन प्रयाण केले. नंतर अग्नीला बोलावून म्हणाले–"तू आजपासून वृक्ष, पर्वत व समुद्र ह्यामध्ये गुप्तरूपाने वास कर." अशी त्याने अग्नीला आज्ञा करीत म्हटले.

इंद्र व इतर देवदेवता शंकराकडून आज्ञा घेऊन तेथून निघाले. नंतर शंकराचे मन पार्वतीवर आकृष्ट झाले. त्यांनी पार्वतीला पाहून तिच्या बरोबर विवाह करण्याचा निश्चय केला.

पार्वतीने शंकराबरोबरच अरण्ये व मन्मथ भस्म होत असतांना पाहिले होते. त्यामुळे ती घाबरली व आपल्या मैत्रिणी-बरोबर घरी पळून आली. सर्व वृत्तांत समजल्यावर हिमवान व मेनकेला



समजले की त्यांच्या मुलींने पुनर्जन्म प्राप्त केला आहे. त्यामुळे त्यांनी तिची भीती मनोधारणा व सात्वंना करून काढून टाकली.

पार्वतीला शंकराच्या विरहाचे अतोनात दु:ख होऊ लागले. तिच्या मनांमध्ये शंकराशिवाय दुसरा कोणताच विचार येत नव्हता. तिचे मन त्याची आठवण काढून व्याकुळ होत होते. त्याच्या आठवणीचे दु:ख सहन करीत तहान भुक विसरलेल्या पार्वतीला समजावत हिमवान व मेनका तिला म्हणाले–"बाळे, तू अजिबात काळजी करू नको. आम्ही लवकरच तुझा विवाह शंकराबरोबर लावून देतो.

एक दिवस नारदाने प्रवेश करून पार्वतीला धीर दिला की, तुझे लग्न कसेही शंकराबरोबरच होईल. त्याने तिला "शिव पंचाक्षरीचा" मंत्रोपदेश केला. व सांगितले की ह्याचा जप केल्याने तुझी मनोकामना निश्चित पूर्ण होईल. व तू सुखाने दिवस घालवशील नंतर त्याने मेनका व हिमवानाची भेट घेतली व त्यांना सविस्तर सांगून तो निघून गेला.

नारदाच्या सूचने प्रमाणे पार्वती आपल्या सखींना बरोबर घेऊन श्रृंगतीर्थी गेली आणि "नम:शिवाय" च्या पंचाक्षरी मंत्राचा जप करीत तपश्चर्या करू लागली. तिनें तोंडात पाण्याचा एक थेंब देखील घेतला नाही. तिला लोक अपर्णा म्हणू लागले.

एकदा मेनका व हिमवान दोघे आपल्या मुलीला पाहण्यासाठी आली. पार्वतीचा कृश देह पाहून मेनका म्हणाली–"मुली! हे ग काय? काही खात नाहीस की पीत नाहीस. हे घोर तप कशासाठी करते आहेस? शंकर वरील असे वाटते होय तुला? तो वैरागी आहे आणि फार क्रोधीपण आहे. ज्या कामात यश मिळणार नाही. त्या कामात लक्ष घालणे फुकट आहे. चल घरी."

पार्वती संतापाने सर्व ऐकून घेऊन नम्रतेन म्हणाली–"शंकराशी माझा विवाह होईल



हे तुम्हीच ना सांगितले? मी तपश्चर्या करून तपोबलानें त्यानां तुमचा जांवई करून देईन म्हणून तुम्ही माझी काळजी करण्याचे सोडून घरी परत जा."

तिकडे शंकराचे मन चलबिचल होऊ लागले. त्याच वेळी ब्रह्मा विष्णु इंद्रादिक देव शंकराच्या दर्शनास गेले. शंकरानें त्यांना आदरपूर्वक बसायला सांगून येण्याचे कारण विचारले. तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला– "हे महेश्वरा! तू पार्वतीशी विवाह करून जगाचे कल्याण कर. तारकासुराला पूर्वी असा वर मिळाला होता. की, तुझा अंश असेल त्याच्या शिवाय इतर कोणाच्याही हाती त्याला मरण नाही. त्याचा वध झाल्या शिवाय जगाचे कल्याण होणार नाही."

ते ऐकून शंकर म्हणाला–"मी विवाह केला तर तिच्या तपश्चर्येत विघ्न नाही कां येणार? स्त्री जातीची वक्रदृष्टी पडली तर स्वत:चे रक्षण कठीण आहे. पार्वतीच्या बरोबर संसार करण्यापेक्षा तपश्चर्या करणे जास्त सोपे आहे असे मला वाटते.

ते ऐकून ब्रह्मदेव म्हणाला–"चार आश्रमात गृहस्थाश्रम स्विकारून जो राज योगी झाला. त्याच्या हातूनच जगाचे कल्याण होऊ शकते."

शंकरानें ब्रह्मादिक देवांच्या इच्छेला मान देऊन पार्वतीशी विवाह करण्यास



होकार दिला. ब्रह्मादिक देव निघून गेल्यावर शंकराने पार्वतीचा मनोदय समजून घ्यायचे मनाशी ठरविले म्हणून एका वृद्ध योग्याचे रूप घेऊन हातात कुबडी व कमंडलु घेऊन पार्वती तपश्चर्या करीत होती तेथे आला. पार्वतीने शंकराच्या मुखावरचे तेज पाहिले. व ब्रह्मा विष्णु किंवा महेश या तिघांपैकीच कोणी यति वेष घेऊन आल्यासारखे तिला वाटले म्हणून तिने यतिराज रूपात असलेल्या शंकराची पादपुजा केली. आणि विचारले "आपण कोण?"

शंकर म्हणाला–"मी ब्रह्मवंशी आहे जगाच्या कल्याणासाठी हिंडत असतो."



कोणाची मुलगी तू आणि कशासाठी ही तपश्चर्या करीत आहेस ?"

पार्वती म्हणाली—"मी मेनका व हिमवान यांची मुलगी माझे नाव पार्वती. शंकर कैलास पर्वतावर तपश्चर्या करीत असतां मी त्याच्या सेवेसाठी उपस्थित होते. परंतु एकदा मी सेवा करण्यासाठी गेले असता कामदेवाने त्यांच्यावर आपले पंचबाण सोडले. तेव्हां शंकराला तपोभंग करण्याऱ्या कामदेवाचा राग आला व त्यांनी आपला तिसरा डोळा उघडला. त्याबरोबर त्यातून अग्निज्वाला आल्या आणि त्यात कामदेव भस्म झाला. त्यानंतर नारदमुनींनी मला पंचाक्षरी मंत्राचा उपदेश केला. मी त्या मंत्राचा जप करून तपश्चर्या करीत आहे.

शंकराने पत्नीरूपे मला स्विकारावे ही माझी कामना आहे. परंतु इतकी घोर तपश्चर्या करूनही माझ्यावर शंकराची कृपा नाही. म्हणून मी अग्नीत प्रवेश करून देहत्याग करण्याच्या विचारात आहे. पार्वती त्या यती रूपात असलेल्या शंकराला म्हणाली.

ते ऐकून यतिरूपात असलेला शंकर पार्वतीला म्हणाला—"तू फार मोठी चूक करते आहेस. शंकर वैरागी आहे तपश्चर्या करतो आहे. यापेक्षां तू हा विचार मनांतून काढून टाकून घरी परत जा. आणि इतर देवांपैकी योग्य वर निवड."

"आपण केलात तो उपदेश मी ऐकला. आपण आता जाऊ शकता!" पार्वती थोडी रागानेच त्याला म्हणाली.

"होय, मी जाणारच आहे परंतु जाण्यापूर्वी तुला वस्तुस्थिती समजून द्यावी म्हणतो शंकर भिकारी आहे. रेशमी वस्त्रा ऐवजी तो चर्मच परिधान करतो. बैल त्याचे वाहन आहे. भूत प्रेत त्याचे अनुयायी आहेत. शरिराला चंदना ऐवजी तो भस्म माखून ठेवतो. त्याच्याशी विवाह केल्याने तुला काय सुख मिळणार?" शंकर म्हणाला.

ते ऐकून पार्वतीला जास्तच राग आला. ती दरडावून म्हणाली—"तू कोणी सोंगाड्या यतिराज दिसतो आहेस. तू कोणी ज्ञानी योगिराज असशील असा माझा भ्रम होता. शंकराचे ऐश्वर्य तुला काय कळणार? जो शंकराची निंदा करतो. त्याला सात जन्म दारिद्र्य भोगावे लागते." असे सांगून तिने आपल्या सखी व परिचारिकांना त्या सोंगाड्या यतीला हाकलून लावायला सांगितले.

शंकर स्मित करून म्हणाला—"पार्वती! मीच शंकर आहे. तुझी मनोकामना कळावी म्हणून मी हे रूप घेऊन आलो होतो. आता माझ्या बरोबर कैलास पर्वतावर चल." असे सांगून शंकराने पार्वतीचा हात धरला.

पार्वतीने हिसका देऊन आपला हात सोडवून घेतला आणि शंकराकडे पाहिले. तेव्हां शंकर स्वस्त्र रूपात प्रत्यक्ष झाला. शंकराकडे पार्वतीने क्षमा मागितली व म्हणाली—"मी आपल्या बरोबर असे जाणं बरोबर होणार नाही आपण माझ्या आई वडिलांना भेटून त्यांच्या अनुमतीने मला घेऊन जावे हे योग्य होईल."

त्यानंतर तिने शंकराला नमस्कार करून त्याचा निरोप घेतला आणि आपल्या सखी परिचारिकांबरोबर घरी निघून गेली. व त्याच विचारात रममाण झाली.



पार्वतीच्या तोंडी शंकर प्रसन्न झाल्याचे ऐकून आईवडिलांना परमानंद झाला. त्यांनी पार्वतीच्या विवाहासाठी सुमुहूर्त ठरविला व तिच्या विवाहाच्या तयारीस लागले.

शंकर कैलास पर्वतावर परतला. तेथे त्यांनी आपल्या भूतप्रेतादि गणांस कामदेवाने पंचबाणाचा प्रयोग केल्यामुळे त्याला कशी शिक्षा भोगावी लागली हे सांगितले नंतर पार्वतीशी विवाह करण्याचे ठरले असल्याचे सांगून त्यासाठी सप्त ऋषींचा सहयोग प्राप्त करावा असे सांगितले.

ते ऐकून नंदी निघाला आणि सप्तऋषींना घेऊन कैलास पर्वतावर आला.



सप्तर्षी शंकराच्या दर्शनाने आनंदित होऊन म्हणाले–"हे महादेव, आज्ञा करावी.

"मुनिवर्य हो, पार्वतीशी विवाह करून गार्हस्थ धर्माचे पालन करण्याचा विचार आहे. यास्तव आपण पार्वतीचे आईवडिल मेनका व हिमवान यांच्याकडे जाऊन माझ्या वतीने पार्वतीला मागणी घालण्यासाठी जावे. त्यांच्या सल्याने सुमुहूर्त ठरवून विवाह संपन्न करण्याची यथोचित व्यवस्था करावी." शंकर सप्तर्षींना म्हणाला.

सप्त ऋषींनी मोठ्या आनंदाने त्या कामाची जबाबदारी घेतली आणि हिमवानाकडे गेले. मेनका व हिमवान दोघांनी सर्वांचा यथोचित सत्कार करून येण्याचे कारण विचारले. सप्तर्षी म्हणाले– "हे मेनके व हे हिमवाना! तुमचे भाग्य फार थोर आहे. स्वतः परमेश्वरीने तुमच्या पोटी पार्वती रूपे अवतार धारण केला आहे या विवाहाने तुझी कीर्ति त्रैलोक्यात होईल."

ते ऐकून मेनका व हिमवान म्हणाले– "मुनिवर्य हो! आपण केलेली सूचना आम्हांला फार आवडली आमच्या मनांत देखील शंकर पार्वतीचा विवाह व्हावा हीच इच्छा होती परंतु कालच एका भिक्षूने येऊन पार्वतीचा विवाह शंकराशी करून देण्यात हित नाही असे सांगितले. कारण तो स्मशानात रहातो नागसर्प धारण करतो. अशा माणसाशी विवाह केल्यास पार्वती सुखी कशी काय होईल? म्हणून आम्ही शंकराशी पार्वतीचा विवाह करून देण्याचा विचार सोडला आहे."

ते उत्तर ऐकून सप्तर्षी चकित झाले व म्हणाले–"तो कोणी दुष्ट भिक्षु असावा. शिवपार्वतीच्या विवाहात विघ्न घालण्याच्या हेतूने त्याने तसे केले असावे. आपली मुलगी प्रत्यक्ष परमेश्वरीचा अवतार आहे. आम्ही पुन्हां या गोष्टींची आठवण करून देत आहो. शंकराशी विवाह व्हावा या हेतूनेच तिने अवतार धारण केला आहे. म्हणून हा विवाह करून द्यावा."

या संदर्भात वशिष्ठ मुनींनी मेनका व हिमवान यांना अनरण्य नामक राजाची कथा सांगितली.

प्राचीन काळी इंद्रसावर्ती नामक चौदाव्या मनूच्या वंशात अनरण्य नामक एक राजा चक्रवर्ती पद मिळवून राज्य करीत होता. त्याच्याकडे रूचि नावाचा एक तपस्वी पुरोहित म्हणून रहात असे.

त्या राजाला पांच बायका व शंभर मुलगे होते. शेवटी पद्मावती नावाची एक मुलगी झाली. पद्मावती एक लावण्यवती राजकन्या होती. लग्नाला योग्य झाल्यावर अनरण्य राजानें तिच्यासाठी योग्य स्थळ पहाण्यास सुरवात केली.

त्याच सुमारास पद्मावती आपल्या सखी बरोबर नदीवर स्नानास गेली. त्याचवेळी पिप्पलाद नावाचे एक मुनी स्नानास नदीवर आले. पिप्पलाद कोणी सामान्य मनुष्य नव्हता. तो भृगुवंशी दधीचीचा मुलगा होता.

पद्मावतीचे रूप पाहून मुनींने राजकन्येच्या सखींकडून ती कोणकोणाची मुलगी आहे वगैर सविस्तर चवकशी करून घेतली आणि सरळ अनरण्य राजाच्या दरबारात जाऊन पद्मावतीला मागणी घातली.

एका मुनींच्या तोंडी अगदी अनपेक्षितपणे आलेली ती मागणी ऐकून राजा थक्क होऊन मुनींकडे पहात उभा राहला. आपल्या रतितुल्य रूपवती मुलीचा विवाह कामदेवासारख्या एका सुंदर पुरुषाशी करून देण्याचा राजाचा विचार होता. थेरडा मुनीमध्ये येऊन उभा राहला. मुनीला परंतु तो नकार दिला. तर तो शाप देऊन आपला वंशच निर्मुळ करील अशी भीति राजाला वाटत होती. राजासमोर मोठा गंभीरप्रस पडला.

राजाला त्या धर्मसंकटात पडलेला पाहून राजपुरोहित व मंत्र्यानी एक सल्ला राजाला दिला तो असा.....



# सर्वज्ञ

कोण्या एका राजाकडे एक अत्यंत हुषार मंत्री होता. तो जेव्हां म्हातारा झाला तेव्हां त्याने त्याचा राजीनामा देण्याचे ठरविले. परंतु राजाने त्याच्या जागी दुसऱ्या मंत्र्याची नेमणुक करण्याचे काम त्याच्यावरच सोपविले.

त्या मंत्र्याच्या जागेकरीता अनेक उपस्थित झाले. वृद्ध मंत्र्याने त्यांची परिक्षा घेतली. त्या परिक्षेत दोन जण सर्वश्रेष्ट निघाले. परंतु मंत्र्यांच्या जागे करीता एकच जागा खाली होती.

वृद्ध मंत्र्याने त्या दोघांना आपल्या घरी नेले. तेथे एक चमकणारे नक्षीकाम केलेले व सोन्याचा मुलामा दिले एक उंच सिंहासन होते. त्याच्याकडे संकेत करीत म्हणाला–"तुम्हीं समान दर्जाने उत्तीर्ण झालात. हीच तुमची शेवटची परिक्षा आहे. तुमच्या पैकी जो कोणी हे मानतो की आपणच सर्वज्ञ व सर्व जाणणारे आहोत त्याने सरळ जाऊन त्या उंच आसनावर बसायचे. मी तीन मिनिटांचा वेळ देतो.

दुसऱ्या क्षणी त्यातील एकजण त्या उंच आसनावर जाऊन बसला. तेव्हां मंत्र्याने उभ्या असलेल्या युवकाला राजाकडे नेत म्हटले–"महाराज, आपण ह्या तरुणाला मंत्र्याच्या पदावर नियुक्त करावे."





# चोर आणि स्वामी

इस्पहान नगरात कमलुद्दीन नावाचा एक व्यापारी रहात होता. तो एक दिवस संध्याकाळी आपले दुकान बंद करून जी काही मिळकत झाली होती ती पैशांची थैली कनवटीस अडकवून घरी निघाला.

तो राजमार्गाने थोडे दूर जात जात एका गल्लीत वळला तो गल्लीत वळला नाही तोच एका व्यक्तिने त्याच्यावर झडप घातली व त्याच्या कमरेची थैली ओढून घेऊन पसार झाला. कमलुद्दीन जोर-जोरात चोर! चोर! म्हणत ओरडला. त्यामुळे रस्त्याने जाणाऱ्या काही लोकांनी त्या व्यक्तिचा पाठलाग केला व अखेर त्यास पकडले.

कमलुद्दीनचे पैसे तर त्याला परत मिळाले पण त्या लोकांनी त्या चोराला गावच्या कोतवालाकडे ओढत आणले. व सर्व घडलेली गोष्ट सांगितली.

कोतवाल एक नंबरचा रागीट होता. चोराने कोतवालाचे पाय पकडत माफी मागितली. परंतु कोतवालाने त्याला असे रागाने पहात जोरात लाथ मारली—"मूर्खा मी कोतवालाच्या जागेवर असतांना ही तुझी हिंमत! लाथेचा मार लागून तो चोर उलटा पालटा होत खाली पडला. तेवढ्या झटक्यात उठून तो टणाटणा उड्या मारून पळून जाऊ लागला. त्याला पकडण्या करीता काही शिपायी त्याचा पाठलाग करू लागले परंतु शिपायांच्या डोळ्यात धूळ झोंकून तो केव्हांच शीमेपार निघून गेला. परंतु शिपायी त्याचा पाठलाग करीतच होते.

चोर दमुन गेला होता. त्याला पळत रस्त्याने जातानांच रस्त्याच्या कडेला असलेल्या एका पहाडातील गुहेत एक दिवा जळत असलेला दिसला. चोर धावत पळत जाऊन त्या गुहेत शिरला. त्यावेळी गुहेत कोणी चिटपाखरू पण नव्हते. त्यामुळे चोराने झटक्यात तेथील कोपऱ्यातील एक चादर अंगावर ओढली व तो समाधी लावून बसण्याचे ढोंग करीत माळ जपत बसून राहला.

थोड्या वेळाने ते शिपायी त्या गुहेत आले व आत डोकावून विचारू लागले—"स्वामीजी, आपण इकडे कुणाला पळत जात असताना पाहिलेत काय?"

"आम्ही पाहिले नाही!" चोराने गंभीर आवाज करीत म्हटले.

"गुरुदेव, क्षमा करा आम्ही आपल्या प्रार्थनेत विघ्न आणले." असे म्हणत चोराला सर्वजण नमस्कार करीत निघून गेले.

चोराच्या मनातील भीती गेली. तो काहीसा स्थिर झाला. शिपायाच्या कडून नमस्कार करून घेतल्याचे त्याला हसू आले. परंतु दुसऱ्या क्षणी त्याच्या मनांत एका शंका निर्माण झाली की, मी स्वामीचे सोंग केले, ह्यामुळे आता पुरते तर आपण संकटातून वाचलो. त्यातून त्या लोकांनी माझा आदरच केला जर खरोखरीच मी स्वामी बनलो तर मग सर्वजण माझा किती आदर ठेवतील!

चोर अशा तऱ्हेने नाना प्रकारचे विचार करीत होता. तेवढ्यात त्या गुहेत



रहाणारे स्वामी परत आले. त्यांना पाहून चोराने त्याचे पाय धरून कळवळत म्हटले—"गुरुदेव, मला आपल्या चरणापाशी ठेवून घेऊन आपली सेवा करण्याची अनुमती द्या. म्हणजे माझा बोझ थोडासा हलका होईल.

स्वामींना त्याच्यावर दया आली व त्यांनी त्या चोराला आपला शिष्य बनवून आपल्यापाशी ठेवून घेतले.

त्या दिवसापासुन चोर त्या स्वामीची सेवासुश्रुषा करू लागला व त्यांनी सांगितलेले धर्मोपदेश ऐकू लागला हळूहळू त्याचे मनात परिवर्तन झाले. तो एक सज्जन व धार्मिक होऊन माणसाच्यांत बदलून गेला.

काही वर्षे उलटली त्या स्वामीचे देहावसान झाले. चोराने त्याच गुहेत राहून एका धर्मोपदेशकाच्या रूपाने यश प्राप्त केले.

एक दिवस चोराने आपल्या शिष्याची प्रार्थना ऐकली व तो त्या नगरात गेला. तेथे कित्येक लोकांनी त्याचे स्वागत व आदर सत्कार केला व त्याच्या समोर आपल्या धर्मातील शंका व्यक्त केल्या चोराने त्यांच्या शंकाना उचित उत्तरे देऊन त्यांचे शंका निवारण केले.

त्याच वेळी एक म्हातारा त्या चोराच्या जवळ आला व त्याने अत्यंत श्रद्धापूर्वक त्याचे पाय धरले व निवेदन केले--"स्वामी माझ्या सारख्या व्यक्तिला देवाचे सान्निध्य प्राप्त करावयाचे आहे. तेव्हां काही नां काही अद्‌भूत घटना घडतात ह्याचे एकच कारण आहे की, मी माझे पूर्व जीवन आपल्या सारखे न घालवता अन्य मार्गाने घालवले आहे मी कित्येक वर्षे या गावचा कोतवाल म्हणून राहिलो आहे.

"वत्सा, तू अशी शंका कां करतोस की तुझ्यात अद्‌भूत घडणारच नाही काही काळापूर्वी मी तुझे पाय धरले होते. तेव्हां तू रागाने मला लाथाडले होतेस. तरी सुद्धा आज तुच श्रद्धाभावतेने माझे पायाला स्पर्श करीत आहेस काय ही गोष्ट अद्‌भूत नाही कां? एका काळातील चोर जेव्हां देवाच्या करूणेला प्राप्त होऊ शकतो तर चोराला पकडून बंदी करणारा कोतवाल देवाच्या करुणेला कां नाही पात्र होणार" असे म्हणत चोर मंदहास्य करीत तेथून उठला. व आपली हकीकत सांगून उत्तर देऊन गप्प राहला.

ते उत्तर ऐकून म्हाताऱ्याला त्याच्या म्हणण्याचा उलगडा झाला नाही तेव्हां परत चोराने पूर्व घडलेली घटना त्याला कथन करून सांगितली.

तेव्हां ते समजताच म्हाताऱ्याने अत्यांनदाने त्या स्वामीचे पाय धरले व आपल्या अश्रुने ते धुवून काढले.





# चार पायांच्या मासोळ्या

१७४१ मध्ये सेंट पीटर नावाचे एक रूसी जहाज बेरिंग बेटाच्या किनाऱ्याला आपटून फुटले. त्या जहाजातील काही प्रवासी पोहून आपला जीव वाचवत किनाऱ्याला येऊन पोहोचले. ते पोहत येत असतानां त्यांना अनेक "पाणकुत्री" पोहतांना दिसली. ते लोक जितके दिवस त्या भागात राहीले तितके दिवस त्यांनी आपला आहार म्हणून त्या पाणकुत्र्यांचा संहार केला. त्यांच्या कातड्याचा व्यापार करून पैसा मिळवला. त्या दिवसापासून सामुद्रिक प्राण्यांचा संहार करणे दिवसंदिवस वाढतच चालले. ह्या कारणाने एका काळी प्रशान्त महासागरावर अधिक संख्येने दिसणारे हे प्राणी नाहीसेच झाले, १९१० मध्ये अमेरिकेने व १९१५ मध्ये अनेक देशांनी ह्या जलप्राण्यांची रक्षा करण्याकरीता काही कायदे अमंलात आणले व त्या जलप्राण्याची काळजी वाहू लागले.

समुद्रात जेथे जास्त शेवाळे साचलेले असते अशा उथळ जागेच्या भागात हे स्तन्य जलप्राणी आपला जमाव करून रहातात. ह्या जनावराची लांबी एक मीटर लांब, शेपूट तिन चर्तुथांश मिटर ह्याचे डोके मोठे असते, मान निमुळती असते, डोळे छोटे व कान पण छोटे असतात ह्यांच्या मिशा झुपकेदार असतात. ह्याचे पुढचे पाय मागच्या पायांपेक्षां छोटे असतात. त्याच्या बोटांना लागुनच चामडी असतात. हे प्राणी पाण्यातून वाहून जाऊ नये म्हणून तोंड उलटे करून समुद्रातील शेवाळे अंगावर लपेटून झोपून रहातात. त्यातील एकजण त्यांच्यावर पहारा देत रहातो. झोपेतून उठल्यावर ते समुद्रात डुबकी मारून खेकडे व कवच असलेले लहान मासे खातात हे प्राणी कवच फोडण्याकरीता समुद्राच्या तळातून एक दगड घेऊन येतात व खालच्या पायाने दगड पकडून पुढच्या दोन्ही पायाने कवच धरून ते दगडावर हापटून फोडून खातात. दोन वर्षाने हे प्राणी पिल्ले घालतात परंतु पिल्ले घालण्याकरीता ते जमिनीवर येतात.



# चांदोबातील नवलाई



## चंद्रावर आपण काय मेणबत्ती पाहू शकू कां?

चंद्र पृथ्वीपासून जितका दूर आहे तितक्या दूर असलेल्या चंद्रावरच्या मेणबत्तीच्या प्रकाशाचे सौंदर्य आपण पाहू शकू कां? खगोल शास्त्रज्ञ असे सांगतात की १९९३ पर्यंत हे शक्य होईल! कॅलिफोर्निया तील खगोल शास्त्रज्ञ ह्या कार्याच्या हेतूने फानोमार पर्वतावर एक विशिष्ट तऱ्हेची दुर्बिण तयार करीत आहेत. ह्या दुर्बिणीतून पाहिले असतांना बारा लाख करोड वर्षां पूर्वीच्या वस्तूचे पृथ्वी बाहेरचे सौंदर्य आपण पाहू शकू!

## तिमिंगलांचे संगीत प्रेम



आलास्का आणि सोविएत रुसच्या समुद्री प्रदेशात काही ठिकाणी पाणी गोठल्यामुळे जवळ जवळ एक हजार तिमिंगल (प्रचंड मासे) अडकून पडले होते. सोव्हिएत नौका दलाने एक कालवाचा खोदला. त्यावेळेस हे अडकलेले मासे घाबरून जाऊन तेथून बाहेर पडू शकले नाहीत. परंतु अनेक प्रयत्न करून शेवटी प्रेम संगीत ऐकवल्याने ते तिमिंगल त्या कालव्यातून बाहेर पडले. आणि समुद्राच्या पाण्यात निघून गेले.

## ग्रहांतर वासियांचे स्वागत



ग्रहांवरून आलेले कोणीही पृथ्वीवर कोठे उतरतील? अन्टानियो बाजकेज आल्वा नावाच्या एका प्रतिष्ठीत व्यक्तिचा असा विचार आहे की, हे लोक मेक्सिकन नगरापासून ऐंशी मैल दूर स्थित असलेल्या ओरिएंटल पर्वतावर उतरतील त्यामुळे तेथे त्यांचे स्वागत करण्याकरीता एक विमान तळ करण्याचा प्रयोग चालू आहे.

## तुम्हांला माहीत आहे कां?

१. पृथ्वीचा किती भागाचा प्रदेश जलमय आहे?

२. सूर्याच्या जवळचा ग्रह कोणता आहे?

३. ग्रहांमधील सर्वात थंड ग्रह कोणता?

४. ग्रहांमधील सर्वात मोठा ग्रह कोणता आहे?

५. पृथ्वीचा व्यास किती आहे?

[ उत्तरे पान ६४ वर पहावीत ]



# कुंदनची बुद्धिमत्ता

विजयपुरीचा राजा चंद्रसेन अंतपुरात राणी बरोबर राजकुमाराच्या शिक्षणाबद्दल काही विचार विनिमय करीत होता. त्यावेळेस कसा कोण जाणे पण एक कावळा गवाक्षामधून अंतपुरात आला. तो पहाताच ताबडतोब दासदासीनें त्याला बाहेर हांकलवले परंतु त्या कावळ्याला पहाता क्षणी राजाच्या मनांत एक विचित्र विचार आला.

त्याने मंत्र्याना बोलावणे पाठविले व म्हटले–"मंत्री आपल्या राज्यात जितके कावळे आहेत त्यांची बरोबर संख्या सांगणाऱ्याला आम्ही सर्वोत्तम बक्षीस देऊ. परंतु जो कोणी बरोबर सांगणार नाही त्याला वीस फटके मारले जातील. तेव्हां अशा प्रकारची गावांत दवंडी पिटवा. व माझ्या भेटीस येण्यास कळवा. मंत्र्याने राजाचा हुकूम घेऊन तशी दवंडी पिटवीली. एक आठवडा लोटला. परंतु राजाच्या त्या प्रश्नाचे बरोबर उत्तर देण्यास कोणीही पुढे आला नाही. सर्वांना एक प्रकारची भीती वाटत होती.

कुंदन नावाचा एक तरुण आपले शिक्षण संपवून नोकरीच्या शोधार्थ राजधानीला आला होता. त्याने ती विचित्र गोष्ट ऐकली. त्याला आश्चर्याबरोबर राजा चंद्रसेनच्या राज्यकारभाराविषयी एक शंका उत्पन्न झाली.

त्याने राजाची भेट घेण्याची इच्छा दर्शविली व राजदरबारात प्रवेश करून राजाला प्रणाम करीत म्हटले–"महाराज, मी शिकलेला पण एक बेकार माणूस आहे. नोकरीच्या शोधा करीता मी अनेक गांवे व शहरे व लहान लहान खेडी पालथी घातली आहेत. त्यामुळे फक्त कावळेच न होत तर बगळे, ससाणे, पोपट गिधाडे



कोकीळ हे सुद्धा किती संख्येने आहेत. हे मी निःसंकोच सांगू शकतो. ह्याची सुद्धा बरीच माहीती मला आहे. परंतु घुवडाची संख्या मात्र सांगू शकत नाही कारण ते निशाजीवी आहेत.

कुंदनचे बोलणे ऐकून राजाला हसू आले. राजा म्हणाला–"तुझे म्हणणे जर खरे असेल तर, तुझे पक्ष्यांच्या बाबतीतील ज्ञान अगाध प्रशंसनीय आहे म्हणावयाचे. परंतु एका विशिष्ट खास गोष्टीकरीता मला फक्त राज्यातील कावळ्यांचीच संख्या किती आहे हे पाहीजे आहे.

"मी त्याची संख्या सुद्धा सांगू शकतो, महाराज!" कुंदनने उत्तर देत म्हटले.

"पण एक लक्षात ठेव जर बरोबर संख्या सांगितली नाहीस तर वीस कोरड्या चामार मिळेल." राजाने आठवण करून देत म्हटले.

"होय, महाराज! ह्या गोष्टीचे मला स्मरण आहे. आमच्या विजयपुरी राज्यात ह्या क्षणी कावळ्यांची संख्या तीन लाख वीस हजार आहे!" कुंदन म्हणाला.

"असे आहे काय! परंतु तू जी संख्या सांगतोस ती बरोबर आहे का चूक आहे. ह्यांचा शोध मला आता काढला पाहिजे. ह्याकरीता मी प्रत्येक शहरातून व नगरातून शिपायी पाठवून तेथील अधिकाऱ्यांना निरोप पाठवितो. ते आपापल्या ठिकाणच्या कावळ्याची मोजणी करून मला येऊन सांगितील." राजा म्हणाला.

"महाराज, मी सांगितले आहे की, ह्या क्षणाला आपल्या राज्यात कावळ्यांची संख्या तीन लाख वीस हजार आहे. परंतु आपल्या अधिकाऱ्यांकरवी त्यांची मोजणी केलीत तर त्या वेळी मोजणीमध्ये थोडा फार फरक पडण्याची शक्यता आहे. कारण कावळे म्हणजे एक स्वेच्छा प्राणी आहे. त्यांना तर देश-प्रेम ह्या भावना तर नसतातच त्याहुनही देशाच्या सीमे बद्दल किंचीत सुद्धा आदर नसतो. त्यामुळ



ते केव्हांही इकडून तिकडे उडून जातील व शेजारच्या राज्यातील कावळ्यांची संख्या वाढेल. तसे झाले नाही तरी आपल्या राज्यातील कावळे शेजारच्या राज्यात जातील तर संख्या कमी होईल त्यामुळे ह्या कमी जास्त होण्याच्या कारणाकरीता कावळ्याचा जिम्मेदार मी रहाणार नाही." कुंदनने स्पष्ट सांगितले.

कुंदनच्या चाणाक्ष बुद्धीचे सर्व दरबारातील लोकांनी हर्षनादाने कौतुक केले. त्या लोकांना समजले की, राजाच्या ह्या व्यर्थ प्रयत्नावर कुंदनने अप्रत्यक्ष कसा आक्षेप केला. राजा स्वतः कुंदनचे उत्तर ऐकून संतुष्ट झाला व म्हणाला–"सांग, कोणत्या तऱ्हेचे बक्षीस हवे?"

कुंदन क्षणभर विचार करीत म्हणाला– "महाराज, मला क्षमा करा. आपल्याला नेहमी प्रजेच्या अडीअडचणींचा विचार करून त्यांना उपयोगी पडतील अशी कार्ये केली पाहिजेत. परंतु आपण आपला अमुल्य वेळ निरर्थक प्रश्न व समाधान ह्याकरीता फुकट घालविणे बरोबर नाही. आपल्या राज्यातील प्रजा काही ठिकाणी पाण्या शिवाय त्रस्त झालेली आहे. काही पुरांच्या हानीमुळे नुकसान सहन करीत आहे. तेव्हां आपण त्या सर्व खुबींचा सारासार विचार करून ह्याला काहीतरी उपाय काढण्याचा मार्ग शोधा. अशा परिस्थितीत मी बेकार राहू शकणार नाही. हाच माझ्या करीता









आरंभ दिलेला पुरस्कार राहील. ही गोष्ट ऐकून राजा अत्यंत खुष झाला व म्हणाला–"कुंदन, मी तुला माझ्या मुख्य सल्लागाराच्या रूपाने नेमतो. तू म्हणालास की तू राज्याचे भ्रमण केलेले आहेस. त्यामुळे तुला आता ह्याक्षणी ही गोष्ट माहीत असावयास हवी की, प्रजेला कोणत्या गोष्टींची आता आवश्यकता आहे. सांग, तुझे काय म्हणणे आहे.

"महाराज, तुम्ही माझ्यावर कोणतेही जबाबदारीचे काम सोपवले तरी ते मी यथाशक्ति पार पाडू शकेन!" कुंदन म्हणाला.

"तर मग तुला मी एक विशेष काम सांगतो. मला दहा वर्षांचा एक मुलगा आहे. त्याला शिक्षण देणे म्हणजे माझ्या पुढे एक कठीण समस्याच आहे. आम्हांला त्याला कोणत्याही गुरुकुलात पाठवायचे नाही." असे म्हणत राजा हसू लागला. व फिरून म्हणाला–"मी जे काय पंधरा वर्षांपर्यंत राज्यकारभारात राहून गुरुकुलात शिक्षण प्राप्त केले आहे. ते कोठपर्यंत राज्य चालविण्याकरीता उपयोगी पडेल. ही गोष्ट तर तुमच्यापासुन लपून राहात नाही. पुस्तकी ज्ञाना बरोबर व्यवहारज्ञाना मधे सुद्धा तू तज्ञ आहेस त्यामुळे मी माझा मुलगा बालकुमाराच्या शिक्षणाची जबाबदारी तुझ्यावर सोपवत आहे. काय तुला मंजूर आहे नां!"

"तुम्ही माझ्यावर एवढा विश्वास टाकून विजयपुरीच्या गादी युवराजांच्या शिक्षणाची जबाबदारी सोपवत आहात. तेव्हां मी माझ्या परीने शर्थीने प्रयत्न करून ह्या कामाला सर्व तऱ्हेने युवराज योग्य असे सिद्ध करून दाखविन." कुंदन म्हणाला.

अशा तऱ्हेने कुंदनने राजाने दिलेली दोन्ही कामें जबाबदारीने समर्थता पूर्वक पार पाडली. व राजाच्या व प्रजेच्या दृष्टीला एक दक्ष निपुण व्यक्ति म्हणून नाव कमावले.






[ ८ ]

[त्या जादुगारीण कापालिनीने चंद्रवर्माला खायला प्यायला दिले. व सांगितले की, शंबू मांत्रिकाकडून तो अपूर्व शक्ति असलेला शंख कसा प्राप्त करावयाचा. तिने असे सांगितले की काही विशिष्ट वनस्पतीचा काढा त्या शंखात घालून प्याल्याने आपण एक हजार वर्षांपर्यंत जिवत राहू शकतो. म्हणून चंद्रवर्मा त्या शंखाच्या शोधार्थ तिच्या घरातून बाहेर पडला. पुढे....]

तो काळसर्प त्याला रस्ता दाखवित पुढे पुढे चालला होता. त्याचे अनुकरण करीत पाठीमागे चंद्रवर्मा जात होता. काळसर्प मधून मधून आपली तीन डोकी असलेले शरीर गोल गोल वळवित जोर-जोरात फुत्कार करीत त्या घनदाट जंगलातून चालला होता. त्या जंगलातील झाडांपाठीमागून अनेक प्राणी व विषारी जनावरे त्याच्या समोर आले. परंतु काळ-सर्पाला पहाताच ते इकडे तिकडे घाबरून जाऊन सैरावैरा पळू लागले.

अशा प्रकारे जंगलातून थोडया दूरवर चालत गेल्यानंतर चंद्रवर्माच्या मनात अचानक एक शंका आली. की, काळसर्पाला बहुदा मानव भाषा येत असावी कारण त्या जादुगारणीने त्याच्याजवळ अशा प्रकारे बोलाचाली केली की, एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याला जवळ करेल व तीने त्याला तश्या



मानव बोलीतून हुकूमही केला होता. परंतु त्याने अद्याप पावेतो त्याला मानववाणीतून बोलताना पाहिले नव्हते. परंतु जर आपण तसा प्रयत्न करून पाहिला तर आपल्याला त्याचा शोध लागेलच काळसर्प बोलतो कां नाही ते ?"

अशा तऱ्हेनें विचार करीत चंद्रवर्मा काळसर्पाच्या जवळ गेला व त्याला विचारू लागला–"काळसर्पा, आपल्याला हे जंगल पार करावयाचे आहे. तेव्हां अजून किती लांब चालत जावयास हवे ?" मला आत्ताच थकल्यासारखे वाटते आहे.

चंद्रवर्माचा प्रश्न ऐकता क्षणीच काळसर्प तेथल्या तेथे थांबला त्यानी आपली तिन्ही डोकी वर उचलली व तो चंद्रवर्माच्या डोळयात पाहू लागला. नंतर दुसऱ्या क्षणी आपली जिभ बाहेर काढून थोडे पुढे जात त्यांनी एक प्रकारचा मंदध्वनी केला. त्या आवाजात फुत्कार नव्हते. त्याच्या पाठीमागे दोन तिन आवाज येत होते. हि काहीतरी त्यांची भाषा असावी.

चंद्रवर्मा आश्चर्यचकित झाला. त्या काळसर्पाने त्याचे प्रश्न समजल्याच्या आशयानें आपली तिन्ही डोकी इकडे तिकडे हलविली व आपल्या रस्त्यातून बाजूच्या रस्त्याला वळून चालू लागला व तसे अनुकरण करण्याचा चंद्रवर्माला आदेश केला.

चंद्रवर्माला समजले की, काळसर्पाला आपल्याला काही गुप्त गोष्टी सांगावयाच्या आहेत. त्यामुळे तो कोणतीही शंका मनात न आणता त्याच्या पाठोपाठ चालू लागला. थोडया वेळातच ते दोघे घनदाट जंगलाच्या भागातून बाहेर मोकळया हवेत आले व तेथील एका झऱ्याजवळ येऊन पोहोचले.

काळसर्प त्या झऱ्याजवळ थांबला आणि आपली डोकी उंच करून झऱ्याच्या पलीकडे असलेल्या एका विचित्र वृक्षाकडे पाहू लागला. तितक्यात त्याला भयंकर किंकाळया व रडणे ऐकू आले. त्या वृक्षाकडे पहाताक्षणीच त्याला कांपरे भरले. ते दृष्य अत्यंत भयानक होते.

तो एक भयंकर व विचित्र प्रचंड वृक्ष होता. चाळीस पन्नास फूट उंच व प्रचंड असलेल्या त्या झाडावर अनेक पशुंची पक्ष्यांची मुंडकी लटकलेली होती. ती सर्व मुंडकी चंद्रवर्माला व काळसर्पाला पाहाता क्षणीच वेगवेगळया प्रकारचे आवाज काढून चित्कारू लागली.

चंद्रवर्माने आपली झाडावरची दृष्टी काढून काळसर्पाकडे वळविली व एकटक त्याच्याकडे पाहात राहिला. नंतर त्या विचित्र वृक्षाकडे हात करीत त्याने काळसर्पाला विचारले–"काळसर्पा, ते काय खरच झाड आहे कां ? झाडरूपात कोणी राक्षस आहे ?"

काळसर्प शांतपणे त्या झाडाच्या जवळ असलेल्या झऱ्याजवळ जाऊ लागला. आणि काहीवेळातच त्या झाडाजवळ येऊन थांबला. चंद्रवर्मा जेव्हा त्या झाडाजवळ जाऊ लागला. तेव्हां चंद्रवर्माला त्या झाडाजवळ भयंकर विचित्र आवाज कोलाहल, किंकाळया ऐकू येऊ लागल्या. चंद्रवर्माने आपले मन घट्ट केले. जर कां काळसर्पाने जरी आपल्याला धोका देऊन मारण्याचा प्रयत्न केला तरी आपण मरू शकणार नाही. कारण आपण जंगलात



शिरता क्षणीच कापालिनीनें आपल्या शक्तिने आपल्याला वश केले आहे. त्यामुळे आपली शाररिक शक्ति व बळ ह्याने व आपल्याजवळील ही तलवार सुद्धा आपल्याला उपयोगी पडणार नाही. जरी कां आपले काहीही चांगले अगर वाईट होणार असेल तर ते त्या कापालिनीच्याच हातात आहे.

चंद्रवर्मा त्या विचारातच गुंग झाला होता. त्याला तेवढयात त्या काळनागाने जवळ येऊन त्या झाडाकडे चलण्याचा इशारा केला काळावेळाचे त्याला भानच राहीले नाही त्याने त्याचा अर्थ लावला की आपल्या हा ह्या झाडावर चढण्याकरीता




सांगत असावा असे म्हणून त्याने म्यानेतून तलवार बाहेर काढली व तो निर्भयतेने झाडाजवळ गेला व त्याने तलवारीचे टोक जोरात त्या झाडाच्या बुध्यात रोवले. दुसऱ्याक्षणी साऱ्या जगलातून एक प्रकारचा भयंकर कर्णभेदी आवाज व किंकाळ्या ऐकू येऊ लागल्या. काळनागाने घाबरून जाऊन आपले शरिराचे वेटोळे केले व तो चंद्रवर्माकडे पहात त्याला समोरा आला. तेव्हां चंद्रवर्मा दुसरीकडेच स्वतःच्या धुंदीत पहात होता. त्याच्या मनात विचार होता की, ह्या झाडाला लटकलेली पशुपक्ष्यांची मुंडकी आपल्या तलवारीने एकांपाठोपाठ सपासप कापून दूर फेकून द्यावीत कालसर्प वृक्षाच्या बुंधापाशी आला व आपल्या शरिराने त्याला लपेटू लागला आणि त्याच्या फांद्याकडे त्याने आपली नजर रोखून धरली त्याचे करणे पाहून चंद्रवर्मा सुद्धा त्याच्या प्रमाणेच झाडावर सरपटत चढू लागला. तेव्हां त्या झाडावर लटकणारी सर्व मुंडकी एकाएकी भयंकर तोंडे व आवाज करून थयथयाटकरु लागली. चंद्रवर्मा निर्भयतेने त्या झाडाच्या फांदीपर्यंत पोहोचला व त्याने आपल्या तलवारीने त्यातील वाघाच्या आकृतीचे असलेले डोके खाली पाडले. ते पाहून चंद्रवर्माच्या आश्चर्याला काही सीमाच राहिली नाही. ते डोके खाली पडले. जमीनीवर पडता पडता त्या डोक्याचे एका फळाम्यात रूपांतर झाले. हा कोणी मांत्रिक नाहीतर जादुगारणीचाच प्रकार असावा असे त्याला वाटले.

चंद्रवर्मा ताबडतोब झाडावरून खाली उतरला. तेवढ्यात त्या काळसर्पाने ते फळ आपल्या तोंडात दाबून धरले व तो चंद्रवर्माकडे वळून पाहू लागला. चंद्रवर्माने ते फळ त्याच्या तोंडातून काढून घेऊन चाखून पाहिले. त्या ते क्षणार्धात त्याला कालसर्पाच्या तोंडून एक विचित्र ध्वनी ऐकू येऊ लागला. तेव्हां चंद्रवर्मा त्याच्याकडे वळून पाहू लागला. आता त्याला त्याच्या बोलण्याचे ध्वनी स्पष्ट ऐकू येऊ लागले.

"चंद्रवर्मा, आता समजली नां! ह्या वृक्षावर लटकणाऱ्या विचित्र डोक्याची कथा?" कालसर्प म्हणाला.

आता त्याच्या सर्व कृतीचा व वागण्याचा उलगडा चंद्रवर्माला लागला. चंद्रवर्माने ते फळ चाखताक्षणीच कालसर्पाच्या साऱ्या गोष्टी त्याला समजू लागल्या. त्या क्षणापर्यंत कालसर्प काही-बाही आवाज तोंडाने करत राहिला होता. तेव्हां ते त्याला फक्त फुत्कारच वाटत होते आता समजले. त्याचे बोलणे.

"ते फळ चाखताक्षणी तुला पशू पक्ष्यांची भाषा समजू लागली नां!" आता मांत्रिक शंखूच्या जवळ जाऊन तो अद्भुत असा शंख हडप करण्याकरीता ह्या भाषेचा तुला प्रत्येकवेळी खूपचउपयोग होईल. काळसर्पाने विचारले परंतु तुला त्या मांत्रिकाचा सेवक 'अग्निपक्षी' कडून होणाऱ्या संकट व त्रासाला मात्र जपायला हवे. आता तुला सर्व प्राण्यांच्या भाषा समजू लागल्या आहेत! आता तुला तुझ्या कार्यात नक्कीच यशप्राप्ती मिळू शकेल. अशी आशा करायला काहीच हरकत नाही." काळसर्प म्हणाला.




चंद्रवर्माचा उत्साह द्विगुणीत झाला. त्याने काळसर्पाकडे अत्यंत कृतज्ञतापूर्ण नजरेने पाहिले. व म्हटले–"काळसर्पा, तू मला फारच मोठी मदत केली आहेस. तेव्हां ह्याचा बदल्यात तुला माझ्याकडून काय पाहिजे ते तू माग?"

काळसर्प काळजीयुक्त स्वरात आपले डोके खाली झुकवत त्याला म्हणाला–"तुला माझे छोटेसे काम करावयास हवे. परंतु तू जोपर्यंत मांत्रिकाकडून तो शंख घेऊन येत नाहीस तोपर्यंत मला तुझी वाट पहात बसावे लागणार." त्याशिवाय मला तुझ्याकडून काहीही प्राप्त होणार नाही. कालसर्पाच्या तोंडून तसे उत्तर ऐकून

चंद्रवर्माच्या मनांत कुतुहल निर्माण झाले. की, कालसर्पाची काय इच्छा असावी ते ह्या-क्षणाला कळावी म्हणून त्याने कालसर्पाकडे शंकाखोर नजरेने पाहात विचारले– "कालसर्पा, तू खरोखरी नाग आहेस कां मनुष्य आहेस?"

"मी कधीही सर्प नव्हतोच मनुष्य होतो. शंबूचा शिष्य होतो. ज्याच्या हुकू-माने मी कापालिनीचा नाश करावयास निघालो व तिच्या हातातच पकडलो गेलो व सर्प बनलो. त्या दिवसांपासून ती माझ्याशी नोकरांप्रमाणे वागते. तू आपल्या ह्या कार्यात यश प्राप्त करून परत आल्या-वरच माझ्या ह्या तुच्छ जीवनाचा उद्धार करु शकतोस! माझं एवढंच तुझ्याकडे मागणे आहे." कालसर्प म्हणाला.

ह्या इतक्या छोट्या कारणाकरीता तुला फार काळ थांबावयाची जरूर नाही. ह्याक्षणी मी तुला कापालिनीकडे घेऊन जातो! ती माझ्या कुठल्या ही म्हणण्याला विरोध करणार नाही. तुला पुन्हां मानव रूप देण्याकरीता तिला मी सांगेन." चंद्रवर्मा म्हणाला.

परंतु कालसर्पाने चंद्रवर्माचे म्हणणे ऐकले नाही तो म्हणाला–"तुला कापा-लिनीचा स्वभाव माहित नाही. ती भयंकर दुष्ट व शंकेखोर बाई आहे. ती असा सुद्धा असा विचार करेल की आपण दोघे एक होऊन तिचा नाश करण्याचा प्रयत्न करणार आहोत आणि तसे झाले तर पुढेमागे माझ्या बरोबर तुझाही ती नाश करेल. मी अनेक वर्षे सर्प बनून माझे आयुष्य घालवले आहे. अजून थोडे दिवस वाट पाहण्याने माझे काही तसे नुकसान होणार नाही!" तू तुझ्या कामात यश प्राप्ती मिळव.

चंद्रवर्माला त्याच्या म्हणण्यात सुद्धा काही तथ्य आहे असे वाटू लागले. हे मांत्रिक व जादूगार केव्हांही विश्वास ठेवण्यालायक नसतात ह्याची कल्पनाच करणे कठीण आहे. की हे लोभ कोणावर कोणत्या क्षणी दाखवतील व शंका कोणावर करतील. चंद्रवर्मा असाविचार करीत त्या झाडापासून जाऊ लागला. कालसर्प त्याला त्याचा मार्ग दाखवून त्याच्या पुढे पुढे जाऊ लागला.

ठिक दुपार पर्यंत त्यांनी ते घनदाट भयंकर जंगल पार केले समोर मोठे मोठे पर्वत व दऱ्या दिसू लागल्या. तेथेही झाडे खूप होती. परंतु तो भाग जंगलाप्रमाणे दिसत नव्हता. तेथील कोणत्याही गोष्टीची कल्पना करणेंच कठीण होते.



"चंद्रवर्मा, आता मी परत जातो. पुढे तुला एकट्यानेच जावे लागणार. त्या पर्वतात दऱ्याखोऱ्यातून तुला अनेक संकटाना तोंड द्यावे लागणार. परंतु तू धीर न सोडता तुला येणाऱ्या पशुपक्ष्यांच्या भाषेचा उपयोग करून नक्कीच चांगले यश प्राप्त करता येईल." काळसर्प म्हणाला.

ह्यानंतर चंद्रवर्माचा निरोप घेऊन काळ-सर्प फुत्कार करीत करीत जाऊ लागला. तो दृष्टीआड होई पर्यंत चंद्रवर्मा पहात उभा राहिला. नंतर एक दिर्घश्वास सोडून तो आपल्या कामगिरीला निघाला.

सगळा रस्ता भयंकर काटे-कुटे व दगडागोट्यांनी भरलेला होता. काही काही ठिकाणी आकाशाला टेकतील ऐवढी उंच झाडे होती. त्या भागात संचार करणाऱ्या पशु-पक्ष्यांचे आवाज व गुंजन चंद्रवर्माला स्पष्ट ऐकू येत होते. व त्यांच्या बोलण्याचा अर्थ त्याला आता समजू लागला होता. ते प्राणी एक दुसऱ्याला सांगत संकेत करीत होते की, सावध रहा. ह्या प्रदेशात कोणी एक नवा प्राणी घुसून संचार करीत आहे.

तिसऱ्या प्रहरी दिवस उलटल्यावर चंद्रवर्मा सरळ उत्तर दिशेकडे वळला. तो खूपच थकून गेला होता. त्याच्या पोटांत भूकेने आग पेटली होती. तो एका झाडाच्या सावलीत आला. व त्याच्या बुंधाशी टेकून बसला त्याने चौफेर नजर टाकली. परंतु त्याला कुठेही फळाची








झाडे दिसली नाहीत. काही कंदमुळे खावीत तर काटेरी झाडा खेरीज दुसरे कोणतेही झाड तेथे उगवलेले नव्हते.

"इथे आपला वेळ फुकट घालण्यात काही अर्थ नाही. थोडे पुढे चालत जाऊन पहावे काही फळांची झाडे दिसतात का? असा विचार करीत तो तेथून उठून पुढे चालू लागला. एका वळणापाशी आल्यावर काय आश्चर्य समोर अनेक वृक्ष फळांनी फुलांनी लगडलेले त्याच्या दृष्टीस पडले. त्याच्या अंगात बळ आले तो. अत्यंत वेगाने पुढे जाऊ लागला. परंतु काही क्षणातच त्याला त्याचे अंग भाजू लागल्याचा भास होऊ लागला. तसाच तो थोडा पुढे गेला. तो पुढे थळी होती व त्यातील पाणी उकळत होते.

ती विचित्र नदी पाहून चंद्रवर्माला आश्चर्य वाटले. त्याने जाणले की, कोणत्या-तरी गरम पर्वतातून निघून गरम पाण्याच्या रूपाने ही वहात आहे. जर आपल्याला भुकेपासून आपला जीव वाचवायचा असेल तर ही नदीपार करून पलीकडे जाणे भागच आहे. कारण फळांनी लगडलेली ती सर्व झाडे नदीपलीकडेच आहेत.

चंद्रवर्मा थोडा थांबून आपल्या पुढच्या कामागिरीबद्दल विचार करू लागला. तेवढ्यात तेथल्या एका वळणाच्या टोकाला एक महासर्प नदीच्या दुसऱ्या काठड्याच्या टोकाकडे सरपटून येण्याच्या प्रयत्नात होता. ते पाहून काही माकडे किच् किच् आवाज करीत त्या सर्पाच्या पाठीचा पुल करून इकडून तिकडे पळत गेलेली त्याने पाहीली.

चंद्रवर्माला उमजले की, जर आपल्याला तो उष्ण प्रवाह पार करावयाचा असेल तर मोठ्या शर्थीने ह्या सर्पाच्या पाठीवरून चालत जाणे भाग आहे. ते काम सुद्धा तो सर्प तिकडून इकडे येण्यापूर्वीच करावयास हवे. अशा प्रकाराने विचार करीत चंद्रवर्मा सर्पाच्या जवळ पोहोचला व पलीकडे जाण्याकरीता तो त्याच्या अंगावर चढून पलीकडे पळू लागला. (क्रमशः)



# अद्भुत मांत्रिक

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, ह्या अर्धरात्री तू हे कष्ट करीत आहेस त्याचे फळ तुला मिळले हे नक्की परंतु मला एक गोष्ट समजत नाही की, सर्व राजे लोक स्वार्थीच असतात आणि त्यांचे हित करणारी चांगली माणसे सुद्धा वेळ पडताच त्यांचा बदला घेतल्या शिवाय रहात नाहीत. तू सुद्धा स्वार्था करीताच इतके कष्ट सहन करत आहेस ना? आणि जर ही गोष्ट खरी असेल तर तुला मी तशाच एका राजाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक.

शरभ नावाचा एक महामांत्रिक सूर्योदयापूर्वीच उठून नदिवर स्नान करून

## वेताळाच्या गोष्टी



काठांवर बसला व आपली ध्यानधारणा पुजा आटोपून चालू लागला. तेव्हां एक माणूस त्याला समोरून येत असतांना दिसला.

शरभने त्याला पायापासून डोक्यापर्यंत आश्चर्ययुक्त नजरेने निरखून पाहीले तेव्हां त्या अभ्यागताने विचारले–" शरभ नावाचा मांत्रिक तुच आहेस कां?"

हा प्रश्न ऐकताच शरभच्या अंगाचा तिळपापड झाला. त्याला राग असह्य झाला. तो म्हणाला–"मी काय नुसते मंत्र तोंडपाठ केलेले नाहीत मी सर्व मंत्रशास्त्रात पारंगत आहे. ह्या राज्यातील जवळजवळ सर्वजण जाणतात की, मी एक अपूर्व शक्ति प्राप्त झालेला माणूस आहे.

"असे काय, ठिक आहे! मी तुमच्या शेजार देशचा रहिवासी आहे. त्या राज्यातील प्रत्येक लहान मुलगा सुद्धा मला ओळखतो की मी एक अपूर्व अद्भूत मंत्रजाणणारा आहे. माझे नाव देवन आहे. त्याने आपला परिचय करून देत म्हटले.

"एकाच वेळी दोन मंत्रतंत्र सामर्थ्य असणारे रहाणे म्हणजे धोक्याचे आहे" शरभ म्हणाला.

" हि तर गोष्ट खरी आहे. पण काय तू हे सिद्ध करू शकतोस कां? की माझ्याहून तुला जास्त मंत्र सामर्थ्य आहे?" देवनने त्याला पेचात टाकत विचारले.

" कां नाही? जर माझ्या मनात आले तर सर्व पाणी मी आटवून टाकेन व सर्व जनतेला पाण्यावाचून त्राही त्राही करून सोडेन" शरभने आपल्या मंत्र सामर्थ्याची चुणूक दाखविली.

"मी तर काही सेकंदात सर्वत्र पाणी पाणी करून लोकांचे प्राण वाचवू शकतो!" देवन म्हणाला.

ते ऐकताच शरभ संतापला व म्हणाला–"काय रे, मी कां तुझ्याहून कमी आहे? मी खडकाळ व ओसाड जमीन सुद्धा सुपिक बनवू शकतो."

"बस् हेच कां? मी क्षणभरात भस्म करून टाकतो." देवनने पुन्हां पैज लावली.



त्यावर शरभ चिडून म्हणाला–"हा निरर्थक वितंड वाद कशाला. सांग, माझ्या अद्भूत शक्तिचा तुझ्या मनांत विश्वास निर्माण करण्याकरीता मला काय करावयास हवे? ह्या क्षणाला मी माझ्या शक्तिचे तुझ्यापुढे प्रदर्शन करवतो.

"तू तर असा सामर्थ्यवान मांत्रिक आहेस. म्हणवतोस तर काय दिर्घकाल असलेल्या असाधारण रोगांपासून काय माणसांचा बचाव करू शकतोस काय?" देवनने विचारले.

" कां नाही! नक्कीच बरे करू शकतो?" शरभ उत्तर देत म्हणाला.

"काय तू पाण्यापासून सृष्टी करू शकतोस?" देवनने पुन्हां विचारले.

शरभने स्विकृती सुचक मान हलविली.

देवन क्षणभर थांबून म्हणाला–"मानव प्राण्यांत कोण चांगले आहे, कोण दुष्ट आहे? हे तू शोधून काढतोस कां?"

ह्यावेळेसही शरभने मान डोलावून हो म्हटले–"काय तू तुझ्या समोर असलेल्या माणसाच्या मनात कोणते विचार चालले आहेत हे समजू शकतोस कां?" देवनने विचारले.

शरभ म्हणाला–"हो! हो! तू आता मला सर्व विचारून काय माझी परिक्षा घेतो आहेस कां? तू सांग मी काही अद्भुत कामे करतो ती तू करू शकतोस कां?"

"हो हो जरूर करीत!" देवनने झटक्यात उत्तर दिले.

"नुसत्या अशाच गप्पा करण्याने काही प्रयोजन नाही. आपण पैज लावूया कां? शरभने विचारले.

'सांग', कसली पैज लावूया?" देवनने आपली उत्सुकता प्रकट करीत विचारले.

"ह्याचा निर्णय तुच कर. मला सर्व अटी मंजूर आहेत." शरभने आपली संमत्ती दर्शविली.

देवन क्षणभर थांबला आणि म्हणाला–"हारणाऱ्यांने जिंकणाऱ्याच्या पाया पडावयाचे ह्यानंतर आपल्या मंत्रशक्तिचा त्याने उपयोग करता कामा नये.

"मला ह्या अटी मंजूर आहेत!" शरभने आपली स्विकृती दिली.

"तर मग ऐक छोटीशी अट आहे. तू प्रथम तुझ्या मंत्रशक्तिचा प्रयोग करून दाखव." देवन म्हणाला.

शरभने देवनचे म्हणणे मान्य केले. दोन्ही मांत्रिक तेथून निघाले व दुपार पर्यंत एका गावांत येऊन पोहोचले. कित्येक दिवसात तेथे पाऊस पडला नव्हता. त्यामुळे सर्व शेते वाळून गेली होती. त्या सर्व कारणांमुळे प्रजा पाण्याकरीता तडफडत होती.

"शरभ, आता तू ह्या इथे आपल्या मंत्र शक्तिचा उपयोग करून दाखव!" देवन म्हणाला.

शरभने काही क्षणभर आपले डोळे बंद केले व काही तरी तोंडाने पुटपुटले व आपली बोटे हवेत उडवत नतंर ती आपल्या डोळ्यांना लावली. दुसऱ्याक्षणी आकाशांत काळे ढग जमू लागले व गडगडाटासहीत मुसळधार पाऊस कोसळू लागला.

विजयाच्या आनंदाने शरभने देवनकडे दृष्टी टाकली, देवनने शरभची स्तुती केली व म्हटले–"मला तू एक खोटा मांत्रिक आहेस असे वाटत होते. परंतु आता मला समजले की, तुला थोडया फार मंत्रशक्ति येतात आणि ही गोष्ट. खरी आहे!"

हि तर अपमानाची गोष्ट आहे! तू मला सर्वसाधारण मांत्रिक समजतोस का! माझ्या मंत्र शक्तिना मामुली समजतोस! मग तर मला दाखव बघू तुझ्या मंत्र सामर्थ्याने पाऊस पाडून!"

देवन स्मित करत म्हणाला–"काय तू सर्व ठरलेल्या अटी विसरलास? प्रथम तुला तुझ्या सर्व मंत्र शक्तिचा उपयोग करून दाखवायला हवा असे आपण नियम घातले आहेत नां!"

"ठिक आहे! प्रथम त्या नियमांचे पालन करू यां!" शरभने सांगितले.

"चल आपण राजधानीच्या गावी जाऊ मी असे ऐकले आहे की, त्या देशची राजकुमारी कित्येक वर्षापासून भयंकर रोगाने पछाडली आहे. तू तुझ्या मंत्र शक्तिचा उपयोग करून तिला पूर्णपणे बरी करून दाखव." देवनने त्याला सुचविले. ह्यानंतर दोघे राजधानीला पोहोचले व राजाला जाऊन भेटले. राजाने त्यांना आपल्या मुलींच्या महालात आणले. शरभ राजकुमारीच्या पंलगापाशी जाऊन उभा राहिला. आपल्या बोटांनी तिच्या डोळयांना स्पर्श करीत काही क्षण डोळे मिटून काहीतरी पुटपुटू लागला.

थोडयावेळात राजकुमारी हसत हसत पलंगावरून उठून उभी राहूली. कित्येक वर्षापासून त्रस्त करून सोडणारा तिचा आजार एकदम नाहिसा झाला. राजाला ते पाहून अतिशय आनंद झाला.

नतंर देवनने राजाशी थोडा वेळ एकांतात काही गप्पा केल्या. नंतर शरभच्या







जवळ येत म्हणाला–".राजाच्या मनांत काही शंका आहेत की, त्याच्या कुटूंबातच काही हेरगिरी चालू आहे. तेव्हां त्याची सर्व गोष्ट सांग.

शरभने राजाच्या कुटूंबांतील सर्वजण व सैनिकांकडे नीट निरखून पाहिले व त्यातील जे चहाडखोर होते त्यांच्याकडे अगुंलीनिर्देश करीत देवनला दाखविले. देवनकडून ह्या गोष्टींचा समाचार मिळताच राजाने त्या सर्व चहाडखोर माणसांना शिपायांकरवी बंदी केले व तुरुंगात घातले.

ह्या गोष्टीनंतर राजदरबारात देवनने शरभची मुक्तकंठाने स्तुती केली नंतर म्हटले–"आपल्या अटीनुसार तुला आणखिन एकदा आपल्या मंत्रशक्तिचा उपयोग करून दाखवावयास हवा तू जर ही अट पूर्ण करून दाखवलीस तर तुझ्या इच्छे प्रमाणे मी माझ्या सर्व मंत्रशक्तिचा उपयोग करून दाखविन. "ठिक आहे. सांग पाहू ह्या क्षणाला मी माझ्या मनांत कोणत्या गोष्टींचा विचार करीत आहे?"

शरभने एक दोन क्षण आपले डोळे बंद केले व आपल्या बोटांनी डोळ्याला स्पर्श केला व नंतर डोळे उघडत देवनकडे क्रोधाने पहात विचारले–"काय सांगू ह्या क्षणी तू आपल्या मनांत कसला विचार करीत आहेस?" तुला हे सांगायचे आहे की मी जर खरी गोष्ट सांगितली तरी ती तू ती खोटी आहे हे सिद्ध करून माझा पराभव करणार आहेस. ह्यानंतर माझी बोटे कापून टाकून माझ्या मंत्रशक्ति पासून मला परावृत्त करणार आहेस."

शरभच्या तोंडी ह्या गोष्टी एकून देवन एकदम चकित होऊन गेला. तेव्हां शरभ दात ओठ खात बोलला–"अरे दुष्टा, मी समजलो ते! तू कोण आहेस. तू मांत्रिक नाहीस आणि तुझे नाव पण देवन नाही देवदत्त आहे. तू ह्या देशाचा मंत्री आहेस. कोणत्याही औषधांचा उपयोग न झाल्यामूळे माझ्याकडून राजकुमारीला बरे करून घेण्याकरीता हे सर्व नाटक तू रचलेस नां!"

दुसऱ्याक्षणी राजाच्याद्वारा हुकूम मिळताच चार शिपायी पुढे आले व त्याने झटक्यात त्याला पकडले व त्याचे हात दोरीने बांधले त्याचे शरीर एका पोत्यात कोंबले व पोते बांधून टाकले.

"ह्याला घेऊन जाऊन ह्याचे मुंडके छाटून टाका." राजाने शिपायांना हुकूम फर्मावला.

राजाचा आदेश मिळताच शिपायी तेथून पोते खेचत घेऊन गेले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, शरभला शिक्षा मिळाली ती काय अन्यायाला धरून आहे कां? त्याने दिर्घकालीन व्याधीने ग्रस्त झालेल्या राजकुमारीला आपल्या मंत्रसामर्थ्याने स्वास्थ मिळवून दिले. तरी शरभ राजावर संतापला नाही. खरे तर राजाला शरभचा अपूर्व सत्कार करावयास पाहीजे होता. असे न करता त्याला मृत्युदंड देणे हे काय उचित आहे? या शंकांचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"राजाला आपल्या कुटूंबाचा आणि आपल्या राज्यातील प्रजेचा कुशलक्षेमचा विचार करावयासच हवा. शरभला अनेक अद्भूत मंत्रशक्ति प्राप्त होत्या. त्यामुळे मनात आले तर तो प्रजेचे काहीही चांगले वाईट करू शकत होता. आता तर त्याच्या मनांत मंत्र्याविषयी सुद्धा द्वेष निर्माण झाला. त्यामुळे असा विश्वास ठेवणे कठीण की, जो मांत्रिक मंत्र्या बद्दल द्वेष करत आहे. तो जरूर पडली तर राजाशी वैर करण्यास सुद्धा मागे पुढे पहाणार नाही. असा अद्भूत महाशक्ति असणारा माणूस केव्हांही धोकेबाज होऊ शकतो. ह्या गोष्टी जाणूनच राजाने त्याला शिरच्छेदाचा दंड सुनावला."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



     

# रहस्य

रामदास एका वर्षी रिकाम्या हाताने गणेशपुरला आला. आणि वर्षात त्याने एक एकर जमिन खरेदी केली. चार वर्षात तो एक व श्रीमंत माणसात गणला जाऊ लागला.

त्याच गावांत मंगलदास नावाचा एक शेतकरी रहात होता. इतक्या थोड्या दिवसात रामदास इतका श्रीमंत कसा बनला. हे कारण शोधण्याकरीता मंगलदासने आपले डोके खूप चालवले. त्याला काही कारण सांपडले नाही. शेवटी रामदासच्या तोंडूनच ते रहस्य शोधण्याकरीता एक दिवस निश्चयाने मंगलदास त्याच्या घरी गेला.

तेव्हां रामदास एक लहान दिवा कोनाड्यात आणून ठेवत होता त्याने मंगलदासला पहाताच स्वागत केले व घरात बोलवून विचारले–"दादा साहेब, कसे काय येणे केलेत ? सांगा काही जरुरीचे काम आहे ?"

"तसे काही विशेष नाही !" असे म्हणत मंगलदासने आपल्या येण्याचे कारण सांगत म्हटले–"दादा साहेब, आपण दोघे एकाच गावांतले रहाणारे मग मलाही लवकरात लवकर श्रीमंत बनण्याचे रहस्य कां नाही सांगत ?"

"ह्यात रहस्याचे काय कारण" असे म्हणत त्याने एक चटई आणून अंथरली व त्यावर त्याला बसवले. नंतर दिव्याची वात विझवत रामदासच्या जवळ येऊन बसला. मंगलदासने आश्चर्याने थक्क होत विचारले–"रामदास हे मला सांग. तू जळती दिव्याची वात कां विझवलीस ?"

तेव्हां रामदास मोठ्या ताठ्याने म्हणाला–"आपल्याला अशा आरामात गप्पा करीत असतांना दिव्याचे तेल फुकट कां खर्च करायचे."

हे ऐकताच मंगलदास झटकन् उठून उभा राहिला. आणि म्हणू लागला–"ठीक, मी आता चलतो." "अरे बाबा, तू तर धनवान बनण्याचे रहस्य ऐकण्याकरीता आला होतास नां ?" रामदासने विचारले.

"ते रहस्य काय हे तू न सांगताच मला समजले." असे म्हणत मंगलदास आपल्या घरी निघून गेला.





# ब्याद टळली

सुरेश एका सरकारी कचेरीत अधिकारी होता व स्वभावाने भयंकर संकोची. थोड्या दिवसांने त्याने लग्न केले. त्याची पत्नी घरी आली परंतु आश्चर्य त्याची बायको पण संकोची स्वभावाचीच निघाली.

ज्या दिवशी सुनंदा आपल्या पतीच्या घरी आली. त्याच दिवशी दोघांच्यात स्वयंपाक करण्याच्या बाबतीत संकोच सुरू झाला. सुरेश थोडावेळ इकडे तिकडे करीत राहला व म्हणाला–"तुला हे घर नविन आहे. त्यामुळे तुला स्वयंपाक करावयासत्रास पडेल. म्हणून खानावळीतून जेवण आणू!

सुनंदाने विचार केला की, नवऱ्याकडे घरगुती स्वयंपाकाचे सामान आणवले तर वाईट दिसेल म्हणून तिने हळू आवाजात म्हटले–"आपण जर स्वयंपाकाचे सामान आणून दिलेत तर स्वयंपाक करायला मला काही त्रास होणार नाही.

त्या संकोची स्वभावाच्या नवरा-बायकोचा संसार अशा तऱ्हेने पहिला वाहिला सुरू झाला.

एक दिवस संध्याकाळी दोघे गावाच्या टोकाला असलेल्या शंकराच्या देवळात गेले. येतानां घरी यायला अंधार झाला रस्त्यात एका म्हाताऱ्याशी त्यांची गाठ पडली तो त्या उभयतानां पहात म्हणाला–"बाबूजी, मला अंधेरी आल्या सारखे वाटते आहे. मी बहुदा रस्त्यातच पडतो की काय! तेव्हां आपण थोडा हातभार लावलात तर पुण्य घडेल.

त्यावर सुरेशने त्याच्या खांद्याला धरले व त्याला हळूहळू चालवत नेऊ लागला. तेवढ्यात त्या रस्त्याने दोन सभ्य माणसे त्यांना समोर चालत येत असतांना दिसली. त्यांनी सुरेशकडे जरा तिरस्काराने रागाने पाहिले व म्हटले–"तुम्ही तर

स्मिता खेरे



दिसायला चांगले शिकले सवरलेले वाटता. मग म्हाताऱ्या वडीलांबरोबर अशी वागणूक तुम्हांला शोभा देते कां ? थोडी तरी जिवाला चाड पाहिजे होती!'' असे म्हणत त्यांनी एका गाडीवानाला हांका मारले.

सुरेश संकोचाने क्षणभर गडबडून गप्प राहला त्याला हे ही सांगणे संकोचाचे वाटू लागले की ते माझे वडील नाहीत. तोपर्यंत त्यांनी त्या म्हाताऱ्याला गाडीत सुद्धा बसविले. आणि म्हटले–''पहात काय राहलात चला लवकर गाडीत बसा जा.''

संकोचानें सुरेश व सुनंदा गुपचुप गाडीत चढून बसलेवघरी पोहोचले. पहातात तो म्हातारा तापाने चांगलाच फणफणलेला होता. सुनंदाने त्याच्या अंथरूणाची सोय केली. सुरेशने जाऊन वैद्याला बोलावून आणले.

चार दिवस असेच उलटले. म्हातारा चांगला खुटखुटीत बरा झाला. परंतु त्याने घरातून बाहेर निघण्याचे नावच काढले नाही. सुरेशने म्हाताऱ्या करीता शंभर रुपायाच्या वर खर्च केला.

आणखी चार दिवस असेच निघून गेले. नवव्या दिवशी सुरेश रागानेच पुटपुटला–''न जाणो हा म्हातारा आमचे घर सोडून केव्हां निघून जातो ?

''त्यांनाच जाऊन कां नाही विचारीत'' सुनंदा म्हणाली.

''तुच उद्या जेवण झाल्यावर विचार !'' सुरेश म्हणाला.

सुनंदाला म्हाताऱ्याला विचारायला खूप संकोच वाटत होता. त्यामुळे ती गप्प राहली.

ह्यानंतर दोन दिवस उलटले. शेवटी त्या दोघांना वाटू लागले की हा म्हातारा आपल्या घरातून जाणे अशक्य आहे.

शेवटी डोके चालवून एक उपाय सुरेशला सापडला सुरेश म्हाताऱ्याच्या खोलीत येत म्हणाला–''हे पहा बाबा, उद्या सकाळी मी व सुनंदा तिच्या माहेरी जाणार आहोत. तेथे एका लग्नाचे आम्हांला बोलावणे आहे. आम्ही दोन दिवसानंतर घरी परत येऊ!''



लागतात. मी एका मिनिटात त्या म्हाताऱ्याच्यापासून तुमची सुटका करते बघ ! माझे म्हणणे ऐकून त्याप्रमाणे वागण्यास मात्र तू तयार हो!''

त्यानंतर सुनदाने थोडी साखर घेऊन त्याची पावडर केली व त्याच्या औषधा सारख्या पुड्या बांधल्या व तिला दिल्या तिसऱ्या प्रहरी जव्हा म्हातारा चहापाण्या करीता उठून खोली बाहेर आला तेव्हां त्याला पाहिले न पाहिलेस करत नंदिनी सुनंदाला म्हणाली–''अग त्या म्हाताऱ्याला मरणाच्या दाढेतून तुम्ही वाचवलत त्यामुळे त्याची जबाबदारी तुमच्यावर येऊन पडली पण तू म्हणतेस तुमची मिळकत त्याला सांभाळायला पुरी पडत नाही. तेव्हां त्याला निचितपणे मरण येण्याकरीता तुम्हांलाच काहीतरी मार्ग शोधायला पाहिजे नां !

"हो, हो, तू म्हणतेस ते बरोबर आहे !" सुनंदाने नंदिनीच्या हो ला हो करत म्हटले.

"मग ऐक, माझ्याजवळ एक प्रकारचे विष आहे. त्यातील थोडे विष तू म्हाताऱ्याच्या खाण्यात मिसळून दे. एका आठवड्या नतंर तो स्वर्गात किंवा नरकात जाऊन पोहोचेल. परंतु ह्या विषाचाच उपयोग झाला. हे कोणत्याही मोठ्यात मोठ्या वैद्याला सुद्धा समजणार नाही. म्हाताऱ्याला सुद्धा मरताना कोणत्याही तऱ्हेचा त्रास होणार नाही! समजले" असे म्हणत तिने पुड्या सुनंदाच्या हातात दिल्या.





लग्न एकाच दिवशी झाल्यामुळे नंदिनीने सुनंदाला पाहिले नव्हते त्यामुळे ती तिची चौकशी करण्याकरीता आली.

सुनंदा नंदिनीला पहाताच अतिशय आनंदीत झाली. ती आपल्या खुप गमंती-जमती तिला सांगत होती. तेवढ्यात तो म्हातारा तेथे येऊन टपकला आणि धम-कावणीच्या स्वरात म्हणाला—"ह्या फालतू गप्पा केव्हां बंद करणार? मला खायला देणार आहेस कां नाही?"

सुनंदा गुपचुप उठून गेली व म्हाताऱ्याला जेवायला वाढून बाहेर आली. तेवढ्यात खाण्याचे ढोंग करीत तो चिडून म्हणाला—"कितीदा सांगितले मला ही भाजी आवडत नाही तरी दुसरी कोणती भाजी करीत नाहीस?" अशा तऱ्हेने म्हातारा काही ना काही बरळत राहला शेवटी जेवण संपवून आपल्या खोलीत जाऊन निजला.

नंदिनीने ते सर्व बोलणे ऐकले व सुनंदाला हंसत विचारले—"काय ग, तुझे सासरे भयंकर तापट दिसतात? तुझा पती पण तसाच आहे कीं काय?"

"अग, तो म्हातारा माझा सासरा नाही. रस्त्यात चालत असणाऱ्याला घरी आणून आमच्या डोक्याला त्रास करून घेतला आहे. असे म्हणून सुनंदाने सर्व वृत्तांत सांगितला.

"तुमच्या संकोची स्वभावानेच तुम्हाला हा त्रास सहन करावा लागत आहे" असे म्हणत नंदिनी आश्चर्य करू लागली.

"मग तूच सांग नां! आता मी काय करू? आम्ही त्याला घरातून बाहेर काढण्याच्या गोष्टी केल्या तर हा आम्हांला विहिरीत मी जीव देईन अशा धमक्या घालतो आणि तसे झाले तर खरच आमची अब्रु जाईल नां!" सुनंदा डोळ्यांतून आंसवे गाळत म्हणाली.

त्यावर नंदिनी खदखदून हंसू लागली व म्हणाली—"अग वेडी, तू तर एक नंबरची मूर्ख आहेस. एवढी छोटी गोष्ट सुद्धा समजत नाही. जे लोक अशा धमक्या घालतात ते मरणाचे नाव काढताच थरथर कांप लागतात. मी एका मिनिटात त्या म्हाताऱ्याच्यापासून तुमची सुटका करते बघ! माझे म्हणणे ऐकून त्याप्रमाणे वागण्यास मात्र तू तयार हो!"

त्यानंतर सुनंदाने थोडी साखर घेऊन त्याची पावडर केली व त्याच्या औषधा सारख्या पुड्या बांधल्या व तिला दिल्या तिसऱ्या प्रहरी जव्हां म्हातारा चहापाण्या करीता उठून खोली बाहेर आला तेव्हां त्याला पाहिले न पाहिलेसे करत नंदिनी सुनंदाला म्हणाली—"अग त्या म्हाताऱ्याला मरणाच्या दाढेतून तुम्ही वाचवलत त्यामुळे त्याची जबाबदारी तुमच्यावर येऊन पडली पण तू म्हणतेस तुमची मिळकत त्याला सांभाळायला पुरी पडत नाही. तेव्हां त्याला निचितपणे मरण येण्याकरीता तुम्हांलाच काहीतरी मार्ग शोधायला पाहिजे नां!

"हो, हो, तू म्हणतेस ते बरोबर आहे!" सुनंदाने नंदिनीच्या हो ला हो करत म्हटले.

"मग ऐक, माझ्याजवळ एक प्रकारचे विष आहे. त्यातील थोडे विष तू म्हाताऱ्याच्या खाण्यात मिसळून दे. एका आठवड्या नतंर तो स्वर्गात किंवा नरकात जाऊन पोहोचेल. परंतु ह्या विषाचाच उपयोग झाला. हे कोणत्याही मोठ्यात मोठ्या वैद्याला सुद्धा समजणार नाही. म्हाताऱ्याला सुद्धा मरंताना कोणत्याही तऱ्हेचा त्रास होणार नाही! समजले" असे म्हणत तिने पुड्या सुनंदाच्या हातात दिल्या.









स्वयंपाक घराच्या बाहेरूच म्हाताऱ्याने ह्या सर्व गोष्टी ऐकल्या व तो घाबरून जात आपल्या खोलीत परत आला व आपले सामानसुमान बांधत सुनंदाला हांका मारत म्हणाला–"मुली, ऐक, मी इथून जात आहे. तू वाईट वाटून घेऊ नकोस. मी विचार केला की ह्या म्हातारपणी एकाच ठिकाणी कुजत पडण्यापेक्षां तिर्थक्षेत्र हिंडून पहाणे काय वाईट आणि माझी इच्छा पण होती. मी आज सकाळीच ही गोष्ट तुमच्या कानावर घालणार होतो की, काल रात्री एका देवीने मला दृष्टांत दिला की तू तिर्थक्षेत्र हिंड. आता मी चलतो!"

"हे काय म्हणता तुम्ही बाबा! माझ्या पतीला न सांगताच तुम्ही कसे जाऊ लागलात. पण ठिक आहे. जातो म्हणता आहात तर थोडा नाष्टा पाणी तरी करून जा" सुनंदा म्हणाली.

खाण्याची गोष्ट काढताच म्हातारा कांपू लागला व गडबडत म्हणाला–"मी एक क्षणभर देखील आता थांबू शकत नाही. राहूकालापूर्वी जाणे चांगले." असे म्हणत म्हातारा घरातून गेला.

त्या दिवशी जेव्हां संध्याकाळी सुरेश नोकरीवरून घरी आला. तेव्हां सुनंदाने सर्व सविस्तर बातमी सुरेशला सांगितली आणि हुश् करीत म्हणाली–"नंदिनीच्या उपकारामुळे आपल्या मागची म्हाताऱ्याची कटकट तर टळली."

सुरेश काही बोलणार तेवढयात नंदिनीने त्याला तोडत म्हटले. आपण दोघांनी आपला संकोची स्वभाव काढून टाकावयास पाहिजे. अग थोडी उपकार बुद्धी पाहिजे. नाही-तर दाक्षिण्य म्हणता येत नाही परंतु आपल्या ताकती पलीकडे दुसऱ्यावर उपकार करणे म्हणजे संकटे ओढून घेण्यासारखेच आहे.

"आता आपणही गोष्ट अनुभवानीच जाणली आहे. काय ग सुनंदा मी म्हणतो ते खरे आहे ना!" असे म्हणत सुरेशने बायकोच्या डोळ्यात रोखून पहात म्हटले.

सुनंदाने हसत त्याच्या म्हणण्याला होकार दिला.





# कुरीत

प्राचिनकाळी जेव्हां ब्रह्मदत्त काशीवर राज्य करीत होते, तेव्हां बोधिसत्वांनी ब्रह्मदत्तच्या मुलाच्या रुपे जन्म घेतला. त्याचे नाव ब्रह्मदत्त कुमार असे ठेवले गेले. त्याने तक्षशिला येथे जाऊन वयाच्या सोळाव्या वर्षाच्या आत वेद-उपनिषिदे इ. चे अध्ययन करून शिक्षण पूर्ण केले व तो काशी राज्यात परत आला. त्यानंतर काशीच्या राजाने त्याचा राज्याभिषेक करविण्याचे योजले.

त्या युगात काशी राज्यातील जनता वेगवेगळ्या देव-देवतांची पुजा-अर्चा करीत होती. काही मेळे होत असत तेव्हां त्यात बरीच कोंबडी व बकरी देवांस बळी चढविले जात व त्याचे रक्त देवीला नैवेद्य म्हणून अर्पण केलें जाई. ब्रह्मदत्तकुमार जनतेचा हा अंधविश्वास व दुराचार पाहून अत्यंत दुःखी होऊन गेला. तो विचार करीत म्हणाला–"माझ्या राजा बनण्यानंतर रक्ताचा एक थेंब देखिल मी न सांडून देता ह्यां अंधविश्वास व दुराचाराचा नाश व दुराचाराचा अंत करून टाकेन."

काशीनगरा बाहेर एक मोठे विशालकाय वडाचे झाड होते. लोकांचा विश्वास होता. की, एक देवी त्या झाडावर रहाते व आपल्या मनातील इच्छा-आकांशा ती नवस केल्यास पूर्ण करते.

एक दिवस ब्रह्मदत्तकुमार आपल्या रथात बसून शहरातील बाहेर असलेल्या त्या वडाच्या झाडापाशी येऊन पोहोचला त्यावेळी बरेच स्त्री पुरुष भक्तिभावनेने त्या झाडाला प्रदक्षिणा घालत असलेले त्यांनी पाहिले. झाडापासून थोड्या-दूरवर ब्रह्मदत्त कुमार खाली उतरले. त्यांनी फुले वाहून त्याची पुजा केली व त्या झाडा-भोवती तिन प्रदक्षिणा घातल्या नंतर तो

     

रथात बसून शहराकडे परत निघाला. त्या दिवसा नंतर तो बहुदा बरेच वेळां त्या झाडाकडे येऊ लागला अंधविश्वास ठेवणाऱ्या लोकांप्रमाणे तोही बरेचदा येऊन झाडाची पुजा करून त्याला प्रदक्षिणा घालू लागला.

काही दिवसानंतर त्या म्हाताऱ्या राजाचा देहान्त झाला व ब्रह्मदत्तकुमार राजा बनला.

राज्याभिषेकानंतर तावडतोब त्याने दरबार भरवला व सांगितले तुम्हा लोकांपैकी कोणासही माहीत नाही की, मी कसा राजा झालो आहे, परंतु आपल्याला हे समजलेच असावे की मी जेव्हां युवराज होतो तेव्हां नगराबाहेरील स्थित वडाच्या झाडाची नियमित पुजा करीत होतो व मी नवस सुद्धा केला होता की जर का मी राजा झालो तर मी एक हजार प्राण्यांचा बळी तुला देईन. माझा नवस पूर्ण झाला, आता मला माझ्या वचना प्रमाणें वागणें भाग आहे. हे ऐकताच दरबारातील सर्वजण अत्यंत आनंदीत झाले. त्यावर मंत्र्याने राजाला विचारले–"महाराज सांगा! वडाच्या झाडाला बळी चढवण्याकरीता कोणते प्राणी पाहिजेत म्हणजे आम्ही त्याचा सर्व बंदोबस्त करून टाकतो.

"मी जनावरांचे बळी देण्याचा नवस केला नव्हता तर जनावरांना देवताचे बळी चढविणाऱ्या माणसांचा नवस केला होता. त्यामुळे आपल्या लोकांमधील' अशी एक हजार माणसे घेऊन या. की मी माझा नवस फेडू शकेन. त्याच बरोबर देशात अशी दवंडी पिटवा की, आजपासून जे जनावरांचा बळी चढवतील त्यांनाच वडाच्या झाडाचा बळी चढवला जाईल.

दरबारातील राजाची घोषणा ऐकल्यावर सर्वजण थक्क झाले. तरी सुद्धा ते लोक बळी देण्याच्या बाबतीत विश्वास ठेवणारे होते म्हणून गप्प राहले. सर्व राज्यात दवंडी पिटवीली त्या दिवसापासून काशी राज्यात जादु केल्याप्रमाणे जनावरांचा बळी चढवणे एकदम बंद झाले.



आपल्या नद्या :

## गंगा - १

नारदमुनि एकदा भूलोकातून देवलोकात भ्रमण करावयास निघाले. त्या पौर्णिमेच्या रात्री शुभ्र चांदण्याच्या प्रकाशात हिमालय पर्वताच्या दऱ्या खोऱ्यातून वीणा वाजवित नारद आनंदाने जात असतांना.




एका घाटात त्यांना अद्भुत सौंदर्य असलेले अनेक स्त्री-पुरुष दिसले. हे कोण असू शकतील असा विचार करीत नारद मुनी त्यांच्या जवळ येऊन पोहोचले.





"तुम्ही कोण आहात ? असे विचारत जेव्हां नारद अगदी त्यांच्या जवळ आले. तेव्हां त्यांना आणखी एक गोष्ट कळून आली. तेथे जमलेल्या व्यक्तिंच्या मध्ये प्रत्येक जण विकलांग होता. कोणाला डोळे नव्हते तर कोणाला कान, कोणाचा हात तर कोणाचा पाय.










ते लोक नारदाला उत्तर देण्यास संकोच करू लागले. परंतु थोड्या वेळाने त्या लोकांनी सांगितले की ते लोक राग व स्वर ह्याचे प्राण बनलेले गंधर्व आहेत. जेव्हां गायक व गायीका रागाचा आलाप करतात. तेव्हां त्याचा दुष्परिणाम आमच्या शरिरावर होतो. त्यामुळे एक एक अंगाने अपंग होऊ लागतो..

हे उत्तर ऐकून नारदाला अत्यंत दुःख झाले. त्याने कुतुहलाने प्रेरित होऊन त्या लोकांना आणखीन काही प्रश्न विचारले. तेव्हां त्या लोकांनी उत्तर दिले परम शिवाचे गाणे ऐकल्याने आम्ही पूर्ववत होवू. तेव्हां नारदाने तत्क्षणी कैलाश पर्वतावर जाऊन शंकराचे दर्शन घेत सारा वृत्तांत सांगितला.





शंकराने गाण्याचीतयारी दाखविली. परंतु एक अट घातली की, आपले गाणे ऐकण्यास कमीत कमी एक तरी परीपूर्ण श्रोता असावयास पाहीजे. आणि परिपूर्ण श्रोता दोनच आहेत एक ब्रह्मा आणि विष्णु तेव्हां नारदाने ब्रह्माकडे जाऊन त्याला विनंती केली की त्याने शंकराचे गीतगान ऐकण्यास यावे.

शंकराचे गाणे ऐकावयास येण्याची ब्रह्माने आनंदाने स्विकृती दिली. तरीही नारदाला शंकराचे गाणे ऐकावयास घेऊन जाण्याकरीता दोघेही परिपूर्ण श्रोता असावेत असे वाटले म्हणून तो विष्णुकडे आला. त्याने विष्णुला सर्व समाचार सांगितला. तेव्हां त्यानेही येण्याची आनंदाने तयारी केली.





ह्यानंतर ब्रह्मा विष्णु आणि गन्धर्व शंकराच्या जवळ येऊन पोह्चले. शंकराने बराच वेळेपर्यंत मौन धारण केले. ध्यान धारणा केली नंतर हळू आवाजात आलाप करण्यास सुरवात केली.

ते त्याचे अद्भुत संगीत ऐकून सर्व लोक तन्मय होऊन गेले. आणि कृतज्ञतेने सर्वांनी शंकराला साष्टांग नमस्कार केला.














शंकराच्या अद्भुत संगीत लहरींनी सारा आसमन्त अत्यंत शोभायमान दिसू लागला. झाडे-झुडपे फुलांनी डवरून आली. थंडगार वारा वाहू लागला. तेथील वातावरणाने पृथ्वीला स्वर्गाप्रमाणे शोभा आली.

त्याच सुमारास तेथे एक विचित्र घटना घडली. शंकराचे मृदुमधुर संगीत तन्मय होऊन ऐकणाऱ्या विष्णूच्या शरिराचा एक भाग पाणीमय होऊन पाझरू लागला. तो विचित्र प्रकार केवळ ब्रह्मालाच समजला.





तत्क्षणी ब्रह्माने त्या वहाणाऱ्या जलधारा आपल्या कमंडलूत भरून घेतल्या. त्याच जलधारा म्हणजे गंगा नदीचा उगम आहे. विष्णूच्या शरिरातून वहाण्यामुळे ह्या गंगा-नदीला अत्यंत पवित्र मानले जाते.

# ज्ञानोदय

चित्रपुरीचा राजा किर्तिसेनच्या मनांत एकच चिंता लागून राहीली की, थोड्या दिवसात आपल्याला मृत्यु येणार. ही गोष्ट जाणून राजाच्या मंत्र्याने धर्मसेनने राजाला विनविले की, वनात तपश्चर्या करणाऱ्या ज्ञानानंद नावाच्या ऋषिंना बोलावून घ्यावे.

किर्तिसेनने ज्ञानानंद ऋषिंना दरबारात बोलावून घेतले. व आपली काळजी सांगून विचारले–"मुनिवर्य, तुम्ही मला असा काही उपाय सांगू शकाल कां? की, त्याने माझे मरण टळू शकेल!" ज्ञानानंद स्मित करून म्हणाले–"राजन्, आपण तर तरुणावस्थे मध्ये आहात. मग आताच अशा भ्रमात पडून आपण कां मृत्युला घाबरता परंतु काही वर्षांनी आपण म्हातारे व्हाल. तेव्हां आपली दृष्टी मंद पडेल. श्रवणशक्ति कमी होईल. कंबरेत वांकाल. हा सर्व निसर्ग प्रकृतिचा धर्मच आहे नियम आहे. त्या स्थितीत आल्यावर आपल्या मधील ह्या हावरेपणाचा भाव पण केव्हांच लुप्त होऊन गेलेला असेल. तेव्हां केव्हां न केव्हां तरी नक्कीच येणाऱ्या ह्या मृत्युची गोष्ट घेऊन विनाकारण आताच काळजी करण्याचे कारण काय!"

किर्तिसेनने ज्ञानानंदाना नमस्कार करीत म्हटले–"महात्मन्, आपण माझ्या मनांत ज्ञानोदय निर्माण केलात. मला ही चिंता किड्या सारखी पोखरत होती. त्यातून मला आता मुक्तता मिळाली.












# शिक्षण अधिकारी

चंद्रचुड राजाच्या दरबारात गौरांग व गंभीर नावाचे दोन कवी होते. गौरांग अनेक उत्तम काव्ये रचून महाकवीच्या रूपानें प्रसिद्ध झाला होता. वयानें लहान असला तरी गंभीर कवी दृष्टीने मोठा होता. व आपल्या काव्य रचनेच्या श्रेष्ठ-तेच्या कारणांमुळे तो हळूहळू लोकांची प्रशंसा प्राप्त करू लागला होता.

साहित्यप्रेमी चंद्रचुड राजाच्या भेटी करीता राजधानीत अनेक उत्तम कवी-पंडीत व विद्वान येत असत. राजाने विचार केला की अशा तऱ्हेने भेटीस येणाऱ्या कवी विद्वान पंडीतामध्ये सर्वोत्तम कोण आहे याची निवड करण्याकरीता दरबारात एका अत्युत्तम विद्वानाची जरूर आहे.

राजाने ही गोष्ट आपला मंत्री मिहिर-वर्मा याला सांगितली. त्यावर मंत्र्याने आश्चर्ययुक्त चेहरा करत म्हटले— "महाराज, गौरांग सारखा उत्कृष्ट कवी आपल्या दरबारात असतांना आपल्याला दुसऱ्या कवींचा शोध करण्याची काय जरुर आहे ? आपण त्याला शिक्षण अधिकाऱ्यांच्या पदावर नियुक्त करावे. तो आपल्याला योग्य वेळी योग्य तो सल्ला देऊ शकेल.

मंत्र्याचे बोलणे ऐकून राजा काहीक्षण गप्प राहला. ह्या घटनेनंतर एका आठ-वड्याने ललाट देशातून भूषण नावाचा एक कवी राजाच्या भेटीच्या इच्छेने राजधानीत आला व राजाचे दर्शन घेत म्हणाला—"प्रभु! मी माझे पहिले काव्य आपल्याला भेट देण्याच्या इच्छेने इतक्या दूरवरून आलो आहे!"

चंद्रचुड राजाने भूषणच्या हातून तो काव्यग्रथं घेतला व आपल्या राजभटांना त्याचा आदर सत्कार करून त्याची

के. गिता

उतरण्याची व्यवस्था करण्याची आज्ञा केली. ह्यानंतर राजाने गौरांगला बोलावले व त्याच्या हातात भुषणने लिहूलेले काव्य देत म्हटले—"कविवर, आपण हे काव्य वाचून ह्या संबधी आपले विचार सांगावेत.

दुसऱ्या दिवशी गौरांगने राजाचे दर्शन घेत सांगितले—"महाराज, मी सर्व काव्य वाचले कवीचा हा पहिलाच प्रयत्न आहे. तरी सुद्धा खूप शोधून सुद्धा एक सुद्धा चुक ह्यात दिसली नाही"

गौरांग गेल्यानंतर राजाने कवी गंभीरला बोलावणे पाठवले व त्याच्या हातात भुषणचे काव्य देत विचारले—"कविवर हे काव्य वाचून आपले विचार काय ते सांगा ?"

दोन दिवसानंतर गंभीर राजाला दर्शन देत म्हणाला—"महाराज, हे काव्य करणारा कवी कोणी नवीन दिसत आहे. तरीही ह्याने केलेली काव्ये व त्यातील मुख्य मुद्दे अत्यंत प्रशंसनिय मानले पाहिजेत!"

गंभीर कवी गेल्यानंतर राजाने मंत्र्याला म्हटले—"शिक्षण अधिकाऱ्याच्या पदावर उचीत सल्ला देण्याकरीता मी गंभीरला नियुक्त करीत आहे तरी तुम्ही त्याची पूर्ण तयारी करा!"

मंत्री मिहिर शर्मा आश्चर्यात पडला व म्हणाला—"महाराज, असे हे महत्वाचे काम आपण लहानवयी असलेल्या गंभीर कवीला देणे उपयुक्त समजता? ही गोष्ट जर गौरांग कवीला समजली तर त्याला अनावर











दुःख नाही कां होणार? तरीही तुम्ही असा निर्णय घेतला आहात म्हणजे ह्या पाठीमागे नक्की काहीतरी खास उद्देश असावा!"

राजा चंद्रचुड क्षणभर थांबून म्हणाला– "कवी भुषणचे काव्य वाचून गौरांग व गंभीरने जे आपापले विचार आपल्या-समोर मांडले ते तर तुम्ही ऐकलेच आहांत!"

ह्यावर मंत्र्याने स्विकृतीसुचक मान हलविली.

ह्यानंतर राजा म्हणाला–"ह्या दोन कवींनी कवि भुषणच्या काव्यासंबधी आपापले विचार व्यक्त केले ते ऐकल्यावर मला असे वाटू लागले की, ह्या पदावर नियुक्त करण्यास गंभीर कवीच योग्य होऊ शकतो. राजदरबारात आपल्या कलांचे प्रदर्शन करण्याकरीता येणाऱ्या कविचे उचित रुपात स्वागत करून त्यांना बक्षीस देऊन पाठविण्या करीता शिक्षण अधि-काऱ्यांत पांडित्या बरोबर अभिरुचीची सुद्धा आवश्यकता आहे. फक्त त्यांचे दोष काढून दाखविण्यात नाही हो नां!"

मंत्र्यानें होकारार्थी मान हलविली.

ह्यानंतर फिरून राजा चंद्रचुड म्हणाला– "जर कां हे शिक्षण अधिकाऱ्याचे पद आपल्या गौरांग कवीला दिले तर माहीत आहे कां काय होईल? राजाश्रयाच्या आशेने येण्याऱ्या कवीचे दोष दाखविण्या-च्याच प्रयत्नात राहील. परंतु गंभीर कवी त्यांच्या पांडित्या व गुणांविषयी सखोल विचार करून परिक्षण करेल. त्यामुळे ह्या पदाकरीता चांगल्यात चांगल्या कवीची जरूर असेल तर गंभीर कवीच सर्वदृष्टीने योग्य आहे.

राजाचा विचार ऐकून मंत्र्याने विचार केला की, राजाच्या सांगण्यात काही तथ्य आहे तोच निर्णय उचित आहे.

ह्यानंतर त्या पदावर गंभीर कवीची नेंमणुक केली. त्या पदावर काम करीत असतांना गंभीर कवीने कवी व पंडीत ह्यानां राजाश्रय प्राप्त करून दिला व तो सुद्धा एक विवेकशिल व अत्यंत उदार-व्यक्ति म्हणून दरबारात प्रसिद्ध पावला.






# आत्मस्तुति

हेमपुर नावाच्या गावात नागेंद्र व वरलक्ष्मी नावाचे एक जोडपे रहात होते. गावातील श्रीमंत लोकांच्यात त्याची गणना होत असे. त्यांना गोविंद नावाचा एकुलता एक मुलगा होता. तो अभ्यासात खूप हुषार होता. तसाच गुणवान सुद्धा. परंतु तो घरातील कोणतीही कामे न करता मित्रांच्या बरोबर उनाडक्या करण्यात व भटकण्यात आपला वेळ घालवित असे. त्याला आईवडिल खूप रागावत तो त्यांची फिकीर कधी करीत नसे.

एकदा गोविंदचा मामा हेमपुरला आला. आपल्या भाच्याची गोष्ट ऐकून त्याला खूप वाईट वाटले. त्याच बरोबर ह्यास कारण आपली बहीण व तिचा नवराच आहे म्हणून त्यांच्याशी तो वाद-विवाद घालू लागला.

"आम्ही तरी काय करणार?" तो लाख वेळासांगितले ऐकतच तरी नाही!" नागेंद्र व वरलक्ष्मी एका सुरात म्हणाले.

गोविंदच्या मामाने त्याला जवळ बोलावून म्हटले–"ऐक, बाळ तुझे आई-वडील तुझी नालस्ती करतात! पाठीमागे सर्व मित्र तुझी टिंगल करतात जो नालायक असतो त्याचा कोणी मान ठेवत नाही!"

"मामा, माझे मित्र तसे नाहीत! गोविंदने स्वाभिमानाने म्हटले.

"तुला जर तुझ्या मित्राच्या स्वभावाची खरी पारख करावयाची असेल तर एक काम कर तू तुझ्याच मोठेपणाच्या गोष्टी त्यांच्यापुढे तिखट मीठ लावून सांग. मग पहा त्यांची प्रतिक्रिया काय होते ते!" मामानी समजावले.

गोविंदने तसे वागण्यास सुरवात केली. परंतु मित्रांना वाटले की हा गंमत म्हणून तसे बोलून आपली स्तुती करीत असेल. म्हणून ते सर्व दुर्लक्ष करू लागले परंतु त्यांना जेव्हां समजले की, गोविंद खरोखर

       



आपली आत्मस्तुती गातो आहे. तेव्हां मित्रांनी चिडून म्हटले–"अरे बाबा, तुला लहानपणापासून पहातो तू काय होतास ते असे असतांना तू आमच्या समोर फुशारक्या कशाला मारतोस !"

तरी सुद्धा गोविंद नाईलाजाने म्हणाला–"तुम्हांला कोणाला माहीत नाही. माझ्या कुटुंबातील माणसे माझ्याशी कसे वागतात. माझ्या बोलण्याचा कसा आदर करतात. पाहीजे तर तुम्ही माझ्या आईवडीलांना व माझ्या मामांना विचारा.

गोविंदच्या फुशारक्या ऐकण्या बाबतीत मित्र कंटाळले. त्यामुळे हळू हळू त्याच्या मित्रांनी भेटणे बोलणे चालणे बंद केले.

एक महिन्या नंतर गोष्ट येवढी विकोपाला गेली की, गोविंदला आपला म्हणून म्हणण्यास एकही मित्र राहला नाही. सर्व त्याच्यापासून दूर राहू लागले.

त्यानंतर गोविंद आपल्या मामाला भेटून म्हणाला–"मामा, तुम्ही म्हणालात ते खरे आहे! माझे मित्र द्वेष करणारे आहेत. मी मारलेल्या फुशारक्या त्यांना सहन झाल्या नाहीत. आजपर्यंत त्यांच्या सहवासात राहून मी माझा वेळ व्यर्थ फुकट घालवला आता सांगा मी काय करावयास पाहिजे?"

"तू तुझ्या आईवडीलांनी सांगितलेले ऐकून त्यांच्या सांगण्याप्रमाणे वाग व त्यांना आनंदी ठेव." मामाने उपाय सांगितला.

"ते ही माझ्या मित्रासारखे नसतील कशावरून ? ह्याची काय खात्री !" गोविंदने आपली शंका प्रकट करीत विचारले.

"ऐक मुला, तू तुझी खोटी स्तुती केलीस तरी ते ऐकून घेतील परंतु तुझा द्वेष करणार नाहीत" मामा म्हणाला.

त्यानंतर गोविंदच्या मामाने आपल्या बहिणीला व मेहुण्याला समजावत सांगितले जरी कां गोविंदने आपल्या बढाया मारल्या तरी त्या तुम्ही चुपचाप ऐकून शांत रहा व त्याच्या हो ला हो करा.

गोविंदच्या आईवडीलांनी विचार केला की येवढया क्षुल्लक कारणाने जर आपला मुलगा सुधारला तर त्याहून आपल्याला जास्त काय पाहिजे !"

त्या दिवसापासून गोविंद आपल्या आई वडीलांसमोर आपल्या फुशारक्या बढाया मारू लागला. ते मोठ्या सहनशिलतेने व आनंदाने त्याच्या गप्पा ऐकू लागले. त्यामुळे गोविंदच्या मनांत आपल्या आई वडिलांविषयी आदर व प्रेम-भाव वाढू लागला.

तेव्हां पासून तो आपल्या आईवडिलांचे म्हणणे ऐकू लागला व घरातील तसेच शेतीभातीच्या कामात मदत करू लागला.



आपल्या भाच्याच्या वागण्यातील हा बदल पाहून त्याच्या मामाला खूप आनंद झाला. त्यानंतर तो जेव्हां गांवी निघाला तेव्हां त्याने म्हटले–"मुला तू तुझ्या बरोबरीच्या लोकांपुढेच सारखे गुण गात राहलास तर ते काही दिवसाने चिडोचिडे होतील तेव्हां तुझा जो रिकामा वेळ असेल तेव्हां मोठी मोठी काव्ये व ग्रंथ यांचे वाचन करीत जा. त्यात तुला अशा गोष्टी समजतील की, मंत्री राजाची कशी स्तुती करतो. कशी प्रशंसा करतो. त्याप्रशंसेची वाक्ये तू पाठ करून ठेव."

गोविंदने आपल्या मामाच्या सांगण्यानुसार कथा-कहाण्या काव्यरचना वाचण्यास सुरवात केली. मुलांत झालेला बदल पाहून नागेंद्र व वरलक्ष्मी दोघांना अत्यानंद झाला. परंतु तो स्वतःच्या स्तुती बरोबर आईवडीलांची निरर्थक स्तुती करून त्यांना ऐकवून त्यांचे कान किटकू लागला. त्याला कंटाळून ते गोविंदला सुचवू लागले–"बाळा, थोडा वेळ इकडे तिकडे फिरून ये. म्हणजे शरिर स्वास्थ्य चांगले राहिल.

गावातील सर्वांना समजले होते की, त्याच्या सवयी कशा आहेत. म्हणून त्याच्या समोर यायला सर्वजण टाळत असत. एक दिवस गोविंदची आई नवऱ्याला म्हणाली–"अहो, गोविंदच्या खोट्यानाट्या स्तुतीने तर मी कंटाळून गेले.

"जर ह्याचे लग्न लावून दिले तर ही कटकट त्याच्या बायकोच्या



माथी पडले" नागेंद्र म्हणाला.

त्यानंतर गोविंदच्या लग्नाची बोलणी सुरू झाली. परंतु ह्यापूर्वी गोविंद बडबडचा व फुशारक्या मारण्यात नंबर एक आहे हे सर्वांना माहीत होते. त्यामुळे कोणीही आपली मुलगी त्याला द्यायला तयार झाले नाहीत.

त्या सुमारास गोविंदचा मामा परत आला. गोविंदच्या लग्नाची गोष्ट ऐकताच म्हणाला—"माझ्या गावात माझ्या मित्राची एक सुशिल मुलगी आहे ! मी त्यांच्याशी बोलतो ! तुम्ही काळजी करू नका."

गोविंदच्या आईवडीलांनी त्या मुलीबद्दल पूर्वीच ऐकले ती स्वभावाने गुणी होती. परंतु नास्तिक होती. ती देवाची पुजा अर्चा जप-जाप्य उपवास इत्यादींची घृणा करे. तरीही गोविंदला कोणीच मुलगी द्यावयास तयार नसल्यामुळे त्याने ह्या मुलीचे स्थळ पसंत केले.

ह्यानंतर राधा नावाच्या त्या मुलीबरोबर गोविंदचे लग्न थाटामाटात पार पडले. आता गोविंद आपल्या बायको समोर स्वतःचे गुणगाण करू लागला. आणि गोविंदच्या आईवडीलांची त्याच्यापासून सुटका झाली. त्यामुळे सासूसासऱ्याविषयी तिच्या मनात सहानभूती वाढली.

राधाला सासरी सर्वप्रकारचे सुख संपन्न होते. परंतु तिच्या नवऱ्याच्या आत्मप्रौढीला ती कटाळून गेली. त्यामुळे तिने खूप विचार केला व देवपूजा करण्यास सुरवात केली. त्यामुळे गोविंदला आता तिच्या समोर फुशारक्या मारण्यास मिळत नसत. राधाला त्यापासून सुटका प्राप्त झाली परंतु तिच्या मनात देवाविषयी भक्ति वाढू लागली. ती आता पूर्ण आस्तिक झाली. त्यामुळे तिच्या सासू सासऱ्याला अत्यंत आनंद झाला. त्यांनी ती गोष्ट राधाच्या वडिलानां कळविली. गोविंदचा सासरा आपल्या मुलीला भेटावयास तिच्या घरी आला. राधाने वडिलांना सर्व समाचार ऐकवला. एका नास्तिकला आस्तिक बनवण्याऱ्या गोविंदची आत्मस्तुती ऐकून त्याला त्याचे खूप कौतुक वाटले परंतु राधाला नवऱ्याबद्दल अजिबात आदर वाटत नव्हता परंतु भीती वाटत होती.

गोविंदच्या सासऱ्याने गोविंदला भटकायला घेऊन जाण्याच्या उद्देशाने घराबाहेर काढले व म्हटले—"गोविंद, तुझ्या मामांनी तुला नालायक दुष्ट मित्रांपासून तू दूर रहावेस ह्याकरीतां तुला फुशारक्या मारण्यास सांगितले परंतु ती सवय तुझ्या इतकी अंगवळणी पडली की, त्याने तुझ्या घरचीच माणसे कंटाळू लागली व तुझ्या बरोबर आपला वेळ घालविण्यासही घाबरू लागली. त्यामुळे तुला तुझी ही सवय घालविली पाहीजे. "मला आता ही सवय सोडवण्या करीता काही चांगला उपाय सांगा नां!" गोविंद म्हणाला.

सासरा थोडा वेळ विचार करीत राहला नंतर म्हणाला—"मग तू मी सांगितल्या प्रमाणे कर. आज पासून तू आपली स्तुती करण्याचे सोडून दे व समोर येईल त्याचे कौतुक करू लाग. मग पहा कसा ह्याचा प्रभाव पडतो ते" असे सांगून सासरा आपल्या घरी निघून गेला.

गोविंदने तेव्हां पासून सांगितलेल्याचे पालन करण्यास सुरवात केली. परीणाम स्वरूप त्यांच्या मित्रलोकांची संख्या वाढू लागली. कुटूंबातील माणसे त्याचे बोलणे उत्सुकतेने ऐकू लागले. परंतु गोविंदच्या मनात ह्या नविन सवयीची चिड निर्माण होऊ लागली. कारण आजपर्यंत तो स्वतःचीच प्रशंसा करण्याच्या आधीन झाला होता. त्यामुळे दुसऱ्यांचे कौतुक स्तुती करण्याचा त्याला त्रास वाटू लागला. त्यामुळे त्याने खोटी प्रशंसा करणे सोडून दिले. व नुसते बसून वेळ जाईना म्हणून तो घरकामात हातभार लावू लागला.

आपल्या सवयीनुसार लवकरच गोविंद एक कुशल व्यक्ति बनला घरात व घराबाहेर तो लोकांप्रती प्रेम व सद्भावनेनी वागू लागला आणि एक उत्तम गृहस्थ म्हणून प्रसिद्ध झाला.












# उत्तम गृहिणी

एका गावात एक शेतकरी रहात होता. त्याच्या बायकोला पतिबद्दल अपार भक्ति होती. त्याने कोणतेही काम केले तरी तिला ते आवडत असे. त्याच्याजवळ जमिन, शेती दोन गायी पण होत्या. त्यामुळे त्याना खायला-प्यायला व दुधतुपाची कमतरता नव्हती. त्यांचे दिवस ऐष-आरामात जात होते. शेतकऱ्याच्या बायकोने दुध-दही विकून शंभर रुपये जमविले.

शेतकऱ्याच्या बायकोने एक दिवस पतीला सांगितले की—एका गायीच्या दुध-दुभत्यावर आपले भागते. दुसऱ्या गायीचा सांभाळ करणे त्रासाचे आहे. तुम्ही एका गाईला घेऊन जाऊन बाजारात विकून टाका. आपल्याकडे जे शंभर रुपये आहेत ते सणासुदीला आपल्याला उपयोगास येतील.

शेतकऱ्याने आपल्या बायकोचे म्हणणे ऐकले व तो एक गाय घेऊन बाजारात आला. परंतु खूप प्रयत्न करून सुद्धा गाईला मागणी आली नाही. त्यावर शेतकऱ्याने विचार केला. "गाय विकली गेली नाही तर काय बिघडले ?" आपली गाय आपल्यापाशी राहील. असा विचार करून गाईला हांकीत घराच्यादिशेने निघाला.

रस्त्यात एका घोडेवाल्याची त्याची भेट झाली. शेतकऱ्याने घोडेवाल्याला आपली गाय दिली बदली त्याने घोडा घेतला. व आपल्या घरी निघाला. थोड्या अंतरावर त्याला एक बकरीवाला भेटला. त्याने आपला घोडा त्याला देऊन त्याची बकरी घेतली व तो पुन्हा चालू लागला.

थोड्या दूर चालत गेल्यावर एक माणूस एक बदक घेऊन चाललेला दिसला. शेतकऱ्याने बोलून त्याचे बदक घेतले व आपली बकरी त्याला देऊन टाकली थोड्या दूर गेल्यावर एक कोंबडा घेतलेला माणूस दिसला. शेतकऱ्याने कोंबडा घेऊन बदक त्याला देऊन टाकले.

घरी पोहोचण्यास अजून पुष्कळ अंतर चालून जावयाचे होते. त्याला मध्यरस्त्यात-च सटकून भूक लागली. त्यामुळे वाटेतील घरात जाऊन तेथील माणसाजवळ ती कोंबडी त्याने देऊन टाकली. त्याच्या घरी त्याने कोंबडीच्या बदल्यात भरपुर पोटभरून जेवण केले. वाटेत शेतकऱ्याला त्याचा शेजारी दृष्टीस पडला. त्याने शेतकऱ्याला विचारले— "मला समजले तुम्ही बाजारात गेला होतात. काय सौदा चांगला झाला वाटते ?"



शेतकऱ्याने शेजाऱ्याचे ऐकून घेऊन सर्व वृत्तांत सांगितला व विचारले—"सांग बाबा, मी जे काही केले ते बरोबरच केले नां !"

"तू भयंकर चूक केलीस ! तुझ्या ह्या कर्तृत्वावर तुझी बायको भयंकर संतापेल आग पाखडील व तुझ्याशी खूप भांडेल. माझे म्हणणे ऐक." शेजाऱ्याने सांगितले.

"तुला माझ्या बायकोचा स्वभाव माहीत नाही. ती भांडकुदळ नाही." शेतकरी म्हणाला. "जरी कां तुझी बायको भोळी भाबडी असली तरी तू आज जे काय केलेस त्यावर ती नक्कीच नाराज होईल व तुझ्याशी भांडण काढेल.

ही गोष्ट घेऊन दोघांनी आपापल्यात पैज लावली. "माझ्या जवळ शंभर रुपये आहेत. ह्या पैजेकरीता माझे शंभर रुपये लावतो. माझी बायको माझे हे करणे पाहून माझ्यावर रागावणार चिडणार नाही. पण तू किती पैसे पैज लावतोस ?" शेतकऱ्याने विचारले.

"मी पण शंभर रुपये पैज लावतो. शेजाऱ्याने सांगितले.

"तर मग तू एक काम कर तु माझ्या घरी चल. घराबाहेर थांबून आमचे सर्व बोलणे ऐक. असे म्हणत शेजाऱ्याला आपल्या घरापर्यंत घेऊन आला. त्याला ओसरीपाशी थांबवून तो घरात निघून गेला.

"काय हो, तुम्ही आलात ? गाय विकली गेली. ? केवढ्याला विकलीत ?" शेतकऱ्याच्या बायकोने विचारले.








आपल्या गाईला कोणीही विकत घ्यायला तयार नाही. त्यामुळे रस्त्यात एका घोडेवाल्याला देऊन गाईच्या बदली मी घोडा घेतला." शेतकरी म्हणाला.

"तुम्ही चांगले केले. आता आपण गाडी घेतली तर आरामात कुठेही जाऊ येऊ शकतो." बायको म्हणाली.

मी घोड्याला घरी आणले नाही. रस्त्यात एका माणसाच्या हाती देऊन त्याच्या बदल्यात एक बकरी घेतली." शेतकऱ्याने समजावत म्हटले.

"मग तर फारच छान केलेत. घोड्याला सांभाळायला पुष्कळच खर्च पडला असता. पण बकरी कुठे आहे?" शेतकऱ्याच्या बायकोने विचारले.

थोडी थांब नां! माझे बोलणे तर पुरते ऐकून घे. मी बकरी देऊन बदक घेतले." शेतकरी म्हणाला.

"अरे वा." बायको खुष होत म्हणाली.

"मी बदक देऊन एक कोंबडा घेतला!" शेतकरी म्हणाला.

"हात् तिच्या मी पण तेच सांगणार होते. बदकापेक्षां कोंबडा घेतला असतात तर छान झाले असते. कोणत्याही परिस्थितीत कोंबडा असणे चांगले असते कारण सकाळ होताच तो ओरडून आपल्याला उठवू शकतो." बायको अत्यानंदाने म्हणाली.

"अग पण पुढचे ऐक, रस्त्याने येता येता वाटेत मला खूप जोराची भुक लागली. त्यामुळे मी एका घरात कोंबडा देऊन त्यांच्या घरी पोटभर जेवून परत आलो." शेतकरी म्हणाला.

"छान केलेत! मेला कोंबडा नसलेलाच सर्वात उत्तम शेतकऱ्याची बायको म्हणाली.

ह्यावर शेतकरी घराबाहेर आला व आपल्या बरोबर पैज लावणाऱ्या शेजाऱ्याला म्हणाला–"काय मित्रा, आमचे बोलणे ऐकलेस नां? "ऐकले हं छान ऐकले तू माझ्या घरी येऊन पैजेचे शंभर रुपये घेऊन जा. तो शेजारी म्हणाला.

शेतकऱ्यांला बायकोमुळे त्याला गायीच्या किंमतीच्या दुप्पट पैसे मिळाले.






अनरण्य राजाला आपल्या मुलीच्या लग्न विवचनेत पडलेला पाहून मंत्र्यांनी त्याला एक सल्ला दिला–"महाराज, पद्मावती सारख्या सुंदर तरुण स्त्रीने एका महामुनीला पती म्हणून स्विकारणे उचीत होईल. या महामुनीचा जन्म उच्च कुळात झाला आहे. अशा वंशाशी आपल्या वंशाचा संबंध जोडला जाणे भाग्याचेच लक्षण आहे. आपण यास पद्मावतीला दाखवावे. जर पद्मावतीने यांच्याशी विवाहास संमती दिली तर दोघांचा विवाह करून द्यावा. नाहीतर हे मुनी आले तसे निघून जातील."

अनरण्य समोर उभा राहलेला प्रश्न अशा तऱ्हेने सुटला. पिप्पलाद मुनींना पाहून पद्मावतीने त्यांच्याशी विवाहास होकार दिला. त्या दोघांचा विवाह झाला आणि अनरण्यला फार मोठा कीर्तिलाभ झाला.

विवाह होताच पिप्पलाद पद्मावतीला बरोबर घेऊन आश्रमात गेले. पद्मावतीवर बापाचे अपार प्रेम होते. म्हणून त्याला संसाराचा वीट आला आणि त्याने आपल्या मोठ्या मुलाचा राज्याभिषेक करून देऊन आणि आपल्या पांचही राण्यांना बरोबर घेऊन आपल्या मुलीकडे वानप्रस्थाश्रमासाठी म्हणून येऊन राहू लागला.

एकदा पद्मावती नदीवर अंघोळीला गेली. त्यावेळी धर्म स्वतः एका सुंदर तरुण युवकाचे रूप घेऊन तिच्याजवळ



गेला आणि म्हणाला–"हे सुंदरी! मी तुझ्या लावण्ययुक्त तारुण्यास योग्य पुरुष आहे. माझ्याशी विवाह करून घे. त्या थेरड्या बरोबर संसार करून आपले आयुष्य फुकट कां घालवते आहेस? माझ्या बरोबर संसार केलास तर राणी सारखी राहशील."

पद्मावतीने त्याला शाप दिला–"माझ्या पति निंदकाला क्षय होवो!"

धर्म दचकून म्हणाला–"ताई, मी कोणी राजा किंवा राजकुमार नसून स्वतः धर्म आहे. तुझ्या पातिव्रत्याची परिक्षा घेण्यासाठी आलो होतो. तू मला क्षमा कर आणि आपला शाप परत घे.

पद्मावतीला घाईला आणि रागात असा शाप दिल्याबद्दल पश्चाताप वाटला म्हणाली–"शाप परत घेणे आता मला शक्य नाही. पण तुझा एक पाय जाईल." एवढेच करता येणे मला शक्य आहे. धर्म तेव्हांपासून लंगडा झाला.

पद्मावतीच्या पातिव्रत्याची कथा सांगून वशिष्ठ मुनि म्हणाले–"तुम्ही देखील अनरण्या सारखे आपल्या मुलीचा विवाह शंकराशी करावा. तुमची नकीर्ति अजरामर होईल."

मेनका व हिमवान दोघांनी पद्मावतीची कथा ऐकून मैनाक आदिक नातेवाईकांच्या सल्लयाने शंकर पार्वतीच्या विवाहास संमति दिली आणि वशिष्ठ अरुंधती या दंपतीच्या हातात पार्वतीचा हात मोठ्या आनंदाने देत म्हणाले–"आता तुम्हीच या शंकरपार्वतीच्या विवाहाचा मुहूर्त निश्चित करावा."

अरुंधतीने पार्वतीला ती लोकमाता होईल असा आशीर्वाद दिला. माघ शुक्ल एकादशीला आर्द्रा नक्षत्र व वृश्चिक राशीवर लग्नाचा मुहूर्त ठरला.

सप्तऋषींनी विवाह ठरल्याची मंगलवार्ता परत जाऊन शंकराला सांगितली. आणि ब्रह्मदेव, विष्णु आणि इंद्रादिक देव यांना लग्नाच्या तयारीस लागण्यास सांगावे असा सल्ला देऊन सप्तर्षी निघून गेले.

पार्वतीच्या विवाहाची यथायोग्य सर्व तयारी झाली. हिमवानानें आपल्या प्रधानाला सांगून सर्व सामुग्री मागविली. लग्नाच्या पत्रिका सर्व नातेवाईकांकडे आणि मित्रमंडळीकडे पाठविण्यात आल्या. सुवासिनींनी पार्वतीला स्नान घालून नविन वस्त्रे परिधान करावयास दिली. लग्नास योग्य असे सर्व अलंकार घालून पार्वती गौरीहारास बसली.

पार्वतीच्या विवाहाची हिमवानानें कुंकुम पत्रिका पाठविली होती. ती वाचून त्याची मित्रमंडळी व नातेवाईक मंडळी सकुटुंब सपरिवार लग्नाला निघाली. ते आपल्या बरोबर सोन्याची फुले, मोती माणिक्य पाचु आदि मणि अहेर म्हणून द्यायला घेऊन आले. निरनिराळ्या पर्वतांचे प्रमुख नवरत्न चंदन अगरू इत्यादी सुगंधी द्रव्ये, हत्ती, घोडे अहेरासाठी घेऊन आले. हिमवानाने सर्व अहेर आनंदाने स्वीकारून त्यांचा सर्व प्रकारे सत्कार केला. आणि त्यांच्या आतिथ्याची उत्तम व्यवस्था केली.

अतिथींसाठी व विवाहासाठी दश योजन विस्तीर्ण मंडप तयार करण्याचे काम हिमवानाने विश्वकर्माला सांगितले. हिमवानाची राजधानी औषधीपुर उत्तम



प्रकारची तोरणे व पताकांनी सजविण्यात आली होती. जिकडे तिकडे फुलां पानांची तोरणे लावण्यात आली. सडे रांगोळ्या घालण्यात आल्या.

तिकडे कैलास पर्वतावर शंकराला हिमवानाची शुभ पत्रिका मिळाली. ती वाचून शंकराला फार आनंद झाला. वायुदेवाला पाठवून शंकराने नारदाला बोलावून घेतले, नारदाने आपणांस बोलावण्याचे कारण विचारले.

"नारदा, पांच दिवसांनी माझा विवाह हिमवानाची मुलगी पार्वतीबरोबर होण्याचे निश्चित झाले आहे. हि आनंदाची गोष्ट आहे व वेळ थोडा आहे. तुला वांछित



गमनाची शक्ति प्राप्त आहे. म्हणून त्रिलोकातल्या निवासियांस माझ्या वतीने माझ्या विवाहाचे निमंत्रण देऊन ये. कुबेराला भेटून विवाहास योग्य सर्व वस्त्रालंकार घेऊन यायला सांग." शंकराने नारदाला सांगितले.

नारदाने मोठ्या आनंदाने ती कामगिरी स्वीकारली आणि शंकराचा निरोप घेऊन निघाला. ब्रह्मा, विष्णु व इंद्र आदिक देवांना भूलोक व नागलोकांतील लोकांना औपचारिक निमंत्रण देऊन नारद म्हणाला— "माघ शुद्ध एकादशीच्या दिवशी प्रात:काळ शिवपार्वतीचा विवाह आहे. त्या विवाहास उपस्थित राहून वधूवरास आशीर्वाद द्यावा.

त्यानंतर कुबेराला भेटून लग्नासाठी आवश्यक सर्व सामुग्री घेऊन कुबेराबरोबर कैलाश पर्वतावर आला. त्याने केलेला उपकाराच्या वृत्तांत शंकरास सांगितला.

शिव पार्वतीच्या विवाहास ब्रह्मा, विष्णु व इंद्रादिक देव आणि सप्तर्षी कैलास पर्वतावर येऊ लागले. नंदी व भृंगी अतिथि सत्कारास जागोजागी उभे राहले. त्यांनी अतिथीच्या उतरण्याची व फराळाची उत्तम व्यवस्था ठेवली. कुठेही काही कमी पडत नसल्याची सर्वांनी जातीने खबर ठेवली. शंकराने सर्वांना कुशलवार्ता विचारून सर्वांचे स्वागत केले.

ब्रह्मदेवाने पौरोहित्य करावे असे ठरले. विष्णु, इंद्र आदिक आणि सप्तर्षी वडीलधारी मंडळी वरपक्षाकडील मानण्यात आली. शंकराचा मंगल अभिषेक करण्यासाठी बृहस्पतिने मुहूर्त धरला. त्या मुहुर्तावर गरुड गंधर्व यक्षनारी, सप्तमाता, लक्ष्मी, सरस्वती, शची अरुंधतीसारख्या पतिव्रतांनी शंकराला अभ्यंग स्नान घातले. हरिचंदन लावून शंकराला कंठहार घालण्यात आला अत्रि गौतम भृगु आदिक महर्षींनी विधिवत् लग्नकंकण शंकराच्या उजव्या मनगटाल बांधले आणि नवग्रहांची पूजा करविली. शंकराला सजवून तयार केले.

त्यानंतर ब्रह्मदेवाच्या आज्ञेनुसार शंकर नवरदेव होऊन मंगलवाद्य ऐकत व नृत्य पहात औषधीपुरीच्या दिशेने निघाला. कैलास पर्वताच्या रक्षणासाठी रुद्रगणास नेमण्यात आले होते. आणि नंदी व शंकराचे गण शंकराबरोबर निघाले होते. वीरभद्र चंडीश्वर भैरव आपापल्या वाहनांवर निघाले. शंख डमरू घंटा शिंग वेणु वीणा व मृदंगाच्या तालावर भद्रकाली व गण नृत्य करीत निघाले.

नवरदेवांना ऐरावतावर बसवून मिरवणूक निघाली. सरस्वती व ब्रह्मदेव हंसावर लक्ष्मी व विष्णू गरुडावर, शची व इंद्र उडत्या सिंहासनावर बसून निघाले. कुबेर नवनिधी घेऊन शंकराच्या मागे बसला देवनारी व ऋषिपत्नी आणि अप्सरा चित्र विचित्र बहुमोल वस्त्रे परिधान करून विमानातून निघाल्या. तो सर्व सोहळा पहावयास अत्यंत रमणिय भासत होता.

शंकराच्या विवाहाचे वऱ्हाड औषधीपुरीच्या सीमेवर आले. तेव्हां हिमवान आपले पुरोहित मुनीवर्य गर्ग, पत्नी मेनका व पुत्र यांच्या सह मंगलवाद्य वाजत असता सामोरा आला. ब्रह्मदेव, विष्णु देवेन्द्र व ऋषीमुनींस त्याने प्रणाम केला आणि शंकरासमोर हात जोडून उभा राहून म्हणाला—"तू सर्वेश्वर महादेव आहेस.



तुला जामात करवून घेऊन मी कृतार्थ झालो. आता माझ्या घरी येऊन पार्वतीचा हात आपल्या हातात घेऊन आमच्या सर्व कुटुंबियांस कृतार्थ कर." त्यानंतर हिमवानाने वराला पोशाख देऊन सुगंधी द्रव्ये फुले तांबुल देऊन वरपूजा केली. सर्व अतिथींना घ्यावयास उत्तमोत्तम पेये देण्यात आली. त्यांचा श्रम परिहार करण्यासाठी वधूपक्षाकडील लोक पंख्याने वारा करु लागले.

शंकराचे रूप पाहून वधूपक्षाकडील सर्व सर्व स्त्रियांनी पार्वतीला असा पती मिळाल्याबद्दल ती किती सौभाग्यवती आहे याचे परस्परांशी वर्णन केले. तीचे गुणगान



त्या करु लागल्या. नंतर मेनका हात जोडून शंकराला म्हणाली–"मी इतरांचे बोलणे ऐकून काही काही बोलले. ते विसर. तू शंकर आहेस, क्षमा कर. नंतर सौभाग्यवती स्त्रियांनी शंकराला आशीर्वाद दिला.

शंकराला घेऊन हिमवान व मेनका वाजत गाजत व पुष्पवृष्टि करीत जनवासा होता तेथे आले. ज्यांना ज्यांना अहेर द्यावयाचा होता. तो देऊन सर्वांची उतरण्याची उत्तम व्यवस्था जातीने झाली आहे कां. नाही ते पाहून ती दोघे आपल्या घरी परत आली. पार्वती कुळरीती प्रमाणे गौरीहाराला बसली. अंबिकेच्या देवळात जाऊन देवीला नमस्कार केला व देवीचा आशीर्वाद घेतला. सौभाग्यवती स्त्रियांबरोबर ती देवळात जात असतांना देव आकाशातून तिचे दर्शन घेऊन मनात म्हणत होते. ही परमेश्वरी आहे. हिचा शंकराशी विवाह झाला तर आपले सर्व कष्ट दूर होतील.

पार्वती अंबिकेची पूजा करून घरी परतली. मुहूर्ताची वेळ जवळ येत होती. शंकराला ऐरावतावर बसवून मंगलवाद्य वाजवीत विवाह मंडपाजवळ आणण्यात आले. हिमवानाने पुढे येऊन शंकराला मांडवात आणले व ब्रह्मदेवाने बोहोल्यावर मांडलेल्या पाटावर बसविले. हिमवान व मेनका दोघांनी जामाताचे चरण धुवून ते पाणी स्वत:वर शिंपडून घेतले नंतर विधि-वत कन्यादानाचा कार्यक्रम उरकला. शिवजी व पार्वती परस्परांकडे पाहून आनंदित झाली.

अशाप्रकारे शंकरपार्वतीचा विवाह थाटामाटाने पार पडला. सर्व मंडळी शंकराचा निरोप घेऊन स्वस्थानी निघून गेले. शंकराने हिमवानाच्या घरी जास्त न राहता लवकर कैलास पर्वतावर परत जायचे असल्याची गोष्ट नंदी कडून हिमवान व मेनकेला कळविली. व जाण्याची तयारी केली.








हिमवान व मेनकेने पार्वतीला निरोप देण्यासाठी सर्व तयारी केली. उत्तमोत्तम सुंदर वस्त्रे. तिचे सिंहासन दासी, संसाराला लागणारी भांडी वगैरे अहेराचे सामान देऊन पार्वतीला शंकराबरोबर जाण्यास निरोप दिला. निरोप देतांना म्हणाले–"सदाशिवा, आता पार्वतीच्या सुखादुःखाचा मालक तूच आहेस." सौभाग्यवती स्त्रियांनी शंकर पार्वतीला प्रेमपुर्वक आशीर्वाद दिला.

सुमुहूर्तावर शंकर पार्वतीसह कैलास पर्वतावर आला. आणि ऋषींच्या आदेशा प्रमाणे विधिवत गृहप्रवेश झाला तीन दिवस कैलास पर्वतावर जेवणावळी चालू होत्या. ह्यानंतर ब्रह्मा विष्णु व इंद्रादिक देव आणि सप्तर्षींनी शंकरपार्वतीला आशीर्वाद देऊन त्यांचा निरोप घेतला. शंकराने सर्वास यथोचित वस्त्रे आदि देऊन निरोप दिला. पाहुणे मंडळी निरोप घेऊन आपापल्या गावी निघून गेली. नंतर शंकर नंदीला म्हणाला–"आम्ही दोघे विश्राम करणार आहों, म्हणून तू माझे निवास-स्थान सजवून ठेवण्याची व्यवस्था कर. नंदीने सर्व गण प्रमुखांबरोबर शंकराचे निवास स्थान स्वच्छ करून त्यात सुगंधी द्रव्ये शिंपडली. नंतर जागोजागी मोती हिरे यांचा चूर मिसळून रांगोळी घालण्याची व्यवस्था केली. फुले पाने व मोहोर आणून दारे खिडक्यांना तोरणे बांधविली भिंतीवर सुरुचिपूर्ण चित्रे काढविली आणि निर-निराळी फळे व स्वास्थ्यकर पेये यथास्थान ठेवून दिवाबत्तीची यथोचित व्यवस्था करून शयनगृह सजविले.

नंदीने शंकराला कळविले की शैयागृह सजवून तयार ठेवण्यात आले आहे तेव्हां शंकर नंदीला व गणवृंदाला म्हणाला–"आता आम्ही विश्रांति घ्यायला जात आहो. तेव्हां कोणाला आजूबाजूला किंवा आत येऊ देऊ नका. आमची झोप मोडता कामा नये. चारी बाजूला पाहरा ठेवा! असे सांगून शंकर पार्वतीसह विश्राम करायला शयनगृहात गेला.



# जनतेचा प्रतिनिधि

नागवर गावातील वामनमुर्ती नावाचा एक रहिवासी नेहमी काहीबाही उचापती काढून गावकऱ्यांबरोबर भांडत असे. छोटीशी गोष्ट झाली तरी त्यात तोंड खुपसून सल्ला देत असे–"हे पहा, ह्या भांडणाचा निकाल सामोपचाने लागणार नाही. तुम्ही सर्व कोर्टात जा. मी येतो ना तेथे!

एकदा गावकऱ्यांसमोर एक संकट उपस्थित झाले. की, राजधानीनगरा करीता प्रतिनिधि म्हणून कोणाला निवडावे? परंतु गावातल्या लोकांमध्ये ह्या गोष्टी करीता भांडणे होऊ लागली. शेवटी सर्वांनी एकमताने ही गोष्ट पाटलावर सोपवली.

पाटील गुप्तवेष करून चार-पांच दिवस रात्री गावात सर्वकडे हिंडला व त्याने सर्वांना सल्ला दिला की, गावातल्या वामनमुर्तीला राजधानी नगराचा प्रतिनिधि म्हणून निवडावे.

काय ह्या भांडणे आणि उचापत्या करणाऱ्या वामनमुर्तीला प्रतिनिधि म्हणून निवडायचे?" असे म्हणत सर्व गावकरी आश्चर्याने थक्क झाली.

त्यावर पाटलाने समजावत सांगितले–"प्रथम पासूनच माझ्या मनांत हि शंका होतीच. कारण ह्या गावातील भांडणे तंटे ह्याचे मुख्य कारण म्हणजे वामनमुर्तीच होता. परंतु तीन चार दिवस रात्रभर फिरण्यामुळे ते खरे आहे हे सिद्धच झाले, त्यामुळे जर का वामनमुर्ती राजधानीच्या गांवी निघून गेला. तर गावात शांतता निर्माण होईल कारण काय की जनतेचा प्रतिनिधि म्हणून त्याला राजधानीच्या गावीच रहावे लागेल!"

त्यामुळे गावकऱ्यांनीही एकमताने वामनमुर्तीला आपला प्रतिनिधि म्हणून निवडून दिले. आणि त्याला राजधानीला पाठवून दिले.





# सुलतान आणि गरुड

इराक देशातील करवान नावाच्या राज्याचा सुलतान एक तरुण मुलगा होता. तो भयंकर जिद्दी व स्वतःच स्वतःची प्रशंसा करणारा होता. तो नेहमी म्हणत असे की–"मी जे कोणते काम करतो ते नेहमी विचारपूर्वकच."

सुल्तानाच्या परिवारांपैकी सुद्धा सर्वजण त्याच्याकडून स्तुतीकरून घेण्याकरीता व त्यांची खोटी खोटी स्तुती व प्रशंसा करण्याकरीता थकत नसत. ते त्याच्या हो ला हो करून म्हणत–"होय सरकार, आपली बुद्धिमत्ता प्रशंसनिय आहे अद्भुत आहे."

परंतु सुलतानाचा वृद्ध वजीर जेव्हां संधी मिळेल तेव्हां त्याला नेहमी सांगायचा प्रयत्न करे–"हुजूर, घाईला येऊन कोणतेही काम करु नये, जरा विचार करूनच कामे करावीत. सुलतानाला समजत नसे की हा म्हातारा वजीर नेहमी आपल्याला असा सल्ला कां देतो ?"

सुलतानाने एका गरुडाला मोठ्या प्रेमाने पाळले होते. तो खूप प्रसंगावधानी पक्षी होता. तो नेहमी सुल्ताना बरोबरच रहात असे. खास करून सुलतान जेव्हां शिकार खेळायला जाई त्यावेळेस हा आकाशात उडत असे व चारीबाजूला टेहळणी करीत असे व जेथे शिकार आहे तिकडे जाऊन सुचना करे. त्याच बरोबर काही संकटे आपत्ती कोसळणार आहे असे वाटले तर पूर्वीच इशारा करीत असे.

एक दिवस सुलतान आपल्या सर्व परिवारासह शिकार खेळण्यास गेला. तेथे त्याला एक सुंदर हरीण दृष्टीस पडले. सर्वांनी मोठ्या उत्साहानी त्या हरणाला चारी बाजूने घेरले.

सुलतानाने आपल्या लोकांना सांगितले की–"आपण हरिणाला पकडले आहे. परंतु जर कोणाच्या बाजूने ते निसटून गेले तर मात्र त्याच्या जिवंत राहण्याची आशा करू नका.

हरीण पुढच्या दोन्ही पायाकडे झुकून थोड्यावेळ एकटक पहात राहीले. नंतर अचानक उधळून जात उंच उडी मारून सुलतानाच्याच डोक्यावरून निसटून रानात पळून गेले.

सुलतानाला भयंकर संताप आला तो रागानें म्हणाला–"मी ह्या हरीणाला ठार मारून टाकीन" असे म्हणत त्याने घोड्याला टाच मारली. घोडा अतिवेगाने हरणाचा पाठलाग करीत पळू लागला.

तो एक जंगलाचा घनदाट भाग होता. त्यामुळे ते हरीण झाडाझुडूपातून साधे पणाने त्याच्यापासून वाचून पळून जात होते. ते पाहून गरुडानें आकाशात उडत त्या हरणाचा पाठलाग करण्यास सुरवात केली. ते करता करता हरीण जंगलाच्या टोकाला येऊन पोहोचले. तेथे फक्त लहान लहान झुडपे होती. ते पाहून सुलतानाने नेम करून हरणावर बाण सोडला. बाण लागताच हरिण तडफडत खाली जमिनीवर पडले.

हरीणमेल्याच्या अत्यानंदाने सुलतान तेथीलच एका खडकावर दम घालवण्यासाठी बसला. त्या खडकाला लागूनच जवळ एक टेकडी होती. त्यावर गरुड बसला.



सुलतान खूप दमला होता. तहानेने व्याकुळ झाला होता. त्याने पाण्याच्या आशेने चोहोबाजूला निरखून पाहीले. तेथे जवळच एका द्रोणासारख्या मोठ्या मोठ्या पानाकडे त्याची दृष्टी गेली. त्यात थोडे पाणी वरून ठिबकत होते. त्या टेकडीवरच्या झाडावरून खाली पानांवर पाणी ठिबकत होते. सुलतानाने विचार केला की, सर्व पाणी एकत्र करून गळा तरी थोडा ओला करता येईल नां ! असा विचार करून त्याने पाणी पानांत एकत्र करून प्यावे ह्या विचाराने तोंडाजवळ ते पान नेले. तेवढ्यात गरुडाने वेगाने सुलतानाच्या हातावर झडप मारून ते पान खाली पाडले. व परत उडून टेकडीवर जाऊन बसला.








"छी: छी: हे काय रे तहान लागलेली असतांना असे पाणी उडवून टाकतोस. असे म्हणत गरुडांची निंदा करीत सुलतानाने आणखीन एक पान उचलले व त्यांत पाण्याचे थेंब पकडू लागला. ते पाहून पुन्हां गरुडाने एका झेपेत ते पान सुलतानाच्या हातातून दूर उडवून लावले.

सुलतान संतापाने लालबुंद झाला. व त्याने गरुडाला जवळ येण्याचा आदेश केला. तो जसा जवळ आला तसा त्याने आपल्या तलवारीने त्याचे चार तुकडे तुकडे करून त्याला ठार मारले.

नंतर सुलतानाच्या मनांत विचार चमकला हे पाण्याचे थेंब वरून कोठून पडत असावेत. असा विचार करीत तो ते पहावयास टेकडीवर चढू लागला. टेकडीच्या माथ्यावर झोपलेल्या सर्पांच्या तोंडातील विष थेंबाथेंबाने खाली पानांवर ठिपकत होते. ते प्यालाने सुलतानाचे मरण निश्चित असे समजून वर बसलेल्या गरुडाने दोनदा त्याला वाचविण्याकरीता त्याच्या हातातून पान उडवून लावले व त्याला ते पिण्यापासून परावृत्त केले.

हे समजल्यावर सुलतानाला अतिशय दु:ख झाले. तेथे जवळूनच एक झरा वहात होता. परंतु तेथे जाऊन पाणी न पिता तो टेकडीवरून खाली उतरून आला व त्याने गरुडाला उचलून घेतले. व त्याला कुरवाळतच तो बेशुद्ध झाला.

ह्यानंतर बराच वेळेपर्यंत तो तसाच पडून राहला. त्याचे नोकर त्याला शोधत तेथे आले. सुलतानाला बेशुद्ध अवस्थेत पाहून त्यांनी त्याच्या तोंडावर पाणी छिडकले व त्याला बसवून पाणी पाजले. नंतर झालेली गोष्ट विसरण्याकरता सांगितले. तरीही त्याला त्याच्या करण्याचे दु:ख होतच राहीले.

सुलतानाला आता उमगले की, अनुभवी वृद्ध वजीर आपल्याला कां सारखा सारखा सांगत होता की, कोणतेही काम नेहमी विचार करूनच करावे. घाईगडबडीने करू नये."





# आफ्रिकेतील हत्ती

**इ.** स. पू. २१५ व्या वर्षी उत्तर आफ्रिकेतील हानीबाल नावाच्या सेनापतीने रोमनांवर हल्ला केला. त्या युद्धात हानीबालच्या कडून बऱ्याच हत्तींचा युद्धांत उपयोग केला. तरीही त्या सुमारास आलम पासून इटलीला जाणाऱ्या मार्गा मध्ये बरेच हत्ती मेले. हानीबालनेच्या ह्या युद्धात ज्या हत्तीने भाग घेतला. त्यातील बरेच हत्ती आफ्रिकेच्या संबंधित होते बाकीचे भारतातील होते.

आपल्याला त्याचे हे प्रमाण माहीत आहे की, पूर्वीच्या काळात जगातील अनेक देशांतून हत्ती असावेत परंतु आत्ता मात्र फक्त आफ्रिका व भारताला सम्बंधित असणारे दोन प्रकारचेच हत्तीच उपयोगात आणले जातात.

ह्या दोन प्रकारातील हत्तीमध्ये आफ्रिकेतील हत्ती आकाराने खूपच मोठे असतात. ह्या हत्तीचे मोठे मोठे कान ऐकण्यापेक्षा त्याच्या शरिराला थंड ठेवण्याकरीताच बरेच उपयोगी पडतात. ह्यांचे मोठे कान शरिरातील उष्णता इतर भागांकडे पोहोचवण्याचे अगर जरूर पडली तर त्याचा पंख्यासारखा उपयोग करण्याकरीता कामी येतात.

भारतातील हत्ती जेथे घनदाट जंगले आहेत तेथेच आपला निवास करतात, त्यामुळे ह्यांना मोठ्या कानांची जरुर पडत नाही. त्यामुळे त्यांचे कान तितके मोठे नसतात.

आफ्रिकेतील हत्तींचे गंडस्थळ भारताच्या हत्तीच्या गंडस्थळापेक्षा पुष्कळ काळे असतात सोंडेवर भोके असतात आणि शेवटी दोन ओठ असतात दांत खूप लांब असतात.



मादी हत्तीण व हत्तीची पिल्ले बरोबर रहातात व आपले आयुष्य घालवतात. अशा प्रकारे काही कुटुंबे एकास एक मिळून त्यांचे जमाव बनतात. जरुरत पडली तर नर हत्ती त्या जमावात येऊन रहातो. परंतु नेहमी वेगळाच रहात असतो.

मादी हत्तीण जेव्हां पिल्लाला जन्म देते तेव्हां एका बाजूला दुसरी एक हत्तीण तिच्या मदती करीता उभी रहाते. आफ्रिकेतील हत्ती पन्नास वर्षे, तर भारतातील हत्ती सत्तरवर्षे जगू शकतात.

## चांदोबातील नवलाई



### आपल्या देशातील सर्वांत प्रथमची नाणी

इ. स. तिसऱ्या शतकात सर्वांत प्रथम आपल्या देशात नाणी प्रचलित झाली. अलिगडच्या विश्वविद्यालयातील के. प्रो. इर्फाने हबीबचा विचार आहे की ती नाणी चांदीची होती.

### फुकटचा वेळ



उत्तम चित्रपटांना पुरस्कृत करण्याकरीता आपल्या जगतील अनेक देशांमध्ये अनेक संस्था आहेत. परंतु जास्तीत जास्त उद्वेग निर्माण करण्याकरीता अनेक चित्रपटांना पुरस्कार देण्यात-येतात. त्या हेतूने सध्याच्या परिस्थितीत न्यूजर्सी येथे एक समिती स्थापन झाली आहे. त्या समितीच्या प्रमुखांचे असे म्हणणे आहे–'चित्रपटांची निवड करण्याकरीता आमच्या येथे सदस्यांना बराच वेळ झोपा काढाव्या लागतात."



### चित्राशिवाय एक्स-रे

फोटो घेतल्याशिवाय एक्स-रे काढण्याच्या पद्धतीचा अविष्कार सर्वप्रथम जपान मध्ये लागला आहे. ह्या पद्धतीनुसार डॉक्टर काहीक्षणातच टेलिव्हिजनवर रोगांचे निदान पाहून सांगू शकतात.

## तुम्हांला माहीत आहे कां ?

१. हर्षवर्धनच्या शासनकाळात भारतात यात्रा करणारा चीन यात्री कोण ?
२. द्वितीय पुलकेशी कोणत्या वंशाचा होता ?
३. कुतुबमीनारपेक्षा अधिक उंच मनोरा बांधण्याचा संकल्प करून तो पुरा होण्यापूर्वी मरण पावलेला सुलतान कोण ?
४. अकबर जेव्हां गादीवर बसला तेव्हां त्याचे वय काय होते ?
५. छत्रपति शिवाजीच्या वडीलांचे नांव काय ?



# आप्पलपोटी

एकदा नारद आकाशमार्गे भ्रमण करीत होते. त्यावेळेस त्यांनी पाहिले–" एक देवदूत एका मनुष्याला स्वर्गात घेऊन जात आहेत. तेव्हां नारदाने त्यांच्या जवळ जात त्या देवदूताला विचारले. "हा कोण आहे? ह्याला स्वर्ग लोकात कां घेऊन जात आहात?"

"ह्याचे नाव देवराम आहे. ह्याने आयुष्यभर पापेच केली आहेत! परंतु ह्याच्या स्वर्गप्राप्तीचे कारण आम्हांला ठाऊक नाही." असे सांगून ते पुढे निघाले.

हे उत्तर ऐकताच नारदाला आश्चर्य वाटू लागले. आयुष्यभर पापेच पापे करणाऱ्या स्वर्गप्राप्ती कशी? ह्याचे कारण जाणण्याकरीता नारद यमलोकात निघाला.

यमराजने नारदाचे स्वागत करीत त्याचे कुशलक्षेम विचारले. त्यानंतर नारदाने स्वर्गलोकात घेऊन जाणाऱ्या मनुष्यांचा वृतांत सांगून त्यासंबधी स्वतःचे शंका निवारण करण्यास विनविले.

यमराज हसून म्हणाला–" देवराम नावाचा माणूस अत्यंत निर्धन त्याने आपल्या आयुष्यात पापेच केली. त्या कारणाने त्याला नरकलोकात रहावयास पाहीजे परंतु एकदा एका मोठ्या संकटात पडलेल्या एका गरिब मनुष्याने त्याच्याकडे मदतीची याचना केली. त्याच्याकडे पै नसतांना सुद्धा त्याने सांगितले माझ्याकडे पैसा असता तर नक्कीच दिला असता त्याने ही गोष्ट मोठ्या मनाने सांगितली. त्यामुळे त्याची सर्व पापे नाहीशी झाली. जी काय शिल्लक राहिली. त्याकरीता नरकलोक भोगून तो आता स्वर्गात जात आहे.

"यमराज, ह्यात मला काहीतरी गडबड होती आहे अशी शंका येते."



"गडबड! असे म्हणत यमराज चकित झाला.

"हो! हो! धोका होतो. जो माणूस दुसऱ्याची मदत करण्याची सहानुभूति राखतो. तो कितीका संकटात पडलेला असू दे. जेव्हां संकटात पडलेली व्यक्ति याचना करते तेव्हां आपल्या जवळचे किडूकमिडूक देऊन त्याला नक्की मदत करेल. परंतु असे तर म्हणणार नाही की माझ्याकडे असते तर मी दिले असते हि तर दुष्ट बुद्धी चालाखी आहे. मला शंका आहे की देवराम सुद्धा असाच माणूस असेल. आपण त्याला पाहिजे तेवढे धन देऊन त्याची परिक्षा घ्यावयास पाहिजे होती." नारद म्हणाला.

त्यावर यमराजने आपल्या सेवकांना बोलावले व स्वर्गदारा जवळ जाणाऱ्या देवरामला बोलावून आणविले.

ह्यानंतर यमराजने देवरामला भूलोकात एका साधारण शेतकऱ्याचे रूप देऊन सोडून दिले.

आता देवरामच्या हातात शेतकी व्यवसायामुळे थोडा पैसा खेळू लागला व तो आपले आयुष्य ऐषआरामात चालवू लागला.

त्याच सुमारास एक संकटात सांपडलेला माणूस देवरामच्या घरी आला व त्याने त्याच्याकडे मदती करीता याचना केली. तेव्हां देवरामने त्याच्याकडे पहात असे काही ढोंग केले व म्हटले. मी एक साधा शेतकरी आहे. माझी मिळकत फक्त माझ्या कुटुंबापुरतीच आहे. मला जर जास्त मिळकत मिळत असती तर जरूर तुला मी मदत केली असती.

"पहा आता! पैसा हातात आल्याबरोबर त्याचे मन कसे बदलले? नारद यमराजाला म्हणाला.

"मी मनात सुद्धा असा विचार केला नव्हता की हा असा नीच हलकट माणूस असेल मी आताच्या आता त्याला परत बोलावतो व नरकलोकात हाकलून देतो" रागारागात यमराज म्हणाला.

"आपण थोडे दिवस थांबून ह्याची परिक्षा पहा. तुम्ही तर त्याला भूलोकात पाठविले आहेत. तो ज्या काही इच्छा करेल त्या सर्व वस्तु त्याला देऊन तुम्ही त्याची परिक्षा घ्या. त्याच्या मध्ये कसा बदल होतो ते पहा?" नारदाने सुचविले.

त्या वर्षी देवरामच्या शेतात जास्तच धान्य पिकले. देवरामने गावाच्या मध्यवर्ती एक सुंदर घर बांधले. त्यावेळी एक अडचणीत पडलेला माणूस त्याच्यापाशी आला व आपली सर्व हकिकत सांगून त्याच्याकडे याचना करू लागला.

देवराम त्याच्याकडे सहानुभूतिने पहात म्हणाला–"ऐक बाबा, कशातरी परिस्थितीने मी हे घर बांधले. त्यामुळे माझ्याहातात एक दमडा सुद्धा नाही. तुला काय मदत करणार तूच सांग ना?"

दुसऱ्या वर्षी दुप्पट पैसा मिळाला त्या पैशाने देवरामने गावात एक लहानसा व्यापार सुरू केला. तो व्यापार इतका चांगला झाला व त्यात त्याला जास्तच फायदा झाला.

तेव्हां एक अत्यंत कठिण संकटात पडलेला मध्यम परिस्थितीतील माणूस त्याच्याकडे आला व त्याने आपल्या रामची सर्व कथा सांगून त्याच्याकडे काही पैसा मिळेल अशी अपेक्षा केली. देवरामने त्याचे



म्हणणे लक्षपूर्वक ऐकले व शेवटी म्हणाला– "मी इथे काही दिवसापूर्वीच घर बांधले त्याकरीता बरेच कर्ज घेतले होते. त्या कर्जाच्या भाराने मी अगदी दबलो गेलो होतो. आताच कुठे ते सर्व कर्ज फिटले. नाहीतर मी तुला नक्कीच मदत केली असती.

ह्यानंतर देवरामच्या व्यापारात त्याला खूप पैसा मिळाला. त्याने चार जहाजे विकत घेतली. त्याच्यांद्वारे त्याने विदेशातून व्यापार करून अमाप पैसा मिळवला व लवकरच कोट्याधिश बनला. शहारातील श्रीमंताच्या मध्ये त्याची गणना होवू लागली.

तेव्हां एक निर्धन माणूस त्याच्याकडे गेला. देवरामने त्याच्या बोलण्याकडे जरा देखिल लक्ष दिले नाही. फक्त येण्याचे कारण विचारले त्याने म्हटले "आज मी एका महत्वाच्या कामात गुंतलो आहे उद्या ये. जमेल तितकी मी तुला मदत करतो! असे सांगून त्याने त्या गरिबाला पाठवून दिले.

दुसऱ्या दिवशी तो मोठ्या आशेने देवरामच्या घरी गेला. देवरामने त्याला पहाताच कठोर आवाजात विचारले–"तू कोण ? माझ्याकडे तुझे काय काम आहे?"

तो गरिब आश्चर्यचकित होऊन पाहू लागला. त्याने त्याला आदल्या दिवशीची आठवण करून दिली व तुम्ही उद्या मला येण्यास सांगितले असल्याचे सांगितले व आपण येण्याचे कारण सांगितले. देवरामने त्याला मध्येच थांबवत म्हटले–"हे बघ, मला एक मिनिटाचाही वेळ नाही मी व्यापाराकरीता विदेशी जात आहे. मला यावयास कमीत कमी तिन महिने लागतील तू ह्यानंतर येऊन मला भेट. निश्चित रुपाने मी तुला मदत करेन. त्यानंतर त्या माणसाने कसेबसे तीन महिने वाट पाहिली व नंतर एके दिवशी संध्याकाळी तो देवरामच्या घरापाशी आला. तेव्हां देवरामच्या नविन पहारेकऱ्याने त्याला दारावरच अडवले व आत न जाऊ देता बाहेर हांकलले.

त्याने ती पूर्ण रात्र देवरामच्या दारातच घालविली दुसऱ्या दिवशी देवराम घरातून बाहेर पडला. परंतु आजूबाजूच्या अंगरक्षकांनी त्या गरिबाला देवरामपर्यंत पोहोचू दिले नाही. की, त्याचे हांका मारणे देवरामच्या कानापर्यंत गेले नाही की काय? देवराम थोड्या दूरपर्यंत गेला. नंतर एका विशेष तऱ्हेने सजवलेल्या घोड्यांच्या रथात बसून निघाला.

"आता मात्र सहन होत नाही. ह्याला सरळ घेऊन जाऊन नरकात टाक." नारदाने चिडून म्हटले. यमराजाने आपल्या सेवकां करवी देवरामला आणावयास सांगून नरकलोकात पाठविले.






१

[चंद्रवर्मा कापालिनीचा निरोप घेऊन उत्तर दिशेने गेला जंगलात त्याने एका झाडाचे विचित्र फळ खाल्ले. तेव्हां त्याला पशुपक्ष्यांची भाषा आपोआप समजू लागली. थोड्या पुढे गेल्यावर त्याला उष्ण पाण्याचे प्रवाह दिसले. ते पार करून जाण्याकरीता त्याला एका महासर्पाच्या पाठीचा आधार घेऊनच जायचे होते, म्हणून तो वेगाने पळू लागला. पुढे वाचा...]

चंद्रवर्मा धापा टाकीत जेव्हां सर्पाच्या पाठीवर अर्ध्यापर्यंत येऊन पोहोचला तेव्हां नदीच्या उष्ण पाण्याच्या वाफेमुळे त्याचा जीव गुदमरून जाऊ लागला. त्याच्या मनांत तर एक शंका येऊ लागली की आपले कपडे तर त्या उष्णतेने जळून जाणार नाहीत नां! नदीच्या प्रवाहाचे उष्ण फवारे त्याच्या अंगाला येऊन भिडू लागले. तेव्हां तो मनात विचार करून घाबरून गेला की आपण बेशुद्ध पडून त्या पाण्याच्या प्रवाहात वाहून गेलो तर आपले काय होणार त्या भीतीनेच तो पुढे धावत जाऊ लागला. महासर्पाच्या पाठीवरून पुढे पळणाऱ्या माकडांकडे त्याची दृष्टी गेली. काही वेळाने त्याला जमिन दिसू लागली. तेव्हां कुठे त्याचा जीवात जीव आला. चंद्रवर्माने एका रांगेत पुढे जाऊन खाली झुकलेल्या झाडांच्या फांदीवर उडी



टाकली. काही क्षणापूर्वी जो विचित्र अनुभव आपल्याला आला त्याचे स्मरण करताच त्याच्या अंगावर शहारे आले. तो धापा टाकत महासर्प जेथून जात होता, त्याच्याकडे विस्मयाने पहात राहला. तो प्रचंड महासर्प अजूनही नदी पार करीत होता. त्याला माकडे व आपण त्याच्या पाठीवरून गेल्याचा काही एक मागमुस सुद्धा लागलेला दिसत नव्हता. दहा ते बारा फुट व्यास असलेले त्याचे काळेकभिन्न डोके त्याला झाडांच्या फांद्यांच्या थोडे पुढे दृष्टीस पडले त्यात आग ओकणारे त्याचे लाल भडक डोळे पाहून तो क्षणभर लटपटू लागला त्याने निर्णय घेतला की, जर कां आपण त्याच्या दृष्टीस पडलो तर आपले जीवंत रहाणे असंभव आहे. परंतु नशिबाने सर्पाचे ते अजस्त्र तोंड चंद्रवर्माच्या बरोबर उलट्या बाजूला होते. काही वेळाने तो सर्प झाडाझाडांतून सरपटत पुढे जाऊन जंगलात अदृष्य झाला. तेव्हां त्याला थोडे हायसे वाटले. पण ते क्षणापुरतेच थोडे पुढे गेल्यावर तो महासर्प त्याला पुन्हां दिसला. तेव्हां त्याचे तोंड त्याच्या विरुद्ध दिशेला होते. म्हणून त्याने आपल्या तलवारीचे टोक त्याच्या शरीरात रुतवून पाहिले. परंतु त्याचे चमकणारे शरिर तलवारीचा स्पर्श होताच जरा सुद्धा विचलीत झाले नाही. त्याला मुंगी चावल्या इतकी सुद्धा संवेदना झाली नाही.

चंद्रवर्माने विस्मयाने चोहोबाजूला दृष्टी टाकली सर्वत्र फळांनी लगडलेली झाडे पाहून त्याला भुकेची जाणीव होऊ लागली. घाईने त्याने आपली तलवार म्यानेत ठेवली व तो जवळच्या एका झाडावर चढला. त्याने त्या झाडावरचा एक आंबा तोडला व तो तोंडात घालणार इतक्यात त्याला भयकंपित करणाऱ्या माजलेल्या हत्तींच्या कर्णकर्कश गर्जना ऐकू येऊ लागल्या. त्याने ज्या बाजूने आवाज येत होता. तिकडे निरखून पाहिले. त्याला कुठेही हत्ती दिसला नाही, परंतु थोड्या दूरवर त्याला झाडे झुडपे अशा तऱ्हेने हलतांना दिसली की, जोरदार वादळात झाड मुळासकट कोलमडावीत तशी आणि अनेक हत्तींचे चीत्कार पण ऐकू येऊ लागले व त्याच बरोबर मोठे मोठे वृक्ष उन्मळून पडण्याचा मोठमोठा आवाज आला.

चंद्रवर्माने झाडाच्या टोकांवर सरपटत चढून जाऊन आवाजाच्या दिशेने आपली मान वळविली. त्याने क्षणभर डोळे गचकन मिटले. त्याने जे दृष्य पाहिले ते कोणीही जरी अत्यंत साहसी व पराक्रमी असला तरी त्याला भीती वाटावी असे होते. त्याचे हात पाय कांपू लागले.

उष्ण पाण्याचा प्रवाह पार करून महासर्प हत्तीला गिळकृत करण्यास पुढे पुढे जात होता. प्राणभयाने हत्ती चित्कार करीत पळत होता. तेवढ्यात सर्पाच्या पकडीत हत्ती सापडलाच गेला. त्याच्या पकडीतून सुटण्याकरीता तो तडफडत होता. बाकीचे हत्ती ह्याला पाहून त्याच्या भोवताली कोंडाळे करून उभे होते. ते आपल्या सोंडेने खुणा करीत ओरडत होते. त्याच्या पायदळी अनेक वृक्ष कोलमडून




पडत होते. ते पाहून असे वाटत होते की, चोहोबाजूने येणाऱ्या हत्तींची त्याला काही एक काळजी वाटत नव्हती. तो आपल्या शरीराने हत्तीला पूर्णपणे लपेटून उलथा-पालथा करीत लोळवत होता व हळूहळू हत्तीला गुहेत ढकलल्या सारखा आपल्या जबड्याने गिळत होता.

"हे देवा, मला वाचव मी बहुदा भयंकर अशा मर्त्य लोकात पाय ठेवला आहे. वाटते! आता मी तुला शरण आलो तुच माझे रक्षण कर." चंद्रवर्मा मनांत घाईघाईने देवाचे स्मरण करू लागला. त्या उष्ण प्रवाहाच्या आजूबाजूचा भयंकर प्रदेश पाहून त्याला कापालिनी

रहात असलेले ठिकाण उद्यानासारखेच वाटू लागले. परंतु त्याला त्या शंखू नावाच्या मांत्रिकापासून तो शंख प्राप्त करावयाचा होता, थोड्याअवधीतच त्याला अनेक विचित्र अनुभव आले. त्यांची कल्पना करताच तो चिंताग्रस्त झाला. त्याला वाटू लागले की, जर आपल्याला काहीतरी दैवीशक्ति प्राप्त झाली तरच आपण हे जंगल पहाड बिनधोक पार करून जाऊ शकतो. नाहीतर मरण हे निश्चितच आहे. ह्यातून काहीतरी मार्गाचा अवलंब तावडतोब करणे भाग आहे.

चंद्रवर्मा अशा प्रकारे विचार करीत आपल्या गतजीवनातील शूर व पराक्रमाच्या गोष्टी विसरून क्षणभर म्लान झाला. त्यावेळी तो अजिबात भुकतहान विसरला. त्याला आता स्पष्ट कळून आले की, आपण प्राप्त करण्यास जात असलेले काम किती कठिण व असाध्य आहे. त्याने विचार केला की, त्या जादुगारीण व शंखूला त्यांच्या नशिबाच्या भरवंशावर सोडून आपण निघून जाणेच जास्त चांगले परंतु आपण जायचे आता ते कुठे आणि कसे ?"

विचार करून करून त्याला क्षीण आला झाडावरच त्याला ग्लानी येऊ लागली. व सूर्य मावळला व पशुपक्ष्यांच्या आवाज कमी झाला. हळूहळू काळोख पडू लागला. आकाशात तारे चमकू लागले. परंतु चंद्राचा अजून पत्ता नव्हता. हवा वहाणे एकदम बंद झाले होते.

अशा थंड वातावरणात अचानक झंझावातासारखे वारे वाहून येत अंगाला झोबून गेल्यासारखा भास चंद्रवर्माला झाला. तो आश्चर्याने घडपडत डोळे फाडून पाहू लागला. तेव्हां तो वाऱ्याच्या झोता बरोबर अधांतरी उडत उडत जात होता. चंद्रवर्मा भीतीने मनांत विचार करू लागला की, आता बहुदा आपले आयुष्य संपुष्टात आले असावे तेवढ्यात धम्‌दिशी तो एका ठिकाणी खाली पडला परंतु तो काही दगड गोट्यावर पडला नाही. मऊ गवतात पडल्याचा त्याला भास झाला. आपण वाचलो म्हणून त्याला हायसे झाले. असा विचार करीत तो उठून उभा राहू लागला. तेवढ्यात तो भाग इकडे तिकडे हळू हलू लागल्याचा भास त्याला झाला. विस्मयाने त्याने जवळच दृष्टी टाकत पाहिले तर त्याला सर्वत्र हिरवेपिवळे धम्मक गवत अंथरल्यासारखे दिसले. चंद्रवर्माने आपल्या हाताने थोडा स्पर्श करून पाहिले तो त्याला उबदार स्पर्श झाला. व त्या पाठोपाठ त्याला दोन पक्ष्यांचे बोलणे कानावर आले.

"आज रात्री इथेच रहाणे चांगले. शेजारून वहाणाऱ्या उष्ण प्रवाहाचे वारे मला खुप आनंददायी उबदार वाटतात. एक पक्षी दुसऱ्या पक्ष्याला म्हणाला.







त्यावर समोरच्या पक्ष्यांने स्विकृती सुचक आपल्या भाषेत आवाज केला. चंद्रवर्माला क्षणात समजले की, तो कुठे बसलेला आहे. तो जेव्हां गुंगीत होता. तेव्हां दोन गरुडांनी येऊन त्याला उचलून आणले होते. ते दोघे जेव्हां उडत होते. तेव्हां नशिबाने एकाच्या तोंडांतून सुटून तो दुसऱ्या गरुडाच्या पाठीवर येऊन पडला होता म्हणून वाचला नाहीतर केव्हांच यमलोकात पोहोचला असता. परंतु आता त्या पक्ष्यांच्या पाठीवरुन खाली उतरून आपल्याला पळून जावयास पाहिजे. आता कसे पळावे? चंद्रवर्मा अशा प्रकारे विचार करून खाली उतरू लागला. तेवढयात आकाशात विजेच्या लोळा सारखा प्रकाश झळकला व एक प्रचंड पक्षी तोडांने फुत्कार करीत वरून उडत चाललेला त्याला दिसला. क्षणात तो ह्यां गरुडांच्या जवळ येऊन पोहोचला तेव्हां त्याला आठवले की, जादुगारीणीनें आपल्याला सांगितलेला हाच तो अग्नीपक्षी असावा. तो पहाताच त्याला थोडा आधार वाटू लागला. आता आपले काम साध्य होणार असा त्याला विश्वास वाटू लागला. तो अग्नीपक्षी शंखू मांत्रिकाचाच आहे. हे नक्की झाले

अग्नीपक्षी जवळ येताच गरुडांनी चोंची उंच करून त्याचे स्वागत केले. तो खाली उतरतच म्हणाला—"मी खूप वेळापासून तुमचा शोध करीत भटकत आहे. आणि तुम्ही इथें आहात वाटते!"

"अरे वा असे आहे कां! आमच्या जवळ तुझे असे जरुरीचे काय काम आहे?" गरुडांनी त्याला विचारले.

अग्नीपक्षी खाली उतरला तो चोंचीने आपली पिसे साफ करीत म्हणाला—"माझा मालक शंखू याने मला एक काम दिले आहे. ते तितकेस कठीण नाही. म्हातारपणात जखड होऊन जाणारी जादुगारीण हिला त्याच्यापाशी बांधून घेऊन जावयाचे आहे. परंतु माझ्याकडून हे काम होणे शक्य वाटत नाही. कारण दिवसा मला काहीही दिसत नाही. रात्री माझ्या प्रकाशामुळे माझ्यापासून ती आपली सुटका प्राप्त करून घेण्यास समर्थ ठरते. त्यामुळे तुम्ही दोघे आज रात्रीच जाऊन काही एक आवाज न करता आपल्या चोचींत पकडून तिला शंखू मांत्रिका पाशी घेऊन या. हे काम तुम्ही केलेत तर मी तुमचा फार फार आभारी होईन."

हे ऐकताच गरूड दिर्घ श्वास घेत म्हणाले—"आम्ही आज दोघे एक योजन लांब पर्यंत उडत जाऊ शकणार नाही. कारण सूर्यास्ता पासून आतापर्यंत अनेक समुद्रपार करून अनेक समुद्राच्या किनाऱ्याने उडत जाऊन भरपूर पोट भरून खाऊन आताच आम्ही विश्रांती करता इथे ह्या उष्ण प्रवाहाच्या उजेला बसलो आहोत. उद्या रात्री आम्ही तुझे काम निश्चित करतो!"

अग्निपक्षी प्रसन्नतापूर्वक पंख फडफडवून जोरजोरात आवाज करून आपला आनंद व्यक्त करीत म्हणाला—"दिवसा त्या जादुगारणीवर कब्जा करणे शक्य नाही. ती मोठी धुर्त व हुषार आहे. त्याहूनही तिच्यापाशी तिचे बलवान सेवक सुद्धा आहेत. शिवाय रात्र रात्र ती डोळयात तेल घालून स्वत:चे रक्षण करीत जिवंत राहली आहे. परंतु तिचे स्वास्थ आता पूर्वी इतके चांगले नाही. तीचे आरोग्य आता वरचेवर बिघडत चालल्यामुळे ती पूर्वी इतकी जागत नाही. तुम्ही अंधारात लपून अचानक तिच्यावर हल्ला करा व आपल्या चोचीत तिचे तोंड दाबा म्हणजे तिला मंत्रोच्चारण करता येणार नाही. त्यामुळे तिच्यापासून तुम्हांला कोणताही धोका संभवणार नाही. ह्यानंतर तुम्ही तिला धरून सरळ माझ्या मांत्रिकापाशी घेऊन या. तिला त्याच्या पायापाशी टाका. माझा मालक तुम्हांला उचित बक्षिस व तिला उचित दंड देईल!"



मला तुझ्या मालकाकडून बक्षिसाची अजिबात आवश्यकता नाही. परंतु मनात आणताच जर मला सर्व समुद्रद्विपापर्यंत जाऊन येऊ शकेन अशी शक्ति मला प्राप्त झाली तर मी अत्यंत आनंदी होईन पाहीजे तर तेवढेच माग प्राप्त व्हावयास पाहिजे." एक गरुड म्हणाला.

मला फार मोठी हाव नाही परंतु मृत्युपासून वाचण्याकरीता काही मंत्र असेल तर तो मला शिकव म्हणजे मला त्याचा फायदा होईल." दुसऱ्या गरुडाने आपली मनोकामना प्रकट केली.

"हे दोघे बावळट पक्षी बहुदा शंखू मांत्रिकाला देव समजत असावेत" म्हणून अशा खुळचट मागण्या करीत आहेत असा विचार करून चंद्रवर्मा मनातल्या मनात हंसू लागला.

गरुड पक्ष्यांच्या प्रश्नाचे काही एक समाधान कारक उत्तर न देताच असेच मान हलवत अग्नीपक्षी त्यांना म्हणाला–

काय तुम्ही दोघे उद्या दिवसा माझ्या घरी येऊ शकता कां? येत असाल तर तुम्हांला मी माझा मालक दाखविण्यास तयार आहे. तुम्ही नक्की यां मी वाट पहातो नंतर तो अग्नीपक्षी पुन्हां फुत्कार आवाज करीत आकाशात उडाला व तीव्र वेगाने उत्तरेकडे निघून गेला.

गरुडांनी थोडावेळ आपापसात गप्पा मारल्या व आपल्या चोची जमिनीवर टेकवून झोपेच्या अधिन जायचा ते दोघे प्रयत्न करू लागले.

चंद्रवर्माला मनातल्या मनांत आनंदाचे आनंदाचे उधाणा आले की, आता काही एक त्रास न होता आपल्याला शंखू मांत्रिकापाशी जायची एक चांगली संधी आली आहे. ती हातची घालविता कामा नये म्हणून तो आपली झोप घालवून पहाट होण्याची वाट पाहू लागला. मनांतल्या झालेल्या गोष्टी आठवू लागला.

(क्रमशः)



# अहंकाराचा परिणाम

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडावरून प्रेत खांद्यावर काढून घेऊन काही बोलल्या शिवाय स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ म्हणाला–"राजा तू ह्या अर्ध्यारात्री इतके कष्ट करीत आहेस ते पाहून तर माझे मन व्याकुळ झाले. कारण माझा विश्वास आहे की, तू साध्या माणसाप्रमाणे दिसणाऱ्या तपस्वांकडून असंतोषाने शाप झेलत असावास माझी गोष्ट खरी आहे नां! ह्याचे उदाहरण म्हणून रत्नपाल नावाच्या माणसाची गोष्ट सांगतो लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

रत्नपाल अतिशय श्रीमंत माणुस होता. परंतु त्याला दुर्दैवाने मुलबाळ झाले नाही. काही वर्षानंतर त्याला असे कळले की, नैमिषारण्यात रहाणाऱ्या भुवनेंद्र स्वामींच्यापाशी मुले होणारे औषध आहे. तावडतोब

## वेताळाच्या गोष्टी



रत्नपाल त्या अरण्यात जावयास निघाला. सात उत्तम घोडे बांधून तयार केलेल्या रथात सात रात्र सात दिवस प्रवास करून तो अरण्यापासून जवळ असलेल्या यतिश्राम नावाच्या गावात पोहोचला.

तेथे असलेल्या एका वृद्ध गृहस्थाने रत्न-पालच्या येण्याचे कारण जाणून त्याला म्हटले–"महाशय, भुवनेंद्र महर्षि तुमची मनोकामना नक्कीच पूर्ण करतील. परंतु तुम्हांला पायी चालत जावे लागले.

रत्नपाल पायी चालत जाऊ लागला परंतु त्याला चालण्याची सवय नव्हती त्यामुळे तो आश्रमाजवळ येताच थकून गेला व एका झाडाखाली बसला. त्याला एक पाऊलही पुढे चालणे अशक्य झाले. त्याचवेळेस आश्रमातील गोपाल नावाचा शिष्य अंगण झाडत असतांना. त्याने रत्नपाल खाली पडतांना पाहीला. तेव्हां तो धावत धावत त्याच्याजवळ आला.

रत्नपाल त्या मुलास म्हणाला–"अरे बाळा, तू थोडे माझे पाय दाबून देतोस कां ?"

"हो नक्की चेपून देईन परंतु जितका वेळ मी तुमचे पाय चेपेन त्याच्या दुप्पट वेळ तुम्ही माझे पाय चेपले पाहिजेत." तो तरुण मुलगा म्हणाला.

एका नोकराच्या तोंडून असे बोलणे ऐकताच त्याच्या अंगाचा तिळपापड झाला तो रागाने म्हणाला–"मूर्खा, लहान मोठ्यातील फरकच कळतो की, नाही बहुदा न कळणारा एक मूर्ख आहेस. मी तुझ्यापेक्षा वयाने मोठा आहे. आणि तू माझ्याकडून सेवा करून घेण्याची अपेक्षा करतोस ?"

"ठिक, तुम्ही हे सांगा, आपल्याला माझ्याच वयाचा जर एक मुलगा असता तर त्याची सेवा कोण करेल त्याच्याहून मोठे कां छोटे ?" गोपालने विचारले.

तो प्रश्न ऐकून रत्नपाल चिडून म्हणाला–"माझ्या बरोबर तू आपली बरोबरी करतोस ?

ह्यावर गोपाल स्मित करीत म्हणाला–"मला वाटते तुम्हांला तुमच्या संपत्तीचा भयंकर गर्व आहे. की एवढा करोडोपती मूल नसल्या कारणाने एका मुला करीता भिकाऱ्यासारखा ह्या आश्रमात आला आहे. जा तुमचा मुलगा माझ्याहून जास्त कष्ट करून एका नोकरासारखे आपले आयुष्य काढेल." असे सांगून तो तरुण तेथून निघून गेला.



रत्नपालने त्या मुलाच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. तेवढ्यात आश्रमात परत येणाऱ्या भुवनेन्द्र स्वामींची दृष्टी त्यांच्या-कडे गेली. रत्नपालला मुनींनीं आपली ओळख करून दिली व रत्नपालचा सर्व समाचार ऐकून त्यांना म्हणाले–"अरेरे, आपण इतके हाल सोसून इथपर्यंत आलात. असे म्हणत आश्रमाच्या आत घेऊन जाऊन त्याचा अतिथी सत्कार केला."

रत्नपाल महर्षिच्या औदार्याबद्दल अत्यंत आश्चर्य करू लागला. व चकित होऊन म्हणाला–"महात्मन् महान व्यक्ति व निच व्यक्ति ह्याच्यांमध्ये किती फरक असतो. तुम्ही तर माझ्याहूनही कितीतरी पटीने महान असून प्रेमाने माझ्याबरोबर वागलात. परंतु नोकर असलेल्या गोपालने माझा कसा अपमान केला.

स्वामींना ह्या घडलेल्या घटनेचे आश्चर्य वाटले ते म्हणाले–"मी जे औषध तुम्हांला देत आहे. त्याच्या प्रभावाने तुम्हांला मुल नक्की होईल, परंतु गोपालचे बोलणे शाप होऊन त्यापासून तुम्हांला नक्कीच त्रास घडेल !"

हे ऐकताच रत्नपाल घाबरून म्हणाला–"स्वामी, गोपालचे माझ्याबरोबर वागणे अत्यंत असभ्यतेचे होते. तरी सुद्धा ते बोलणे मला शापाप्रमाणे कां ठरावे ? हा तर खरोखरी माझ्यावर अन्याय आहे. तरी सुद्धा ह्यातून वाचण्याकरीता काही तरी मार्ग तुम्ही सांगा !"

"गोपालच्या वागण्यात काहीही चूक नाही. जर तुम्ही त्याच्याकडून काम करून घेण्याची इच्छा धरता तर त्याच्या बदल्यात त्याने तुमच्याकडून काम करून



घेतले तर त्यात काय चुक आहे ? लहांनानी मोठ्याकडून सेवा करून घेणे बरोबर नाही. परंतु हे खोटे आहे. कारण लहान पणापासून तुम्ही आजपर्यंत काय केलेत ?" हीच गोष्ट त्याने आपल्याला सांगितली. आपण आपल्या संपत्तिचा अहंकार मनांत आणून त्याला कमी लेखलेत त्यामुळे त्याने आपल्याला शाप दिला. ह्या आश्रमात रहाणाऱ्या प्रत्येक व्यक्तिचे बोलणे सत्य होते."

रत्नपाल त्यावर काहीहीं बोलला नाही. परंतु थोडावेळ विचार करत म्हणाला– "स्वामी, माझ्या अपराधांची चुक मी कबूल करतो. कारण पायी चालण्याची मला सवय नव्हती. त्यामुळे माझ्या तोंडून तसे बोलणे निघून गेले. माझे बोलणे तसे गर्विष्ठ पणाचे होते ह्यावर आपण विश्वास करू नका. कृपा करून गोपाळच्या शापापासून मला मुक्तता मिळवून द्या."

जर खरोखरीच आपण उत्तम स्वभावाचे असलात तर आपोआप ह्यातून उत्तम मार्ग सांपडेल. सत्पुरुषांना कोणत्याही शापापासून त्रास सोसावा लागत नाही." असे म्हणत भुवनेंद्र स्वामींनी रत्नपालला काही औषधी पुड्या आणून दिल्या व म्हणाले–"ह्या आपल्या बायकोला खाण्यास सांगा. ह्याच्या प्रभावाने आपल्या पत्नीला गर्भ राहिल व ती एका सुंदर मुलाला जन्म देईल. आपला मुलगा दासीच्या हाती जाईल व दासीचा मुलगा आपल्या हाती येईल. ह्या गोष्टीनंतर ती दासी आपणास दिसणार नाही. त्यानंतर केव्हां तरी गोपाल आपल्या गावी येईल त्यावेळेस गोपालला संतुष्ट करून त्याच्या-कडून आपण आपल्या मुलाचा शोध काढून घेऊ शकता !"

रत्नपाल औषधी पुड्या घेऊन आपल्या गावी परत आला. ह्यानंतर भुवनेंद्र स्वामीने घोषीत केल्याप्रमाणे सर्व घटना खऱ्या झाल्या. रत्नपाल हताश झाला. रत्नपालने काही विचाराअन्ती सर्व गोष्टी बायकोस सांगितल्या ह्या भीतीने की ही गोष्ट तिच्यापासून लपवून ठेवली तर त्या परक्या मुलावर ती आपले सारे प्रेम उधळून देईल. "आपला खरा मुलगा काही वर्षानंतर आपल्या घरी परत येईल. ह्या दासी-पुत्रावर जर तू अतिशय प्रेम व वात्सल्य करशिल तर त्या मुलाला मल्लिका दासीच्या हाती सोपवतांना तुला अतिशय दु:ख होईल. हे सगळे आपले दुर्भाग्य आहे.

हि सर्व गोष्ट ऐकताच रत्नपालची पत्नी रडू लागली. ह्यानंतर तिने आपल्या दासींचा हाती सोपवले. तो मुलगा रत्न-पालच्या दासदासींच्या पैकी एक होऊन वाढू लागला. इतर नोकरांप्रमाणे रत्नपाल-च्या कुटुंबाची सेवाचाकरी करू लागला.

रत्नपालच्या काही मित्रमंडळींनी ह्याचे कारण काय ते विचारले. रत्नपालने त्यांना उत्तर देत म्हटले–हा मुलगा पुष्कळ वर्षा-नंतर माझ्या घरी जन्मला आहे. त्यामुळे स्वामींनी सांगितले आहे की, ह्याचे पालन-पोषण अशा प्रकारे नोकराचाकरांच्यातच व्हायला पाहिजे.

अशा तऱ्हेने दहा वर्षे उलटली. एक दिवस रत्नपालला समजले गोपाल नावाचा एक महान योगी आपल्या गावात आला आहे. तो त्याक्षणी त्या स्वामींना भेटावयास गेला. त्या सुमारास योगी एक



बाईला समजावून सांगत होते. "तू एका आई व मुलाला वेगळे केलेस तुझ्या त्रासांचे हेच कारण आहे. तू परत त्या मायलेकरांला एकत्र कर. तुझे सर्व त्रास नाहीसे होतील."

ते ऐकताच रत्नपालचा राग अनावर झाला. त्याने समोरे जात म्हटले– "महात्मन्, आपण ऋषिच्या आश्रमात रहाणारे गोपाल तर नाहीत ?"

"हो, हो !" असे म्हणत त्याने मान हलविली.

त्यावेळेस रत्नपालने तेथे जमलेल्यानां सर्व समाचार सांगितला व त्यांना विचारले– आपण कृपा करून हे सांगा की, एक छोटे कारण घेऊन आपण एका मायलेकराला

एकमेकांपासून दूर केलेत. ह्या अपराधाच्या कारणाने आम्ही कोणकोणत्या त्रासांचे शिकार बनलो गेलो ?"

गोपाल मंद मंद स्मित करीत म्हणाला– "मी कोणाला ही वेगळे केले नाही. आज-पर्यंत आपल्या घरात राहीला आहे. तोच आपला खरा मुलगा आहे !"

हे ऐकताच रत्नपालचा आनंद गगनात मावेनासा झाला. गोपालची चरणधूळ मस्तकाला लावून वेत धावत धावत घरी परत आला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले– "राजा ! गोपाळने हे खोटे कां सांगितले की, जो रत्नपालचा मुलगा नाही तो त्याचाच आहे ? ह्याचे समाधान कारक उत्तर दिले नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला–"हे सांगणे तितकेसे बरोबर होणार नाही की महर्षि भुवनेंद्र अशा महान व्यक्तिचा शिष्य गोपाल खोटे बोलत आहे. रत्नपालच्या ह्या विचित्र अनुभवांचे कारण म्हणजे त्याचे विचित्र कलुषित मन आत्मा. ह्याच भीतीने त्याला त्रास होऊन तो गोपालच्या शापाचा शिकार बनला. परंतु मुनींने त्याला जी चेतावणी दिली होती त्या गोष्टीचे मर्म त्याने समजण्याचा प्रयत्न केला नाही. अशा भ्रमात पडला की, दासीपुत्राची व आपल्यापुत्राची अदलाबदली झाली आहे. म्हणून त्याने तो मुलगा दासीच्या हाती सोंपवला हे तर त्याच्या वाईट मार्गाचे लक्षण आहे. प्रस्तुत दासीचे नाहीसे होणे गोपालने एका बाईला अशा प्रकारे रागावणे की, तीने एका मांयलेकराला वेगळे केले आहे हि एक योगायोगाची गोष्ट आहे. परंतु ह्यात एक गोष्ट नि:संशय आहे की जो जन्मपासून रत्नपालच्या घरात वाढला तोच मुलगा ऋषींच्या औषधांमुळे प्राप्त झाला होता."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृष्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# व्याजी खाते

एका गावात एक शेतकरी रहात होता. पाऊस न पडल्या कारणाने तो साव-काराकडून उधार घेत गेला व जेव्हां धान्य पिकत असे तेव्हां सर्व उत्पन्न व्याज म्हणूनच फेडत गेला. अशा प्रकारे शेवटी कंगाल झाला. त्याने सावकाराकडे येऊन म्हटले– "महाशय, भविष्यकाळात आपण माझ्या कडून एक पैसा सुद्धा वसूल करु शकणार नाहीत. जो काय माझ्यापाशी होता तो सर्व पैसा पाण्या प्रमाणे गळून गेला. आपण खूप धन कमावले आहांत त्यामुळे ते धन कमावण्याचे रहस्य मला तर सांगा. मी सुद्धा आरामात माझे आयुष्य घालविन.

"अरे मुर्खा ! धन तर तो रामच फक्त देऊ शकतो !" सावकाराने सांगितले.

त्यावर तो शेतकरी त्याच्यावर विश्वास ठेऊन रामाकडून धन मागण्याच्या निर्धाराने निघाला. त्याच्या बायकोने त्याला तीन रोटया करून दिल्या थोडया दूर गेल्यानंतर समोरून एक ब्राह्मण आला. शेतकऱ्याने आपले बोचके उघडून त्यातून एक रोटी बाहेर काढली. व ती ब्राह्मणाच्या हाती देत त्याला विचारले–"तुम्हांला रामाचा पत्ता माहीत असला तर सांगता कां ?"

ब्राह्मणाने रोटी घेतली. व आकाशाकडे पहात गुपचुप निघून गेला.

शेतकरी पुन्हां चालत निघाला. ह्यावेळी त्याला समोरून एक योगी येतांना दिसला. शेतकऱ्याने गुडघे टेकून नमस्कार केला व आपल्या गाठोडयातली एक रोटी बाहेर काढली व ती योग्याच्या हातात दिली व विचारले–"स्वामी, रामा पर्यंत जाण्याचा कोणता रस्ता आहे ?"

तो योगी मौनव्रत असल्या सारखा पुढून निघून गेला. आणखी पुढे गेल्यावर एक गरिब त्याला येताना दिसला तो अतिशय



अशक्त व दुबळा दिसत होता. शेतकऱ्याला ते पाहून त्याची दया आली. त्याने तिसरी रोटी काढून देऊन त्याला खायला सांगितली.

त्या गरीबाने रोटी खाल्ली व त्या शेतकऱ्याला विचारले मालक, आपण कुठे जात आहात ?"

"असे ऐकले, रामाचे दर्शन केल्याने धन प्राप्त होते. परंतु त्याच्याकडे जाण्याचा रस्ता कोणी सुद्धा सांगत नाहीत. तुम्ही सांगता कां ?" शेतकऱ्याने विचारले.

गरीब हसत म्हणाला—"मीच राम आहे. तुला अजून कुठेही जाण्याची जरुर नाही. हा शंख घे हा कसा वाजवायचा मी तुला सांगतो. तुला जे पाहीजे आहे. ते हा शंख पूर्ण करेल ! ह्यानंतर त्या शेतकऱ्याने रामाच्या मदतीने शंख वाजवण्याचे रहस्य माहीत करून घेतले व घरी आला. त्या दिवसापासून शेतकऱ्याच्या घरी कोणत्याही गोष्टीची कमी भासली नाही. शेतकरी ज्या गोष्टीची इच्छा करेल ती त्याला ताबडतोब प्राप्त होत होती. एक दिवस सावकाराला ती गोष्ट समजली आणि संधी मिळताच त्याने तो शंख चोरला व शेतकऱ्याच्या घरी येऊन त्याला म्हणाला—"पहा, हा शंख माझ्यापाशी आला आहे. हा मी तुला एका अटीवर देतो. ह्या शंखापासून जो फायदा तुला होतो त्याच्या दुप्पट मला मिळालापाहिजे. नाहीतर मी हा शंख तुझ्या पूर्वीच्या कर्जाच्या रकमेमध्ये जमा करून टाकेन."

शेतकऱ्याने लाचार होऊन त्याचे म्हणणे मान्य केले. सावकाराने तो शंख शेतकऱ्याला परत करुन टाकला. त्या शंखापासून शेतकऱ्याला जो लाभ होत होता त्याच्या दुप्पट सावकाराला मिळत गेला.

ह्यात शेतकऱ्याच्या डोक्यात एक विचार चमकला त्याने मनांत विचार केला व शंख वाजवला—"की, माझा एक डोळा फुटावा ! त्यावर शेतकरी तिरळा झाला व सावकाराचे दोन्ही डोळे फुटले. ते पाहूनच शेतकरी संतुष्ट झाला.





# खजिन्याचे गुपित

कोशल देशाचा राजा सूर्यसेन सत्तर वर्षाचा म्हातारा झाला. म्हातारपणामुळे त्याची तब्येत ही वारंवार खालावू लागली. राज्यकारभारात त्याला जास्त लक्ष घालणे जमत नव्हते. म्हणून राज्यभर हळूहळू अराजकता माजू लागली. सर्वत्र चोऱ्यामाऱ्या दरोडे होवू लागले. विदेहच्या राजाला बऱ्याच दिवसांपासून कोशल राज्यावर आपला अधिकार असावा असे वाटत होते. त्यामुळे त्याला ही आयती संधी आल्याचा आनंद झाला. त्याने कोशल राज्यावर स्वारी करण्याची तयारी केली.

त्याच सुमारास दूरदेशी विद्याभ्यासास गेलेला राजकुमार चतुरसेन राजधानीला परत आला. तेव्हा मंत्र्याने राजाची भेट घेऊन राजाला सुचविले "महाराज, राजकुमाराचा राज्याभिषेक करून राज्याची जबाबदारी त्यांच्यावर टाकावी.

परंतु सूर्यसेनला मंत्र्याचा सल्ला पसंत पडला नाही. ज्याला राज्यकारभारा विषयी अजिबात माहीती नाही. अशा व्यक्तिच्या हाती राज्यकारभार सोपवणे म्हणजे संकटात पडण्यासारखेच आहे. तरीही राजाला आपल्या मुलाच्या व्यवहारज्ञान कुशलता ह्याची माहीती काढून घ्यावयाची होती. त्या विचाराने राजाने युवराजला बोलावून घेतले व राज्याची स्थिती सांगून त्यावर उपाय विचारला.

चतुरसेन थोडावेळ विचार करीत राहला व म्हणाला—"महाराज, सर्वात प्रथम विदेह देशातून येणाऱ्या हल्लयाचा आपल्याला मुकाबला करण्याकरीता आपण किल्लयाची दारे मजबूत करावी सैन्य तयार करावे."

"आपल्या राज्यात राहून जे लोक अराजकता माजवत आहेत त्याच्या बरोबर आपणास कशा प्रकारे वागावयास हवे.



बाहेरच्या शत्रू पेक्षा ह्या देशातच असणाऱ्या लोकांपासून आपणास जास्त धोका होण्याचा संभव आहे नां ?" राजा सुर्यसेनने विचारले.

"देशात ज्या चोऱ्यामाऱ्या होतात दरोडे पडतात. त्याकरीता राज्यातील लोकांना अनेक नुकसान सोसावे लागते. हि गोष्ट खरी आहे. परंतु राज्यातील मालमत्ता राज्यातच राहते नां !" जेव्हां आपण ह्या दुष्टांना पकडतो तेव्हां त्यांच्या-हातून त्या वस्तु घेऊन आपण त्याच्या मालकांच्या हातात परत देऊन टाकतो हो नां ! चतुरसेन म्हणाला.

"म्हणजे तुझ्या म्हणण्याचा अर्थ हल्ला करणारा शत्रू राजा जास्त धोक्याचा असतो नां !" राजा सूर्यसेनने त्याला विचारले.

"माझा तर तसाच सल्ला आहे, पिताजी, प्रत्येक संकटापासून आपल्याला योग्य तऱ्हेनें देशाचे रक्षण करणे जास्त जरूरीचे आहे. जर युद्धात विदेह राज्याबरोबर हारलो तर ते सैनिक आपल्या राज्यातील संपत्ती पूर्णपणे लुटून घेऊन जातील. आपल्या राज्यातील सिंहासन शत्रूराज्याच्या अधीन होईल" युवराज म्हणाला.

युवराजाने सांगितलेल्या सल्ल्याने राजानें किल्ल्याच्या दरवाजाच्या मजबूती-विषयी थोडा विचार करून पाहिला नंतर त्याने खजिनदाराला बोलावणे धाडले. खजिनदाराने दुरुस्तीच्या कामाच्या विषयी थोडी आकडेमोड करून असा हिशोब सांगितला की, खजिन्यात असलेली संपत्ती किल्याच्या दरवाजाची दुरूस्ती करण्यास कमी आहे.

राजा सूर्यसेन पुढचे काय करावे ह्याविषयी विचार करीत राहला. त्याचवेळी सेनापती आपल्या बरोबर दोन गुप्तहेरांना घेऊन तेथे आला व म्हणाला—"महाराज, आपल्या ह्या हेरांकडून एक विचित्र समाचार मिळाला आहे. कोणी एक साधू एका महिन्यापासून आपल्या राजधानीत येऊन राहला आहे. लोकांचे म्हणणे आहे की साधू महाराज अनेक प्रकारची महिमा जाणणारे आहेत असे ऐकले की, आपल्या नागरिकांच्या पूर्वजांनी आपल्या घरातून जी संपत्ती पुरून ठेवली आहे त्याचे सर्व गुपीत ते सांगतात. अशा प्रकारे साधू पासून अनेक लोकांना लाभ झाला आहे. तेव्हां तुम्ही सुद्धा त्याची भेट घ्या.

सूर्यसेनच्या मनात सेनापतीच्या राज-भक्ति व सामर्थ्यावर गाढ विश्वास होता. त्यामुळे राजाने ताबडतोब जाऊन साधूची भेट घेतली व त्याला निवेदन केले.

साधुने काही क्षण डोळे मिटून ध्यान केले व नंतर डोळे उघडीत त्याला म्हटले— "राजन् मी माझ्या योगबलाने त्याचे कारण शोधले आहे. तात्पुरता तरी कोणत्याही जवळपासच्या राजापासून आपल्याला काही एक धोका होणार नाही. परंतु एक गोष्ट आहे. आपल्या पूर्वजानी मुख्य किल्याच्या दाराजवळच्या भिंतीं खाली शंभर हंडे भरून सोने पुरून ठेवले आहे. ते खणून काढून आताची आपली काळजी तरी नाहीशी होईल.

राजाला अतिशय आनंद झाला. त्याने भक्तिभावनेने साधूला नमस्कार केला व आपल्या राजवाड्यात निघून आला.

वडिलांच्या तोंडी ती गोष्ट ऐकताच राजकुमाराला अत्यंत आश्चर्य वाटले त्याने विचार केला. की कितीही कां साधूचे



म्हणणें खरे असले तरी किल्ल्याची दारे तोडवणे सध्याच्या परिस्थितीत मुर्खपणाचे ठरेल. साधूने जिथे संपत्ती पुरून ठेवली आहे असे सांगितले तेथील किल्याची दारे तर अत्यंत मजबूत आहेत राज्यात इतर ठिकाणीही संपत्ती पुरलेली नसेल कां? "बाबा, मला साधूच्या महिमांची परिक्षा घेण्याची एक आठवडाभर मुदत द्या.

सूर्यसेन राजाने मुलाचे म्हणणे मान्य केले. राजकुमाराने गुप्तरूपाने दरबारातील विदुषकाबरोबर बोलणे केले व त्याच्या घरापाठीमागच्या आवारात पूर्वदिशेला एक हजार सोन्याची नाणी पुरून ठेवविली. ह्यानंतर विदुषक घरी गेला व त्याला



साष्टांग नमस्कार करीत म्हणाला– "स्वामी, मी ह्यावेळेस आर्थिक दृष्टीने बराच नडलेलो आहे. कमीत कमी एक हजार जर नाणी असली तर मी माझ्या संकटातून वाचू शकतो. तुम्ही तर सर्वांना गुप्त संपत्ती बदल सांगत आहात नां? माझ्यावर दया करून माझ्या घरात कुठे संपत्ती आहे तेवढी कृपया सांगावी.

साधू क्षणदोन क्षण विचार करीत राहला. नंतर म्हणाला–"तुला, खजिन्यांचा शोध काढण्याची वेळ आता निघून गेली आहे. तू उद्या सकाळी ये. मी निश्चित रुपात कोठे संपत्ती ठेवली आहे का नाही सांगतो. त्या दिवशी रात्री युवराज चतुरसेन गुप्तरूपाने विदुषकाच्या घरी गेला. अर्ध्या-रात्री नंतर युवराज व विदुषकाने पाहिले तो कोणी दोन माणसे पाठिमागच्या भिंती-वरून उडी मारून आत शिरत होती. ते दोघे दुसरे तिसरे कोणी नसुन सेनापती ज्या गुप्तचरांना घेऊन राजापाशी आला होता ते दोघेच होते.

त्या दोघांनी पाठीमागच्या आवारात पश्चिमेकडील असलेल्या एका आंब्याच्या झाडाखाली एक खड्डा खणला व त्यात कोणती तरी वस्तु लपून त्यावर पुन्हां माती भरून ते निघून गेले.

ते दोघे जाताक्षणीच युवराज व विदुषक दोघांनीं त्या जागी जाऊन माती उकरून तेथे काय आहे ते पाहिले. त्यांना एका छोटयाश्या तांब्याच्या भांड्यात एक हजार सोन्याची नाणी दिसली. त्यांनी ती पाहून पूर्ववत त्यावर माती भरून टाकली.

दुसऱ्या दिवशी सकाळी विदुषक साधू-पाशी गेला तेव्हां साधूने विदुषकाला पाहात म्हटले–"बाळा, मी माझ्या योग बळाने पाहीले की, तुझ्या घरात काही संपत्ती गाढली गेली आहे कां? नाही. तेव्हां तुझ्या घराच्या पाठीमागच्या आवारात पश्चिमे-कडील आंब्याच्या झाडाखाली. काही संपत्ती आहे. ती खोदून काढून तू घे व आपली संकटे दूर कर!"

विदुषक राजमहालात आला व त्याने राजकुमाराला साधूने सांगितलेली गोष्ट सांगितली युवराज विदुषकाला बरोबर घेऊन आपल्या वडिलांपाशी आला. सर्व गोष्टी सांगून म्हणाला–"पिताजी, जर खरोखर तो साधू महिमा जाणारा असता तर त्याने आपण पुरलेला खजिना कोठे आहे ते सांगा-वयास पाहिजे होते. परंतु तसे झाले नाही तो शत्रूचा हेर आहे. ह्यात काही शंकाच नाही. आपले सेनापती व काही गुप्तचर एक होऊन अशा तऱ्हेने धन पुरून ठेऊन भोळ्या भाबड्या लोकांना बनवित आहेत. खजिन्याच्या लोभात पाडून आपल्या किल्याची मजबुत पक्की दारे पाडण्या पाठीमागे विदेह राजाचाच कट आहे.

ही गोष्ट ऐकताच राजा सूर्यसेनच्या मनामध्ये सेनापतीच्या राजभक्ति विषयी थोडी शंका निर्माण झाली. परंतु तरीही राजाने त्याला तावडतोब कैद करण्याचा हुकूम दिला नाही. परंतु राजकुमारला म्हटले. साधूच्या रुपात आपल्या नगरात घुसलेल्या त्या गुप्तचराने जसे अनेक लोकांना आपल्या प्रभावांनी बळी पाडले आहे. तसेच सेना-पतीला सुद्धा आपल्या अधिन केले नसेल कशावरून! काय सांगू माझे मन त्याची राजभक्ति पाहून विचलीत होऊ पहात नाही. मला त्याच्याबदल शंका वाटत नाही.



"तर मग आज रात्री आपण एक उपाय करूया. गुप्तवेष धारण करून आपण त्या साधूच्या आश्रमात जाऊ तेथे साधूच्या दर्शनाला येणाऱ्याच्यात जर कोणी आपला गुप्तहेर असला तर त्याला पकडून घेऊन येऊ. म्हणजे त्यांच्या तोडून आपल्याला ह्या गोष्टींचा काहीतरी मागमुस लागू शकेल." राजकुमाराने सल्ला दिला.

राजाने युवराजचे म्हणणे मान्य केले. ते दोघे त्याच रात्री गुप्तवेष धारण करून दहा सैनिकांना बरोबर घेऊन साधूच्या आश्रमापाशी आले साधूच्या घरापासून थोडे लांब त्यांनी सैनिकांना उभे केले व स्वत: ते दोघे घराच्या खिडकीपाशी उभे राहिले.

    


नंतर थोड्या वेळाने सेनापती आपल्या दोन सोबत्यांबरोबर तेथे येऊन पोहोचला. सेनापतीला पहाताच साधूने विचारले– "राजाने माझ्या योग बलावर विश्वास तर केला आहे ना !"

"हो, हो, तसेच समजायचे कारण विदुषकाच्या घराच्या पाठीमागे धन-दौलत मिळाल्यामुळे इतर दरबारातील कर्मचाऱ्याचा सुद्धां आपल्यावर गाढ विश्वास बसू लागला आहे. एखाद्या दिवशी खाजिन्याच्या लोभाने किल्लयाच्या मुख्यद्वाराची सुद्धा राजा तोडफोड करून रस्ता मोकळा करून देऊ शकतो.

ह्यानंतर राजा व युवराज सैनिकांच्याजवळ गेले व त्यांनी त्या सैनिकांना इशारा केला की साधु, सेनापती, व त्यांचे इतर अनुचर ह्यांना बंदी करून तुरूंगात घाला.

राजा महालात येत मंत्र्याला बोलावून घेत म्हणाला–"मंत्री महोदय, मी प्रथमच तुमचे म्हणणे मान्य करून जर राजकुमाराचा राज्याभिषेक केला असता तर काय चांगले झाले असते दुष्टांच्या कारवाई पासून खजिन्याकरीता आपल्या किल्याची दारेफोडून विदेश राजा आपल्या राज्यावर हल्ला करण्याची सुचना देण्यापूर्वी तुम्ही राजकुमारांचा राज्याभिषेक करण्याची तयारी करा!"

एका आठवड्यानंतर राजकुमाराचा राज्याभिषेक झाला.

राजाचे पद प्राप्त होताच चतुरसेनने आपल्या पूर्व अनुभवाची आठवण करून अशी घोषणा जाहिर केली की, भविष्यकालात गुप्तचर विभाग सेनापतीच्या अधिन रहाणार नाही तर पूर्ण राजाच्या अधिन राहील.

अशा प्रकारे विदेह राजाची योजना असफल झाली. त्यानें युद्धाची तयारी करणे बंद केले.

राजा सूर्यसेनला स्वतःला आपल्या मुलांच्या चातुर्याचे व सामर्थ्याचे आकलन झाले. त्यामुळे तो निश्चिंत होऊन आपले उर्वरित आयुष्य आरामात घालवू लागला.





# सोन्याचा मोर

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असता बोधिसत्वानी एका मोराच्या रूपे जन्म घेतला. तो एक अनन्य साधारण मोरा सारखा नव्हता. एक अद्‌भुत सोन्याचा मोर होता. तो दण्डकारण्यात वास्तव्य करे.

एके दिवशी काशी राजाच्या बायकोला स्वप्नात तो सोन्याचा मोर दिसला. तेव्हां तिने आपल्या पतीला तो मोर आणून देण्याची विनवणी केली. राजाने मोराच्या बाबतीत मंत्र्याच्याकडे चौकशी केली. मंत्र्यांनी सांगितले की, ह्याची माहीती ब्राह्मणांना नाहीतर शिकाऱ्यांना असावी.

ह्यावर राजाने एका शिकाऱ्याला म्हटले–"जर कां तू तो सोन्याचा मोर जिवंत पकडून आणून दिलास तर तुला मोठे बक्षिस देण्यात येईल." शिकाऱ्याने सात वर्षे प्रयत्न करून पाहिला परंतु तो सोन्याचा मोर त्याच्या जाळ्यात सांपडला नाही. ह्या अवधीत तो शिकारी मेला. व सोन्याच्या मोराची इच्छा करणारी राणी सुद्धा मरण पावली.

"स्वप्नात पाहिलेल्या एका मोराच्या काळजीने माझी राणी मरून गेली!" ह्या दुःखाने राजाला भारी राग आला. त्याने किल्लयाच्या मुख्य द्वारावर फलक लावला की, "दण्डकारण्यात सोन्याचा मोर हिंडत आहे त्याचे मांस जो खाईल त्याला मरणापासून मुक्ति मिळेल."

त्या राजाच्या मृत्यु नंतर युवराजाने एका आणखीन शिकाऱ्याला सोन्याचा मोर पकडण्या करीता पाठविले. त्याला ही त्यात यश मिळाले नाही अशा प्रकारे सहा पिढ्या निघून गेल्या.

सातव्या पिढीचा जेव्हां राजा सिंहासनावर बसला. तेव्हां त्याने त्या सुचनेनुसार मोर पकडण्याकरीता एका शिकाऱ्याला








पाठविले. त्या युक्तिने व शिताफीने मोराला पकडून राजाच्या हाती सोंपविले.

त्या सोन्याच्या मोराला पाहून राजाच्या मनांत आनंदाबरोबरच आश्चर्य वाटू लागले व त्याच्या बद्दल आदर वाटू लागला. राजाने आपल्या सिंहासना शेजारीच एक उंच आसन तयार करविले. तेव्हां मोराच्या रूपात असलेल्या बोधिसत्वांनी विचारले–"राजन् आपण मला पकडवून इथे कां आणवलेत?

"लोक असे सांगतात. तुझे मांस खाल्ल्याने म्हातारपण व मरण यापासून मानव मुक्त होतो "म्हणजे ह्याचा अर्थ असा आहे तुम्ही मला ठार मारणार!" बोधिसत्वानी विचारले.

"हो, हो!" राजा म्हणाला.

"वेड्या, मी मृत्युला घाबरत नाही, परंतु अशा स्थितीत माझ्या मांस खाण्याने म्हातारपण व मृत्यु यापासून तू कसा वाचू शकशिल" बोधिसत्वानी विचारले. तुझ्या शरिराची सावली सोन्याची आहे. त्याने तो मरणांपासून मुक्त होतो." राजा म्हणाला.

"तर मग राजा ऐक, मी ही सोन्याची छाया कशी प्राप्त केली ते! प्राचीन काळी मी ह्या राज्याचा महाराजा होतो. मी न्यायपूर्वक राज्यकारभार केला व धर्माचे रक्षण केले. त्याचे फळ म्हणूनच मोराच्या रूपाने जन्म घेतला.

हा सर्व वृत्तांत ऐकून काशीचा राजा आश्चर्यचकितच झाला. त्याने त्याला विचारले–"काय धर्मपूर्वक राज्यकारभार करण्याचे फळ हे आहे कां! परंतु तुझे म्हणणे खरे कसे काय मानायचे?

"कां नाही? मी ज्या काळी महाराजा होतो. त्या काळी एक नवरत्न खचित दिव्यरथ होता. त्यावर बसून मी भ्रमण करीत असे. तो रथ उद्यानाजवळच्या तळ्याच्यापाशी पुरून ठेवलेला आहे."

काशी राजाने तळ्याच्या कांठी खणून तो दिव्यरथ पाहिला. त्या दिवसांपासून राजाने बोधिसत्वांना आपला गुरू मानले.





आपल्या नद्या :

## गंगा - २

अयोध्येचा राजा सगरने एकदा यज्ञ करण्याचा संकल्प केला. त्या काळच्या रितीनुसार एका अलंकृत बलवान घोड्याच्या पाठीवर एक ध्वज बांधून त्याला धरून राजकुमार जात असत असा तो यज्ञाचा घोडा अनेक देशांतून भ्रमण करीत फिरत असे.

त्या घोड्यांच्या रक्षकांचे लक्ष नाही असे पाहून इंद्राने राक्षसांचे रूप घेतले व तो घोडा पळवून नेला. व त्याला नेऊन पाताळातील कपिल मुनींच्या आश्रमात नेऊन बांधला.





महाराजा सगरचे साठ हजार मुलगे होते. ते सर्वजण चोहीकडे चारी दिशांनी घोड्याचा शोध काढत शेवटी पाताळ लोकांत येऊन पोहोचले. तेथे त्यांनी त्या यज्ञाच्या घोड्याला पाहिले. त्या लोकांना वाटले की कपिल मुनींनीच तो घोडा चोरून आणला आहे. म्हणून त्यांनी मुनींनीच तो घोडा चोरून आणला असावा. म्हणून त्यांनी



सगरच्या मुलांच्या उद्दट पणाचा मुनींना भयंकर क्रोध आला. त्यांनी त्यांना शाप दिला हे घमेंडखोर राज-कुमार जळून भस्म होऊन जावोत. त्याच क्षणी ते सर्वजण जळून भस्म होऊन गेले.

अनेक वर्षानंतर सगर राजाचा नातु अंशुमान याने कपिल मुनींकडे आपल्या वडिलांना जिवंत करण्याकरीता प्रार्थना केली. त्यावर कपिल मुनीने सांगितले की, ब्रह्मदेवाच्या कमंडलुतील पवित्र गंगेचे पाणी जर त्या भस्म झालेल्या राशींना स्पर्श करतील तरच सगरचे पुत्र पुनर्जीवित होऊ शकतिल.





काही वर्षानंतर सगरच्या मुलाचा नातू भगीरथ याने भस्मराशींच्या रुपाने स्थित असलेल्या आपल्या पूर्वजांना पुनः जिवंत करण्याचा दृढ संकल्प केला. व त्याकरीता ब्रह्मदेवाची तपश्चर्या करण्यास सुरवात केली. त्याच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन ब्रह्माने आपल्या कमंडलूतून गंगाजल सोडण्याची संमति दर्शविली.

तरीही वेगाने वहाणाऱ्या गंगेच्या प्रवाहाला थोपवून धरण्याची शक्ति पृथ्वीला नव्हती. भगिरथाने जाणले की, तिचा वेग थोपविण्याची शक्ति केवळ शंकरालाच माहित आहे. ह्या विचाराने त्याने शंकराची प्रार्थना केली. त्याची प्रार्थना शंकराने ऐकली. धार आपल्या जटेतून सोडून दिली.





शंकराच्या जटेतून गंगाअवर्तिण झाली व पृथ्वीवर पडून वाहू लागली. ह्या-नंतर भगीरथ पुढे पुढे जाऊ लागला. त्याच्या पाठोपाठ जाऊन पृथ्वीवर चारीबाजुला गंगेने शस्यशामल बनवले.

ह्यानंतर भगिरथाने गंगेच्या प्रवाहाला पाताळापर्यंत वाहून आणले. कपिल-मुनिच्या आश्रमाजवळच्या भस्मराशी गंगा जलामध्ये बुडून गेल्या. व ह्याचे परिणाम सगरचे साठ हजार पुत्र जिवंत होऊन बाहेर आले. अशा प्रकारे भगीरथाचा प्रयत्न सफल झाला.





आपल्या देशात गंगानदी अत्यंत पवित्र नदी म्हणून लोकप्रिय आहे. गोमुखापासून नदिच्या रुपाने गंगोत्रि पर्यंत वहात जाऊन गंगानदी प्राचिन पवित्र क्षेत्राच्या रुपाने हृषिकेश मधून वहात जाते.

गंगानदीच्या काठी असलेल्या अनेक पुण्यक्षेत्रामध्ये हरिद्वार व वाराणसी ही अत्यंत महत्वाची मानली जातात. ही दोन्ही गावे पुष्कळ पूर्वी पासूनच प्रख्यात आहेत. अनेक वर्षानुवर्षेहि तिर्थ भक्तांना आपल्याकडे आकृष्ट करून घेत आहेत.





गंगानदीच्या काठी असलेले आणखी एक मुख्य शहर म्हणजे कलकत्ता. ह्या शहरात ह्या नदीला हुगली नावाने संबोधले जाते. कलकत्ता मधून ही नदी अनेक शहरातून अनेक फाट्यांनी वहात जाऊन बंगालच्या बांधाने सुंदरबन नावाच्या जंगलातून वहात जाऊन शेवटी समुद्राला जाऊन मिळते.



# खरा वैद्य

भिमदत्त नावाचा राजा अचानक एका विचित्र रोगाने पछाडला गेला. त्या मुळे त्याच्या सर्व शरीरभर घाणेरडे डाग पडले. दरबारी वैद्यांनी अनेक प्रकारे प्रयत्न करून पाहिले पण उपयोग झाला नाही.

राजधानीच्या गावात रहाणाऱ्या सिताराम नावाच्या वैद्याला हि गोष्ट समजली राजाचा रोग विचित्रच होता. सितारामच्या कुटूंबात वैद्याचा पेशा परंपरागत चालत आला होता. सितारामने ह्या तऱ्हेच्या रोगावरचा उपाय आपल्या वडिलांकडून शिकून घेतला होता.

सीतारामने त्या रोगांना लागणारी आवश्यक औषधे तयार केली. आणि एक दिवस तो राजाला भेटायला निघाला.

दरबारात आल्यावर राजवाड्यातील वैद्यांनी त्याला अनेक प्रश्न विचारले व त्याची उत्तरे ऐकली. तेव्हां त्या सर्वांना समजुन चुकले की, सीताराम वैद्यशास्त्रांत निष्णात आहे.

त्यामुळे इतरांचे मन शंकाकुल होऊ लागले कारण न जाणो सीतारामच्या औषधांने राजा खडखडीत बरा झाला तर राजाच्या दृष्टीला आपण अयोग्य म्हणून गणले जाऊ व आपली नोकरी निघून जाईल.

दरबारी वैद्यांनी सीतारामला म्हटले—"आम्ही सर्वांनी लहानपणीच गुरुंच्या पाठशाळेत पूर्णरूपांने वैद्याचा विद्याभ्यास पूर्ण केलाआहे. तशा आमच्या औषधांने राजाचा आजार बरा झाला नाही. तो काय तुझ्या औषधोपचाराने बरा होईल ही केवळ कल्पना करणे म्हणजे भ्रमच आहे. तू पुन्हां चुकूनही राजाचे दर्शन करण्यास कृपा करून येऊ नकोस.

सीतारामला वाईट वाटले तो नाईलाजास्तव घरी परत आला. परंतु तो

मुक्ता कुलकर्णी



दर चार-पांच दिवसांने राजमहाला पर्यंत जात होता कारण काही कारणास्तव जर दरबारी वैद्यांनी आपला विचार बदलला तर, परंतु ते वैद्य त्याला जास्तच रागावून हाकलून देत.

एकदा सीताराम राजमहालातून घरी परत येत होता. तेव्हां तेथील धर्मशाळेच्या ओसरीवर बसलेल्या एका रोग्याकडे त्याची दृष्टी गेली. त्याच्यासुद्धा अंगावर काळे डाग होते. त्याचा रोग बरोबर तसाच होता जो राजाला झाला होता.

सीतारामने त्याच्यावर उपाय करण्यास सुरवात केली व एका महिन्याच्या आत त्याचा रोग पूर्ण बरा केला.

एक दिवशी संध्याकाळी राजा आपल्या दोन अंगरक्षकाच्या बरोबर बागेत, फिरण्यास जात होता. तेव्हां धर्मशाळेच्या ओसरीवरून उतरत त्या पूर्वीच्या जुन्या रोग्याने राजाला नमस्कार केला. पूर्वी राजा नेहमी त्याला त्या वाटेने जाताना पहात असे त्या रोग्याला पहाताच राजाला अत्यंत आश्चर्याचा धक्काच बसला त्याने अंगरक्षकाना विचारले–"मी ह्याला पूर्वी अंगाची मुटकुळी करून ओसरीवर पडलेला पहात होतो. हा इतका खडखडीत बरा कसा झाला तुम्ही त्याला तावडतोब माझ्याकडे घेऊन या."

अंगराक्षकांनी त्या माणसाला राजापाशी आणले. राजाने त्याला त्याच्या उपाया बाबतीत सर्व प्रश्न विचारले. आणि त्यानेही सीताराम कडून उपाय करण्या-करीताहट्ट धरला.

राजा त्याच दिवशी वेष बदलून सीतारामला भेटण्याकरीता त्याच्या घरी गेला. सीतारामने त्याला तपासुन त्याच्या-वर औषोधोपचारास सुरवात केली. वीस दिवसाच्या आत राजा पूर्णतया बरा झाला. व त्याने वैद्याबद्दल कृतज्ञता प्रकट केली तेव्हां सीतारामने राजाला म्हटले–"महाशय, हा रोग मोठा विचित्र आहे. दुर्देवाने लाखात एकालाच हा रोग पछाडतो. अशा लोकांना मी माझ्या उपायाने पूर्णतया बरे करीत आहे. परंतु ह्या राज्याच्या राजाचा हा रोग बरा करण्याकरीता मला तेथे जाण्याकरीता कोणताही मार्ग मिळत नाही.

"ह्यात काय मोठेसे आहे, तू राजाचे दर्शन घे आणि त्याला ह्या सर्व गोष्टी सांग" राजा म्हणाला.

ह्यावर सीतारामने राजदरबारी वैद्यांनी राजाला भेटण्या करीता कसे अडवले आहे ते आपल्यालासांगितले. तेव्हां राजाला दरबारी वैद्यांच्या दुर्बुद्धी बद्दल मनांपासून चिड आली. राजा विचार करू लागला की, ह्या लोकांना माझ्या स्वास्थापेक्षा स्वतःच्या पदवी बद्दल जास्त महत्व आहे. ह्या कारणाने त्याने सीतारामला आपल्याला भेटू दिले नाही.

ह्यानंतर राजाने सीतारामला दरबारी मुख्य वैद्याची पदवी देण्याचा निर्णय घेतला व सीतारामला म्हणाला–"सीताराम, मी गुप्तवेषात तुझ्याकडून इलाज करून घ्यायला आलेला ह्या देशाचा राजा आहे" असे म्हणत त्याने आपला वेष काढून टाकला व त्याला म्हटले–"उद्या सकाळी तुला राज्याचे अधिकारी मोठ्या आदराने दरबारात घेऊन जायला येतील त्यावेळी मी तुझा अपूर्व सत्कार करेन व तुला दर-बारातील प्रधान वैद्याच्या जागेवर नियुक्त करण्यात येईल.

सीतारामने राजाला विनयपूर्वक प्रणाम करीत म्हटले–"महाराज, तुम्ही मला जे पद बहाल करू पहाता आहात त्याचा मला



अस्विकार करावा लागत आहे. त्यामुळे मला कृपाकरून क्षमा करा. मला माझ्या ह्या जुन्या घरात राहूनच सुख व संपन्नता मिळते.

राजाला आश्चर्य वाटले त्याने विचारले "मी तुला जी पदवी व संपत्ती देत आहे. त्याने तुला संतोष व सुख मिळत नाही कां?"

"होय महाराज मी एकदा का राजवैद्याचे काम हातात घेतले तर मला आपल्या परिवारा शिवाय दुसऱ्या गरीब-लोकावर इलाज करता येणार नाही. अशा स्थितीत गरीब लोक जर आजारी पडले तर त्याची काय स्थिती होईल. मी ह्या पदवीच्या व धनाच्या लोभाला बळी पडून माझ्या वैधकीचा अपमान करू शकत नाही." सीतारामने स्पष्ट सांगितले.

सीतारामच्या बोलण्यातील खरेपण राजाला पटले. तो थोडावेळ विचार करीत शांत राहला. नंतर म्हणाला "सीताराम, तू खरोखर खरा वैद्य आहेस. तू माझ्या राज्यातील नागरीक आहेस. त्यामुळे मला फार अभिमान वाटतो. मी तर तुला अशी संधी देतो की तू तुझ्या वैद्यकीचा उपयोग जास्तीत जास्त लोकांवर करू शकशिल. मी दर महिना खजिन्यातील अमुक एक रक्कम तुझ्याकडे पाठवित जाईन. त्याचा उपयोग तुला जेथे आवश्यक वाटेल तेथे दवाखाने, धर्मशाळा, वैद्यशाळा काढण्यात खर्च कर व आजारी लोकांच्या मदतीकरीता उपयोग कर काय तुला हे काम तर मंजूर आहे नां?"

"महाराज, ह्या पेक्षा जास्त मला काय पाहिजे? तसे म्हटले तर मी पूर्वी पासूनच काही वैद्यशाळा काढण्याची इच्छा मनात करीत होतो. परंतु पैशांच्या अभावामुळे मला त्या इच्छा माराव्या लागत होत्या. तुम्ही मला जी मदत करण्याची आश्वासने दिली आहेत. त्याबद्दल मी आपला अत्यंत ऋणी आहे." सीतारामने म्हटले.

त्यानंतर राजा पूर्णपणे संतोषाने राजमहालात परत आला.





# धर्म देवी

कुण्डलिनी देशाचा राजा सत्यानंद मोठा धर्मात्मा होता. धर्माच्या रक्षणा करीता स्वतःचे प्राण खर्ची करण्यासही तो तयार असे. न्यायदाना करीता तो आश्रित म्हणून आलेल्या माणसांबरोबर पक्षपात करीत नसे तसेच नातेवाईक व मित्रमंडळीच्या बरोबर सुद्धा. त्याचे कुलदैवत म्हणजे धर्मदेवीच होती. दररोज तो तिची पुजा केल्याशिवाय कोणतेही काम करीत नसे.

सत्यानंद राजाला श्रवण नावाचा एक मुलगा होता. सत्यानंद म्हातारा झाला त्यामुळे त्याने आपला मुलगा श्रवण ह्याचा राज्याभिषेक करण्याचा विचार मनाशी केला.

श्रवणचा राज्याभिषेक झाला. ह्यानंतर थोड्या दिवसातच राजाची तब्येत बिघडली. त्यावेळेस राजाने श्रवणला जवळ बोलावित म्हटले-"बेटा, धर्माच्या रक्षणाकरीता पूर्वपरंपरा राज्य चालवत आलेले आपले पूर्वज आपल्या प्राणांची सुद्धा पर्वा करीत नसत. तुलाही त्यांच्याच पाऊलावर पाऊल टाकून जावयास पाहिजे. धर्माचे आचरण करीत असतांना तुला जर कां कोणती अडचण वाटली तर तू आपल्या राज्याच्या दक्षिण दिशेकडे स्थित धर्मदेवीचे देऊळ आहे. तेथे जाऊन तिचे दर्शन कर. तुला नक्कीच तुझ्या समस्यावर काहीतरी उपाय शोधून मिळेल.

आपल्या वडिलांच्या मरणानंतर श्रवणने सुद्धा धर्मानुसार राज्यकारभार करीत धर्मात्मा बनून राज्य प्राप्त केले. अशा तऱ्हेने बरीच वर्षे उलटली. परंतु एक दिवस श्रवणच्या समोर धर्मा सम्बंधी एक जटील समस्या उभी राहिली.

श्रवणच्या मुलीचे मालतीचे एका छोट्या सामंत राजाच्या मुला बरोबर प्रेम होते.












राजाला आपल्या मुलीच्या इच्छेविरुद्ध जाता येईना. परंतु राजघराण्याच्या चाली नुसार तिला तिच्या योग्यतेच्या राजकुमाराबरोबर लग्न करणे भाग होते. असे जर केले नाही तर ते राज्याच्या विरुद्ध सिद्ध होऊ शकले असते. जर वंशपरंपरागत आलेल्या रुढी सोडून त्याने तिचे लग्न लावून दिले तर मुलीला दुःखी करणारा म्हणून आपला असता प्रसिद्ध होऊ.

"ह्याला उपाय काय?" ह्यावर श्रवण खोल विचार करू लागला. तेव्हां त्याला त्याच्या वडिलांनी सांगितलेली गोष्ट आठवली. तो त्याच क्षणी त्या धर्मदेवीच्या देवळात गेला. देवीला नमस्कार करून त्याने आपली समस्या तिच्यापुढे सविस्तर सांगितली.

दुसऱ्याक्षणी ती देवीची मुर्ती देदीप्यमान होऊन चमकू लागली. व त्या देवीच्या मुखातून वाणी ऐकू आली—"हे श्रवण, तू प्रथम पिता आहेस कां राजा!"

"देवीमाते, मी राज्याभिषेकाच्या वेळी विवाहीत होतो. त्या वेळी मालती एक छोटी मुलगी होती!" राजा म्हणाला.

"तर मग तुला मालतीच्या बाबतीत एक राजा नाही तर एका पित्याच्या दृष्टीनेच पाहिले पाहिजे. हाच खरा धर्म आहे!" धर्मदेवीने सल्ला दिला.

ह्यानंतर त्या प्रतिमेमधील चमकणारा प्रकाश लुप्त झाला. श्रवणने पुन्हां एकदा देवीला प्रणिपात केला व तो राजवाड्यात निघून आला. नंतर एका शुभमुहूर्तावर त्याने आपल्या मुलीचा विवाह त्या सामंत राजाच्या मुलाशी करून दिला.

ह्या घटने नंतर काही दिवसाने एक समस्या पुन्हां निर्माण झाली राजाचा मुलगा नागा गुरुकुलात विद्याभ्यास करीत होता. त्याच्यामुळे पुन्हां एक अडचण आली. नागा आपल्या बरोबरीच्या एका मित्राबरोबर खड्गयुद्ध करीत होता. त्यावेळेस चुकुन ते शस्त्र त्याच्या मित्राच्या खांद्याला लागुन त्याचा डावाहात कापला गेला. तो मित्र विराग नावाचा एक ब्राह्मणाचा मुलगा होता.

विरागने दरबारात येऊन राजाला निवेदन करीत म्हटले—"महाराज, आपल्या मुलाने नागाने अशा इर्ष्येने माझ्याशी युद्ध करून माझा डावा हात कापला आहे की मी खड्ग विद्येत त्याच्यापेक्षा श्रेष्ठ होईन. आपल्या धर्माचरणानुसार शिक्षा म्हणजे वार करण्याचा बदला वारच आहे. तेव्हां आपण आपल्या मुलाचा डावा हात कापून आपल्या धर्मात्म्याच्या नावांचे सार्थक केले पाहिजे.

श्रवणला त्यावेळी काय करावे सुचले नाही. त्याने सभा संपवली व तो धर्मदेवीच्या देवळात गेला देवीला दंडवत घालीत त्याने आपली विवंचना देवीसमोर मांडली.

सर्व देऊळ प्रकाशमय झाले. व देवीची गंभीर वाणी सर्वत्र दुमदुमली. "श्रवण तुझ्या राज्याची नीति "माराचा बदला मार हिच आहे. तेव्हां त्याला कलंक लागता कामा नये. तुझ्या मुलाने विरागचा हात कापला तेव्हां विरागने सुद्धा तुझ्या मुलाचा हात कापला पाहिजे. हाच खरा धर्म आहे."

श्रवणने दरबारात स्वतःचा निवाडा सांगितला. तेव्हां दरबारातील प्रजेने हर्षनादाने त्याला स्विकृति देऊन टाळ्यांचा कडकडाट केला. ह्यावर विराग गुपचूप राजदरबारातून निघून गेला.














कुडलिनी राज्याच्या शेजारचा देश वैशालिनी होता. त्याचा राजा वसंतसेन श्रवणचा बालपणचा मित्र होता. एकदा तो त्याला भेटावयास आला. तेथे एक दिवस रात्रीच्या भोजनानंतर वेळ घालविण्याकरीता त्याने बुद्धीबळ खेळण्याची इच्छा प्रगट केली. श्रवणला आपल्याकडे आलेल्या पाहुण्यांना असंतुष्ट करण्याची इच्छा नव्हती. त्यामुळे श्रवणानंद वसंतसेनच्या बरोबर बुद्धीबळ खेळण्यास तयार झाला.

खेळण्यात काही पैज लावली तर खेळाला मजा येते म्हणून तू कोणतीतरी वस्तुची पैज लाव." वसंतसेन त्याला स्फुर्तीदेत म्हणाला.

श्रवणने आपल्या हातातील सोन्याचा तोडा काढून पैज लावली. ह्यावर हसत हसत वसंतसेन म्हणाला–"राजा होऊन सुद्धा आपण काय साध्या लोकांसारख्या अशा क्षुल्लक गोष्टीची पैज लावायची म्हणजे चांगले दिसेल काय? मी माझे राज्य पैजेत लावतो. तू पण तुझे राज्य लाव." वसंतसेनने श्रवणला डिवचले.

श्रवणने सुद्धा तुझ्यापेक्षां मी कमी नाही असे समजून खेळण्यास आरंभ केला. खेळात एकमेकांनी एक दुसऱ्यास पराभूत करण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु दुर्दैवाने श्रवण खेळीत हारला. व पैज लावल्या प्रमाणे त्याने त्याचे राज्य वसंतसेनच्या हाती सोंपविण्याची तयारी केली. परंतु राजा वसंतसेनने तसे मान्य केले नाही. परंतु म्हटले–"मी फक्त खेळण्यात मजा यावी ह्या उद्देशाने तसे म्हणालो होतो. आपण दोघे गाढ मित्र आहोत. मी तुझे राज्य हस्तगत करून तुझ्याबरोबर मित्रद्रोह करू इच्छित नाही."

ह्यावर मोठ्या कष्टाने श्रवण म्हणाला–"ते खरेही असू शकेल की तू गमतीखातर तसे म्हणाला असशिल परंतु मी माझे राज्य मनाने पैजेत लावले आहे. मी माझे वचन कधी मोडत नाही. तेव्हां तू ह्या राज्याचा स्विकार कर." अशा प्रकारे श्रवणने त्याच्यावर जोर दिला.

तरीही वसंतसेनने श्रवणचे म्हणणे मान्य केले नाही. तेव्हां शेवटी ह्यावर काहीतरी उपाय काढण्याकरीता ते दोघे धर्मदेवीच्या दर्शनाला आले. श्रवणने आपल्यापुढील समस्या देवीपाशी बोलून दाखविली. व तिची प्रार्थना केली.

परंतु त्याखेपेस देवीच्या देवळात अंधारच राहिला. प्रकाश झाला नाही. ती हीन स्वरात म्हणाली–"श्रवण, राज्य कोणाच्याही हाती सोपवणारा तू कोण होतोस? राज्य हे जनतेचे आहे. राजा हा केवळ कारभार करणारा असतो जसा देवळातील पुजारी. असतो तसा."

धर्मदेवीचे उत्तर ऐकून वसंतसेन अत्यंत प्रभावित झाला. तिला साष्टांग नमस्कार घालून तो तेथून निघून गेला.

ह्यानंतर श्रवणही तेथून जायला निघणार तोच धर्मदेवीच्या मुखातून काही शब्द बाहेर पडले. "हे श्रवण, तू राज्य पैजेत लावण्यापूर्वी जनतेच्या बाबतीत काहीच विचार केला नाहीस. तू धर्माच्या बाबतीत अतिक्रमण केलेस तू जुगारी आहेस. त्यामुळे यापुढे राज्यकारभार करण्याची तुझी लायकी नाही. त्यामुळे तू ज्या राज्यात राहशिल तेथे मी रहाणार नाही.

त्याचक्षणी धर्म-देवीचे शिर धडापासून तुटून खाली पडले. श्रवण अत्यंत दुःखाने आपल्या महालात परत आला. व एक शुभमुहूर्त पाहून त्याने आपला मुलगा नागानंद ह्याचा राज्याभिषेक करविला. व त्याला समजावित म्हटले–"मुला बाळा, हे राज्य प्रजेचे आहे. तू फक्त ते चालवणारा रक्षणकर्ता आहेस. हि गोष्ट कधीही विसरू नकोस. तू धर्मदेवीला आपल्या हृदयात जपून ठेव."

तो दुसऱ्या दिवशी धर्मदेवीच्या देवळात गेला. तेथील दृष्य पाहून तो आश्चर्यचकित झाला कारण धर्मदेवीचे शिर पूर्ववत यथास्थानी होते. ती पूर्वीपेक्षा अत्यंत देदिप्यमान दिसत होती. ते पाहून श्रवणानंद अत्यंत आनंदित झाला. व त्याने खाली गुडघे टेकून तिला साष्टांग दंडवत घातला.





# भिणाऱ्या सुनबाई

सुरज स्वर्णलताचे लग्न थाटामाटात झाले. ती आपल्या सासरी आली. त्या दिवशी स्वर्णलताच्या सासऱ्याने शामरावने तिला समजावत म्हटले–"मुली, तुझी सासू खूप लहरी व तापट आहे. त्यामुळे ती तुला जे काही काम सांगेल त्याप्रमाणे करीत जा.

"ठिक आहे." असे म्हणत स्वर्णलताने मान डोलावीत होकार दिला.

स्वर्णलता त्या दिवसापासून मोठे मन लावून घरातील सर्व काम करु लागली परंतु कमलाबाई मुद्दाम तिला उकरून जास्त कामे सांगू लागल्या. स्वर्णलताला त्या घरात येऊन तीन दिवस सुद्धा झाले नव्हते. तो तिला विहिरीवरून पाणी भरून आणायला थोडा उशिर झाला तेव्हां तावातावाने सासू कमलाबाई पुटपुटत दरवाजापाशी आल्या व म्हणाल्या–"स्वर्णलता, एवढे उशिर करून पाणी आणलेस तर बाकीचे काम कोण करणार ग?" हे सर्व कपडे केव्हां धुवणार?"

सासूचे ओरडणे ऐकताच स्वर्णलता घाबरून गेली कांपू लागली. त्यामुळे भयाने तिच्या हातून कळशी खाली पडली व पाणी सांडून कळशीला एक मोठा पोचा पडला. तेव्हां सासूने तिला जास्तच दामटले. व शिव्यागाळ केली.

स्वर्णलता थरथरत गप्प राहली. पाठीमागच्या दारातून तिचा सासरा श्यामरावने हा सर्व प्रकार पाहिला. व बायको जवळ येत म्हणाला शांत हो "सून घाबरली आहे! आता तिला काही बोलू नको."

एक दिवस दुपारच्या वेळी सर्वंजण जेवावयास बसले होते. स्वर्णलता तूप वाढीत होती.

कमलाबाईने सुनेकडे रागीट नजरेने पहात म्हटले–"मी तुला किती वेळा सांगितले की, तूप गरम केल्या शिवाय वाढीत जाऊ नकोस. "हाय! राम! ही तर एक बुद्दुच निघाली!"



स्वर्णलताच्या हाताला कांपरे सुटले. व तुपाचे भांडे तिच्या हातून खाली पडले व सर्व तुप सांडून गेले.

"अग गधडे, इतके महाग व साजुक तूप तू मातीत घालवलेस? असे म्हणत ती सूनेला ओरडून रागावू लागली.

भीतीने थरथरत असलेल्या सुनेला पाहून श्यामरावना तिची दया आली. त्यांनी मधे पडून पत्नीला समजावून शांत केले.

त्याच दिवशी संध्याकाळी सुन विहीरवर पाणी भरीत होती. तेव्हां सासू तोंड धुण्याकरीता विहिरीवर आली व दरडावीत तिला म्हणाली–"अग कोर्टे, चुलीवर भात शिजतो आहे. तिकडे न पहाताच इकडे पाणी भरायला आलीस कां? तुझ्या डोक्यात काय दगड भरले आहेत की काय थोडी पण अक्कल नाही!"

स्वर्णलता ते ऐकताच घाबरली व तिच्या हातून बादली दोरीसकट सुटून विहिरीत जाऊन पडली. तिच्या पतीने सुरजने आंकडी आणून बादली विहीरीतून काढली.

दुसऱ्या दिवशी पहाटेच स्वर्णलताने दोन्ही गाईच्या धुवून धारा काढल्या व भांड्यात दूध भरून घरात आणले तेवढ्यात सासू उठून समोर येत चिडून म्हणाली–"अग तुला कितीदा सांगितले की, गाईना चारापाणी करावयास विसरू नकोस पण तुझ्या सवयी जात नाहीत.

सासूचे ओरडून बोलणे ऐकूनच स्वर्णलता घाबरून गेली व तिच्या हातातून दुधाचे भांडे खाली पडले.

त्याच वेळी घरात येत असलेल्या श्यामरावाने ते दृष्य पाहिले व विचारले–"स्वर्णा, काल तू कळशी खाली पाडलीस, तुपाचे भांडे पाडून तूप सांडवलेस. आज सकाळी बादली विहिरीत पाडलीस व आत दूध सांडलेस अशा प्रकारे कामे करत राहिलीस तर कसे चालेल ग."









स्वर्गलता सासऱ्याचे बोलणे ऐकून जास्तच घाबरून गेली व रडत म्हणाली– "मामजी, जर कां कोणी मला रागावले तर मला भीती वाटते आणि मी थरथर कांपू लागते मी काय करू?"

त्यावर श्यामराव आपल्या बायकोला म्हणाले–"तू जेव्हां सुनबाईना रागावतेस तेव्हां कोणती नां कोणती तरी गोष्ट खराब होते.त्यामुळे तू आपल्या रागालाआवर घाल!"

कमलाबाई नवऱ्याच्या बोलण्याने नाराज झाली व तोंड वाकडे करीत तेथून निघून गेली.

दुसऱ्या दिवशी कमलाबाईच्या शेजारच्या कांताबाई काही कामाकरीता त्याच्या घरी आल्या. तेव्हां त्यांनी आतल्या बाजूला असलेल्या सुनेला पाणी आणावयास सांगितले. स्वर्णलताला पाणी आणावयास थोडा उशिर झाला. त्यावर सासूने विचारले–"अग, सांगितल्या बरोबर तुला पाणी आणावयास काय झाले?

स्वर्गलता घाबरून थरथर कांपू लागली व तिच्या हाताला कांपरे सुटल्यामुळे तांब्याभांडे खाली पडले त्यावर कमलाबाई कांताबाईला सांगत म्हणाली–"ताई, माझ्या सुनेची हि हालत आहे. आम्ही काहीही सांगावे ती हातातील वस्तु खालीच पाडते आणि विचारले तर उलट सांगते की, मला भीती वाटते.

"हो, हो, ज्या नविन मुली सासरी येतात त्या अशाच काहीशा घाबरतात त्यामुळे घरातल्या वस्तुचेच नुकसान होते त्यावर एकच उपाय आहे. जर आताच आपल्या रागाला आवर घाल.

त्या दिवसापासून कमलाबाईने आपल्या रागाला आवर घातला व आपल्या सुनेबरोबर शांतचित्ताने बोलणे चालणे सुरू केले. सुनेमुळे आपल्या बायकोत झालेला बदल पाहून शामराव अत्यंत खूष झाले. स्वर्णलता खुप समजुतदार होती. त्यामुळे तीने सासू जेव्हां रागावत असे तेव्हां भिण्याचे नाटक मोठ्या कौशल्याने केले. परंतु ही गोष्ट फक्त तिचा नवरा सुरेज ह्यालाच ठाऊक होती.






शंकर पार्वतीचा विवाह अशाप्रकारे यथोचित पार पडला. तिकडे तारकासुर देवांना फार त्रास देऊ लागला. त्यांनी ब्रह्मदेवाकडे आपले गाऱ्हाणे नेले व म्हणाले– "हे देवाधिदेवा ब्रह्मदेवा! तू तारकासुराला जो वर दिला त्यामुळे आम्हांला निरनिराळ्या प्रकारे यातना सहन कराव्या लागत आहेत. त्याला ठार केल्याशिवाय आम्हांला शांति मिळणार नाही. तरी त्याला ठार करण्याचा काही तरी उपाय कर."

ब्रह्मदेव देवांना धीर देत म्हणाला– "मी तारकासुराला वर देऊन त्याला अजिक्य केले हे खरे आहे. पण वर दिला नसता तरी भागले नसते तप करणारा मग तो सुष्ट असो किंवा दुष्ट असो त्याला वर देणें भाग आहे. दुष्टाला वर दिला नाही तर तो तपश्चर्या करणे सोडील का? तपश्चर्येमुळे उत्पन्न होणारा ताप त्रिलोकाला भस्म करील. त्रिलोकाच्या रक्षणासाठी द्यावा लागतो. वर मिळविणारा त्याचा दुरुपयोग करतो तेव्हां त्याचे पारिपत्य करावे लागते. चला विष्णूकडे जाऊन त्याचा सल्ला घेऊ या."

सर्व देव विष्णूकडे गेले व तारकासुराच्या अत्याचाराचे वर्णन करून त्याचे पारिपत्य करण्यास उपाय सुचविण्यास सांगितले. विष्णू म्हणाला–"पार्वती परमेश्वर विवाहित झाले आहेत. त्यांना मुलागा होईल तेव्हां तुमची इच्छा पूर्ण होईल."











शंकर पार्वतीचा विवाह होऊन पुष्कळ काळ लोटला. त्यांना आमच्या स्थितिची कल्पना करून द्यावी." देव विष्णूला म्हणाले.

विष्णु ब्रह्मदेवाला व देवांना बरोबर घेऊन कैलास लोकी गेला. शंकराच्या आज्ञेने चहूंकडे कडक पहारा होता. विष्णु नंदीला म्हणाला–"आम्ही शंकराच्या दर्शनाला आलो आहो. आम्हांला आत जाऊ दे."

"पार्वती परमेश्वर एकांतात आहेत. आत कोणाला प्रवेश देऊ नये अशी प्रभूची आज्ञा आहे. त्यांची आज्ञा मोडणे आम्हांला कसे शक्य होईल? तेव्हां क्षमा करावी." नंदी म्हणाला.

विष्णु व इतर देव ज्या कामासाठी आले होते त्यात विघ्न आले. म्हणून विष्णु देवांना म्हणाला–"तुम्ही शंकराचे पार्थिव लिंग तयार करून पंचाक्षरी मंत्राचा जप करीत त्याची आराधना करा. शंकर प्रसन्न होऊन तुम्हांला दर्शन देईल. तेव्हां जे निवेदन करावयाचे असेल ते करता येईल. तुम्ही नक्कीच यशस्वी व्हाल. यात शंका नाही." विष्णू म्हणाला.

देवांनी पार्थिव लिंग तयार केले आणि सर्वजण मिळून हर हर महादेव शंभो असा जयघोष करू लागले.

शंकर भक्तांच्या हाकेला पावला. तो धावत बाहेर येऊन म्हणाला–"देव हो! तुम्ही कशासाठी माझे एवढे स्मरण केलेत? बोला काय पाहिजे?"

ब्रह्मदेवादिक देव म्हणाले–"हे शंकरा! तारकासुराच्या वधासाठी तु स्वतःची एक सृष्टी कर."

ते ऐकून शंकराने आपले वीर्य अग्नि-कुंडात सोडले. पार्वतीला राग आला व तिने देवांना अपत्य प्राप्ति न होणार, असा शाप दिला.

शंकराचे वीर्य पडल्याने अग्नि घाबरून गेला तो ताप त्याला असह्य झाला. त्यात सप्त ऋषींनी भक्तिपूर्वक होम करून पूर्णाहुति दिली.

त्या वेळी अग्नि सप्त ऋषींच्या पत्नींना पाहून त्यांच्या विरहाने दुःखी झाला. अग्नीची पत्नी स्वाहा हिला ती गोष्ट कळली. ती प्रत्येक मुनिपत्नीरुपे अग्नीस भेटली. परंतु तिला अरुंधतीचे रूप घेता येईना म्हणून स्वाहाने त्या वीर्याचे सहा भाग करून ते आपल्या पोटात धारण केले. तिला फार कळा सोसाव्या लागल्या. म्हणून तिने आपल्या गर्भातला अंश कैलास पर्वताच्या शिखरावर टाकला. तो अंश वायूने गंगेत सोडला. गंगेत तो अंश यथासमयी पूर्ण वाढ झाल्यावर मार्गशीर्ष षष्ठीला धनिष्ठा नक्षत्रावर एक शिशुरूपे प्रगट झाला. त्या मुलाला सहा तोंडे व बारा हात होते व वज्राचा देह होता.

सर्वत्र अशी किंवदंती पसरली की सहा मुनि पत्नींना अग्नीच्या कृपेने हा मुलगा झाला. ते ऐकून मुनींनी आपापल्या पत्नीचा त्याग करण्याचे ठरविले. तेव्हां
















स्वाहाने मुनींना वस्तुस्थिती समजावून सांगितली तिच्या बोलण्याकडे त्यांनी दुर्लक्ष केले. मुनींनी मुनिपत्नींचा त्याग केला.

मुनिपत्नींनी गंगानदीकाठी जाऊन तो षण्मुख असलेला शिशु पाहिला. त्यांना पान्हा फुटला आणि त्या शिशूने सहा मुनिपत्नींचे स्तनपान केले.

ब्रह्मदेवाने स्वतःने जाऊन मुलाची जन्मकुंडली तयार केली आणि त्या मुलाचे नामकरण केले. तोच कुमारस्वामी, षण्मुख स्कंध इत्यादि नावांनी प्रसिद्ध झाला.

मुनिपत्नींनी त्या मुलाला विचारले— "बाळा! पतींनी आम्हांला घराबाहेर काढले आहे आता, आमचे कसे व्हायचे?

कुमारस्वामी म्हणाला—"मी तुमचा मुलगा आहे! तुम्ही माझ्या माता आहांत म्हणून तुम्ही माझ्या बरोबर रहा."

कुमारस्वामी दिवसेंदिवस वाढू लागला. तो डोंगराळ प्रदेशात हिंडे फिरे. वाघावर किंवा सिंहावर बसे त्यांच्याशी खेळे. त्याला शंकराचे धनुष्य मिळाले. त्याने त्यावर बाण चढवून क्रौंच पर्वताचे शिखर तोडले ते पाहून त्या पर्वतावर रहाणारे राक्षस कुमारस्वामीला मारायला धावले. कुमारस्वामीने सर्वांचा संहार केला.

तिकडे शंकरपार्वतीस एकवीस मुले झाली. ते अन्यान्य गणांचे मूळपुरुष होऊन गणाधिपति झाले.

शंकराची आज्ञा घेऊन नंदी ब्रह्मदेव, विष्णु इंद्र व इतर देवदेवतांना बरोबर घेऊन गंगा किनारी आला. व त्यांनी कुमारस्वामीला बोलवणे धाडले. कुमारस्वामी आपल्या सहा मातांना घेऊन पुष्पक विमानात बसून कैलास पर्वतावर आला.

पार्वती परमेश्वरांनी पुढे येऊन कुमारस्वामीला आलिंगन दिले. व दरबारात आपल्या जवळ बसवून घेतले.

त्याच वेळी ब्रह्मदेव कुमारस्वामीच्या अगदी जवळ उभे रहात म्हणाले—"पार्वती परमेश्वर आज आपला मुलगा कैलासला आला आहे. उद्या त्याला देवतांचा सेनापती म्हणून अभिषेक करणे जात उचित होईल. ते ऐकताच सर्व देव-देवताच्यात आनंदोत्साह निर्माण झाला. पार्वती शंकरांनें सर्वां समक्ष आपल्या मुलांचा उपनयन संस्कार केला. त्यानंतर ब्रह्मदेवांनी पुरोहित बनून कुमारस्वामींनी देवांच्या सेनेचे अधिपत्य करण्याकरीता त्याचा अभिषेक केला.

पार्वती परमेश्वर कुमारस्वामीला म्हणाले—"बाळा, तू ह्या क्षणी देवांचा अधिपती आहेस. तू इंद्राच्या सहाय्याने ह्या त्रिलोकाचे रक्षण कर. दुष्टांचा व अत्याचारी लोकांचा समूळ नायनाट कर. जगात महान बनून यश संपादन कर.

ह्यानंतर विश्वकर्माकडून कुमारस्वामी करीता स्वर्गात एक सुंदर असा महाल बनविण्यात आला.

महाल बांधून झाल्यावर शंकर पार्वती कुमारस्वामीला म्हणाले—"बाळा, तुझ्याकरीता महाल बांधवला आहे! तू तेथे जाऊन तुझे वास्तव्य कर."

पार्वतीने कुमारस्वामी बरोबर अनेक देवी-देवतां दिल्या. देवांनी कुमारस्वामीला अनेक वर दिले आयुधे-अस्त्रे देऊन तारकासुराचा संहार यशस्वी रितीने करावा ह्याकरीता आशीर्वाद दिले. त्यानंतर कुमारस्वामींने, ब्रह्मदेव, विष्णु इंद्र आणि देव-देवतांना नमस्कार केला. आणि



आपल्या गणांना आदेश दिला तुम्ही सर्वजण तारकासूराच्या नगराला घेरण्या करीता आवश्यक ती तयारी करा. असे म्हणून त्याने युद्धाच्या तयारी करीता शंख वाजविला आणि स्वर्गात स्वत. करीता बांधलेल्या निवास स्थानी गेला.

तिकडे शोणितपुरला तारकासुराला ही बातमी समजली की शंकराच्या वीर्यापासून उत्पन्न झालेला कुमारस्वामी देवांचा अधिपती होऊन आपला संहार करण्याकरीता येत आहे.

तारकासुराने ही गोष्ट समजताच आपल्या मंत्री नाव सेनापतींना बोलावून समजावून सांगितले—"आपल्या गुप्तहे-



राकडून मला ही गोष्ट समजली आहे. तेव्हां तुम्ही सुद्धा त्यांना तोंड देण्याकरीता सैन्यांची जमवाजमव करा."

त्यानंतर शिवभक्त तारकासुराने शंकराचे पार्थिव लिंग तयार करून त्याच्या पुजे-करीता आवश्यक त्या वस्तु बेलपत्री नारळ पंचामृत फुले फळे, सुगंधी द्रव्ये वगैरे जमवून लिंगाचा अभिषेक केला. नंतर धूप-दिप करून नैवेद्य दाखविला. आणि नमस्कार करीत म्हणाला–'हे देवाधिदेवा मी तुझी मनोभावनेनी पुजा केली त्याचे उचित फळ मला दे."

तिकडे स्वर्गात देवतांच्या गुरूने बृहस्पतीने निश्चितं मुहूर्त काढून त्यावेळी रणदुंदुभी वाजविली व देव, रुद्र वीरभद्र व देवीगणांना बरोबर घेऊन युद्ध करण्या-करीता निघाला.

कुमारस्वामी इंद्र इत्यादिंच्या बरोबर शोणितपुर गावांत पोहोचला तेथे त्याने नगराला वेढा घालण्याकरीता तेथेच तंबू ठोकला ह्यानंतर सर्वांना तेथून एकत्र करून मच्यावर उभा रहात म्हणाला–"आपल्याला युद्ध करण्यापूर्वी एकदा संधी करण्याकरीता आपल्या दूताला पाठवून त्याचे काय म्हणणे आहे. ते कळवून घेणे योग्य आहे त्यावर तुम्हांसर्वांचा काय विचार आहे?"

त्याच्या म्हणण्याला सर्वांनी अनुमती दिली, ह्यानंतर कुमारस्वामीने आपल्या वक्षस्थळापासून उत्पन्न केलेल्या विशाखाला आज्ञा केली–"तू तारकासुराच्या राज्यसभेत प्रवेश करून माझ्या करवी असे सांग आणि त्याचे उत्तर काय हे मला येऊन कळव."

विशाखने शोणितपुर राज्यात प्रवेश करून पाहिले तेव्हां तारक राज्यसभा भरवून कुमारस्वामीला कसे तोंड द्यावयाचे ह्यावर चर्चा करीत होता. तारकाने विशाखला पहात म्हटले–"तू कोण आहेस? कोणत्या कामाकरीता आला आहेस?

विशाख म्हणाला–"तारका, तू शिवभक्त आहेस शंकराचा मुलगा कुमारस्वामी यांने









मला आपला दूत बनवून आपल्याकडे पाठविलेले आहे

तारकाने प्रसन्न होत विशाखाला बसण्यास आदेश केला व म्हणाला–"सांग, कुमार-स्वामीने तुझ्याबरोबर मला कोणता निरोप पाठविला आहे. देवता हे तर माझे शत्रू आहेत परंतु कुमारस्वामी माझा शत्रू नाही.

"तारका, तू तर बराच काळ ह्या तिन्ही लोकांवर अधिकार गाजवून आहेस. परंतु तुझ्या शासनकाळात कोणतीही प्रजा सुखाने आयुष्य घालवू शकली नाहीत. त्यामुळे तू आता आपल्या सर्व अधिकाराची सुत्रे इंद्राच्या हातात सोपवून भोगवती पुरला निघून जा. नाहीतर कुमारस्वामी तुमच्यावर चाल करून तुमचा पराभव करून सर्व राज्याची सुत्रे इंद्राच्या हातात सोपविण्यास सज्ज आहे. हा निरोप तुम्हांला सांगण्या करीताच कुमारस्वामीने मला दुत म्हणून तुमच्याकडे पाठविले आहे.

ह्यावर तारक चिडून म्हणाला–"मी घाबरून राज्य सोडण्यास अजिबात तयार नाही. त्यांना जाऊन सांग की मी उद्या सकाळी युद्ध करण्यास तयार आहे.

दुसऱ्या दिवशी सुर्योदयापूर्वीच दोन्ही पक्षांतील सैन्य युद्ध करण्यास सज्ज झाले. दोन्ही सैन्यांनी प्राणपणाने लढा दिला.

तारकाच्या बाजूने बाणासुर, प्रलंभासुर, जंभासुर, अतिवल शंभासुर कुंभासुर इत्यादी वीर राक्षस होते. कुमारस्वामीकडून वीभद्र अग्निहोत्र, धर्म सुर्य-चंद्र इत्यादि होते.

युद्ध अनेक दिवस चालले, परंतु तारकाला पराभूत करणे असंभव आहे असे वाटू लागले. देव-देवता लढून लढून थकून जात दुबळे बनत चालले. त्यांची शक्ति पूर्णपणे नष्ट होऊ लागली. ती स्थिति पाहून कुमारस्वामीने शत्रू सैनिकांवर पाशुपत अस्त्राचा प्रयोग केला ते अस्त्र तारकाच्या हाजारो सैनिकांच्यावर बिजली सारखे तुटून पडले. राक्षस सैनिक बिथरून इकडे तिकडे धावू लागले. जे युद्ध भुमीत अडकले ते सर्व एकदम भस्मी-भूत झाले.





# परोपकार

बस्त्रानगरात अजीब नावाचा एका तरुण व्यापारी रहात होता. तो फक्त धनवानच नाही तर ईमानदार सुद्धा होता. त्यामुळे सर्वजण त्याचा आदर ठेवित असत. जर कां कोणी संकटात पडलेला असेल तर त्याला तो मदत करीत असे.

अजीबच्या घराशेजारीच एक सैयद नावाचा व्यापारी रहात होता. अजीबच्या बद्दल लोकांच्या मनांत असलेला आदरभाव पाहून तो त्याची ईर्ष्या करीत असे. दिवसेंदिवस अजीबच्या व्यापारातील फायदा पाहून त्याला रहावले नाही. त्याची झोप उडून गेली. ह्याच मानसिक विकारांमुळे तो आजारी पडला त्याने अंथरूण धरले.

एक दिवस सैयदची बायको अजीबच्या घरी आली व तिने आपला पती तुमची भरभराट पाहून आजारी पडला असल्याचे कारण सांगीतले.

सर्व गोष्टी ऐकून अजीबने तीला समजावत म्हटले–"तू काळजी करू नकोस तुझा पती बरा होण्याकरीता मी उपाय करतो."

त्या दिवशी रात्री अजीबने त्या विषयी खूप सखोल विचार केला. "हे काय आपल्या संपत्तीमुळे शेजारणीचा पती आजारी पडला आहे? अशी संपत्ती असून काय उपयोग असा विचार करून तो पहाटेच घरातून निघाला.

अजीब एकटाच चालत संध्याकाळपर्यंत एका ठिकाणच्या उजाड विहिरीपाशी येऊन पोहोचला. त्याच्या चौफेर हिरवेगार गवत उगवलेले होते. अजीब दमल्यामुळे तेथेच बसला व झोपी गेला.

दुसऱ्या दिवशी सकाळी त्या रस्त्याने काही व्यापारी निघाले. त्यांनी अजीबला पहाताच ओळखले व त्याला उठून बसवत












त्याला दुध व रोटी देऊन त्याची भुक शमविली. नंतर त्याला विचारले–"अजीब तू इथे कोणत्या कामाकरीता आला आहेस ?"

"मी जीवनाला कंटाळलो आहे? ह्यापुढे मी व्यापार धंदा करणार नाही!" अजीबने उत्तर देत म्हटले.

त्या लोकांना अजीबचा स्वभाव चांगलाच ठाऊक होता. त्यामुळे त्यांनी त्याची सारी व्यवस्था करून स्वत: बरोबरचे दोन नोकर ठेऊन ते तेथून निघून गेले. रस्त्यात लागणाऱ्या गावांमध्ये त्यांनी जाता जाता असा प्रचार केला की, अमुक एका विहिरीपाशी एक महात्मा येऊन उतरला आहे.

ते ऐकून गावातील अनेक लोक विहिरीपाशी गोळा झाले. त्यांनी अजीब करता तेथे एक झोपडी बांधली. अजीब आपल्यापाशी येणाऱ्या लोकांना उत्तम प्रकारे सल्ला देऊ लागला. त्यामुळे तेथे सुद्धा त्याने नाव व यश मिळविले चोहीकडे त्याची किर्ती पसरली.

सैयदला जेव्हां समजले की अजीब व्यापार धंदा सोडून हे शहर सोडून कुठे बाहेर गावी निघून गेला आहे. तेव्हां त्याला अत्यानंद झाला. परंतु थोड्या दिवसानें त्याला अजीबच्या नवीन जीवनाचा समाचार ऐकावयास मिळाला. तेव्हां त्याला अत्यंत दुःख झाले. व एके दिवशी तो अजीबला पहावयास घरातून बाहेर पडला.

संध्याकाळच्या वेळी आपल्या शिष्यगणांसमवेत बसून गप्पा करीत असलेल्या अजिबच्या जवळ जात सैयदने त्याला नमस्कार केला व म्हणाला–" बाबा साहेब, मी आपल्यापाशी काही गुप्त गोष्टीं संबंधी सल्लामसलत करण्यास आलो आहे."

तेव्हां अजीबनें आपल्या शिष्यांना बाहेर जाण्याच्या इशारा केला. ते सर्व शिष्य बाहेर निघून गेले.

"महात्मन काय आपण मला ओळखले नाहीत ? मी आपल्या शेजारी रहाणारा सैयद. मी आपल्याला एक विशेष गोष्ट सांगण्याकरीता आलो आहे परंतु ती गोष्ट इथे सांगणे बरोबर दिसणार नाही. चला बाहेरील मैदानात तेथेच मी तुम्हांला सर्व काही सांगतो." सैयद म्हणाला.

"ठिक आहे, असे म्हणत अजीब त्याच्या बरोबर बाहेर आला. ते दोघे विहिरीपाशी पोहोंचले.

"हे बघ, ह्या विहिरीत एक विचित्र वस्तु आहे. चल, असे म्हणत सैयदने अजीबला विहिरी जवळ आणले.

अजीब कुतुहलानें विहिरीत डोकावून पाहू लागला तेवढ्यात पाठीमागून सैयदने त्याला विहिरीत ढकलून दिले. व तो आपल्या घरी निघून गेला.

अजीबला पोहोता येत नव्हते परंतु त्या विहिरीत रहाणाऱ्या जलपऱ्यांना अजीब खूप आवडला होता. कारण पूर्वी विहिरी भोवताली ओसाड शुकशुकाट असे आता तेथील शोभा अजीबच्या येण्यामुळे वाढली होती. त्यामुळे त्यांनी अजीबला उचलले व तेथील पायऱ्यांवर आणून बसविले.

"तुला पाहून आम्हांला खूप खुप आनंद झाला. तुझ्यामुळेच येथे उद्या सुलतान येणार आहे." जलपऱ्या त्याला म्हणाल्या.

"कशाकरीता ?" अजीबनें विचारले.

"सुलतानाच्या मुलीला भूत छळते आहे. त्या भूताला काढायचा सुलतानाने खूप



प्रयत्न केला. पण कशाचाही उपयोग झाला नाही. म्हणून शेवटी तुझा सल्ला घेण्याकरीता येत आहे" जलपऱ्यांनी सांगितले.

"बरे, असे आहे काय?" अजीबच्या तोंडून शब्द बाहेर आले.

"तू ज्या मांजरीला पाळतोस त्या मांजरीच्या मिशीतील एक केस काढून तो जाळून त्याचा धूर तिच्या नाकपुड्यांनी हुंगला की, तिच्या मधील भूत पळून जाईल" असे सांगून त्या जलपऱ्या निघून गेल्या.

विहिरी बाहेर येताच त्याने मांजरीला पकडले व तिच्या मिशीचा एक केस उपटून निट सांभाळून ठेऊन दिला.

दुसऱ्या दिवशी सूर्योदय होण्यापूर्वीच सुलतान भेटावयास आला व त्याने मुलीची हकिकत पण सांगितली.

अजीबने राजकुमारीला तेथे घेऊन येण्यास सांगितले. तेव्हां सुलतानाने तिला तिथे आणले. ती वेडयाचे चाळे करीत इकडे तिकडे पहात बडबडत तेथे आली.

अजीबने एका थाळीत निखारा ठेऊन त्यावर तो मांजरीच्या मिशीचा केस ठेवला व त्याचा धूर राजकुमारीला हुंगवला क्षणात ती खाली कोसळली व थोडया-वेळाने झोपेतून उठल्याप्रमाणे उठून बसली तीन शांतपणे बापाकडे निरखून पाहिले.

सुलतानाचा आनंद गगनात मावेनासा झाला. त्याने जवळ उभ्या असलेल्या वजीराकडे वळून पाहीले तेव्हां वजीर म्हणाला–"हुजूर, आपण विसरलात आपण सात महिन्यापूर्वी मला म्हणाला होतात. की जो माणूस शहजादीच्या अंगातले भूत काढेल त्याचाशी तिचे लग्न लावून देईन."

"हो, हो, ते सर्व ठिक आहे परंतु ह्या स्वामीना तर एक वेळ विचारणे भाग आहे नां!" सुलतानाने शंका प्रकट केली.

"ते मी पाहून घेईन! वजीर म्हणाला त्यानंतर अजीबला सविस्तर सांगितले. राजकुमारी बरोबर लग्न करण्याचे अजीबने मान्य केले नंतर दोघांचे लग्न मोठ्या थाटामाटात पार पडले.

काही वर्षाने सुलतान मरण पावला. तेव्हां अजीब गादीवर बसला.

अजीबचे नशिब एकदम उघडल्याचे ऐकूनच सैयद वेडा पिसा झाला.

एक दिवस सुलतान अजीब आपल्या परिवारासह गावात हिंडत असतांना एक फाटके तुटके कपडे घातलेला केस पिंजारलेला माणूस त्याला दिसला. तेव्हां सुल्तान अजीबने त्याला ओळखले व तुरंत आपल्या अधिकाऱ्यांना सांगितले की, सैयदवर चांगला उपचार करून त्याचा वेडेपणा गेल्यावर त्याला एक हजार सोन्याची नाणी बक्षीस द्या.





# आर्किटिक सील जलचर

आर्किटिकच्या सामुद्रिक प्रदेशात जेव्हां बर्फाचे ढिग होतात. तेव्हां देवमाशाची पिल्ले हळू-हळू त्यावरुन घसरु लागतात. तेव्हां त्याच्या नाजुक कोवळ्या पिवळ्या रंगाची कातडी उन्हांत चमकून उठतात भोळा चेहरा लांबुडक्या मांजिरी रंगाच्या डोळयांच्या ह्या माशांची पिल्ले पहावयास खूप सुंदर असतात.

मार्चच्या सुरवाती पासून एप्रिलच्या अखेरीपर्यंत ह्या दोन महिन्याचा अवधीत जन्म घेणारी देवमाशांची पिल्ले एक आठवडाभरच जगतात. एका आठवडयाच्या आत ह्याच्या कातडयाचा रंग मांजिरी होऊन जातो. अशा प्रकारे रंग बदलण्या पूर्वीच शिकारी त्यांची शिकार करून त्यांचे कातडे घेऊन जातात. अशा प्रकारे दरवर्षी हजारो जलचर प्राणी मारले जातात. त्याच्या मऊ कातडयांच्या उपयोग श्रीमंत लोकांच्या कपडया करीता करण्यात येतो.

ह्या शतकाच्या सुरवाती पासून जवळजवळ वीस मिलीयन एवढ्या संख्येने सध्याच्या मासेमारी स्थितीत घटून एक मिलियन पर्यंत पोहोचली आहेत. न्यु फाउण्ड लैण्डच्या "ग्रीन पीस" संस्थेच्या म्हणण्यानुसार जर प्राणी मरण्याचा असाच क्रम चालू राहिला तर पुढच्या दहा वर्षात ह्या प्राण्यांच्या पिल्लांचा समूळ नायनाट होण्याचा धोका आहे. ही संस्था देवमाशांच्या पिल्लांचे संरक्षणाच्या प्रयत्नात आहे.

आर्किटिक देवमाशाची पिल्ले जलचर प्राण्यांपैकी स्तन आहेत. ह्याच्यांत हत्ती एवढे देवमाशचे प्रकार पण आहेत यांचे वजन चार टन, लांबी ६ मिटर असते हे जलचर पाण्यातील मासे खेकडे किडे इ. पकडून खातात! ह्याचे कान इतके छोटे असतात की ते स्पष्ट दिसत नाहीत. परंतु त्याची श्रवणशक्ति तिक्ष्ण असते.

हे जलचर पाण्याच्या बाहेर तोंड काढून हवा ओढून आत घेतात व पाण्यात बुडतात. पाण्यात असतांना ह्याचे हृदय मंदगतीने चालते त्यामुळे हे जलचर प्राणी पाण्यात बराच काळ राहू शकतात. जमिनीवर येतांना खूप आळशी सुस्त वाटतात.



# चांदोबा

संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी

लोभी वृत्तीच्या माणसांच्या इच्छेला काही मर्यादाच नसते. ते सर्व काही संपन्न असले तरी असंतुष्ट रहातात. त्यांना खरे पहाता पूर्वगोष्टीचे ज्ञान देऊन गतजीवनातील आठवणी सांगितल्या तर एखादे वेळेस त्याच्यात बदल घडण्याची शक्यता असते ह्याचे उदाहरण आपल्याला "अतृप्त इच्छा" ही गोष्ट वाचूनच समजेल.

## अमर वाणी

बहिर्मरीचं मलिन, मन्तस्सारं हि दृश्यते ।
विकार रूपोपि बुधः, हृदि प्रज्ञान्वितः खलु ॥

[बाह्य सुंदर रूप पाहून माणसाचे उपजत गुण काही आपण पाहू शकत नाही. काळी मिरी जशी बाहेरून काळी दिसली तरी आत जहाल तिखट असते तद्वतच बाहेरून कुरूप दिसणारी माणसे सुद्धा विद्वान पंडीत असतात.]

वर्ष : ३५ ऑक्टोबर १९८५ अंक : ४
एक प्रत : २-०० :: वार्षिक वर्गणी : २४-००








## चोरांना पकडणारा पोपट



[illegible] कुटुंबात एकदा चोरी झाली. परंतु कोणालाही [illegible] की, चोरी कशी झाली? त्या घराच्या मालकीणीने एका पोपटाला पाळले होते चोरीनंतर तो पोपट सारखा हाका मारीत राहीला रोनी रॉबर्ट तेव्हां पोलिसांनी चोरांच्या रेकॉर्ड मध्ये असलेल्या रोनी व रॉबर्टला पकडून हातकड्या घातल्या घरात कोणीही नाही असे पाहून ते दोघे एकमेकांना नावांनी हाका मारीत होते ते पाहूनच तो पोपट त्यांची नांवे तोंडाने म्हणत राहीला होता.

## गळणारा धातु

न्यु हाम्पशायर नावाच्या एका कंपनीने एका नविन धातुचा शोध लावला आहे. यद्यपि ही एक धातु आहे. तरी सुद्धा तिच्यात पाणी मिसळले तर ते बारा मिनिटाच्या आत गळून जाऊन आपले अस्तित्व घालवून बसते.



## पाण्यात बुडालेले शहर



महाभारताच्या पुराणावरून आपल्याला असे समजते की, श्रीकृष्णाच्या मरणानंतर द्वारका नगर समुद्रात बुडून गेले, परंतु सद्द स्थितित डॉ. एस् आर् राव ह्यांच्या नेतृत्वाने पुरातन विभागातील खोदाईच्या वेळी असे दिसले कि खरोखरी इ. पू. १५०० मध्ये एक प्राचिन शहर समुद्रात बुडाले होते.

## तुम्हांला माहीत आहे कां?

१. सर्वात प्रथम पृथ्वी गोल आहे असे सांगुन विश्वास संपादन करणारी व्यक्ति कोण?
२. सर्वात प्रथम पृथ्वीचा परिघ मोजणारी व्यक्ति कोण?
३. ध्रुव प्रदेशांच्या पेक्षा भूमध्य रेखांच्या जवळच्या वस्तुंचे वजन कमी होते, कां?
४. जगातील सर्वात मोठे अनैसर्गिक बंदर कुठे आहे?
५. जगातील सर्वात मोठे वाळवंट सहारा परंतु दुसरे मोठे वाळवंट कुठे आहे?

[उत्तरे पान ६४ वर पहावीत.]

# अजामिल

**प्रा**चिनकाळात कन्याकुब्ज नगरात अजामिल नावाचा एक ब्राह्मण रहात होता. लहानपणी तो खूप चरित्रवान व सदाचारी होता. तारुण्यात पदार्पण केल्यानंतर तो एके दिवशी फुले वेचण्याकरीता म्हणून पुष्पवाटिकेत गेला. परत येताना त्याला काही दारुडे जुगारी व वाईट व्यसनांत मतींगुंग झालेले तरुण दिसले. त्याचक्षणी अजामिलच्या मनाने चुकीच्या रस्त्याने जाण्याचा निर्णय घेतला व त्याने घरदार सोडून ताडी विकून धर्मविरुद्ध वागणाऱ्या एका बाई बरोबर विवाह करून भोगविलासात आपले आयुष्य घालवले. त्यांना एकूण आठ मुले झाली शेवटच्या मुलाचे नांव त्यांनी "नारायण" असे ठेवले.

वार्धक्य आल्या बरोबर अजामिल आजारी पडला व त्याने अंथरूण धरले. त्या स्थितित असतांना त्याला यमराजाचे दूत दिसू लागले. मरणाच्या भीतीने त्याने मोठ्याने किंचाळत आपल्या लहान मुलाचे नांव घेत 'नारायण' 'नारायण' असे ओरडत हांका मारले. हे शब्द जेव्हां विष्णूदुतांच्या कानी पडले तेव्हां त्यांनी तावडतोब अजामिलला दृष्टांत दिला. तेव्हां तेथे उपस्थित झालेल्या यमदुतांमध्ये व विष्णुदुतांमध्ये वादविवाद सुरु झाला की, ह्याला यमलोकात न्यायचे कां विष्णुलोकात ? अजामिल तर बेशुद्धावस्थेत होता. तरी त्याला अस्पष्ट ऐकू आले. त्यांच्या बोलाचाली वरून कळले आपण कसे नीच जीवन जगत आहोत. त्याचा त्याला पश्चाताप होऊ लागला.

शेवटी यमदुत असा विचार करीत तेथून निघून गेले की–"हा कोणीतरी मोठा विष्णु-भक्त दिसतो आहे. आपण बहुदा चुकून इथे आलो !" असे होऊन त्याची मरणाची वेळ तर टळून गेली. आणि त्याचा परिणाम असा झाला की, त्याचे आरोग्य सुधारू लागले.

त्या दिवसापासून त्याच्या मनात भयंकर बदल झाला. त्याने असे मनांत स्मरण केले आपला लहान मुलगा "नारायण" ह्याला हांका मारले तरी विष्णुदूत त्या बोलावण्याने धावून आले. व विष्णुचे आपल्यावरील अगाध प्रेम पाहून त्याला गहिवरून येऊ लागले. त्याने आपले उर्वरित आयुष्य देवाची भक्ति ध्यान धारणा सदाचरण ह्यात घालवून गंगा किनारी आपली समाधी लावली. व आपल्या शरिराचा त्याग करून तो विष्णु लोकांत गेला.



# कांशाचा किल्ला



१०

[अंधार पडल्यानंतर झाडाच्या फांदीवर पेंगत असलेला चंद्रवर्मा वाऱ्याच्या झोताने झाडा-वरून खाली एका पक्षाच्या पाठीवर जाऊन पडला. अर्ध्या रात्री नंतर एक अग्नीपक्षी तेथें येऊन उतरला आणि त्याने गरूडांना सांगितले कि तुम्ही जादुगारीण कापालिनींला पकडून मांत्रिक शंखूच्या हाती सुपुर्द करा गरूडांनी त्याचे म्हणणे मान्य केले पुढे...]

**अ**ग्निपक्षाने गरूडांच्या बरोबर ज्या बोलाचाली केल्या त्या चंद्रवर्माने ध्यान लावून ऐकल्या व त्याच्या आनंदाला उधाण आले. चंद्रवर्माने त्या कालसर्पाच्या मदती-मुळेच त्या झाडावरचे फळ खाल्ले होते म्हणून त्याला आता पशु-पक्ष्यांची भाषा चांगली समजू लागली होती. त्यामुळे त्याला आता शंभर कोस दूर असलेल्या शंखूपाशी जाण्याकरीता पायी व अनेक संकटे ओढून घेण्याची आवश्यकताच राहीली नाही. गरूडांच्या पिसात लपून बसून त्याला मोठ्या सुलभतेने शंखूपाशी पोहोचणें शक्य होते.

ही मोठी नशिबानी आलेली संधी पाहून चंद्रवर्माला खूपच अत्यानंद झाला. तो मोठ्या आशेन व उत्सुकतेने वाट पाहू लागला. की केव्हां एकदा उजाडते व आपण गरूडांच्या बरोबर उडून केव्हां

एकदा शंखू मांत्रिकापाशी जाऊन पोहोचतो. त्याने आपल्याशीच विचार केला. कापालिनीला कपटीपणाने पकडण्याचा जो उपाय शंखू मांत्रिकाने केला आहे. तो नक्कीच असफल होईल. तशी कापालिनी भोळी-भाबडी नाही. त्या गरूडांनाच काळसर्पाचा आहार बनवायला ती मागे पुढे पहाणार नाही. व त्याकरीता ती नक्कीच काहीतरी मार्ग शोधून काढेल.

चंद्रवर्मा अशाच काही विचारात मग्न होता. तितक्यात आकाशात फटफटीत उजाडू लागले. सूर्य वर आला व त्याची किरणे गरुडांच्या अंगाला लागता क्षणीच गरुड पंख फडफडून पुढच्या मार्गक्रमणाची तयारी करू लागले. ते गरुड उत्तर दिशेकडे वळून उडू लागले ते पहाताच चंद्रवर्माला स्वर्ग दोन बोटे उरली. आपले काम सुलभपणे पार पडेल म्हणून त्याला खूप आनंद झाला. पहाता पहाता ते पहाड जंगले नदी नाले ओलांडून कोण्या एका पहाडावर येऊन उतरले चंद्रवर्माने त्याच्या बोलण्यावरून ताडले हा पहाड त्या शंखू मांत्रिकाचाच आहे. आता आपल्याला तो शंख प्राप्त करणे सुलभ जाईल.

तेवढ्यात चंद्रवर्मा ज्या पक्षांच्या पंखात लपून बसला होता त्याने खाली वाकून दुसऱ्या पक्षाला म्हटले–" अरे मित्रा, ह्या सरोवरात पाहिलेस कां ? ते बघ, हत्तीच्या प्रमाणे माजलेल्या मगरी मगरीचे मांस खाऊन पण बरेच दिवस झाले असतील नां!" असे म्हणत झटक्यात त्याने तीरासारखी खाली उडी मारली.

अशा प्रकारे अचानक गरुडांच्या खाली झेप घेण्यामुळे चंद्रवर्माची पकड ढिली झाली व झटका खाल्ल्याप्रमाणे त्याच्या हातातून त्याचे पंख सुटले व तो खाली असलेल्या सरोवरात गिरक्या खात येऊन पडू लागला.

चंद्रवर्माला आपल्या पाठीवरून सरकून खाली पडत असलेले पक्षाने पाहिले नव्हते. त्याने आपली दृष्टी सरोवरातील मगरीवर केंद्रित केली होती. त्याने मनांत म्हटले की, आता आपण मगरीचा नाहीतर गरुडाचा आहार नक्की बनलो. असा विचार येताच त्याला दरदरून घाम फुटला तेवढ्यात त्या सरोवरामधून उंच आकाशाला पोहोचे असे एक मोठे झऱ्याप्रमाणे कारंजे उंच उडाले व धम्म् आवाज करीत चंद्रवर्मा पाण्यात पडत असता त्याने उत्तरेकडे पाहिले.

गरुडपक्ष्याने मोठ्या आर्तनादाने आवाज केला. त्याने सारा आसमंत जागा झाला नंतर त्याने उंच झेप घेतली तेव्हां त्याच्या पायांच्या नखांच्या पकडीत ती मगर तडफडाट करीत होती.

चंद्रवर्माला ते दृष्य क्षणभरही पहावेस वाटले नाही. त्याने त्या सरोवरात डुबकी मारली नंतर शांतपणे तो पाण्याबाहेर डोके काढून पाहू लागला. त्याने सरोवराच्या सभोवताली आपली नजर टाकली. त्याने








पाहीले लहान मोठ्या मगरी घाबरून जाऊन पळत आहेत.

चंद्रवर्माने क्षणभर विचार केला की. जे काय झाले ते माझ्या भल्याकरीताच झाले समजावयाचे. गरूडांना पाहून त्या मगरी पळून जात होत्या. नाहीतर आपले हातपाय आतापर्यंत त्यांनी चावून चावून खाऊन टाकले असते.

चंद्रवर्मा जीवांच्या भीतीने अगात बळ आणून जोरजोरात हातपाय मारीत सरोवराच्या किनाऱ्यावर पोहत येऊ लागला. सरोवराच्या किनाऱ्यावर घनदाट अरण्ये माजलेली होती. तो जर अशा जंगलात लवकर पोहचला तरच शंखूच्या सेवकांच्या नजरे पासून आपला बचाव करून घेऊ शकत होता. परंतु किनारा अजून वीस तिस कोस लांब होता व त्याला जवळच काही लाटा दिसू लागल्या.

तितक्यात एक प्रचंड मगर आपले तोंड आवासत वेगाने चंद्रवर्माच्या अगदी जवळ येऊ लागली.

चंद्रवर्मा क्षणभर स्तिमित झाला. त्याचे शरिर अशा प्रकारे सरोवराकडे खेचले जाऊ लागले. की पायाला कोणीतरी प्रचंड दगड बांधावेत.

दुसऱ्या क्षणात त्याने भयाने किंकाळी फोडली व सर्व शक्तिपणाला लावून त्याने आपले शरीर किनाऱ्याकडे आणायचा प्रयत्न केला.

चंद्रवर्माला खेकड्याप्रमाणे खाऊन टाकण्याच्या इराद्याने जवळ येणारी मगर वेगाने पुढे येऊ लागली तेवढ्यात चंद्रवर्मा किनाऱ्याजवळ येऊन पाण्यातून बाहेर आला व त्या घनदाट जंगलात भयाच्या मारे पळू लागला. त्या मगरीनें किनाऱ्या बाहेर आपला जबडा वासून थोड्यावेळ चंद्रवर्मा जायच्या दिशेन पाहिले व तिची घोर निराशा झाली. काहीवेळाने तिने आपले अवजड शरिर पुन्हां पाण्यात लोटले.

चंद्रवर्मा धापा टाकीत टाकीत एका वृक्षाच्या बुंधापाशी आला व त्याला टेकून दम घालवण्याकरीता खाली बसला. तेव्हां त्याला आपल्या तलवारीची आठवण आली. त्याला भीती वाटत होती की, आपण पक्षांच्या पाठीवरून खाली पडत असतांनाच आपली तलवार सुटून बहुदा कुठेतरी खाली पडली असणार तेव्हां त्याने आपली नजर म्यानेवर रोखली म्यानेतून तलवारीचे टोक बाहेर दिसले. म्यानेतून तलवार बाहेर खेचली. त्याक्षणी म्यानेत भरलेले पाणी उंच उडाले. त्याने मोठ्या संतोषाने परत तलवार म्यानेत ठेवली.

"मी अजून तरी नाशिबवान आहे म्हणावयाचो. नाहीतर शंभर योजने लांब असलेल्या ह्या प्रदेशात एका मिनिटाच्या अवधीत कोणतेही कष्ट न पडता येऊन पोहोचलो नसतो व त्यातून त्या सरोवरातील मगरीच्या दाढेतून वाचलो नसतो व स्वतःचे संरक्षण करणारी तलवार पण गमावून बसलो नसतो. आता माझे कर्तव्य काय असेल?" अशा प्रकारचे विचार करीत तो उठून उभा राहिला. झाडाझुडूपांना बाजूला सारीत थोडा पुढे गेला. तेव्हां त्याला अगदी समोर जवळच एक उंच पहाड दिसला. त्याचे शिखर म्हणजे लाल भडक नाकाच्या शेंड्या प्रमाणे दिसत होते. त्याच्या खालोखाल थोड्याथोड्या भागावर सपाट जमिन




दिसत होती व तेथे अग्नी ठेवल्याप्रमाणे भासत होते.

"हा तर शंखू मांत्रिकाचाच पर्वत असावा. मी तर ह्याच्या अगदी जवळ येऊन पोहोचलो. की, मला तर त्याच्या पुजारूम मधे असलेला शंख हवा आहे. तो कसा प्राप्त करावयाचा बुवा? कारण तो तर त्याच्या नागाच्या गळ्यातील कंठीत ठेवला आहे. नाग तेथील भिंतीवर लटकत असलेल्या खुंट्यावर आहे. मला तर तो शंख चोरून नेऊन कापालिनीला द्यावयास पाहिजे–" शाब्बास पठ्ठे, आता पर्यंतचा प्रवास तर यशस्वी झाला. आता शंख कसा मिळवायचा ही



तर एक मोठी कठीण परिस्थितीच आली!"

चंद्रवर्मा अशा प्रकारे मनातल्या मनात विचार करीत चिंतामग्न झाला. त्याने एक खोल दिर्घश्वास घेतला. जेव्हां तो कापालिनीचा निरोप घेऊन शंख प्राप्त करावयास निघाला. तेव्हां त्याच्यापुढे एकच समस्या उत्पन्न झाली होती की, शंभर योजने लांब असलेल्या त्या पहाडापर्यंत जावयाचे कसे. आता त्या पहाडापर्यंत तर पोहोचलो आता पुढची समस्या शंख कसा मिळवायचा? काहीतरी मार्ग शोधणे प्राप्त आहे. चंद्रवर्मा अशाच काहीशा विवंचनेत

पडला होता. तेव्हां त्याला कानाचे पडदे फाटतील असा कर्कश आवाज ऐकू आला. तो त्याला आश्चर्य भय वाटले. पुन्हां थोड्यावेळाने तश्याच तऱ्हेच्या आवाजानें त्याचे काळीज थरारले तो आवाज आसंमतात घुमला. ह्यावेळेस त्याने तो आवाज कोणाचा असू शकेल हे जाणले त्याच्या चोहोकडे गगनचुंबी असलेल्या वृक्षांच्या शेंड्यावरून ते आवाज येत होते. तेथे अग्नीपक्षी बसलेला होता व त्याचा आवाज होता. काल रात्री गरूड पक्ष्यांच्या बरोबर बोलाचाली करून तो अशाच प्रकारे काहीसा आवाज करीत होता. तो मिळताजूळता होता.

त्याचा आधारावरून त्याने अनुमान काढले की, तो ह्याक्षणी शंखूमांत्रिकाच्या घरापाशी आहे. आणि त्याच्या गुप्तचराच्या कडून त्याला काही अपाय होण्याचा संभव पण आहे. तेवढ्यात त्याला आठवण आली की, दिवसा अग्नीपक्ष्याला काहीही दिसत नाही. त्यामुळे दिवसा ढवळ्यातरी आपल्याला त्या पक्षापासून काही धोका होण्याचा संभव नाही. दुसरे शंखूचे सेवक परंतु त्या शंखूच्या सेवकांकडून शक्यता आहे नां!"

चंद्रवर्मा अशाच काहीश्या विचाराने घालमेल होत होता व भयशंकीत होता.

परंतु त्याने निर्धाराने पुढे मार्गक्रमणाचा आरंभ केला. त्याने एवढेच लक्षात ठेवले की, आपल्याला नेहमी सावध राहिले पाहिजे. अचानक येणाऱ्या संकटांकरता आतापासूनच व्याकूळ होणे समजुतदारपणाचे लक्षण नाही. मग काय हा विचार मनात आणता क्षणीच त्याच्या शरीरात एकाएक अति उत्साह व साहस याची शंका निर्माण होवू लागली.

त्यानंतर चंद्रवर्माने तेथील जंगलात फिरून इकडची तिकडच थोडी फळे खाल्ली सरोवरात पडणारे पाणी प्याले. अशातऱ्हेने तहानभुक भागल्यानंतर चंद्रवर्मा एका उंच वृक्षावर चढू लागला. त्यातल्या त्यात एका मोठ्या फांदीवर तो निर्भयतेन आडवा झाला व विचार करू लागला की, आता अंधार कधी होईल रात्र केव्हां पडेल. तेव्हां त्याने त्यावेळेस असा निर्णय घेतला की अंधार झाल्यानंतरच शंखू मांत्रिकाच्या पहाडावरील घरात जाणे हितकर होईल.

प्रवासानें थकल्यामुळे आणि अति उत्सुकता असल्यामुळे चंद्रर्माला झोप केव्हां लागली ते सुद्धा कळले नाही. सूर्य जरी टळटळीत वर आला तरी आजूबाजूच्या घनदाट झाडांच्या फांद्यामुळे उन्हाचा त्रास त्याला जाणवला नाही. त्यामुळे तो असा काही गाढ झोपला की, रात्र पडली तरी त्याला थांगपत्ता लागला नाही.

बरोबर अर्ध्यारात्रीनंतर चंद्रवर्माने डोळे उघडून पाहिले. तेव्हां सर्वत्र काळोख












माजला होता. जवळच्या सरोरातून काही लहान लहान ध्वनी ऐकू येत होते. झाडाच्या फांद्या वेल हालून एकमेकांना घासत भयंकर आवाज आवाज करीत होत्या. कुठेही माणसांचा काही मागमुस नव्हता.

"असे वाटते, खूप रात्र झाली असावी. आता मला माझे काम संपन्न करण्याची एक चांगली संधी हीच आहे. मी आत्ताच शंखूच्या मंत्रगृहाचा विचार करून टाकतो. असे म्हणत चंद्रवर्मा झाडावरून खाली उतरला त्याने ओळोखेपिळोखे देत आपल्या कमरेत खोचलेल्या म्यानेतील तलवारीकडे दृष्टी टाकली. आणि मग तेथून निघाला. थोडा थोडा पुढे जाऊ लागला.

त्या अंधारात रस्त्यातील जमिनीला टेकणाऱ्या झाडाच्या फांद्या व छोटया मोठया झुडुपांना बाजूला करीत तो पहाडातल्या थोडया दूरपर्यंत धावत गेला. त्या काळोखात त्याची नजर त्या अग्नी-पक्षाला शोधत होती. त्याच्या मनात एकच शंका होती की, आपल्यावर काहीजरी संकट आले तरी ते अग्नीपक्षाकडूनच येईल त्याच्या मनात असा एक विश्वास होता की, तो अग्नीपक्षी जर आजूबाजूला कुठे नसला तर आपण शंखू मांत्रिकाच्या घरात सुरक्षिततेने जावू शकू व तो शंख प्राप्त करू.

चंद्रवर्मा पहाडाच्या पायथ्यापाशी येऊन पोहोचत नाही तो त्याला जवळच्या प्रदेशा-तून एक मोठा कर्णभेदी आवाज ऐकू आला व सोबत "वर्मा" म्हणून कोणी हाका-मारल्याचे ऐकू आले. त्याने दचकत इकडे तिकडे मान वळवून पाहिले त्याला आवाज ओळखीचा वाटला व तो त्या आवाजाच्या रोखाने धावत पुढे आला. बाहेर जाऊन पहातो तो त्याच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही.

चंद्रवर्माला समजले की, तो आवाज कोणाचा आहे? तो "कापालिनी" म्हणत त्या आवाजाच्या रोखाने वेगाने जाऊ लागला. (क्रमश:)



# वराची परीक्षा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! ह्या मध्यरात्री तू हे जे कष्ट घेतो आहेस ते स्वार्था करीता कां? स्वार्थाकरीता असतील तर हि हाती येणारी सफलता कृतवर्मा सारखी दुसऱ्यांच्या हाती सोपवू नकोस. त्याचे एक उदाहरण म्हणून मी तुला कृतवर्मा नावाच्या एका राजाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

स्वर्णपुरचा राजा कृतवर्मा एक तरुण मुलगा होता. तो एकदा शिकारी करीता जंगलात गेला व जंगलात भटकत असतांना वाट चुकला. त्याला अतिशय तहान लागली. त्याच वेळेस त्याची दृष्टी एका



भिल्ल तरुणीवर पडली. तिचे अनुपम सौंदर्य तो पहात राहिला व तहान लागलेली विसरला. ती भिल्ल तरुणी सुद्धा कृतवर्माकडे मुग्ध होऊन पाहू लागली.

काहीवेळाने तो सावध झाला व त्याने त्या मुलीकडे तहान लागली आहे पाणी दे असे म्हटले. त्या भिल्ल मुलीने एका कमळाच्या पानांच्या द्रोणात पाणी भरून आणले सोबत वडिलांना पण घेऊन आली.

कृतवर्माची तहान भागे पर्यंत त्या भिल्ल तरुणीचा पिता शांतपणे पहात उभा राहिला. नंतर त्याने त्यांची माहिती विचारली. राजा कृतवर्मा म्हणाला–"भिल्ल सरदार, माझे ह्या मुलीवर प्रेम बसले आहे जर कां तुम्ही अनुमती दिली तर मी हिच्या बरोबर लग्न करून घेईन व तिला माझ्या राज्याची राणी करीन.

त्यावर त्या भिल्ल युवतीचा पिता म्हणाला–"मी भिल्लांचा राजा आहे! तेव्हां माझ्या मुलीबरोबर जो कोणी विवाह करेल त्याला आमच्या जातीप्रमाणे भिल्लाचा राजा होऊन रहावयास पाहिजे!"

त्या उत्तराने राजाची घोर निराशा झाली. भिल्ल तरुणीला आपली करण्याकरीता त्याला राज्याचा व लोकांचा त्याग करणे केव्हांही संभव नव्हते.

कृतवर्मा विचारात पडला. आता काय करावे? तेव्हां ती तरुणी आपल्या वडिलांना म्हणाली–"बाबा, मला थोडावेळ राजाबरोबर बोलण्याची संधी द्या."

सरदार भिल्लाने संमती दिली. तेव्हां त्या तरुणीने राजाला थोडे दूरवर नेऊन म्हटले–"महाराज, आपण ह्या लग्नाला मान्यता देऊन टाका आणि आपण जेव्हां भिल्लांचा राजा व्हाल तेव्हां तुम्ही दुसऱ्या कोणाला तरी राजा बनवून मला आपल्या राज्यात घेऊन जाऊ शकता!"

राजाला आता मनापासून वाटू लागले की, त्या भिल्ल तरुणीचे सुद्धा आपल्यावर प्रेम आहे. राजाने भिल्ल सरदाराला सांगितले कि मी तुमच्या मुलीबरोबर लग्न करण्यास तयार आहे.

"तर मग मी वराची परिक्षा घ्यावी म्हणतो! भिल्लांचा सरदार त्याला म्हणाला.

"वराची कसली परिक्षा?" कृतवर्माने विस्मयाने विचारले.

भिल्लजातीच्या तरुणी बरोबर विवाह करावयाचा असेल तर मल्लयुद्धांची चढाओढ ठेवली जाते. त्यात जो जिंकतो त्याच बरोबर भिल्ल तरुणींचा विवाह लावून देण्यात येतो. राजाने ती अट मान्य केली.



दुसऱ्या दिवशी त्या चढाओढी ठेवण्यात आल्या राजाला धरून एकूण बाराजण मल्लयुद्धात भाग घेण्यास उपस्थित होते. भिल्ल सरदारने त्याचे दोन भाग केले. कृतवर्माने आपल्या विरुद्ध युद्ध करणाऱ्यांना सर्वांना पराभूत केले. दुसऱ्या गटातील दिपक नावाच्या तरुणांनें आपल्या विरुद्ध लढणाऱ्यांना सर्वांना हरविले. शेवटी दिपक व कृतवर्मा ह्या दोघांच्यात मल्लयुद्ध सुरू झाले.

दिपकला मल्लयुद्धाच्या सर्व खुब्या माहित होत्या. त्यामुळे त्याने कृतवर्माला पराभूत केले. राजा पराजित झाला हे पाहून भिल्ल तरुणीने अत्यानंदानें टाळ्या वाजविल्या व दिपकचे अभिनंदन केले. राजाला ते पाहून अपमानास्पद वाटले.

परंतु थोड्यावेळाने ती भिल्ला तरुणी राजाला एकांत्यत भेटून म्हणाली–"आपण एका राज्याचे राजा आहात तेव्हां आपण आपल्या सैन्यांसह हल्ला करून मला घेऊन जाऊ शकता?"

कृतवर्मा त्याचक्षणाला भिल्ल तरुणांच्या मदतीने राजधानीला निघून गेला.

त्यानंतर राजाने आपल्या दरबारी मल्लयोद्धाला बोलावणे पाठविले व म्हटले–"आज पर्यंत मी अनेक विद्यांचे शिक्षण संपादन केले त्यात मला अद्वितिय यश प्राप्त झाले परंतु आज मी कुस्तींच्या चढाओढीत पराभूत झालो. त्यामुळे मला मल्लविद्येचे असे शिक्षण दे की, माझी



कोणी बरोबरी करू शकणार नाही!" दरबारी मल्लयोद्धाने राजाचे म्हणणे मान्य केले. कृतवर्माने सुद्धा मोठे मन लावून मल्लविद्येचे शिक्षण एका महिन्यात पूर्ण केले. ह्यानंतर त्याने दोनशे कुशल सैनिक बरोबर घेतले व तो त्या भिल्ल सरदारच्या वस्तीत जाऊन पोहोचला व सरदाराला म्हणाला–"जर कां मी मनांत आणले तर आपल्या मुलीला जबरदस्तीने उचलून घेऊन जाऊ शकतो. परंतु मला असे करावयाचे नाही. म्हणून परत एकदा वर परीक्षे करीता चढाओढी ठेवा."

भिल्ल सरदारने तावडतोब चढाओढी-साठी तयारी करविली. ह्यावेळी राजाने मोठ्या कुशलतेने दिपकला मल्लयुद्धात हारवले. व तिला विचारले–"मागच्या खेपेस जेव्हां मी अपयशी झालो तेव्हां तू टाळ्या वाजवून आपला आनंद प्रकट केलास परंतु आता दिपक पराभूत झाल्या-वर तू दुःखी कष्टी कां झालीस?"

ह्यावर भिल्ल तरुणी केविलवाणे होऊन म्हणाली–"माझे दिपकवर प्रेम आहे. मला माहित होते की, मल्लविद्येमध्ये तो आपल्याला पराभूत करू शकणार. त्यावेळी मुद्दामच त्याला अशा करीता वर-परिक्षा ठेऊन उत्साहीत केले की एका देशाचा राजा त्याचे प्राविण्य पाहून आनंदी होईल.

"तर मग तू मला नंतर असा का सल्ला दिलास की, मी सैन्यानिशी येऊन तुला पळवून घेऊन जावे? कृतवर्मा आश्चर्य करीत म्हणाला.

भिल्ल तरुणी शांतपणें म्हणाली–"एका देशाचा राजा माझ्या वरच्या प्रेमाने आपल्या सैन्यानिशी येणार म्हणजे मला केवढा अभिमानास्पद आहे नां! आणि जर कां मला आपण देशाची राणी बनवू इच्छितात तर मला सर्वात जास्त मोठेपणा नाही कां मिळणार तरीही मला दिपक बरोबरच रहावेसे वाटते माझे प्रेम दिपकवर किती गाढ आहे. परंतु आपण तर पुन्हां वरपरिक्षा ठेऊन त्याला पराभूत करून टाकलेत. तेव्हां भिल्ल सरदाराला राजा कृतवर्मा म्हणाला–"तू आपल्या मुलीचे लग्न दिपक बरोबर करूनदे

"महाराज, यश मिळविलेत तेव्हां आमच्या चालीरिती ना अनुसरून माझ्या मुलीशी आपणासच लग्न करावयास हवे." सरदाराने सांगितले.

कृतवर्मा म्हणाला–"वर परिक्षा तर तेव्हांच संपली जेव्हां मी हारलो. तरुणीकरीता वरपरीक्षा एकदाच असते.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, कृतवर्मा तर वरपरीक्षा पास झाला. मग त्याने त्या भिल्ल तरुणी बरोबर विवाह कां केला नाही? त्यांनी तर भिल्ल तरुणी बरोबर विवाह करावयाचा ह्याच हेतूने तर राज्यात परत जाऊन मल्लविद्येचे शिक्षण घेतले नां! मग त्याने आपले विचार कां बदलले? या सर्व शंकाचे समाधान कारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस, तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"वर परिक्षा केवळ एकदाच घेतली जाते ही गोष्ट तर कृतवर्माने सरदाराला सांगितली ही होती. राजाचा एका साधारण भिल्ल युवकाने पराभव करणे म्हणजे राजाला अपमानास्पद आहे. म्हणून कृतवर्माने मोठ्या मेहनतीने मन लावून ती विद्या आत्मसात केली व पुन्हां राजाने त्या भिल्लयुवका बरोबर स्पर्धा ठेवली ती फक्त ताकदीची परिक्षा होती वर परिक्षा नव्हती. ह्या पाठिमागे एक गुढ पण होते. तो भिल्ल युवक आपल्या प्रेमिकेला प्राप्ता करण्याकरीता पुन्हां लढण्यास तयार झाला. तर तो राजाहू-नही जास्त बलवान आहे दाखविण्या करीता तेव्हां सुद्धा मन लावून हे मल्लयुद्ध खेळला नसता, त्यामुळे असे सांगणे ठिक व खरे नाही की, कृतवर्माने आपले यश दुसऱ्याच्या कडे सोपविले.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग झाल्या-मुळे वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि परत झाडाला लोंबकळू लागला. (कल्पित)












# नारळ चोरणारा चोर

एका गावात जुगल किशोर नावाचा एक शेतकरी रहात होता. त्याने एका मगन नावाच्या तरुण मुलाला माळचाच्या कामाकरीता महिना ४ रु पगार ठरवून आपल्या जागेत एक बाग लावली. त्या बागेत बरीच केळी, आंबे नारळ यांची झाडे लावली. भाजीपाला लावला.

हळूहळू बागेत फळभाज्या फोफावू लागल्या. त्यामुळे मगनने दोन रुपये पगारात वाढ मागितली.

"अरे इतक्या लगेच कसे पैसे वाढवून मागतोस! घाई करू नकोस! जरा नारळाला नारळ तरी लागू देत. मग पहातो!" जुगल म्हणाला.

काही दिवसांनी नारळाला खूप मोहोर आला तेव्हां त्याने मालाकाकडे हट्टच केला की आता तरी पैसे वाढवून द्या. "अरे जा रे जा! आता बागेत तुला करण्यासारखे काही कामतरी राहिले आहे कां? आता तर एक पैसा सुद्धा वर मिळणार नाही. तुला पाहिजे तर काम कर नाहीतर चालू लाग" मालक गुर्मीने म्हणाला.

मगनला खराच पेच पडला कारण बागेत जेवढे काम होते ते त्याने सर्व संपवले होते. ही गोष्ट माहीत पडताच मालकाने आपले म्हणणे हाणून पाडले. आजपर्यंत मगन मेहनतीने बागेत राबून काम करीत होता. त्याच्या मनाने आता बागेत चोरी करण्याचा निश्चय केला.

तो रोज रात्री बागेतून दोन नारळ तोडून नेऊ लागला. तीन दिवसाने जुगलला कळले की, बागेतील नारळांची चोरी होत आहे. परंतु त्याला चोराचा शोध लागला नाही. त्यानें मगनला विचारले की तू तर नारळ चोरून नेत नाहीस नां! तेव्हां त्याने आपल्याला काही एक माहीत नसल्याचे स्पष्ट सांगितले.

"ठिक आहे, तर तू एक काम कर. रात्रीच्यावेळी बागेत पहारा देण्याचे व चोराला पकडून देण्याचे काम कर." जुगलकिशोरने त्याला विनविले.

"साहेब, आपण माझा पगार दोन रुपये वाढवून द्या. मी रात्री पहारा देण्याचे व चोराला पकडून देण्याचे काम नक्की करतो." मगनने उत्तर देत म्हटले.

"ते काही चालायचे नाही! मी स्वतःच रात्री पहारा देतो असे म्हणत जुगल-किशोर देवळात जायला निघाला. देवळात पोहोचताच त्याने देवाला सांकडे घातले की, "देवीमाते, नारळाची चोरी करणाऱ्याला जर माझ्या दृष्टीस घालशील तर तुला एका बकरीचा बळी देईन." असे म्हणत त्याने साष्टांग नमस्कार घातला.

त्याचवेळी मगन सुद्धा देवळात देवीचे दर्शन घेण्याकरीता आला होता. त्याने भिंतीआड लपून मालकाचा नवस ऐकला व मालक निघून जाताच देवीला साष्टांग नमस्कार करीत म्हणाला—"देवी मला माझ्या मालकाच्या नजरेपासून वाचवशिल तर तुला मी एका कोंबडयाचा बळी देईन.

त्याच दिवशी मगन अर्धी रात्र उलटल्या-वर बागेत शिरून विहिरी आडच्या एका नारळाच्या झाडावर चढला व एक नारळ तोडून त्याने दूर भिरकावला. त्याने असा विचार करून नारळ लांब फेकला की, जर











मालक खरोखरी बागेत चोराच्या शोधा-करीता जागत बसला असला तर नारळाच्या आवाजाने तो नारळ पडला तेथे जाईल.

परंतु दुर्दैवाने जुगलीकशोरनें आधीच नारळाच्या झाडावर कोणीतरी चढत असतांना पाहिलें होते. त्यामुळे तो काठी व दोरी घेऊन मगन चढला होता त्या झाडा-खाली आला व जोरात ओरडून म्हणाला—"अरे हरामखोर चोरा मला असा धोका देत होतास कां? खाली उतर, तुला ह्याच झाडाला बांधून तुझी चामडी सोलतो बघ!"

मगन भयाने थरथर कांपू लागला व झाडावरच गुपचूप बसून राहिला. त्याचक्षणी झाडावरून कोणी तरी धप्प आवाजा-बरोबर विहीर पडलेला त्याला दिसला.

"अरे चोरा माझ्या डोळ्यात धूळ फेकून विहिरीत उडी मारून माझ्यापासून पळून जायला पाहातोस काय? मी एक निष्णात पोहणारा आहे. असे म्हणत जुगलने विहिरीत उडी मारली. त्याला कोणाचे तरी डोके हाताला लागले परंतु त्याला ते पकडता आले नाही. चोराची चलाख बुद्धी पाहून त्याला अत्यंत अचंबा वाटला.

दुसऱ्या दिवशी पुन्हा जुगल त्या गावदेवीच्या देवळात आला व देवीची प्रार्थना करीत म्हणाला—"हे देवी माते, तू मला धोका दिलास चोर माझ्या हातात यावयाच्या ऐवजी सुटून पळून गेला. मी तुला बकरीचा बळी देणार नाही."

"तू चोर दृष्टोस घालण्याची मला प्रार्थना केलीस मी तुला चोर दाखवून दिला. तू तुझ्या नोकराला सुद्धा दोन रुपये वाढवून न देणारा एक महाकंजूष आहेस. असे असतांना तू मला काय बकरीचा बळी देऊ करणार रे? काय ह्यावर मी विश्वास ठेवू" देवीने पुजारीच्या तोंडी आपले म्हणणे त्याला बोलून दाखविले.

देवीचे बोलणे ऐकल्यावर जुगलच्या डोक्यात प्रकाश पडला. त्याने त्याच दिवशी मगनचा पगार वाढवून दिला ह्यानंतर त्याच्या बागेत पुन्हां कधी चोरी झाली नाही.





# बुद्धिमान पत्नी

केशवगुप्त नावाचा व्यापारी जेव्हां असाध्य रोगानें आजारी पडला व त्या आजारातून त्याची उठण्याची चिन्हे दिसली नाहीत तेव्हां त्याच्या बरोबरीच्या कर्मचाऱ्यानी चुकीचा हिशोब करून त्याला डल्ला दिला व त्याची सर्व संपत्ती लुटली. आपल्या दिर्घकालीन आजारावर उपचार करून घेण्याकरीता केशवगुप्तला घरातील सर्व किमती वस्तू व शेवटी शेवटी आपल्या बायकोचे दागीने सुद्धा विकावे लागले. परंतु तो थोडा आजारातून सुधारला आणि गरीब झाला.

त्या दारिद्रयात सुद्धा त्याने आपले धैर्य खचू दिले नाही आणि कोणाकडून तरी शंभर रुपये उधार घेऊन पुन्हां व्यापार करण्याचा मनाशी निश्चय केला. त्या विचारान्ती तो त्याचा लहानपणचा मित्र जगदीप ह्याच्या घरी गेला.

जगदीपने त्याचे मोठ्या आनंदाने स्वागत केले व सर्व हकिकत ऐकून म्हटले—नारळाच्या झाडावरून नारळ काढणारा व नारळ विकणारा ह्याच्यात जमिन अस्मानाचे अंतर असते. नारळ काढणारा जर झाडावरून खाली पडला तर पुन्हां झाडावर चढण्याचे धाडस करीत नाही. त्याने दुसरा काहीतरी धंदा करावयास पाहिजे.

जगदीपच्या बोलण्यातले मर्म समजून त्याचा राग उफाळून आला परंतु त्याने त्यावर नियंत्रण ठेवत म्हटले—"संकटाला घाबरून जो माणूस आपल्या धंद्यातला हात काढून घेतो. तो माझ्या दृष्टीने एक नंबरचा भेकड असतो तू बरोबरीची गोष्ट काढलीस म्हणून मी एक गोष्ट सांगतो. जरी कां मी झाडावर चढणारा नसलो तरी संकट आले तरी मी नेहमी




सावधानीच बाळगली असती. व्यापाराच्या बाबतीत मी दुसऱ्या कामगारा विषयी यापुढे नेहमी जागरुक रहाण्याचा प्रयत्न करीन.

हे उत्तर ऐकताच जगदीपचे मन बेचैन झाले. तरी सुद्धा त्याने वरवर प्रसन्न चेहरा करीत म्हटले–"केशव, तू तर छान सांगितलेस परंतु सध्यातरी माझा व्यापार म्हणण्याइतका चांगला नाही. एका बाजूने ज्याच्यांकडून मी कर्ज घेतले आहे ते पाठीस लागले आहेत आणि ज्यांच्या कडून किंमत वसूल करावयाची आहे ते देत नाहीत त्यामुळे अशा परिस्थितीत मी तुला शंभर रुपये कुठले उधार देऊ. पाहिजे तर हे सध्या पांच रुपये घेऊन जा. आणि बघ ते परत करण्याची जरुरी नाही."

ह्या गोष्टीवरून त्याने आपल्या मित्रांची परिक्षा केली. त्याने जगदीप कडून मिळालेले पांच रुपये घेतले व तो इतर तीघां मित्रांकडे गेला तेथे ह्याने आपला सविस्तर वृत्तांत ऐकवला. त्या सर्वांनी सुद्धा काहीबाही कारणे सांगून पांच रुपये देऊन त्याला परत न करण्याविषयी सांगून पाठवून दिले.

केशवने शेवट विचार केला की, आपल्याला शंभर रुपये मिळणे अशक्य आहे. आणि तो परत घरी आला व त्याने आपल्या बायकोला घडलेली घटना सांगितली.

वास्तविक गोष्ट ऐकून केशवच्या बायकोला अतिशय दुःख झाले. ती पतीला म्हणाली–"एवढ्या मोठ्या शहरात काय तुमचे चौघेच मित्र आहेत तुम्हीतर इथेच जन्मलात इथेच लहानाचे मोठे झालात व व्यापाराची सुरवात सुद्धा केलीत काय दुसरा कोणी तुम्हांला मित्र नाही?"

केशव थोडा विचार करीत राहिला. नंतर दिर्घश्वास घेत म्हणाला–"माझे बालपणचे मित्र, व्यापाराच्या देवीघेवीतले मित्र असे एकूण चाळीस एक नक्की निघतील."

"तर मग तुम्ही मला त्यांची नावे व पत्ते लिहून द्या!" केशवची बायको म्हणाली.

"ह्यातून फायदा काय? खरे तर तुला काय करायचे आहे ते तर सांग? केशवने अचंबा वाटून विचारले.

"मी काही करणार नाहीत पण जे काय करायचे आहे ते आपला मुलगा हरीगुप्त करेल." केशवच्या पत्नीने सांगितले.

त्या दिवशी रात्री केशवने आपल्या सर्व मित्रांची नावे आठवणीत आणली व त्यांची नावे पत्ते लिहून ती बायकोच्या हातात दिली. दुसऱ्या दिवशी केशवच्या बायकोने आपल्या चौदावर्षाच्या हरीगुप्तच्या हातात तो कागद देत म्हटले–"बाळा, तू ह्या कागदावर लिहिलेल्या नावांच्या माणसांच्या घरी जा आणि त्यांना भेटून वडिलांनी शंभर रुपये उसने मागितले आहेत म्हणून सांग आणि ते द्यावयास तयार झाले तर वडील येऊन घेऊन जातील असे सांग!"

त्याच दिवशी संध्याकाळी हरीगुप्त एक पिशवी भरून पैसे घेऊन घरी परत आला.

केशवला आश्चर्याचा धक्का बसला. त्याने आपल्या मुलाला विचारले तेव्हां हरीगुप्त म्हणाला–"बाबा, आपल्या कोण-त्याही मित्राकडे उधार द्यायला शंभर रुपये नाहीत. परंतु प्रत्येकाने असे मनात योजून कोणी दहा तर कोणी पांच रुपये दिले की, तुझे वडील पूर्ववत व्यापार सुरु करू देत व हे पैसे परत न करण्याविषयी सुद्धा त्या सर्वांनी निक्षून मला सांगितले व बजावले.

केशवने आपल्या पत्नीच्या चार्तुयाची तारीफ केली ह्यानंतर त्याने हरीगुप्तच्या हातून पिशवी घेऊन पैसे मोजले तेव्हां त्यात एकूण चारशे रुपये निघाले. त्याला आनंद झाला.

त्या पैशाने केशवने एक छान धंदा सुरु केला व पांच सहा वर्षाच्या आत तो आपल्या पूर्वस्थितीला आणला.





# वैराग्य

प्राचीन काळी काशी येथे ब्रह्मदत्त नावाचा राजा राज्य करीत होता. तेव्हां त्याच वेळेस विदेह राज्याची राजधानी मिथिला नगरावर राजा महाजनक राज्य करीत असे. त्याला अरिष्टजनक आणि पोलजनक नावाचे दोघे मुलगे होते.

महाजनकाच्या मृत्यु नंतर अरिष्टजनकचा राज्याभिषेक झाला. त्याने आपला लहान भाऊ पोलजनकला युवराज केले.

परंतु थोड्या दिवसांने अरिष्टजनकला गुप्तहेरांकडून असे समजले की, आपला धाकटा भाऊ पोलजनक आपला वध करून स्वत: राजा बनू पहात आहे. परंतु अरिष्टजनकाने त्याची उपेक्षा केली व त्या बातमीकडे जाणूनबुजून दुर्लक्ष केले.

आपल्या मोठ्या भावाच्या बेजबाबदारपणाचा उपयोग करून पोलजनकने थोडे सैन्य तयार केले व मोठ्या भावावर षडयंत्राने चाल करून जाऊन त्याला युद्धात ठार मारले.

अरिष्टजनक मरताना त्याची पट्टराणी गर्भवती होती. आपल्या पतीच्या मरणाची बातमी कळताच तीने आपले सर्व दागदागीने अंगावरून उतरवले व ते एका टोपलीत ठेवून त्यावरून थोडा भुसा टाकून बंद केले. आणि नंतर स्वत: मळकट कपडे परिधान करून ती टोपली डोक्यावर घेऊन ती रस्त्याने निघाली. वाटेवर तिला कोणीही ओळखू शकले नाही. ती उत्तरेकडच्या दाराने बाहेर पडून शहराच्या बाहेर निघून गेली. ती चालून खूप थकली परंतु राणीला आता समजेना की, कोठे जावे. कारण ती महालातून कधीही बाहेरच आली नव्हती. तीने ऐकले होते की, कालचंपा नावाचे नगर कुठेतरी आहे. त्यामुळे ती तेथंच असलेल्या झाडाखाली टोपली ठेवून बसली व येणाऱ्या जाणाऱ्या पैकी लोकांना विचारू लागली—"दादा साहेब, कालचंपा नगराला जाणारा रस्ता कुठून जातो? मला सांगता कां? परंतु तिला कोणीही रस्ता सांगू शकला नाही." ती बिचारी गोंधळून गेली.

शेवटी एक बैलगाडीवाला त्या रस्त्याने जात होता. त्याने तिला विचारले—"मुली, मी कालचंपा नगरला जात आहे. तुझे दिवस पूर्ण भरलेले दिसताहेत वाटते. त्यामुळे मी बैलांना हळू हांकीत नेईन तू माझ्या गाडीत चढ. राणी गाडीत चढून बसली व कालचंपा नगरात पोहोचली. गाडीवाल्याने राणीला हमरस्त्यावर सोडले व तो निघून गेला राणीला समजेना की आता कुठे जावे! त्यामुळे ती रस्त्याचा कडेला बसून राहली रस्त्यावरून येणाऱ्या-जाणाऱ्या लोकांकडे विचित्र नजरेनें पहात राहली.

थोड्यावेळाने एक ब्राह्मण आपल्या शिष्यांसमवेत नदीवर स्नानास जाण्यास निघाला. त्याने रस्ताकडेला बसलेल्या गर्भवती बाईला पाहिले व त्याने शिष्यांना तेथेच थांबायला सांगितले व तो त्या बाईच्या जवळ गेला व त्याने तिला काय झाले ते विचारले.



"दादा, मी मिथिलानगरची राणी आहे-माझ्या पतीला युद्धात वीरगती प्राप्त झाली व मी अनाथ झाले. माझ्या ओळखीचं इथे कोणी नाही. ह्या गावात मला कोणी माहितीचा नाही मला कोठे जावे ते सुचत नाही." राणीने त्या ब्राह्मणाला सांगत म्हटले.

"तुला माझ्या घराचा आसरा घ्यावयास हरकत नाही. परंतु त्या पूर्वी तुला एक सोंग करावयास पाहिजे माझ्या पायावर पडून तू छाती पिटून पिटून रडाव म्हणजे ते माझ्या शिष्यांच्या कानावर पडेल. मी तुझी गोष्ट नेहमी करीता गुप्त ठेवेन व तुझे रक्षण करेन" ब्राह्मण म्हणाला.









राणी ब्राह्मणाने सांगितल्या प्रमाणे करावयास तयार झाली. कोणी बाई आपल्या गुरुंच्या पायावर पडून रडण्याचा आवाज बाजूला असलेल्या शिष्यांनी ऐकला व ते तावडतोब जवळ जात विचारू लागले–"गुरुदेव ह्यांना काय झाले आहे? तेवढ्या अवधीत रस्त्यावरून जाणारे येणारे बरेच लोक तेथे जमले त्यांनी सर्वांनी त्या बाई विषयी चौकशी केली तेव्हां ब्राह्मणानी त्या लोकांना असे सांगितले.

"हि माझी सर्वांत लहान बहिण आहे. मी जेव्हा माझे गाव सोडून इथे आलो त्यानंतर हिचा जन्म झाला. त्यामुळे आज-पर्यंत मी हिला पाहिले नव्हते. व तिने मला पाहिले नव्हते.

ब्राह्मणाच्या बोलण्यावर सर्वांनी विश्वास केला ब्राह्मणाने तिला आपल्या घरी नेले. तिला स्नान करावयास सांगून जेवण दिले. काही दिवसाने तिने एका मुलाला जन्म दिला. राणीने आपल्या बाळाचे नामकरण करून आपल्या सासऱ्याचे नांव 'महाजनक' त्याला ठेवले. हाच मुलगा म्हणजे बोधिसत्व होय.

महाजनक हळूहळू लहानाचा मोठा होवू लागला. त्याच्या बरोबर खेळणारे क्षत्रिय-कुमार नेहमी त्याची अवहेलना करीत असत. त्यामुळे चिडून जाऊन तो सर्वांना हाणामार करीत असे. ती सर्व मुले रडत घरी जात व आपल्या आईकडे तक्रार करीत की त्या विधवा पुत्राने आम्हांला मारले. तू त्याला रागव. जेव्हां महाजनकला समजले की, आपल्या काकाने राज्याच्या अभिलाषाने युद्धांत आपल्या वडिलांना ठार मारून राज्य प्राप्त केले तेव्हां त्याच्या मनात तिव्रतेने राज्य परत हस्तगत करण्याची इच्छा उत्पन्न झाली. वयाच्या सोळाव्या वर्षी त्याने आपले शिक्षण पूर्ण केले व आपल्या आईला म्हणाला–"आई, मी विदेह राज्यावर अधिकार प्राप्त करून राज्यकारभार करीन. काय तुझ्यापाशी काही धन आहे कां? राणीने बरोबर आणलेल्या टोपलीतील दागीने त्याला दाखविले. त्यातील फक्त अर्धे दागदागिने घेऊन तो मिथिला नगरास जाण्यास निघाला.

बरोबर त्याच सुमारास पोलजनक राजाला अर्धांगवायुचा झटका आला व त्याने अंथरुण धरले महाजनकने ज्याक्षणी मिथिला नगराच्या वेशीत पाय टाकला तेव्हां त्याक्षणाला पोलजनकचा देहान्त झाला.

पोलजनकला कोणीही वारस नव्हता. राजपुरोहितानीं एका रथावर राजमुगुट, राजछत्र, राजदण्ड पादुका वगैरे ठेऊन रथ राजमार्गाने चालविला. अन्य पुरो-हित व मंत्री त्याच्या पाठीमागे जाऊ लागले.

रथ थोडा पुढे जाऊन एके ठिकाणी थांबला जेथे महाजनक विश्रांती करीता बसले होते.








राजपुरोहिताने महाजनकला निट निरखून पाहिले व ओळखले की याच्या देहावर राजलक्षण दिसते आहे. तेव्हां विदेह राज्याचा राजा त्याला बनविण्यात आले. त्याचा राज्याभिषेक केला. थोड्या दिवसाने महाजनकने सीवली देवी नावाच्या मुली बरोबर लग्न केले व राज्य कारभार सांभाळू लागला. त्यांना दिर्घायु नावाचा एक मुलगा झाला.

काही दिवस लोटले एकदा महाजनकला उद्यान पहाण्याची इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां तो हत्तीवर स्वार होऊन निघाला. उद्यानात शिरता क्षणीच त्याला समोर सुंदर दोन आंब्याचे वृक्ष दिसले ते दोन्ही वृक्ष पानांनी गच्च भरलेले दिसत होते. त्यातील एकावर खूप आंबे लागले होते. दुसऱ्यावर एक सुद्धा नव्हता. राजाने जवळ जाऊन त्यातील एक आंबा तोडला व खाल्ला त्याला तो चांगला स्वादिष्ट लागला. तेव्हां राजाने विचार केला की, परते वेळी आणखी तोडून खावेत.

राजा जसा पुढे गेला. तसा त्याच्या कुटुंबातील सर्व उद्यानात शिरली व धाई-धाईने सर्वांनी आंबे तोडून खाल्ले. तेवढ्या धाईगर्दीत बऱ्याच जणांनी त्याच्या फांद्या व पानें सुद्धा तोडली. त्यामुळे तो सुंदर दिसणार वृक्ष एकदम ओका बोका वाटू लागला.

राजा सर्व उद्यान फिरून परत आंब्याच्या आशेने तेथे आला व त्या एकदम उजाड दिसणाऱ्या वृक्षाकडे पहात आश्चर्य चकित झाला. त्याच्या शेजारी फळ नसलेला वृक्ष तेवढाच सुंदर दिसत होता.

महाजनक आपल्या मनामध्ये विचार करू लागला—"हा माझ्यासारख्याला एक चांगला धडा आहे. राज्यातील सारे वैभव ह्याच एका फळवृक्षासारखे आहे. संन्यास त्या फलहीन वृक्षासारखा आहे. ह्या वृक्षाला सोडण्याचा कोणी एक प्रयत्न करणार नाही मी सर्व वैभवाचा त्याग करून संन्यास घेईन. (पुढील अंकी समाप्त)





आपल्या नद्या :

# विपाशा

कल्मषपाद नावाचा राजा एकदा घोड्यावर स्वार होऊन अरण्यमार्गाने जात होता. तो रस्ता भयंकर अरुंद-खाच खळगे काट्याकुट्यांनी भरलेला होता. त्यावेळेस शक्ति नावाचा मुनी-कुमाराने त्याला बाजूला सरकून आपल्याला जाण्यास वाट देण्याविषयी सांगितले.

"साधू संन्याशा विषयी श्रद्धा-भक्ति दाखविणे हे राजा लोकांचे कर्तव्य आहे. त्यामुळे तूच बाजूला जाऊन मला रस्ता मोकळा करून दे." मुनी कुमार म्हणाला. ते ऐकून राजा कल्मषपादला अत्यंत राग आला. व त्याने हातातल्या चाबकाने त्याला मारले.





राजाचा अत्याचार पाहून मुनी-कुमारला आश्चर्य वाटले. परंतु थोड्या-वेळाने स्वतःला सांभाळत त्याने त्याला शाप देत म्हटले—"तू राक्षसी वृत्तीचा आहेस. त्यामुळे राज्य करण्यास अयोग्य नालायक आहेस म्हणून तू राक्षस होशील!" दुसऱ्या क्षणी राजाचे राक्षसाच्यात परिवर्तन झाले.









मुनीकुमार शक्ति दुसरा कोणी नव्हता. महामुनी वशिष्ठ यांचा जेष्ठ पुत्र होता. वशिष्ठ मुनींच्या बद्दल विश्वामित्र परम शत्रु भाव ठेवत असत. त्यामुळे विश्वामित्रानीं राक्षस रूपात असलेल्या कल्मषपादच्या आत एका भूताचा प्रवेश करविला. भूताच्या प्रभावाने राक्षस-रूपी कल्मषपादने एक दिवस मुनी-मुनीकुमार शक्तिला गळा दाबून ठार केले.

कल्मषपाद त्यानेही संतुष्ट झाला नाही. तेथून सरळ महामुनी वशिष्ठ यांच्या आश्रमात गेला. त्यावेळी वशिष्ठ मुनी तेथे नव्हते. परंतु त्याने तेथे असलेल्या सर्व निशस्त्र वशिष्ठ पुत्रांना ठार केले व मुनींच्या आश्रमाला आग लावली.





ह्यानंतर थोड्यावेळाने वशिष्ठ महा-मुनी आश्रमात परत आले. आपले मेलेले पुत्र व जळालेला आश्रम पाहून आश्चर्य करू लागले. त्यांना अत्यंत दुःख झाले. तरीही आपले नशिब वाईट म्हणून त्यानीं कोणा बरोबर प्रतिकार केला नाही.

पुत्रशोकाने ग्रासलेल्या वशिष्ठ महा-मुनींनी आपल्या प्राणांचा त्याग करण्याचा दृढ संकल्प केला. ते एका पर्वताच्या शिखरावर चढून गेले. आणि तेव्हांच उगम पावत असलेल्या नदीच्या प्रवाहात त्यांनी उडी मारली.





वशिष्ठ मुनी नदीत पडले परंतु त्या पाण्याच्या प्रवाहा बरोबर वहात गेले नाहीत. आणि त्यांच्या चोहोबाजूला तेव्हां पाणीही नव्हते. ते मऊ रेतीत उभे होते. त्यांनी मनात जाणले की, त्या करुणामय नदीमातेने आपल्याला वाचवले.

तसाच त्यांनी मरून जाण्याचा प्रयत्न चालू ठेवला. आणि त्या नदीच्या काठाने ते चालत चालत अशा जागी पोहोचले की, जेथे नदी खूप खोल खळाळती होती. त्यांनी आपले हात पाय बांधले व आपले शरिर नदीत लोटून दिले.





नदीत पडता पडता त्यांचे हात पाय एकाएकी सुटून मोकळे झाले. नदीच्या प्रवाहांनी त्यांचे हातपायच सोडवले नाहीत तर त्यांची आपल्या थंडगार पाण्याने थकावट दूर केली व त्यांना आराम दिला.

त्याच वेळी वशिष्ठना शक्तिची बायको आपली सुन नदीच्या काठांवर उभी राहून केविलवाणे अक्रोश करत असलेली दिसली. तेव्हां वशिष्ठांना आठवण झाली. की ती पूर्ण महिन्याची गर्भवती आहे. व ती लवकरच आपल्याला एक नातू देणार आहे. काही नाही तरी आपल्याला नातवाकरीता तरी जगणे भाग आहे. असा निश्चय करून ते नदीतून बाहेर आले.





ह्या नविन नदीला आपल्या बद्दल प्रेमभाव-दया मातृतुल्य प्रेम आहे पाहून वशिष्ठना आनंद दोन बोटे राहिला. आपल्या भक्ताचे पाश केल्यामुळे ह्या नदीचे त्यांनी नामकरण केले "विपाशा" आज सुद्धा विपाशा नदीत स्नान करणे म्हणजे लोक आपल्या भाग्याची गोष्टच मानतात.



# मूर्ख राजा

तारुण्यात आलेला जयवर्मा आपल्या वडिलांच्या मृत्यु नंतर विक्रमपुरचा राजा बनला. तो मोठा तेजस्वी व पराक्रमी होता. कोणत्याही गोष्टीत उशिर व बेजबाबदारी त्याला सहन होत नसे.

एके दिवशी जयवर्मा आपल्या नगरातील राजपथावरून बागेत विहार करण्यासाठी चालत जात असतांना त्याची नजर एक गृहस्थ आपल्या मुलाला रागावत असलेल्यावर पडली. तो म्हणत होता–"अरे मूर्खा, तुला गुरुकुलात विद्याभ्यास करावयास पाठविण्यात मी मोठी चुक केली. तू पुस्तकी ज्ञान तर प्राप्त केलेसच परंतु तुला व्यवहार ज्ञानाविषयी काडी इतकी अक्कल आली नाही. त्याउलट तू एक नंबरचा आळशी बनला आहेस. तुला इकडे काही शेतीभाती करण्याकरीता किंवा तिकडे काही नोकरी चाकरी करण्यातकी सुद्धा लायकी राहीली नाही. तुला पहिल्यावरच समजून येते की, गुरुकुलातील अभ्यास काही कामाचा नाही!"

वडिलांचे रागावणे ऐकले न ऐकल्या सारखे करून त्याचा मुलगा कढड्यावर पुस्तकात डोके खुपसून वाचीत बसला होता.

जयवर्माला त्या मुलाच्या वागण्यामुळे विचार आला व त्याच्या मनांत एकच गोष्ट घर करून राहिली की, गुरुकुलात असेच आळशी व मुर्ख विद्यार्थी तयार होतात. त्यामुळे सर्व गुरुकुले बंद करून अशा नगरात वाढणाऱ्या नालायकांची संख्या कमी करता येईल. व संकटापासून राज्याला वाचवता येईल. जयवर्माने तावडतोब दुसऱ्या दिवशी सर्व गुरुकुले व त्याच्या पाठशाळा बंद करण्याची दवंडी पिटविण्याची आज्ञा केली.

काही महिने उलटले एकदा जयवर्माचा दरबार भरला होता. त्याच वेळेस एक